नियंता नारायण ॥ नेणूनि छळूं गेलीं आपण ॥ यापुढती पुनरागमन ॥ सर्वथा जाण करवेना ॥ २३ ॥ मागें न निघवे निश्चितें ॥ ऐसें जाणोनि समस्तें ॥ थोर गजबजिलीं तेथें ॥ भयचकितें व्याकुळ.॥ २४ ॥ जाणोनि नारायणप्रताप ॥ आतां कोपून देईल शाप ॥ येणें धाकें म्लानरूप ॥ अति सकंप भयभीतें ॥ २५ ॥ ऐशी देखोनि त्यांची स्थिती ॥ कृपेनें तुष्टला कृपामूर्ती ॥ अणुमात्र कोप न ये चित्तीं ॥ अभिनव शांती नारायणाची ॥ २६ ॥ इंद्रें केला अपराध ॥ तरी नारायणासि न येचि क्रोध ॥ बाप निजशांती अगाध ॥ न मानी विरुद्ध कामादिकांचें ॥ २७ ॥ न येचि कामादिकांवरी कोप ॥ इंद्रास ही नेदीच शाप ॥ नारायणाच्या ठायीं अल्प ॥ कदा विकल्प नुपजेची ॥ २८ ॥ अपकाऱ्यावरी जो कोपला॥ तो तत्काळ कोपें नागविला ॥ अपकाऱ्या जेणें उपकार केला ॥ तोचि लाधला परमार्था ॥ २९ ॥ अपकाऱ्या उपकार करिती ॥ त्याचि नांव गा परमशांती ॥ ते शांतीची निज स्थिती॥ दावी लोकांप्रती आचरोनी ॥ ३० ॥ परमार्थाची मुख्यत्वें स्थिती ॥ पाहिजे गा परम शांती ॥ ते शांतीची उत्कट गती ॥ दावी लोकांप्रती आचरोनी ॥ ३१ ॥ भयभीत कामादिक ॥ अप्सरागण साशंक ॥ त्यांतें अभयदानें सुख ॥ देऊनिया देख नारायण बोले ॥ ३२ ॥ अहो कामवसंतादिक स्वामी ॥ कृपा करून आलेत तुम्ही ॥ तुमचेनि पदागमीं ॥ आश्रमभूमि पुनीत झाली ॥ ३३ ॥ तुमचें झालिया आगमन ॥ अवश्य करावें आम्हीं पूजन ॥ हेंचि आमुचें अनुष्ठान॥ कांहीं बळिदान अंगीकारा माझें ॥ ३४ ॥ अहो अप्सरा देवकांता ॥ तुम्ही भिऊं नका सर्वथा ॥ येथें आलिया समस्ता ॥ पूज्य सर्वथा तुम्ही मज ॥३५ ॥ आश्रमा आलिया अतिथी ॥ जे कोणी पूजा न करिती ॥ त्यांची शून्य पुण्यसंपत्ती ॥ आश्रमस्थिति शून्य होय ॥ ३६ ॥ तुम्हीं नांगीकारितां पूजन ॥ कांहीं न घेतां बळिदान ॥ गेल्या आश्रम हा होईल शून्य ॥ यालागीं कृपा करून पूजा घ्यावी ॥ ३७ ॥ आश्रमा आलिया अतिथी ॥ तो पूज्य सर्वांस सर्वार्थी ॥ अतिथी आश्रमीं जे पूजिती ॥ ते आश्रमकीर्ती शिव वानी ॥ ३८ ॥ व्याही रुसलिया पायां पडती ॥ तेवीं विमुख जातां अतिथी ॥ जे वंदूनियां सुखी करिती ॥ ते सुख पावती

१ माठा. २ पूजाद्रव्य.

स्वानंदें ॥ ३९ ॥ ज्याहीं रुसलिया कन्या न धाडी ॥ अतिथी रुसलिया पुण्य जोडी ॥ पूर्वापर जें कां जोडी ॥ तेही रोकडी क्षय पावे ॥ ४० ॥ वैकुंठीं ज्याची निजस्थिती ॥ तो त्या आश्रमा ये नित्य वस्ती ॥ जे आश्रमीं अतिथी ॥ पूजिती प्रीती ब्रह्मात्मभावें ॥ ४१ ॥ ऐसें बोलिला तयांप्रती ॥ परी माझी हे अगाध शांती ॥ हेही नारायणाचे चित्तीं ॥ गर्वस्थिती असेना ॥ ४२ ॥ ऐक राया अति अपूर्व ॥ असोनि निजशांती अनुभव ॥ ज्याच्या ठायीं नाहीं गर्व ॥ तोचि देवाधिदेव निश्चयेंसी ॥ ॥४३॥ जो नित्य नाचवी सुरनरांसी ॥ ज्या भेणें तप सांडिलें तापसीं ॥ त्या अभय देवोनि कामक्रोधांसी[१] ॥ आपणापासीं राहविलीं ॥ ४४ ॥ एवं अभय देत नारायण ॥ स्वमुखें बोलिला आपण ॥ तेणें कामादि अप्सरागण ॥ लाजाविरोन अधोमुख झालीं ॥ ४५ ॥ देखोनि निर्विकार पूर्ण क्षमा ॥ श्रीनारायण हा परमात्मा ॥ कळों सरलें वसंतादिकामां ॥ त्याचाचि महिमा वर्णिती स्वयें ॥ ४६ ॥ ऐके नरदेवचक्रवर्ती ॥ विदेहा सार्वभौमा भूपती ॥ त्या नारायणाची निजस्तुती ॥ कामादि करिती सद्भावेंसी ॥ ४७ ॥ जे सदा सर्वांतें छळिती ॥ त्यांहीं देखिली पूर्ण शांती ॥ तेचि शांतीची स्तुती करिती ॥ नारायणाप्रती कामादि क्रोध ॥ ॥ ४८ ॥ जेणें संतोषे श्रीनारायण ॥ त्यासी कृपा उपजे पूर्ण ॥ ऐशिया परीचें स्तवन ॥ मांडिलें संपूर्ण परमार्थबुद्धी ॥ ४९ ॥ जयजय देवाधिदेवा ॥ तुझिया अविकारभावा ॥ पाहतां न देखों जी सर्वा ॥ देवां मानवां माझारी ॥ ५० ॥ मज कामाचेनि घायें ॥ ब्रह्मा[२] कन्येसि धरूं जाये ॥ पराशरा[३] केलें काये ॥ भोगिली पाहे दिवा दुर्गंधा ॥ ५१ ॥

---

१ कळून आलें. २ ब्रह्मदेव आपली कन्या सरस्वती हिचें रूप पाहून मोहित झाला, आणि तिला धरावयास गेला; हें पाहून मरीचिवगैरे ऋषि जवळ होते त्यांनीं ही गोष्ट सृष्टिक्रमविरुद्ध व अनुचित असें सांगून त्यास मागें फिरविलें. अशी कथा आहे ( भाग० स्कं० ३ अ० १२). ३ एकदां पराशर ऋषि हा तीर्थयात्रेच्या निमित्तानें फिरत फिरत यमुनातीरीं आला. नावेंतून उतारकरांस परतीरीं पोंचविण्याकरितां कोळ्यानें आपण बाळगिलेली सत्यवती नांवाची व दुर्गंधा मुलगी तेथें ठेविली होती. ती रूपवती होती. तिला पाहून पराशर हा काममोहित झाला, आणि त्यानें तपाच्या सामर्थ्यानें तिला सुगंध करून दिवसास अंधार पाडून भोगिलें. अशी कथा आहे. ( भारत० आ० प० अ० ६३ ).

ज्यातें योगी वंदिती मुगुटीं ॥ तो तापसांमाजी धूर्जटी ॥ तो शिव[1] लागे मोहिनीपाठीं ॥ फिटोनि लंगोटी वीर्य द्रवलें ॥ ५२ ॥ विष्णु रुद्रें[2]च्या स्मशानीं ॥ धरणें बैसे विषयग्लानी ॥ अहल्येची काहणी ॥ वेदीं पु[3]राणीं वर्णिजे ॥ ५३ ॥ नारद नायके माझी गोष्टी ॥ त्यासी जन्मले पुत्र[4] साठी ॥ माझी साहों शके काठी ॥ ऐसा बळिया सृष्टी असेना ॥ ५४ ॥[5] जो ब्रह्मचाऱ्यांमाजी राजा ॥ हनुमंत मिरवी पैजा ॥ तयास्तव मकरध्वजा ॥ संगविण वोजा जन्मविला म्यां ॥ ५५ ॥ कलंकिया[6] केला चंद्र ॥ भगांकित[7] केला इंद्र ॥ कपाटीं[8] घातला षण्मुखवीर ॥ जो लाड-

---

१ विष्णूनें मोहिनीरूप धरून दैत्यांस मोहित करून देवांस अमृत पाजिलें, असें शंकरानें ऐकून कैलासाहून भूतगणासहवर्तमान विष्णूपाशीं येऊन त्याची स्तुति करून तें मोहिनीरूप आपणास दाखविण्याविषयीं विनंती केली. तेव्हां विष्णु बरें म्हणून अंतर्धान पावला व मोहिनी होऊन प्रकट झाला. तिला पाहून शंकर मोह पावला, आणि पार्वतीस सोडून तिच्या पाठीमागें धांवला, अशी कथा आहे. ( भा० स्कं० ८ अ० १२ ). २ उमारमासंवाद पहा. ३ मोरोपंत—स्फुट आर्या—आर्या १४ वी पहा. ४ एकदा विष्णु आपली माया नारदास दाखविण्याकरितां त्यास घेऊन एका सरोवराचे तीरीं गेला आणि त्यास म्हणाला, ह्यांत स्नान कर. तें करितांच नारद स्त्री (नारदी) झाला. तिला एका राजानें वरिलें. त्यापासून तिला पुष्कळ संतति झाली; अशी कथा देवीभागवतांत आहे. दुसरे ठिकाणीं अशी कथा आहे कीं, कृष्णाचे सांगण्यावरून नारद एका सरोवरांत स्नान केला असतां स्त्री झाला. तिला कोणे एका कोळ्यापासून साठ पुत्र झाले, व एक कन्या झाली. ते पुत्रच साठ संवत्सर होत; व ती कन्या कपिलाषष्ठी होय. ५ लंका जाळल्यावर मारुती आपलें पुच्छ विझवावयासाठीं समुद्रतीरीं गेला, तेव्हां त्यानें पाण्यांत एक खाकरा टाकिला, तो एका मकरीनें गिळिला. तिला त्यापासून गर्भ राहून मकरध्वज नांवाचा पुत्र झाला. अशी कथा आहे. ६ चंद्र हा गुरुपत्नीशीं ( तारेशीं ) रत झाला. हा त्यास कलंक लागला. ७ इंद्रानें गौतमऋषीची बायको अहल्या ही कपटानें भोगिली; हें गौतमास समजतांच त्यानें इंद्रास तुझ्या अंगास हजार छिद्रें ( भगें ) पडतील असा शाप दिला. अशी कथा रामायणांत आहे. ८ एकदा पार्वतीनें कार्तिकस्वामीस म्हटलें कीं, तूं लग्न कर. तेव्हां त्यानें तिला बायका कशा असतात म्हणून विचारिलें. तेव्हां ती म्हणाली, मजसारिख्या असतात; हें ऐकून स्कंद म्हणाला, बरें आहे आजपासून जितक्या स्त्रिया तितक्या मला तुजसारख्याच आहेत. मला लग्न नको, असें म्हणून तो स्त्रियांचें दर्शन होऊं नये व निर्वेध तप करावें म्हणून एकीकडे गुहेंत जाऊन बसला. अशी स्कंदपुराणांत कथा आहे.

का कुमर महेशाचा ॥ ५६ ॥ मज मन्मथाचा यावा[1] ॥ न साहवे देवां दानवां ॥ मग तेथें इतरा मानवां ॥ कोण केवां सहावयासी[2] ॥ ५७ ॥ मज जाळिलें महेशें ॥ त्यासि म्यां अनंगें केलें पिसें ॥ नवल धारिष्ट तुझ्या ऐसें ॥ पाहतां न दिसे तिहीं लोकीं ॥ ५८ ॥ त्या मज कामानें सरतें केलें ॥ शांतीचें कल्याण पाहिलें ॥ हें तुवांचि एकें यश नेलें ॥ स्वभाव जिंकिले निज शांतियोगें ॥ ५९ ॥ तो मी न सरता केला काम ॥ क्रोधा आणिला उपशम ॥ वासनेचा संभ्रम ॥ नित्य निर्भ्रम त्वां केला ॥ ६० ॥ हे नारायणा तुझी निष्ठा ॥ नये आणिका तपोनिष्ठा ॥ केला अनुभवाचा चोहटा ॥ शांतीचा मोठा सुकाळ केला ॥ ६१ ॥ मागें तपस्वी वाखाणिले ॥ म्हणती कामक्रोधां जिंकिलें ॥ त्यांसिही आम्हीं पूर्ण छळिलें ॥ ऐक तें भलें सांगेन ॥ ६२ ॥ कपिला ऐसा तेजोराशी ॥ क्रोधें तत्काल छळिलें त्याशी ॥ शाप देतांचि सगराशी[3] ॥ तोही क्रोधासी वश्य झाला ॥ ६३ ॥ कोप आला नारदासी[4] ॥ वृक्ष केलें नलकूबरांसी ॥ गौतमें[5] अहल्येसी ॥ कोपें वनवासी शिळा केली ॥ ६४ ॥ जो सर्वदा विघ्नातें आकळी ॥ त्या विघ्नेशातें कोप छळी ॥

१ आगमन. २ सामर्थ्य. पाड. ३ सूर्यवंशांतील सगर राजानें यज्ञसंबंधी घोडा पृथ्वीवर फिरावयास सोडिला, आणि त्याचे संरक्षणार्थ आपले साठ हजार मुलगे बरोबर पाठविले. वाटेंत इंद्रानें तो घोडा चोरून विवरांत कपिलमहामुनि ध्यानस्थ होता त्याच्या जवळ बांधून ठेविला. तेव्हां एकाएकी घोडा काय झाला म्हणून पहावयास ज्या जागीं घोडा अदृश्य झाला ती जागा सगरपुत्रांनीं उकरिली, तों तो घोडा कपिलाशेजारीं दृष्टीस पडला. तेव्हां हाच आपला घोडा चोरणारा असें त्यांस वाटलें. नंतर त्यांच्या गडबडीनें ध्यानविसर्जन करून कोपानें कपिलानें डोळे उघडून त्यांजकडे पाहतांच ते भस्म झाले. अशी कथा रामायणांत आहे. ४ नलकूबर व मणिग्रीव म्हणून कुबेराचे दोन पुत्र होते. ते एकदा मद्यप्राशन करून आपल्या स्त्रियांसहवर्तमान भागीरथींत नग्न जलक्रीडा करीत असतां, तेथून नारद जात होता त्यास पाहतांच बायकांनीं लाजून वस्त्रपरिधान केलें; परंतु त्या दोघांनीं मदोन्मत्तपणामुळें तसें केलें नाहीं. तेव्हां नारदास क्रोध येऊन त्यानें तुम्ही वृक्ष व्हा असा त्यांस शाप दिला; ( भाग० द० स्कं० पू० अ० १०). ५ मोरोपंत, स्फुट आर्या यांवरील टीप पहा. ६ चंद्राला आपल्या रूपाविषयीं मोठा गर्व होता. तो एकदा गणपतीकडे पाहून त्याच्या रूपाच्या बेढबपणामुळें त्यास हांसला, तेव्हां गणपतीस कोप येऊन त्यानें चंद्रास तुजकडे कोणीही पाहणार नाहीं असा शाप दिला. मग चतुर्थीव्रताचरणानें चंद्र शापमुक्त झाला. अशी कथा स्कंदपुराणांत आहे.

तेणें अति कोपें कोपानळीं ॥ चंद्रासि तत्काळीं दिधला शाप ॥ ६५ ॥ कोप आला दुर्वासासी[1] ॥ शाप दीधला अंबरीषासी ॥ देव आणिला गर्भवासासी[2] ॥ क्रोधें महाऋषी छळिले ऐसे ॥६६॥ जे दुजी सृष्टी करूं शकती ॥ तेही कामक्रोधें झडपिजेती ॥ सागरीं पडे इंद्रसंपत्ती[3] ॥ हे क्रोधाची ख्याती पुराणप्रसिद्ध ॥ ६७ ॥ इतरांची गोष्टी कायसी ॥ क्रोधें छळिलें ईश्वरासी[4] ॥ तेणें दीक्षिता द्विज-दक्षासी॥ शिरच्छेदासी करविता झाला ॥ ६८ ॥ जेथें मी काम स्वयें वसे ॥ तेथें क्रोध वसे सावकाशें ॥ कामक्रोध असतचि नसे ॥ नारायणा ऐसें तुवां केलें ॥ ६९ ॥ हें परमाद्भुत तुझें वीर्य ॥ आणिकां एवढें नाहीं धैर्य ॥ यालागीं तुझें परिचर्य ॥ सदा मुनिवर्य सेविती चरण ॥ ७० ॥ शांतीच्या चाडें देवाधिदेवा ॥ जे नित्य करिती तुझी सेवा ॥ ते कामक्रोधादि स्वभावा ॥ स्मरतां तव नांवा जिंकिती सुखें ॥ ७१ ॥ जेथें सन्मानें काम पुरत ॥ तेथें आदरें अनुग्रहो करित ॥ काम सन्मानें जेथें अतृप्त ॥ तेथें शाप

---

१ एकदा दुर्वासऋषि, द्वादशीचे दिवशीं, अंबरीष म्हणून सूर्यवंशीय परम धार्मिक राजा होता, त्याजकडे आला. तेव्हां राजानें आगत स्वागत करून भोजनास राहण्याविषयीं त्यास प्रार्थिलें. मग दुर्वास होय म्हणून कांहीं उरलेलें आन्हिक संपवावयासाठीं बाहेर गेला; तों त्यास परत येण्यास उशीर लागला. त्या दिवशीं द्वादशी थोडी होती म्हणून, व्रतभंग न व्हावा ह्या करितां अंबरीषानें देवास नैवेद्य अर्पिला आणि तीर्थसेवनरूप पारणा करून तो ऋषीची वाट पाहत बसला. नंतर दुर्वास आला तेव्हां त्यास हें समजतांच कोपून त्यानें आपल्या केंसांतून एक कृत्या निर्मिली, ती राजाकडे धांवली तेव्हां सुदर्शनानें येऊन तिला मारिलें इत्यादि कथा आहे. (भाग० स्कं० ९ अ० ४) २ विष्णूला दुर्वासऋषीनें तुला दहा अवतार घ्यावे लागतील असा शाप दिला, अशी कथा आहे. ३ एकेसमयीं दुर्वासऋषीनें आपल्या गळ्यांतील माळ इंद्रास दिली, ती त्यानें उन्मत्तपणानें ऐरावताच्या मस्तकावर फेकून दिली. ती ऐरावतानें आपल्या पायाखालीं तुडवुन टाकिली. ह्या अनादरानें दुर्वासास क्रोध येऊन त्यानें तुझें ऐश्वर्य नष्ट होईल असा इंद्रास शाप दिला. आणि त्याप्रमाणें त्याचें ऐश्वर्य नष्ट झालें, अशी कथा आहे. ४ महादेवाचा सासरा दक्ष प्रजापति ह्यानें एकदां यज्ञ केला, त्यांत सर्व देवांस बोलाविलें परंतु महादेवास बोलाविलें नाहीं. तथापि पार्वतीच्या आग्रहामुळें तो तेथें गेला असतां दक्षानें त्याचा आदर केला नाहीं. पुढें महादेवास राग येऊन त्यानें दक्षाचें शिर तोडिलें, अशी कथा स्कंदपुराणांत आहे.

देत अतिक्रोधें ॥ ७२ ॥ यालागीं शापानुग्रहसमर्थ ॥ ते सर्वदा काम-क्रोधयुक्त ॥ परी नवल तुझें सत्वोचित ॥ केलें अंकित कामक्रोध ॥ ७३ ॥ मज गर्व नाहीं सर्वथा ॥ हे ही तुज नाहीं अहंता ॥ छळावया दावी लघुता ॥ अथवा उपेक्षता न करिसी ॥ ७४ ॥ पृथ्वी दुःखी करिती नांगरी ॥ ते पिकोनि त्यांतें सुखी करी ॥ तेवीं अपकाऱ्या जो उपकार करी ॥ तो मोक्षाच्या शिरीं मुगुट ॥ ७५ ॥ तुजमाजी निर्विकार शांती ॥ हें नवल नव्हे कृपामूर्ती ॥ तुझ्या स्वरूपाची स्थिति ॥ आजि निश्चितीं कळली आम्हां ॥ ७६ ॥ तूं निर्गुण निरुपम ॥ मायातीत पूर्ण ब्रह्म ॥ तुझें स्वभावें स्मरतां नाम सकामांही काम स्पर्शों न शके ॥ ७७ ॥ जो नित्य स्मरे तुझें नाम ॥ त्यासी मी कामचि करीं निष्काम ॥ क्रोधचि करी क्रोधा शम ॥ मोह तो परम प्रबोध होय ॥ ७८ ॥ जे धीरवीर निजशांती ॥ त्यांस परमानंदें नित्य तृप्ति ॥ ऐशियांचिया अमित पंक्ती ॥ पाया लागती तूझिया ॥ ७९ ॥ तुज करावया नमस्कार ॥ पुढें सरसे महासिद्धींचा संभार ॥ त्यांस ही न लभे आवर ॥ तूं परात्पर परमात्मा ॥ ८० ॥ तुझिया सेवकांकडे ॥ विघ्न रिघतां होय बापुडें ॥ तें रिघावया तुजपुढें ॥ कोण्या परिपाडें रिघेल ॥ ८१ ॥ तापसां बहु विघ्न अपावो ॥ आम्हीं करावा अंतरावो ॥ हा आमुचा निजस्वभावो ॥ नव्हे नवलावो नारायणा ॥ ८२ ॥ त्वदर्थांचा मुक्त करोनि काम ॥ बाह्य जपतप भक्तिसंभ्रम ॥ ऐसे जे कां शठ परम ॥ विघ्नांचा आक्रम त्यांवरी चाले ॥ ८३ ॥ ते आमची विघ्नस्थिती ॥ न चले तुझिया भक्तांप्रती॥ तूं रक्षिता भूतपती ॥ तेथें विघ्नांची गती पराङ्मुख ॥ ८४ ॥ माझिया निजभक्तांसी ॥ विघ्नें कैंची म्हणसी यांसी ॥ ऐक त्याही अभिप्रायासी ॥ सांगेन तुजपाशीं देवाधिदेवा ॥ ८५ ॥ पावावया निजपदातें ॥ लाता हाणून स्वर्गभागातें ॥ जे निष्काम भजती तूतें ॥ नाना विघ्नें त्यांतें सुरवर चिंती ॥ ८६ ॥ उल्लंघूनिया आमुतें ॥ हे पावती अच्युतपदातें ॥ यालागीं सुरवर त्यांतें ॥ अतिविघ्नांतें प्रेरिती॥ ८७॥ बळी नेदूनि आम्हांसी ॥ हे जाऊं पाहती पूर्णपदासी ॥ येणें क्षोभें इंद्रादिक त्यांपाशीं ॥ नानाविघ्नां मोकलिती ॥ ८८ ॥ यालागीं त्यांच्या भजनापासीं ॥ विघ्नें छळूं धांवती अपैसीं ॥ विघ्नां अभिनव नव्हे त्यांसी ॥ तूं हृषीकेशी रक्षिता ॥ ८९ ॥ सांडूनि सकाम क-

ल्पना ॥ जे रतले तुझ्या चरणा ॥ त्यांस आठही प्रहर जाणा ॥ तूं नारायणा रक्षिसी ॥ ९० ॥ भक्त विघ्नीं होती कासाविसी ॥ धांवधांव म्हणती हृषीकेशी ॥ तेव्हां तूं धांवण्या धावसी ॥ निष्ठुर नव्हसी नारायणा ॥ ९१ ॥ विघ्न न येतां भक्तांपासीं ॥ आधींच भक्तसंरक्षणासी ॥ तूं भक्तांचे चौंपासी ॥ अहर्निशी संरक्षिता ॥ ९२ ॥ विघ्न छळूं धांवे सकोप ॥ तंव विघ्नीं प्रगट तुझें स्वरूप ॥ यालागीं भक्तांसि अल्प ॥ विघ्नप्रताप बाधूं न शके ॥ ९३ ॥ कामें छळावें हरिभक्तांसि ॥ तंव हरि कामाचा हृदयवासी ॥ तेव्हां विघ्नची निर्विघ्न त्यांसी ॥ भय भक्तांसी स्वप्नीं नाहीं ॥ ९४ ॥ विघ्न उपजवी विरोध ॥ तंव विरोधा सबाह्य गोविंद ॥ मग विरोध तोचि महाबोध ॥ स्वानंदकंद निजभक्तां ॥ ९५ ॥ ज्यांसि तुझ्या चरणीं भावार्थ॥ त्यांसि विघ्नीं प्रगटे परमार्थ ॥ ऐसा भावबळें तूं समर्थ ॥ साह्य सतत निज भक्तां ॥ ९६ ॥ यापरि समर्थ तूं संरक्षिता ॥ तें जाणोनि विघ्नां समस्तां ॥ पाय देऊनि इंद्रपद माथां ॥ पावती परमार्था तुझिया रूपें ॥ ९७ ॥ देव संरक्षिता ज्यांसी ॥ विघ्नें छळूं धांवती त्यांसी ॥ मा सकामांची गती कायसी ॥ विदेहा म्हणसी तें ऐक ॥ ९८ ॥ विषयकाम धरोनि मनीं ॥ इंद्रादिदेवां बळिपूजनीं ॥ जे भजले यागयजनीं ॥ देव त्यांलागोनी करिती विघ्न ॥ ९९ ॥ इंद्र याज्ञिकांचा राजा ॥ सकाम याज्ञिक त्याच्या प्रजा ॥ यज्ञभाग अर्पिती वोजा ॥ पावल्या बळिपूजा न करिती विघ्न ॥ १०० ॥ म्हणसी कामादिक विटंबिती ॥ ते निष्काम कदा नातळती ॥ सहज कामा वश्य असती ॥ सदा कर्मे करीती सकाम ॥ १०१ ॥ जे मज कामासी वश होती ॥ ते तप वेंचूनि भोग भोगिती ॥ जे आतुडले क्रोधाच्या हातीं ॥ ते वृथा नागवती तापसी ॥ १०२ ॥ प्राणायामें प्राणापानीं ॥ निज प्राणातें आकळोनी ॥ वात वर्ष शीत उष्ण साहोनी ॥ जे अनुष्ठानीं गुंतले ॥ १०३ ॥ क्षुधे तृषेतें नेमूनी ॥ जिव्हा शिश्न आकळोनी ॥ मज कामातें जिंकिलें मानूनी ॥ निष्कामाभिमानी उन्मत्त ॥ १०४ जे अल्प अभिमानाहातीं॥जे क्रोधासि वश होतीं॥ ते शाप देऊनि तपसंपत्ती॥ व्यर्थ नागविती निर्जानिष्टा ॥ १०५ ॥ सकामाच्या अनुष्ठाना ॥ मजकामसंगें स्रक्चंदना ॥ भोग भोगिती स्वर्गांगना ॥ अमृतपाना प्राशिती ॥ १०६ ॥ त्या मज कामातें उपेक्षिती ॥ आणि जे कामासि वश होती-

ती ॥ ते निज तपा नागविती ॥ शापोपदीमी-अनुवादें ॥ १०७ ॥ जे अपार सागर तरती ॥ ते गोष्पदोदकीं बुडती ॥ तेवीं मजकामातें जिणोनि जाती ॥ तेही नागवती निजक्रोधें ॥ १०८ ॥ मज कामीची अपूर्ण कामवृत्ती ॥ तेची क्रोधाची दृढ स्थिती ॥ कामक्रोध अभक्तां बांधिती ॥ हरिभक्तांप्रती तें न चले ॥ १०९ ॥ तुझ्या भक्ताप्रती जाण ॥ न चले कामक्रोधबंधन ॥ तो तूं भक्तपती नारायण ॥ तुज आमुचें कामपण केंवि बाधी ॥ ११० ॥ नेणतां तुझा महिमा ॥ आम्ही करूं आलों निजधर्मा ॥ तुजपासी नित्य निजक्षेमा ॥ पुरुषोत्तमा कृपाळुवा ॥ १११ ॥ अपकाऱ्या उपकार करिती ॥ या नांव निर्विकार निजशांती ॥ तेचि शांतीची परिपाकस्थिती ॥ विप्रकन्यांप्रती हरि दावी ॥ ११२ ॥ सांगोनिया आपुली स्थिति ॥ कामादिक स्तुति करिती ॥ तंव परमाश्चर्य देखती ॥ स्त्रिया अत्यद्भुती अकस्मात ॥ ११३ ॥ रूप वैभव अलंकार ॥ श्रियेहूनियां सुंदर ॥ सेवेलागीं अतितत्पर ॥ सदा सादर सावधानें ॥ ११४ ॥ नवल लाघव नारायणा ॥ कैसें या दाखविलें विंदाना ॥ त्या स्त्रिया सकळ स्वर्गांगना ॥ दिवा खद्योत आणा तैशा दिसती ॥ ११५ ॥ या स्त्रिया देखोनि दृष्टी ॥ काम मूर्छित पडला सृष्टी ॥ वसंत घटघटां लाळ घोटी ॥ ती क्रोधाची दृष्टी तटस्थ ठेली ॥ ११६ ॥ भ्रमर विसरले झणत्कार ॥ कोकिळा विसरल्या पंचम स्वर ॥ प्राण विसरला संचार ॥ देवानुचर भुलले ॥ ११७ ॥ देखोनि त्यांचिया स्वरूपासी ॥ अप्सरा दिसती जैशा दासी ॥ अत्यंत लज्जा झाली त्यांसी ॥ काळिमेसी उतरल्या ॥ ११८ ॥ त्यांचे अंगींचा सुगंधवात ॥ तेणें भुलला वसंत ॥ मलयानिल झाला भ्रांत ॥ त्यांचा अंगवात लागतां ॥ ११९ ॥ नारायणाची विद्या कैसी ॥ जे भुलवूं आले आपणासी ॥ भुली पाडिली तयांसी ॥ योगमायेसी दावुनी ॥ १२० ॥ सुंदरत्वें रंभा तिलोत्तमा ॥ जियां मंदरमथनीं जितली रमा ॥ रंभेहुनियां उपमा ॥ उत्तमोत्तमा अतिरूपें ॥ १२१ ॥ तें अतिआश्चर्य देखोन ॥ झाले कामादिक मूर्छायमान ॥ तयांप्रती नारायण ॥ काय हांसोन बोलिला ॥ १२२ ॥ आम्हीं अवश्य पूजावें तुम्हांसी ॥ कांहीं अर्पावें बलिदानासी ॥ संतोषावया इंद्रासी ॥ यांतील एकादी दासी अंगीकारा तुम्ही ॥ १२३ ॥ यांचे सौंदर्य अतिथोर ॥ म्हणाल होईल अपमानकर ॥ तुम्हांसमान जे

सुंदर ॥ तिचा अंगीकार करावा तुम्हीं ॥ १२४ ॥ म्हणाल यांत नाहीं हीन॥ अवघ्या सौंदर्य संपूर्ण॥कोणी न दिसे आम्हांसमान ॥केवीं आपण अंगीकारावी ॥ १२५ ॥ जरी नाहीं तुम्हांसमान ॥ सकळ सौंदर्यें अतिसंपन्न ॥ तरी एकीचें करावें अंगीकरण ॥ होईल भूषण स्वर्गासी ॥ ॥ १२६ ॥ ऐसें नारायणाचें वचन ॥ ऐकोनि हरिखलीं संपूर्ण ॥ करूनिया साष्टांग नमन ॥ मस्तकीं वचन वंदिलें ॥ १२७ ॥ ऐकोनि नारायणवचन ॥ मस्तकांबुजीं करूनिया नमन ॥ ऊर्वशी पुढारून ॥ कामादिगण निघती वेगीं ॥ १२८ ॥ नारायणाचे ऊरुस्पर्शीं ॥ उभी होती नारायणापाशीं ॥ तेंचि नांव झालें तिसी ॥ म्हणती ऊर्वशी स्वर्गांगना ॥ ॥ १२९ ॥ ते देवाचे देवदूत ॥ स्वर्ग पावले समस्त ॥ मग शक्राचे सभेआंत ॥ सांगती अद्भुत नारायणशक्ति ॥ १३० ॥ तिहीं नारायणाचें चरित्र ॥ सांगीतलें अतिविचित्र ॥ तेणें अवघेचि सुरवर ॥ झाले थोर विस्मित पैं ॥ १३१ ॥

---

## वेंचे रामायणांतील.

रामचंद्र सेनेसहित रावणाशीं युद्ध करण्याकरितां लंकेस गेल्यावर युद्ध करावयाच्या पूर्वी, त्यानें वालीचा मुलगा अंगद ह्यास वकील करून रावणाकडे शिष्टसंप्रदायाप्रमाणें पाठविलें. अंगदानें रावणाच्या सभेंत जाऊन त्यास सीता रामाला परत देण्याविषयीं पुष्कळ उपदेश केला; परंतु रावणानें तो ऐकिला नाहीं. मग अंगद रामाकडे परत आला. हें ह्या आख्यानांत सांगितलें आहे.

---

## अंगदशिष्टाई.

### ओंव्या.

याउपरि काय कर्तव्यता ॥ श्रीराम पुसे समस्तां ॥ अवघे म्हणती रघु-नाथा ॥ युद्ध तत्वतां करावें ॥ १ ॥ स-सैन्य मारावें लंकानाथा ॥ विचार कायसा पैं आतां ॥ ऐसें समस्तीं सांगतां ॥ तें रघु-नाथा न माने ॥ २ ॥ जे जें राज-धर्म विहित ॥ त्यांहींच साधे परमार्थ ॥ ऐसे

धर्म रघुनाथ ॥ उपपादीत शास्त्रार्थु ॥ ३ ॥ अतिशयें जो समर्थ ॥ शिष्ट धाडावा लंकेंत ॥ ऐसें बोलतां रघु-नाथ ॥ कपि समस्त क्षोभले ॥ ४ ॥ आपुली चोरुनि नेली सीता ॥ आपणचि शिष्ट पाठवावा आतां ॥ हें तंव अयुक्त रघु-नाथा ॥ युद्ध करितां भय काय ॥ ५ ॥ ऐसें बोलतां समस्त ॥ राम सांगे राज-धर्मार्थ ॥ भूत-दया परमार्थ ॥ समन्वित उपपादी ॥ ६ ॥ युद्ध-धर्म चतुर्विध ॥ साम दान दंड भेद ॥ हे अनादि-सिद्ध प्रसिद्ध ॥ विशद भेद वर्णिले ॥ ७ ॥ युद्ध-समयीं सामानुक्रम ॥ हाचि मुख्यत्वें राज-धर्म ॥ स्वर्मीं भूत-दया-संभ्रम ॥ सामचि होय परमार्थ ॥ ८ ॥ साम न करितां जे जाण ॥ युद्ध करिती दारुण ॥ अ-संख्य मरती प्राणिजन ॥ हत्या कवण सोशील ॥ ९ ॥ ऐकोनि रामाचें वचन ॥ हनुमान घाली लोटांगण ॥ अंगद सुग्रीव बिभीषण ॥ वानर-गणासमवेत ॥ १० ॥ पडतां वानरांचें अनुमोदन ॥ स्वयें पुसे रघु-नंदन ॥ शिष्ट पाठवावा कोण ॥ तो निवडोनि सांगा मज ॥ ११ ॥ शिष्ट नसावा महा भ्याड ॥ शिष्टें न धरावी भीड ॥ शिष्ट बोलका सुघड ॥ निवडा प्रौढ निजबुद्धी ॥ १२ ॥ शिष्ट पाहिजे चपळ चतुर ॥ देऊं जाणे प्रत्युत्तर ॥ राहोनियां धुरे-समोर ॥ स्वामि-कार्य-साधक ॥ १३ ॥ हनुमान म्हणे रघु-नंदना ॥ वानर-वीरांची गणना ॥ वीस पद्में संख्या जाणा ॥ आंगवणें अतिबळी ॥ १४ ॥ यांहि माजी वाळि-सुत ॥ अंगद बळें विख्यात ॥ रावणाचे सभे आंत ॥ अति समर्थ बोलावया ॥ १५ ॥ अंगद बोलोनि निधोट ॥ अंगद वीर धीर सुभट ॥ गांजूं शके दश-कंठ ॥ तोचि शिष्ट योजावा ॥ १६ ॥ पाचारुनि अंगदासी ॥ राम आलिंगी ह्रदयासीं ॥ शिष्ट होऊनी रावणापाशीं ॥ सांगें त्यासी मद्वाक्य ॥ १७ ॥ दंडासि कारण मुख्य चोरी ॥ तुवां चोरिली माझी नारी ॥ तुज दंडावया बाण-धारी ॥ आलों निर्धारी मी राम ॥ १८ ॥ मुख्यत्वें पर-दारा-हरण ॥ तुझ्या मरणाचें कारण ॥ दुर्धर सुटल्या माझे बाण ॥ तुजला कोण राखेल ॥ १९ ॥ यालागीं तूं अर्पी सीता ॥ शरण जाई अयोध्या-नाथा ॥ लंका-निज-राज्यीं स्वस्थता ॥ तरीच तूतें होईल ॥ २० ॥

---

१ शास्त्रार्थाला अनुसरून असणारे. २ वकील. ३ समर्पक रीतीनें. ४ सामोपायापासून आरंभ. ५ आदर. ६ स्तुत्य कृत्य. ७ चतुर. ८ अग्रभागीं. ९ टीकीनें.

ऐसें श्री-रामें आपण ॥ स्व-मुखें अंगदा सांगून ॥ अमृत-फळें देऊनि जाण ॥ करवी गमन लंकेशी ॥ २१ ॥ अंगद म्हणे श्री-रघु-नाथा ॥ आज्ञा प्रमाण जी समर्था ॥ स्वयें पुरुषार्थ बोलतां ॥ आंगीं मूर्खता येऊं पाहे ॥ २२ ॥ श्री-रामासि नमस्कार ॥ करूनी मुखीं नाम-गजर ॥ अवलोकूनी लंका-पुर ॥ अंगद वीर उडाला ॥ २३ ॥ जैसा श्रीरामाचा बाण ॥ तैसें अंगदाचें उड्डाण ॥ स-त्वर क्रमूनि गगन ॥ आला आपण लंकेसी ॥ २४ ॥ रावण-सभेपुढें जाण ॥ आलें अंगदाचें उड्डाण ॥ तेणें दचकला दशानन ॥ कंपायमान भय-भीत ॥ २५ ॥ अवघ्यांचा करावया घात ॥ पुढती आला रे हनुमंत ॥ ऐसा वळसा लंके॰ आंत ॥ अति आक्रांत राक्षसां ॥ २६ ॥ अंगदासीं सन्मुख ॥ बोलों न शके दश-मुख ॥ आणीक कोण बोले मशक॥ झाली टकमक राक्षसां॥२७॥ मी अतिथी आलों सभेंत॥ कोणी न पुसां स्वागत॥ भयें झालां अति-भ्रांत ॥ निश्चित महामूर्ख हो ॥ २८ ॥ हनुमंतें अशोक-वनीं बळी ॥ केली राक्षसां रंवदळी ॥ तेणें तुम्हां दांत-खिळी ॥ वचनावळी खुंटली॥ ॥ २९ ॥ ऐकोनि अंगदाचें वचन ॥ दुरुक्तिबोलामाजि छळण[4] ॥ स्वयें अनुवादे रावण॥ सावधान अवधारा ॥३० ॥ सांडूनि दुर्ग-द्वार-भूमी ॥ तूं आलासी अ-मार्ग-गामी ॥ यास्तव तुजशीं न बोलों आम्ही ॥ मौनानुक्रमें[6] राहिलों ॥ ३१ ॥ अमार्ग-गामी यासीं भाषण ॥ हें तों आम्हां अति दूषण॥ऐकोनि रावणाचें वचन॥ हास्य आलें अंगदा॥३२॥ रावणा ऐक सावधान ॥ देखे पुढिलाचे अवगुण ॥ आपुले न देखे दुर्गुण ॥ रासभ पूर्ण तो एक ॥ ३३ ॥ मुख्य अ-धर्म तस्करपण ॥ तें हो पर-दारा-हरण॥तैसा तूं पापी रावण॥काळें वदन त्रिलोकीं॥३४॥ अंगद खवळला देखोन॰॥ चळचळ कांपे दशानन ॥ म्हणती राक्षस प्रधान ॥ दुसरें विघ्न हें आलें ॥ ३५ ॥ पहिला करूनी गेला होळी ॥ दुसरा त्याहूनी आला बळी ॥ राक्षस कांपती चळचळी ॥ आतुर्बळी वानर ॥ ३६ ॥ रावणासन्मुख सिंहासनीं ॥ अंगद बैसला पुच्छासनीं ॥ वांकुल्या दावी फळें खाऊनी ॥ मिचकाउनी नयनांतें ॥ ३७ ॥ अंगद

---

१ पराक्रम. २ पुकारा. ३ हाहाकार. ४ मर्मभेदक भाषण. ५ किल्ल्याच्या दरवाजाचा मार्ग. ६ मौन धरून. ७ शेपटाच्या आसनावर.

बैसला देखोन ॥ हळूच पुसे दशानन ॥ हनुमान् नव्हेसि तरि तूं कोण ॥ किमर्थ येथें आलासी ॥ ३८ ॥ ऐसें पुसतां लंका-नाथ ॥ अंगद आपुला वृत्तांत ॥ स्वयें असे पैं सांगत ॥ रघु-नाथातें स्मरोनी ॥ ३९ ॥ जेणें मारीच मारिला वनांत ॥ खर-दूषणां केला घात ॥ त्या श्री-रामाचा मी दूत ॥ वालि-सुत अंगद ॥ ४० ॥ रावणा घालूनि काखेतळीं ॥ समुद्रीं केल्या आंघोळी ॥ त्याचा पुत्र मी आतुर्बळी ॥ आलों तुजजवळी तें ऐक ॥ ४१ ॥ सीता देऊनी शरणागत ॥ झाल्या वांचेल लंका-नाथ ॥ नातरी त्याचा करीन घात ॥ ऐसें रघु-नाथ बोलिला ॥ ४२ ॥ धिक् रामाचा पुरुषार्थ ॥ धिक् धिक् तुझा ही बळार्थ ॥ जेणें केला पितृ-घात ॥ त्याचा दूत म्हणवीशी ॥ ४३ ॥ ठकुनी[1] केला पितृ-घात ॥ मातेसी दुजा योजिला कांत ॥ ऐसा नष्ट जो रघु-नाथ ॥ त्याचा दूत म्हणवीशी ॥ ४४ ॥ अंगदा ऐसा निर्लाजिरा ॥ पहातां जनीं न दिसे दुसरा ॥ काय मुख दाखविशी वानरा ॥ रिघोनि सागरीं जीव देईं ॥ ४५ ॥ नातरी करीं आर्डावहिरी ॥ पोटीं घालोनी घेईं सुरी ॥ जळो जळो तुझी थोरी ॥ निंद्य संसारीं तूं एक ॥ ४६ ॥ साधावया पितृ-कार्यार्थ ॥ मिथ्या म्हणसी राम-दूत ॥ हा ही कळला मज भावार्थ ॥ शरणागत तूं माझा ॥ ४७ ॥ मारुनी राम-लक्ष्मण ॥ करूनि सु-ग्रीवाचें हनन ॥ तुज किष्किंधा देईन ॥ सत्य वचन हें माझें ॥ ४८ ॥ ऐसें बोलतां दशानन ॥ अंगद झाला हास्य-वदन ॥ खोंचूनी[2] देतसे प्रतिवचनें ॥ तें सावधानें अवधारा ॥ ४९ ॥ स्वयं-वरीं धनुष्या बाण ॥ चढवितां सभेंत पडलासि उलथोन ॥ तुझे अंगीं नपुंसकपण ॥ कैसें शरण म्यां व्हावें ॥ ५० ॥ बहुत ऐकिले[3] रावण ॥ त्यांमाजि तूं कवण ॥ त्यांचें विविध लक्षण ॥ विचक्षण जाणती ॥ ५१ ॥ रावण दश-मुखाचें किडें ॥ किंवा पातलें[4] घुंगुरडें ॥ बळी न पाहे तयाकडे ॥ तो कोणता रावण ॥ ५२ ॥ विचित्र देखोनी वानरीं ॥ मज अंगदाच्या पाळण्यावरी ॥ रावण बांधिला खेळण्यापरी ॥ हेम-सूत्रीं[5] शृंखळे ॥ ५३ ॥ त्यांतील तूं कोण रावण ॥ हें पुसावें न लगे जाण ॥ माझ्या पद-लत्तांचे वण ॥ मुखीं संपूर्ण दीसती ॥ ५४ ॥ माझ्या मुताची बाळ-धार ॥ मुखीं पडतां निरंतर ॥

---

१ ठकवून. २ लक्ष्य देऊन. ३ ऐका. ४ विष्णूनें वामनावतार घेऊन पाताळीं घातलेला दैत्यांचा राजा. ५ सोन्याच्या साखळीनें.

झाले स-चिन्ह उभय अधर ॥ ते हे उघड दीसती ॥ ५५ ॥ तो तूं अतिशय दीन हीन ॥ भद्रीं बैसलासी रावण ॥ तुज कैंची आंगवण ॥ करावया रण रामासीं ॥ ५६ ॥ अंगदाचे वाग्बाण ॥ ह्रदयीं खोंचले संपूर्ण ॥ तेणें तळमळी रावण ॥ प्राण जाऊं पाहती ॥ ५७ ॥ सभेसि बैसोनी वानरा ॥ किती जल्पशी सैरावैरा ॥ तोंडा नाहीं वोढावारा ॥ दश-शिरां नोळखिसी ॥ ५८ ॥ ऐकें माझी आंगवण ॥ बंदीं घातले सुर-गण ॥ राम बापुडें तें कोण ॥ मजसीं रण करावया ॥ ५९ ॥ इंद्र-चंद्रादि सकळ सुर ॥ माझे घरचे झाले चाकर ॥ मद्भयें कांपती थरथर ॥ अहर्निशीं राबती ॥ ६० ॥ राम बापुडें केवळ नर ॥ आमुचें खाजुगें ग्रास-मात्र ॥ वानर जे कां वनचर ॥ धाकेंच संग्रामीं मरतील ॥ ६१ ॥ मुख्य भक्ष्य राम-लक्ष्मण ॥ मर्कटें कोशिंबिरी जाण ॥ एका ग्रासें कुंभ-कर्ण ॥ भक्षील आपण क्षणार्धें ॥ ६२ ॥ ऐक रे रावणा दुर्मती ॥ दुष्ट-बुद्धी दुष्ट-रीती ॥ चैतन्य-विग्रही राम-मूर्ती ॥ त्याप्रती मनुष्य म्हणसी तूं ॥ ६३ ॥ श्री-रामाचा सेवक ॥ हनुमंत एकला एक ॥ तेणें मर्दूनि तुझें कटक ॥ तुझें मुख जाळिलें ॥ ६४ ॥ सीता अर्पूनि आपण ॥ रामासि रिघालिया शरण ॥ तैंच वांचती तुझे प्राण ॥ एऱ्हवीं मरण तुज आलें ॥ ६६ ॥ सीता रामासि न देतां जाण ॥ रावणा तुज राखेल कोण ॥ मीच तुझा घेईन प्राण ॥ आंगवण पाहें माझी ॥६७॥ रावणा तुझीं दहा शिरें ॥ मीच छेदितों नखाग्रें ॥ परि तीं शिवं-स्व अ-पवित्रें ॥ म्हणोनी करें स्पर्शेना ॥ ६८ ॥ अंगद आदळला आंगासी ॥ बोलिला निष्ठुर वाक्यासी ॥ तेणें रावणा कासाविसी ॥ अतिकोपेसीं कोपला ॥ ६९ ॥ वांचवावया आपणास ॥ क्रोधें सांगे प्रधानांस ॥ धरा मारा वानरास ॥ मज सभेंत निर्भर्त्सी ॥ ७० ॥ कांहीं न धरितां भीड ॥ सभेमध्यें हा माकड ॥ माझें म्हणे काळें तोंड ॥ खंड विखंड करा यासी ॥ ७१ ॥ ऐकोनि रावणाचें वचन ॥ अंगदा धरावया जाण ॥ सैन्य सेनानी प्रधान ॥ अति गर्जोनी ऊठले ॥ ७२ ॥ कटीं पुच्छीं बाहु-मूळीं ॥ अंगद धरिला राक्षसीं सकळीं ॥ तयांसहित तो

---

१ सिंहासनावर. २ प्रतिबंध. ३ रावणाला. ४ खाद्य. ५ ज्ञानमूर्ति—स्वरूपी. ६ शिवाला अर्पिलेली वस्तु घेतल्यास महापाप लागते. रावणानें आपलीं शिरें शिवास वाहिलीं होतीं, ह्या गोष्टीस उद्देशून एथें त्यांस "शिवस्व" म्हटलें आहे.

आतुर्बळी ॥ वेगीं तत्काळीं उडाला ॥ ७३ ॥ आंग झाडिलें अंतराळीं ॥ राक्षसीं धरिला तो बळी ॥ अंगवातें पडोनि तळीं ॥ झाली रांगोळी अवघ्यांची ॥ ७४ ॥ स्वयें मारूं नये रावण ॥ अंगद जाणोनि आपण ॥ पायीं दडपोनि दशानन ॥ मुकुट हिरोनी घेतला ॥ ७५ ॥ मुकुट घेऊं-नि आपण ॥ अंगद उडाला सत्राण ॥ शिरें मंडप उचलिला पूर्ण ॥ हें नाहीं अवगत अंगदा ॥ ७६ ॥ मंडप देखोनिया माथां ॥ कोप आला श्री-रघु-नाथा ॥ अंगदा केली अ-धर्मता ॥ दत्त अर्थ आणिला ॥ ७७ ॥ अंगद म्हणे श्री-रघुनाथा ॥ मी निज बळें उडतां ॥ केव्हां मंडप बैसला माथां ॥ मज न कळतां येथें आला ॥ ७८ ॥ ऐशी-सहस्र स्तंभ ज्यासी ॥ ऐसा मंडप घेऊनि सहजेसीं ॥ पुनरपि नेऊनि लंकेसी ॥ ठेवी स्व-स्थानीं अंगद ॥ ७९ ॥ श्री-रामें मुकुट घेऊन ॥ पाचारिला बिभी-षण ॥ त्याचे मस्तकीं आपण ॥ संतोषोनी घातला ॥ ८० ॥

---

# तुकाराम.

तुकाराम हा पुण्यापासून नऊ कोसांवर देहू म्हणून एक गांव आहे तेथचा राहणारा. ह्याचा बाप जातीचा शूद्र असून वाणीपणाचा धंदा करीत असे. तुकारामाचें चित्त अल्पवयापासूनच संसारांत नव्ह-तें. तशांत त्याची बायको जिजाबाई ही स्वभावानें द्वाड असून त्याला पुष्कळ त्रास देई; ह्यामुळें तो अधिकच उदास झाला.

तुकाराम कथा करीत असे. त्याच्या कथेंत गायनादिक मनोरं-जक साधनें नसत. आपण केलेले अभंग म्हणून त्यांचा अर्थ स्पष्ट करून दाखवावा आणि लोकांस बोध करावा, हाच त्याचा उद्देश असे. कथा करण्याची चाल तेव्हांपासूनच पडली, असें म्हणतात.

तुकाराम शिवाजीराजाच्या कारकीर्दींत होता. नामदेवाप्रमाणें तुकारामानें हजारों अभंग केले आहेत. त्याच्या कवितेंत औत्सुक्य व प्रेम पुष्कळ; त्याचें बोलणें निर्भीड व मनांत ठसण्याजोगें आहे.

---

१ पूर्वींच लंकेचें राज्य रामानें विभीषणास दिलें होतें म्हणून "दत्त अर्थ (दिलेली वस्तू) असें म्हटलें आहे.

तुकाराम आपल्या वयाचे ४१ वे वर्षी वारला.
जन्मशक १५३० इ.स. १६०८. मरणशक १५७१ फा० व० १२ इ.स. १६४९.

## त्यानें केलेले ग्रंथ.

१ भक्ति, ज्ञान, वैराग्य व नीति ह्यांवर मुख्यत्वेंकरून ह्याचे अभंग आहेत, व कांहीं आख्यानांवर ही अभंग आहेत.

२ पदें.

---

## स्फुट अभंग.

( १ )

अगा करुणाकरा करितसें धांवा ॥ या मज सोडवा लवकरि ॥ १ ॥
॥धु.॥ ऐकोनिया माझीं करुणेचीं वचनें ॥ व्हावें नारायणें उतावीळ॥ध्रु.॥
मागें पुढें अवघा दिसे रिता ठाव ॥ ठेवूनि पायीं भाव वाट पाहें ॥ २ ॥
उशीर तो आतां न पाहिजे केला ॥ अहो जी विठ्ठला मायबापा ॥ ३ ॥
उरलें तें एक हेंचि मज आतां ॥ अवघें विचारितां शून्य झालें ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां करीं कृपादान ॥ पाउलें समान दावीं डोळां ॥ ५॥

( २ )

नाहीं संतपण मिळत हें हाटीं ॥ हिंडतां कपाटीं रानीं वनीं ॥ १ ॥
न ये मोल देतां धनाचिया राशी ॥ नाहीं तें आकाशीं पाताळीं तें॥ २॥
तुका म्हणे आहे आपल्या तें आंगीं ॥ गवसना जगीं दुजे ठायीं ॥ ३॥

( ३ )

भोरप्यानें[1] सोंग पालटिलें वरी ॥ बक ध्यान धरी मत्स्या जैसें ॥ १ ॥
टिळे माळा मैंद मुद्रा लावी अंगीं ॥ देखों नेदी जगीं फांसे जैसे ॥ २ ॥
ढीवर या मत्स्या चारा घाली जैसा ॥ भीतरील फांसा कळों नेदी ॥ ३ ॥
खाटिक हा स्नेहवादें पशु पाळी ॥ कापावया नेळी[2] तया साठीं ॥ ४ ॥
तुका म्हणे तैसा भला मी लोकांत ॥ परी तूं कृपावंत पांडुरंगा ॥ ५ ॥

( ४ )

विरोधाचें मज न साहे वचन ॥ बहु होतें मन कासावीस ॥ १ ॥

---

१ बहुरूप्यानें. २ त्याची मान.

म्हणउनी जीवा न साहे संगती ॥ बैसतां एकांतीं गोड वाटे ॥ २॥
देहाची भावना वासनेचा संग ॥ नावडे उबग आला यांचा ॥ ३ ॥
तुका म्हणे देव अंतरे यामुळें ॥ आशा-मोह-जाळें दुःख वाटे ॥ ४ ॥

( ५ )

नलगे मायेसी बाळ निरवावें ॥ आपुल्या स्वभावें वोढे त्यासि ॥ १ ॥
मज कां लागला करणें विचार ॥ ज्याचा कारभार त्याचे माथां ॥ २ ॥
गोडधड त्यांसी ठेवी न मागतां ॥ समाधान खातां नेदी मना ॥ ३ ॥
खेळतां गुंतलें उमगूनी आणी ॥ बैसोनीया स्तनीं लावी बळें ॥ ४ ॥
त्याच्या [1]दुःखें पीडे आपण खापरीं ॥ लाही तळावरी होय जैसी ॥ ५ ॥
तुका म्हणे देह विसरे आपुला ॥ आघात ती त्याला लागों नेदी ॥ ६ ॥

( ६ )

सोनियाचें ताट क्षीरीनें भरिलें ॥ भक्षावया दिलें श्वानालागीं ॥ १ ॥
मुक्ताफळहार खरासि घातला ॥ कस्तुरी सुकराला चोजविली ॥ २ ॥
वेदपरायण बधिरा सांगे ज्ञान ॥ तयाची ते खुण काय जाणे ॥ ३ ॥
तुका म्हणे ज्याचें तोचि एक जाणे ॥ भक्तीचें महिमान साधु जाणे ॥४॥

( ७ )

संताचीये गावीं प्रेमाचा सुकाळ ॥ नाहीं तळमळ दुःख लेश ॥ १ ॥
तेथें मी राहीन होउनी याचक ॥ घालतील भीक तेची मज ॥ २ ॥
संतांचीये गांवीं वरो भांडवल ॥ अवघा विठ्ठल धन वित्त ॥ ३ ॥
संताचें भोजन अमृताचें पान ॥ करीती कीर्तन सर्वकाळ ॥ ४ ॥
संताचा उदीम उपदेशाची पेंठ ॥ प्रेम-सुख-सांठ घेती देती ॥ ५ ॥
तुका म्हणे तेथें आणिक नाहीं परी॥म्हणोनि भोकारी झालों त्यांचा॥६॥

( ८ )

सर्वभावें आलों तुजची शरण ॥ काया वाचा मनासहित देवा ॥ १ ॥
आणीक दूसरें न ये माझे मना ॥ राहीली वासना तुझे ठायीं ॥ २ ॥
माझीयेवरीचें कांहीं जड-भारी ॥ तुजवीण वारी कोण देवा ॥ ३ ॥
तुझे आम्ही दास आमचा तूं धनी ॥ चालत दुरूनी आलों मागें ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां घेतलें धरणें ॥ हिशोबाकारणें भेटी देई ॥ ५ ॥

---

१ वर्म

( ९ )

नीचपण बरवें देवा ॥ न चले कोणाचाही हेवा ॥ १ ॥
महापुरें झाडें जाती ॥ तेथें लोहाळे राहती ॥ २ ॥
येती सिंधूच्या लहरी ॥ नम्र होतां जाती वरी ॥ ३ ॥
तुका म्हणे हंची फळ ॥ पाय धरिल्या न चले बळ ॥ ४ ॥

( १० )

कन्या सासुऱ्यासी जाये ॥ मागें परतोनी पाहे ॥ १ ॥
तैसें झालें माझ्या जिवा ॥ केव्हां भेटसी केशवा ॥ २ ॥
चुकलिया माये ॥ बाळ हुरू हुरू पाहे ॥ ३ ॥
जीवनावेगळी मासोळी ॥ तैसा तुका तळमळी ॥ ४ ॥

( ११ )

घरोघरीं अवघें झालें ब्रम्हज्ञान ॥ परी मेळवण बहू मांजी[1] ॥ १ ॥
निरें कोणापासीं होय एक रज ॥ तरी द्या रे मज दुर्बळासी ॥ २ ॥
आशा तृष्णा मनीं कालवूनी दोन्ही ॥ दंभ तो दुरूनी दीसतसे ॥ ३ ॥
काम क्रोध लोभ शोणवो बहूत ॥ मेळवूनी आंत काळकूट ॥ ४ ॥
तुका म्हणे तेथें कांहीं हाता न ये ॥ आयुष्य तें जाये वाथां सर्व ॥५॥

( १२ )

थंकोनिया लोभ मान ॥ दंभ करीतों कीर्तन ॥ १ ॥
झालों उदासीन देहीं ॥ एकावीण चाड नाहीं ॥ २ ॥
अर्थ अनर्थासारखा ॥ करुनि ठवोला पारिखा ॥ ३ ॥
उपाधीवेगळा ॥ तुका राहोला सोवळा ॥ ४ ॥

( १३ )

भक्त ऐसे जाणा जे देहीं उदास ॥ गेले आशापाश निवारूनी ॥ १ ॥
विषय तो त्यांचा झाला नारायण ॥ नावडे जन धन माता पीता ॥२ ॥
निर्वाणीं गोविंद असे मागें पुढें ॥ कांहींच सांकडें पडों नेदी ॥ ३ ॥
तुका म्हणे सत्यकर्मा व्हावें साह्य ॥ असत्यासी भय नरका जाणें ॥४॥

( १४ )

याजसाठीं केला होता अट्टाहास ॥ शेवटींचा दीस गोड व्हावा ॥ १ ॥
आतां निश्चितीनें पावलों विसांवा ॥ खुंटल्या त्या धांवा तृष्णेचीया॥२॥
तुका म्हणे मुक्ति पर्णीली नोवरी ॥ आतां दिवस चारी खेळी मेळी॥३॥

---

१ ब्रह्मज्ञानामध्यें.

( १५ )

आणिकांच्या घातें ॥ ज्यांचीं निवतील चित्तें ॥ १ ॥
तेचि ओळखावे पापी ॥ निरयवासी शीघ्र-कोपी ॥ २ ॥
कान पसरोनी ॥ ऐके वदे दुष्ट वाणी ॥ ३ ॥
तुका म्हणे भांडा ॥ धीर नाहीं त्याच्या तोंडा ॥ ४ ॥

( १६ )

मांडे पुऱ्या मुखें सांगों जाणे मात ॥ तोंडीं लाळ हात चोळी रीतें ॥ १ ॥
ऐसियाच्या गोष्टी फिक्या मिठेंविण ॥ रुचि नेदी अन्न चवी नाहीं ॥ २ ॥
बोलों जाणे अंगीं नाहीं शूरपण ॥ काय तें वचन जाळावें तें ॥ ३ ॥
तुका म्हणे बहु तोंडें जे वाचाळ ॥ तेंगें तेंच मूळ लटिक्याचें ॥ ४ ॥

( १७ )

निंदा स्तुती करवी पोट ॥ सोंग दाखवी बहु भाट ॥ १ ॥
जटा राख विटंबना ॥ धीर नाहीं क्षमा मना ॥ २ ॥
शृंगारीलें मढें ॥ जीवेंवीण जैसें कुडें ॥ ३ ॥
तुका म्हणे रागें ॥ भलते चावळे वाउगें ॥ ४ ॥

( १८ )

माय ती सर्पीण बाप जरी बोका ॥ त्यांचे संगें सुखा न पवे बाळ ॥ १ ॥
चंदनाचा शूळ सोनियाची बेडी ॥ सुख नेदी फोडी प्राण नाशी ॥ २ ॥
तुका म्हणे नरकीं घाली अभिमान ॥ जरी होय ज्ञान गर्व ताठा ॥ ३ ॥

( १९ )

साधूनी बचनाग खाती तोळा तोळा ॥ आणिकातें डोळां न पाहवें ॥ १ ॥
साधूनी भुजंग धरितील हातीं ॥ आणिकें कांपती देखोनिया ॥ २ ॥
असाध्य तें साध्य करितां सायास ॥ कारण अभ्यास तुका म्हणे ॥ ३ ॥

( २० )

मृगजळा काय करावा उतार ॥ नावावया पार पैल थडी ॥ १ ॥
खापराचे होन खेळतां लेंकुरें ॥ कोण त्या वेव्हारें लाभ हाणी ॥ २ ॥
मंगळदायक करिती कुमारी ॥ काय त्यांची खरी सोयरीक ॥ ३ ॥

---

१ नीच. २ फजीतीला कारण. ३ विषयाच्या आवडीनें. ४ हळूहळू सवय करीत. ५ मुलींच्या खेळांतील लग्नें वगैरे मंगल-कृत्यें.

स्वमींचें जें सुखदुःख जालें कांहीं ॥ जागृतीं तो नाहीं साच भाव ॥४॥
सारीं झालीं मेलीं लटिकें वचन ॥ बद्ध मुक्त शाण तुका म्हणे ॥ ५ ॥

( २१ )

बोलविसी तैसें आणीं अनुभवा ॥ नाहीं तरी देवा विटंबना ॥ १ ॥
मिठेंविण काय करावें मिष्टान्न ॥ शव जीवेंविण शृंगारिलें ॥ २ ॥
संपादणीविण विटंबिलें सोंग ॥ गुणेंविण चांग रूप हीन ॥ ३ ॥
कन्यापुत्रेंविण मंगळदायकें ॥ वेचिलें हें फिकें द्रव्य तरी ॥ ४ ॥
तुका म्हणे तैसी होते मज परी ॥ न देखे अंतरीं प्रेमभाव ॥५ ॥

( २२ )

बोलणेंची नाहीं ॥ आतां देवावीण कांहीं ॥ १ ॥
एकसरें केला नेम ॥ देवा दिल्हे क्रोध काम ॥ २ ॥
पाहेन ते पाय ॥ जोंवरी हे दृष्टी धाय ॥ ३ ॥
तुका म्हणे मनें ॥ हेची संकल्प वाहणें ॥ ४ ॥

( २३ )

खरें बोले तरी ॥ फुकासाठीं जोडे हरी ॥ १ ॥
ऐसे फुकाचे उपाय ॥ सांडुनीया वायां जाय ॥ २ ॥
पर उपकार ॥ एका वचनाचा फार ॥ ३ ॥
तुका म्हणे मळ ॥ मनें सांडीतां शीतळ ॥ ४ ॥

( २४ )

दया क्षमा शांती ॥ तेथें देवाची वसती ॥ १ ॥
पावे धांवोनीया घरा ॥ राहे धरूनीया थारा ॥ २ ॥
कीर्तनाचे वाटे ॥ वराडीया ऐसा लोटे ॥ ३ ॥
तुका म्हणे घडे ॥ पुजा नामें देव जोडे ॥ ५ ॥

( २५ )

शिष्याची जो न घे सेवा ॥ मानी देवासारिखें ॥ १ ॥
त्याचा फळे उपदेश ॥ आणीका दोष उफराटे ॥ २ ॥
त्याचें खरें ब्रह्मज्ञान ॥ उदासीन देहभावें ॥ ३ ॥
तुका म्हणे सत्य सांगें ॥ योत रागें येती ते ॥ ४ ॥

---

१ वनावणी-ज्याचें सोंग घेतलें त्याचें हुबहू अनुकरण.

( २६ )

स्त्रियांचा तो संग नको नारायणा ॥ कोष्ठा या पाषाणा मृत्तिकेच्या ॥ १ ॥
॥ध्रु० ॥ नाठवे हा देव न घडे भजन ॥ लांचावलें मन आवरेना ॥ ध्रु०॥
दृष्टिमुखें मरण इंद्रियाच्या द्वारें ॥ लावण्य तें खरें दुःखमूळ ॥ २ ॥
तुका म्हणे जरी अग्नि झाला साधु ॥ परी पावे बाधूं संघट्टणें ॥ ३ ॥

( २७ )

आशा हे समूळ खणोनी काढावी ॥ तेव्हांचो गोसावी व्हावें तेणें॥१॥
नाहीं तरी सुखें असावें संसारीं ॥ फजीती दूसरी करूं नये ॥ २ ॥
आशा मारूनीया जयवंत व्हावें ॥ तेव्हांचो नोघावें सर्वांतूनी ॥ ३ ॥
तुका म्हणे जरी योगाची तांतडी ॥ आशेची बीबुडी करीं आधीं ॥ ४॥

( २८ )

पराविया नारी रखुमाईसमान ॥ हें गेलें नेमून ठायींचेंची ॥ १ ॥
जाईं वो तूं माते न करीं सायास ॥ आम्ही विष्णुदास नव्हों तैसे ॥२ ॥
न साहवें मज तुझें हें पतन ॥ नको हें वचन दुष्ट वदों ॥ ३ ॥
तुका म्हणे तुज पाहिजे भ्रतार ॥ तरी काय नर थोडे जाले ॥ ४ ॥

( २९ )

कुमुदिनी काय जाणे तो परिमळ ॥ भ्रमर सकळ भोगीतसे ॥ १ ॥
तैसें तुज ठावें नाहीं तुझें नाम ॥ आम्हीच तें प्रेमसुख जाणों ॥२॥
माते तृण बाळा दुधाची ते गोडी॥ ज्याची न ये जोडी त्यासी कामा॥३॥
तुका म्हणे मुक्ताफळ शिंपी पोटीं ॥ नाहीं त्यांची भेटी भोग तिये ॥४॥

( ३० )

जीव तोची देव भोजन ते भक्ती ॥ मरण ते मुक्ती पाखंड्याची ॥ १ ॥
पिंडाच्या पोषणीं नागवले जन ॥ लटिकें पुराण केले वेद ॥ २ ॥
मना आला तैसा करीतो वीचार ॥ म्हणतो संसार नाहीं पुन्हा ॥ ३ ॥
आपुले मनींचें करूनी पाखंड ॥ जनामध्यें भांड पोट भरी ॥ ४ ॥

---

१ लाकूड, दगड अथवा माती ह्यांच्या केलेल्या पुतळ्या ( स्त्रियांच्या आकृति. ) त्याही मनांत विकार उत्पन्न करितात, मग खरोखरीच्या स्त्रियांविषयीं तर बोलावयासच नको, हा भाव. २ ईश्वर जोडण्याची. ३ एकदा कोणी एक स्त्री तुकारामापासून आपणास विषयसुख मिळावें म्हणून त्याकडे गेली असतां, तीस तो म्हणतो. ४ मोतीं एकदां शिंपींतून काढिलें म्हणजे मग त्याचा तिला उपभोग व भेटी होत नाहीं-तीं दुसऱ्यास होतात हा भाव.

तुका म्हणे पाठीं उडती यमदंड ॥ पाप पुण्य लंड न विचारीती ॥ ५ ॥

( ३१ )

मोक्षाचें आम्हांसी नाहीं अवघड ॥ तो असे ऊघड गांठोळीस ॥ १ ॥
भक्तीचे सोहळे होतील जीवासी ॥ नवल त्यावीशीं पूरवीतां ॥ २ ॥
ज्याचें त्यासी देणें कोणतें ऊचित ॥ मानोनीया हीत घेतों सूखें ॥ ३ ॥
तुका म्हणे सूखें देईं बा संसार ॥ आवडोसी थार करीं माझे ॥ ४ ॥

( ३२ )

भाव धरी तया तारील पाषाण ॥ दुर्जनीं सज्जन काय करी ॥ १ ॥
करितां नव्हे नीट श्वानाचें हें पुच्छ ॥ खापरा परीस काय करी ॥ २ ॥
काय करिल तेया साकरेचें[1] आळें ॥ बीज तैसी फळें येती तया ॥ ३ ॥
तुका म्हणे वज्र भंगे एक वेळ ॥ कठीण हा खळ तयाहूनी ॥ ४ ॥

( ३३ )

शांति-परतें नाहीं सुख ॥ येर अवघेंचो दुःख ॥ १ ॥
म्हणउनी शांति धरा ॥ उतराल पैल तीरा ॥ २ ॥
खवळलिया काम क्रोधीं ॥ अंगीं भरती आधि व्याधि ॥ ३ ॥
तुका म्हणे त्रिविध ताप ॥ जाती मग आपें आप ॥ ४ ॥

( ३४ )

ठेवा जाणीव गुंडून ॥ येथें भावची प्रमाण ॥ १ ॥
एका अनुसरल्या काज ॥ अवघें जाणे पंढरीराज ॥ २ ॥
होणें तर्कावितर्कासी ॥ वाव नलगे सायासासी ॥ ३ ॥
तुका म्हणे भावावीण ॥ अवघा बोलती तो शीण ॥ ४ ॥

( ३५ )

मुक्त तो आशंका नाहीं जया अंगीं ॥ बद्ध मोह-संगीं लज्जा चित्ता ॥ १ ॥
सुख पावे शांती धरुनी एकांत ॥ दुःखी तो लोकांत दंभ करी ॥ २ ॥
तुका म्हणे लागे थोडाची वीचार ॥ परी हे प्रकार नागवेती[2] ॥ ३ ॥

( ३६ )

त्रैलोक्य पाळितां उबगला नाहीं ॥ आमचें त्या काइ असे ओझें ॥ १ ॥
पाषाणाचे पोटीं बैसला दर्दुर ॥ तयामुखीं चारा कोण घाली ॥ २ ॥
पक्षी अजगर न करी संचित ॥ तयासि अनंत प्रतिपाळी ॥ ३ ॥

---

१ कारलें, कडू वृंदावन इत्यादि वनस्पतींस. २ सांपडत नाहींत.

तुका म्हणे तया भार घातलिया ॥ उपेक्षीना दयासिंधु माझा ॥ ४ ॥

( ३७ )

गोड नावें क्षीर ॥ परी साखरेचा धीर ॥ १ ॥
तैसें जाणा ब्रह्मज्ञान ॥ बापुडें तें भक्तीविण ॥ २ ॥
रुची नेदी अन्न ॥ ज्यांत नसतां लवण ॥ ३ ॥
आंधळ्यांचे[1] श्रम ॥ सीकवील्याचे ची नाम ॥ ४ ॥
तुका म्हणे वीणा ॥ तारांवीण व्यर्थ जाणा ॥ ५ ॥

( ३८ )

बोली मैंदाची बरवी असे ॥ वांटे अंतरीं घालावे फांसे ॥ १ ॥
कैसा वरिवरि दिसताहे चांग ॥ नव्हे भाविक केवळ मांग ॥२॥
टिळा टोपी माळा कंठीं ॥ अंधारीं नेउनि चेपी घांटी ॥ ३ ॥
तुका म्हणे तो केवळ पुंड ॥ त्यावरि वाजती यमदंड ॥ ४ ॥

( ३९ )

आशाबद्ध वक्ता ॥ भय श्रोतियांच्या चित्ता ॥ १ ॥
गातो तेंही नाहीं ठावें ॥ तोंड वासी कांहीं द्यावें ॥ २ ॥
झालें लोभाचें मांजर ॥ भीक मागे दारोदार ॥ ३ ॥
उभयतां लोभी मन ॥ वायां गेलें तें भजन ॥ ४ ॥
माप आणी गोणी ॥ तुका म्हणे रीतीं दोन्हीं ॥ ५ ॥

( ४० )

निर्वाहापुरतें अन्न आच्छादन ॥ आश्रमासी स्थान कोपी गूहा ॥ १ ॥
कोठें ही चित्तासी नसावें बंधन ॥ हृदयीं नारायण सांठवावा ॥ २ ॥
नये बोलों फार बैसों जनामधीं ॥ सावधानबुद्धी इंद्रियदमनीं ॥ ३ ॥
तुका म्हणे घडी घडीनें साधावी ॥ त्रिगुणांची[2] गोवी उगवूनी ॥ ४ ॥

( ४१ )

याचें नाव दोष ॥ राहे अंतरीं किल्मिष ॥ १ ॥

---

१ अन्वय-अंधळ्याचे शिकविल्याचे श्रम नामची-म्ह० त्याला शिकविलें तर फक्त शिकविलें इतकेंच म्हणतां येईल. म्ह० शब्द मात्र तो उच्चारील, त्याला रूप प्रत्यक्ष नसल्यामुळें शिकल्यापासून खरें सुख अथवा खरें ज्ञान होणार नाहीं. २ सत्त्व रज आणि तम ह्या तीन गुणांचा गुंता उकलून म्ह० हे तीन गुण अथवा गुणकार्यें ह्यांहून आत्मस्वरूप अगदीं भिन्न आहे असें उमजून.

मना अंगीं पुण्य पाप ॥ शुभ उत्तम संकल्प ॥ २ ॥
बीजा ऐशीं फळें ॥ उत्तम कीं अमंगळें ॥ ३ ॥
तुका म्हणे चित्त ॥ शुद्ध करावें हें हित ॥ ४ ॥

( ४२ )

काय माझें नेती वाईट म्हणोन ॥ करूं समाधान कशासाठीं ॥ १ ॥
काय मज लोक नेतील परलोका ॥ जातां कोणी नरका नोवारील ॥२॥
न म्हणें कोणासी उत्तम वाईट ॥ सुखें माझी कूट खावो मागें ॥ ३ ॥
सर्व माझा भार असे पांडुरंगीं ॥ काय माझें जगासवें काज ॥ ४ ॥
तुका म्हणे माझें सर्व ही साधन ॥ नामसंकीर्तन विठोबाचें ॥ ५ ॥

( ४३ )

शरीर दुःखाचें कोठार ॥ शरीर रोगाचें भांडार ॥
शरीर दुर्गंधीची थार ॥ नाहीं अपवित्र शरीरा ऐसें ॥ १ ॥
शरीर उत्तम चांगलें ॥ शरीर सुखाचें घोसुले ॥
शरीरें साध्य होय केलें ॥ शरीरें साधलें परब्रह्म ॥ २ ॥
शरीर विटाळाचें आळें ॥ मायामोहपाशजाळें ॥
पतन शरीराच्या मुळें ॥ शरीर काळें व्यापिलें ॥ ३ ॥
शरीर सकळ हें शुद्ध ॥ शरीर निधींचा हा निध ॥
शरीरें तुटे भवबंध ॥ वसे मध्यें भोगी देव शरीरा ॥ ४ ॥
शरीर अविद्येचा बांधा ॥ शरीर अवगुणाचा रांधा ॥
शरीरीं वसे बहुत बाधा ॥ नाहीं गुण सुधा एक शरीरीं ॥ ५ ॥
शरीरा सुख नेदावा भोग ॥ न द्यावें दुःख न करीं त्याग ॥
नव्हे वोखटें ना चांग ॥ तुका म्हणे वेग करीं हरिभजनीं ॥ ६ ॥

( ४४ )

इतुले करीं भलत्यापरी ॥ परद्रव्य परनारी ॥
सांडुनि अभिलाष अंतरीं ॥ वर्ते वेव्हारीं सुखरूप ॥ १ ॥
न करीं दंभाचा सायास ॥ शांति राहें बहुवस ॥
जिव्हे सेवीं सुगंधरस ॥ न करीं आळस रामनामीं ॥ २ ॥
जनमित्र होईं सकळांचा ॥ अशुभ न बोलावी वाचा ॥
संग न धरावा दुर्जनाचा ॥ करीं संतांचा सायास ॥ ३ ॥

---

१ ज्याला अनेक सुखें लगटून आहेत असें.

करिसी देवाविण आस ॥ अवघी होईल निरास ॥
तृष्णा वाढविसी बहुवस ॥ कधीं सुखास न पवसी ॥ ४ ॥
धरूनि विश्वास धरीं धीर ॥ करितां देव हाचि निर्धार ॥
तयाचा वाहे योगक्षेमभार ॥ नाहीं अंतर तुका म्हणे ॥ ५ ॥

( ४५ )

ठाकलोंसें द्वारीं ॥ उभा याचक भीकारी ॥ १ ॥
मज भीक कांहीं देवा ॥ प्रेम भातुकें पाठवा ॥ २ ॥
याचकाचा भार ॥ नये घेऊं वेरझार ॥ ३ ॥
तुका म्हणे दान ॥ सेवी घेतल्यावांचून ॥ ४ ॥

( ४६ )

सोइरियासि करी पाहुणेरु बरा ॥ काढितो ठोंबरा संतालागीं ॥ १ ॥
गाईसी देखोनि बदबदा मारी ॥ घोड्याची चाकरी गोड लागे ॥ २ ॥
पानफुल वेश्येसि नेतसे उदंड ॥ देखोनेदी खांड ब्राह्मणासी ॥ ३ ॥
बाइलेच्या गोता आवडीनें पोसी ॥ मातापितयांसि दवडितो ॥ ४ ॥
तुका म्हणे थुंका त्याच्या तोंडावरी ॥ जातो यमपुरी भोगावया ॥ ५ ॥

( ४७ )

काय वाणूं आतां न पुरे हे वाणी ॥ मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥
थोरीव सांडीली आपुली परीसें ॥ नेणे सिवों कैसें लोखंडासी ॥ २ ॥
जगाच्या कल्याणा संतांच्या वीभूती ॥ देह कष्टवीती उपकारें ॥ ३ ॥
भूतांची दया हें भांडवल संतां ॥ आपूल्या ममता नाहीं देहीं ॥ ४ ॥
तुका म्हणे सुख पराचीया सुखें ॥ अमृत हें मुखें स्रवतसे ॥ ५ ॥

( ४८ )

अवघा तो शकून ॥ ह्दयीं देवाचे चरण ॥ १ ॥
येथें नसतां वीयोग ॥ लाभा उणें काय मग ॥ २ ॥
संग हरीच्या नामाचा ॥ शुचिर्भूत सदा वाचा ॥ ३ ॥
तुका म्हणे हरिच्या दासा ॥ शुभ काळ अवघ्या दिशा ॥ ४ ॥

( ४९ )

बोल बोलतां वाटे सोपें ॥ करणी करितां टीर कांपे ॥ १ ॥
नव्हे वैराग्य सोपारें ॥ मज बोलतां न वाटे खरें ॥ २ ॥

---

२ देवबा.

विष खावें ग्रासोग्रासीं ॥ धन्य तोचि एक सोसी ॥ ३ ॥
तुका म्हणे करूनि दावी ॥ त्याचे पाय माझे जिवीं ॥ ४ ॥

( ५० )

धेनु चरे वनांतरीं ॥ चित्त बाळका पे घरीं ॥ १ ॥
तैसें करी वो माझे आई ॥ ठाव देउनी राखें पायीं ॥ २ ॥
काढितां तळमळी ॥ जीवनाबाहेर मासोळी ॥ ३ ॥
तुका म्हणे कुडी ॥ जीवेंप्राणाची आवडी ॥ ४ ॥

( ५१ )

डोई वाढवूनी केश ॥ भूतें आणिती अंगास ॥ १ ॥
तरी ते नव्हती संतजन ॥ तेथें नाहीं आत्मखुण ॥ २ ॥
मेळवुनी नरनारी ॥ शकुन सांगती नानापरी ॥ ३ ॥
तुका म्हणे मैंद ॥ नाहिं त्यापाशीं गोविंद ॥ ४ ॥

( ५२ )

पोट लागलें पाठीसी ॥ हिंडवीतें देशोदेशीं ॥ १ ॥
पोटा भेणें जिकडे जावें ॥ तिकडे पोट येतें सवें ॥ २ ॥
जप तप अनुष्ठान ॥ पोटासाठीं झाले दीन ॥ ३ ॥
पोटें सांडोयेली चवी ॥ नीचापुढें तें नाचवी ॥ ४ ॥
पोट कशियानें भरे ॥ तुका म्हणे झुरझुरू मरे ॥ ५ ॥

( ५३ )

सर्वां भूतीं द्यावें अन्न ॥ द्रव्य पात्र विचारून ॥
उपतिष्टे कारण ॥ तेथें बीज पेरीजे ॥ १ ॥
पुण्य करितां होय पाप ॥ दूध पाजूनी पोसिला साप ॥
करुनी अघोराचा जप ॥ दुःख विकत घेतलें ॥ २ ॥
भूमी पाहातां नाहीं वेगळी ॥ माळ बरड एक काळी ॥
उत्तम निराळी ॥ मध्यम आणि कनिष्ठ ॥ ३ ॥
म्हणोनी विवेकें ॥ कांहीं करणें तें निकें ॥
तुका म्हणे फिकें ॥ रुची नेदी मिष्टान्न ॥ ४ ॥

---

१ जीवाला ( देहाभिमान धरणारी चित्कला इला ) कुडी ( देह ) परम प्रिय वाटते, ती सोडून जाण्याला त्याला महत् दुःख वाटतें, तसें तुजविषयीं मला वाटं दे.
२ ( जेथें ) कारण ( बीज ) उपतिष्ठे-फलोत्पादक होतें.

( ५४ )

कन्येचा जे नर करीतीं वीकरा ॥ ते जाती अघोरा नरकपाता ॥ १ ॥
नाम गाउनीया द्रव्य जे मागती ॥ नेणों तयां गती कैसी होय ॥ २ ॥
कैसें होईल त्यांचें तेच हो जाणतो॥ आम्हांसी संगती न लगे त्यांची ॥३ ॥
अमुचा सांगाती आहे तो श्रीहरी ॥ न लगे दुराचारी तुका म्हणे ॥४ ॥

( ५५ )

साधूच्या दर्शना लाजसी गव्हांरा ॥ वेश्येचीये घरा हर्षें जाशी ॥ १ ॥
वेश्या दासी मुरळी जगाची ओंवळी ॥ ते तूज सोंवळी वाटे कैशी ॥२॥
तुका म्हणे आतां लाज धरी लुच्या ॥ टांचराच्या कुच्या मारा वेगीं ॥३॥

( ५६ )

दुर्बुद्धि ते मना ॥ कदा नुपजो नारायणा ॥ १ ॥
आतां मज ऐसें करीं ॥ तुझे पाय चित्तीं धरी ॥ २ ॥
उपजला भावो ॥ तुझे कृपें सिद्धी जावो ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां ॥ लाभ नाहीं यापरता ॥ ४ ॥

( ५७ )

साखरेच्या गोण्या बैलाचीये पाठीं ॥ तयासी शेवटीं करबाडें ॥ १ ॥
मालाचे पैं पेटे वाहताती उंटें ॥ तयांलागीं कांटे भक्षावया ॥ २ ॥
वाऊगा हा धंदा आशा वाढवोसी ॥ बांधोनीया घेसी यमा हातीं ॥ ३ ॥
ज्यासी असे लाभ तोची जाणे गोडी ॥ येरवीं बापूडीं शिणलीं वायां ॥४॥

( ५८ )

जेवीं नवज्वरें तापलें शरीर ॥ लागे तया क्षीर विषातुल्य ॥ १ ॥
तेवीं परमार्थ जीहीं दुराविला ॥ तयालागीं झाला सन्निपात ॥ २ ॥
कामिण जयाच्या जाहली नेत्रासी ॥ देखी तो चंद्रासी पीतवर्ण ॥ ३ ॥
तुका म्हणे मद्यपानाची आवडी ॥ न रुचे त्या गोडी नवनीताची ॥ ४ ॥

( ५९ )

राजा चाले तेथें वैभव सांगातें ॥ हें काय लागतें सांगावें त्या ॥ १ ॥
कोणी कोणा एथें न मनी जी फुका ॥ कृपेवीण एका देवाचिया ॥ २ ॥
शृंगारिलें नाहीं तगों येत वरी ॥ उमटे लौकरी जैसें तैसें ॥ ३ ॥
तुका म्हणे घरीं वसे नारायण ॥ कृपेची ते खुण दिसों येते ॥ ४ ॥

---

१ त्रिदोष-सन्निपात झाला असतां जसा मनुष्य मरतोच तसा ज्यास परमार्थ नाहीं तो नाश पावतोच. २ बरच्यावर आणलेली शोभा ( फार वेळ ) टिकत नाहीं.

( ६० )

कईं वाहावें जीवन ॥ कईं पलंगीं शयन ॥ १ ॥
जैसी जैसी वेळ पडे ॥ तैसें तैसें होणें घडे ॥ २ ॥
कईं भोज्य नाना परी ॥ कईं कोरड्या भाकरी ॥ ३ ॥
कईं बैसावें वाहनीं ॥ कईं पाईं अनवाणी ॥ ४ ॥
कईं उत्तम प्रावर्णें ॥ कईं वसनें तीं ही जीर्णें ॥ ५ ॥
कईं सकळ संपत्ती ॥ कईं भोगणें विपत्ती ॥ ६ ॥
कईं सज्जनासीं संग ॥ कईं दुर्जनासीं योग ॥ ७ ॥
तुका म्हणे जाण ॥ सुख दुःख तें समान ॥ ८ ॥

( ६१ )

कासया पाषाण पूजीती पीतळ ॥ अष्ट धातू खळ भावहीन ॥ १ ॥
भावची कारण भावचो तारण ॥ मोक्षाचें साधन बोलोयेलें ॥ २ ॥
काय करिल जप-माळ कंठ-माळा ॥ करिसो वेळोवेळां विषयजप॥ ३ ॥
काय करिसोल पंडित होउनी ॥ अक्षराभिमानी थोर होय ॥ ४ ॥
काय करिसोल कुशल गायन ॥ अंतरीं मळीन कुबुद्धि तों ॥ ५ ॥
तुका म्हणे भाव नाहीं करी सेवा ॥ तेणें काय देवा योग्य होसी ॥६॥

( ६२ )

साधकाची दशा उदास असावी ॥ उपाधी नसावी अंतर्बाह्य ॥ १ ॥
लोभातें टाकावें निद्रेतें जितावें ॥ भोजन करावें परीमित ॥ २ ॥
एकांतीं लोकांतीं स्त्रीयांसीं भाषण ॥ प्राण गेल्या जाण करूं नये ॥३ ॥
संग सज्जनाचा उच्चार नामाचा ॥ घोष कीर्तनाचा अहर्निशो ॥ ४ ॥
तुका म्हणे ऐशा साधनीं जो राहे ॥ तया ज्ञान लाहे गुरुकृपें ॥ ५ ॥

( ६३ )

कासया गा मज घातलें संसारीं ॥ चित्त पायांवरी नाहीं तुझ्या ॥ १ ॥
कासया गा मज घातलें ह्या जन्मा ॥ नाहीं तुझा प्रेमा नित्य नवा ॥ २ ॥
नामावीण माझी वाचा अमंगळ ॥ ऐसा कां चांडाळ निर्मीयेला ॥ ३ ॥
तुका म्हणे माझी जळो जळो काया ॥ विठ्ठला सखया वांचुनीया ॥ ४ ॥

( ६४ )

माता कापी गळा ॥ तेथें कोण राखे बाळा ॥ १ ॥
हें का नेणा नारायणा ॥ मज चाळवीतां दीना ॥ २ ॥
नागवी धांवणें ॥ तेथें साह्य व्हावें कोणें ॥ ३ ॥
राजा सर्व हरी ॥ तेथें दुजा कोण वारी ॥ ४ ॥
तुझ्या केल्यावीण ॥ नव्हे स्थीर वश मन ॥ ५ ॥
तुका म्हणे हरी ॥ सूत्र तुम्हां हातीं दोरी ॥ ६ ॥

( ६५ )

परद्रव्य परनारी ॥ अभिलाषुनी नाक धरी ॥ १ ॥
जळो तयाचा आचार ॥ व्यर्थ भार वाहे खर ॥ २ ॥
सोंवळ्याची स्फीती ॥ क्रोधें विटाळला चित्तीं ॥ ३ ॥
तुका म्हणे सोंग ॥ दावी बाहेरील अंग ॥ ४ ॥

( ६६ )

टिळे टोपी उंच दावी ॥ जनीं मी एक गोंसावी ॥ १ ॥
अवघा वर रंग सारा ॥ पोटीं विषयाचा थारा ॥ २ ॥
मुद्रा लावितो कोरूनी ॥ मान व्हावयासी जनीं ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसे किती ॥ नरका गेले पुढें जाती ॥ ४ ॥

( ६७ )

ऐसे संत झाले कळी ॥ तोंडीं तमाखूची नळी ॥ १ ॥
स्नान संध्या बुडविली ॥ पुढें भांग वोढविली ॥ २ ॥
भांग भुर्का हें साधन ॥ पचनीं पडे मद्यपान ॥ ३ ॥
तुका म्हणे अवघें सोंग ॥ तेथें कैंचा पांडुरंग ॥ ४ ॥

( ६८ )

वर्णावी ते थोरी एका विठलाची ॥ कीर्ती मानवाची बोलों नये ॥ १ ॥
उदंडची झाले जन्मोनीया मेले ॥ होवोनीया गेले राव रंक ॥ २ ॥
त्यांचें नाम कोणी न घे चराचरीं ॥ साही वेद चारी वर्णिताती ॥ ३ ॥
अक्षय अढळ चळेना वळेना ॥ त्या नारायणा ध्यात जावें ॥ ४ ॥
तुका म्हणे तुम्हीं विठल चित्तीं ध्यातां ॥ जन्म मरण व्यथा दूर होती ॥५॥

---

१ आपलें रक्षण व्हावें म्हणून ज्यास बोलाविलें, तोच जर आपणास लुटील तर.

( ६९ )

जोडोनीया धन उत्तम वेव्हारें ॥ उदास वीचारें वेंच करी ॥ १ ॥
उत्तमची गती तो एक पावेल ॥ उत्तम भोगील जीव-खाणी ॥ २ ॥
पर-उपकारी नेणे परनिंदा ॥ परस्त्रिया सदा बहिणी मायी ॥ ३ ॥
भूतदया गायीपशूंचें पाळण ॥ तान्हेल्या जीवन वनामाजी ॥ ४ ॥
शांतीरूप नव्हे कोणाचें वाच्यत्व ॥ वाढवी महत्व वडीलांचें ॥ ५ ॥
तुका म्हणे हेंची आश्रमाचें फळ ॥ परम-पद-बळ वैराग्याचें ॥ ६ ॥

( ७० )

आली सिंहस्थ पर्वणी ॥ न्हाव्या भटां झाली धणी ॥[1] १ ॥
अंतरीं पापाच्या कोटी ॥ वरी बोडी डोयी दाढी ॥ २ ॥
जें बोडीलें तें निघालें ॥ सांग काय पालटलें ॥ ३ ॥
पाप गेल्याची खुण ॥ नाहीं पालटले अवगुण ॥ ४ ॥
भक्तिभावें वीण ॥ तुका म्हणे अवघा शीण ॥ ५ ॥

( ७१ )

मऊ मेणाहून आम्ही विष्णुदास ॥ कठिण वज्रास भेदूं ऐसे ॥ १ ॥
मेले जित असों निजोनिया जागे ॥ जो जो जें जें मागे तें तें देऊं ॥ २ ॥
भले तरी देऊं गांडीची लंगोटी ॥ नाठ्याळाचे काठी देऊं माथां ॥ ३ ॥
मायबापांहूनि बहु मायावंत ॥ करूं घातपात शत्रूहूनि ॥ ४ ॥
अमृत तें काय गोड आम्हांपुढें ॥ विष तें बापुडें कडू किती ॥ ५ ॥
तुका म्हणे आम्ही अवघेचि गोड ॥ ज्याचें पुरे कोड त्याचे परी ॥ ६ ॥

( ७२ )

हेची थोर भक्ती आवडती देवा ॥ संकल्पावी माया संसाराची ॥ १ ॥
ठेविलें अनंतें तैसेंची राहावें ॥ चित्तीं असों द्यावें समाधान ॥ २ ॥
वाहील्या उद्वेग दुःखची केवळ ॥ भोगणें तें फळ संचीताचें ॥ ३ ॥
तुका म्हणे घालूं तयावरी भार ॥ वाहूं हा संसार देवापायीं ॥ ४ ॥

( ७३ )

धनवंतालागीं ॥ सर्व मान्यता हे जगीं ॥ १ ॥
माता पिता बंधू जन ॥ सर्व मानीती वचन ॥ २ ॥

---

[1] विषयलुब्ध न होतां खरें कल्याण होईल तशा रीतीनें.

जंव चाले मोठा धंदा ॥ तंव बहीण म्हणे दादा ॥ ३ ॥
सदा शृंगारभूषणें ॥ कांता लवे बहूमानें ॥ ४ ॥
तुका म्हणे धन ॥ भाग्य अशाश्वत जाण ॥ ५ ॥

( ७४ )

लोहो परीसा रूसलें ॥ सोनेपणासी मूकलें ॥ १ ॥
येथें कोणाचें काय गेलें ॥ ज्याचें तेणें अनहित केलें ॥ २ ॥
गंगा आली आळशावरी ॥ आळशी देखुनि पळे दुरी ॥ ३ ॥
गांवाखालील ओहळ ॥ रागें गंगेसी न मिळे ॥ ४ ॥
तुका म्हणे होऊनी दास ॥ गुरूसी न भजती शिष्य ॥ ५ ॥

( ७५ )

मागेन तें एक तुज ॥ देईं विचारोनी मज ॥ १ ॥
नको दुर्जनाचा संग ॥ क्षणक्षणा चित्त-भंग ॥ २ ॥
जन्म घेईन मी नाना ॥ बहु सोसीनं यातना ॥ ३ ॥
रंक होईन दीनाचा ॥ घायें देह-पात साचा ॥ ४ ॥
तुका म्हणे हेंचि आतां ॥ देईं देईं तूं सर्वथा ॥ ५ ॥

( ७६ )

कल्पतरु रुया नव्हती बाभुळा ॥ पुरविती फळा इच्छी तया ॥ १ ॥
उदंड त्या गाई म्हैसी आणि शेळया ॥ परि त्या निराळया कामधेनु ॥ २ ॥
तुका म्हणे देव दाखवील दृष्टी ॥ तया सवें भेटी थोर पुण्य ॥ ३ ॥

( ७७ )

जळो भेमा तैसा रंग ॥ जाय उडोनी पतंग ॥ १ ॥
सासुसाठीं रडे सून ॥ भाव अंतरींचा भिन्न ॥ २ ॥
मैंद मुखीचा कोंवळा ॥ भाव अंतरीं निराळा ॥ ३ ॥
जैसी वृंदावनकांति ॥ उत्तम धरूं नये हातीं ॥ ४ ॥
बक ध्यान करी ॥ सोंग करूनि मासे मारी ॥ ५ ॥
तुका म्हणे सर्प डोले ॥ तैसा कथेमाजी खुले ॥ ६ ॥

( ७८ )

जन हें सुखाचें दिल्याघेतल्याचें ॥ बा अंतकाळींचें नाहीं कोणी ॥ १ ॥
[illegible] हीन शक्तो नाक डोळे गळतो ॥ सांडोनीया पळतो रांडापोरें ॥ २ ॥

बाइल म्हणे खर मरता तरी बरें ॥ नासलें हें घर थुंकोनीया ॥ ३ ॥
तुका म्हणे माझी न होत हीं कोणी ॥ तुज चक्रपाणी वांचूनीया ॥४ ॥

( ७९ )

मोलें घातलें रडाया ॥ नाहीं असूं आणी माया ॥ १ ॥
तैसा भक्तिवाद काय ॥ रंगबेगडीचा न्याय ॥ २ ॥
वेठीं धरिल्या दावी भाव ॥ मागें पळावया पाव ॥ ३ ॥
काजळ्याच्या जोती ॥ तुका म्हणे न लगे वाती ॥ ४ ॥

( ८० )

पतित मी पापी शरण आलों तूज ॥ राखीं माझी लाज पांडूरंगा ॥ १ ॥
तारीयेले भक्त न कळे तुझा अंत ॥ थोर मी पतित पांडूरंगा ॥ २ ॥
द्रौपदी बहोण वैरीं गांजोयेली ॥ आपणा ऐसी केली पांडूरंगा ॥ ३ ॥
प्रल्हादाकारणें स्तंभीं अवतार ॥ माझा कां विसर पांडूरंगा ॥ ४ ॥
सुदामा ब्राह्मण दरिद्रें व्यापीला ॥ आपणा ऐसा केला पांडूरंगा ॥ ५ ॥
तुका म्हणे तुज शरण निजभावें ॥ पाप निर्दाळावें पांडूरंगा ॥ ६ ॥

( ८१ )

पुण्य पर उपकार पाप ते पीडा ॥ आणिक नाहीं जोडा दुजा यासी ॥ १॥
सत्य तोचि धर्म असत्य तें कर्म ॥ आणिक हें वर्म नाहीं दुजें ॥ २ ॥
गति तेचि मुखीं नामाचें स्मरण ॥ अधोगति जाण विन्मुखता ॥ ३ ॥
संतांचा हा संग तोचि स्वर्गवास ॥ नर्क तो उदास अनर्गळा ॥ ४ ॥
तुका म्हणे उघडें आहे हित घात ॥ जयाचें उचित करा तैसें ॥ ५ ॥

( ८२ )

चातुर्याचे योगें कवित्व करीती ॥ प्रसादिक रंग आणितां नये ॥ १ ॥
सन्याशाचें सोंग संपादिलें सांग ॥ वैराग्याचें अंग आणितां नये ॥ २॥
चंद्रसूर्यचित्रें लिहिताति भिंती ॥ प्रकाशाचें अंग लिहितां नये ॥ ३ ॥
शिपायाचें सोंग आणितां येईल सांग ॥शूरत्वाचें अंग आणितां नये॥४॥
तुका म्हणे गाऊन नाचून करितील सीमा॥पांडुरंगीं प्रेमा आणितां नये ५

( ८३ )

लेंकरा लेववी माता अलंकार ॥ नाहीं अंतपार आवडीसी ॥ १ ॥
कृपेचें पोसणें तुमचें मी दीन ॥ तुम्ही संतजन मायबाप ॥ २ ॥
आरुष उत्तरीं संतोषे माउली ॥ कवळूनी घाली हृदयाआंत ॥ ३ ॥

पोटा आलें त्याचे न पाहे गुण दोष ॥ कल्याणचि इच्छी असावें हें ॥ ४ ॥
मनाची ते चाली मोहाची ते होय ॥ ओघ गंगा काय परतों जाय ॥ ५ ॥
तुका म्हणे मोठी उदार मेघ-शक्ती ॥ माझी तृषा किती चातकाची ॥ ६ ॥

( ८४ )

हा मी आलों म्हणे कोणी बूडतया ॥ तेणें किती तया बळ चढे ॥ १ ॥
तुम्हीं माझा भार घेतला सकळ ॥ आश्वासीलों बाळ अभयकरें ॥ २ ॥
भुकेलीया आस दावीतां निर्द्धार ॥ किती होय धीर समाधान ॥ ३ ॥
तुका म्हणे दिल्हो चिंतामणीसाठीं ॥ उचित काचवटी दंडवत ॥ ४ ॥

( ८५ )

समर्थाचें बाळ कीविलवाणें दिसे ॥ तरी कोणा हांसे जन देवा ॥ १ ॥
अवगुणी जरी झालें तें वोंगळ ॥ करावा सांभाळ लागे त्याचा ॥ २ ॥
तुका म्हणे तैसा मी एक पतित ॥ परि मुद्रांकित झालों तुझा ॥ ३ ॥

( ८६ )

तूं माझी माउली तूं माझी साउली ॥ पाहातों वाटूली पांडुरंगे ॥ १ ॥
तूं मज एकुला वडोल धाकुला ॥ तूं मज आपूला सोयरा जीव ॥ २ ॥
तुका म्हणे जीव तुजपाशीं आस ॥ तुजवीण ओस सर्व दीशा ॥ ३ ॥

( ८७ )

घातलें दुकान ॥ देती आलीयासी दान ॥ १ ॥
संत उदार उदार ॥ भरलें अनंत भांडार ॥ २ ॥
मागत्याची पुरे ॥ धणी आणीकासी उरे ॥ ३ ॥
तुका म्हणे पोतें ॥ देवें भरलें नव्हे रितें ॥ ४ ॥

( ८८ )

मज शेवटांचा द्यावा ॥ ठाव तयांचीपे देवा ॥
नाहीं करीत मी हेवा ॥ कांहीं थोरपणाचा ॥ १ ॥
पाहा किती आले ॥ शरण समानची केले ॥
नाहीं वीचारिले ॥ गुण दोष कोणाचे ॥ २ ॥
नाहीं पाहिला आचार ॥ कुळगोत्राचा वीचार ॥
फेडूं आला भार ॥ मृग भ म्हणे दगड ॥ ३ ॥
तुका म्हणे सर्व जाणा ॥ तुझ्या आल्यावरी मना ॥
केला तो उगाणा ॥ घडल्या महादोषांचा ॥ ४ ॥

( ८९ )

दुष्ट आचरणासि ग्वाही माझें मन ॥ मज ठावे गुण दोष माझे ॥ १ ॥
आतां तुम्ही सर्व जाणा पांडुरंगा ॥ पाहिजे प्रसंगा ऐसें केलें ॥ २ ॥
व्याघ्राजांवयांचे पंगती दुर्बळ ॥ वंचीजे तो काळ नव्हे कांहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां झालों शरणागत ॥ पुढील उचित तुम्हां हातीं ॥४॥

( ९० )

जरा[1] कर्णमूळीं सांगों आली गोष्टी ॥ मृत्यूचिये भेटी जवळी आली ॥१॥
आतां माझ्या मना होईं सावधान ॥ हे पुण्याची जाण कार्यसिद्धी॥२॥
शेवटील घडी बुडतां न लगे वेळ ॥साधावा तो काळ जवळी आला॥३॥
तुका म्हणे चिंतीं कुळींचो देवता ॥ बाराबा[2] भोंवतो शब्द मिथ्या ॥४॥

( ९१ )

संतासी क्षोभवी कोण्या ही प्रकारें ॥ त्याचें नव्हे बरें उभयलोकीं ॥१॥
देवाचा तो वैरी शत्रू दावेदार ॥ पृथ्वीवरी थार नेदी तया ॥ २ ॥
संतांपाशीं ज्याचा नुरेची विश्वास ॥ त्याचे झाले दोष बळीवंत ॥ ३ ॥

( ९२ )

वसोनि थिल्लरीं ॥ बेडुक सागरा धिक्कारी ॥ १ ॥
नाहीं देखिला ना ठावा ॥ तोंड पिटी करी हांवा ॥ २ ॥
फुगतें काउळें ॥ म्हणे मी राजहंसा आगळें ॥ ३ ॥
गजाहुनी खर ॥ म्हणे चांगला मी फार ॥ ४ ॥
मुलाम्याचें नाणें ॥ तुका म्हणे नव्हे सोनें ॥ ५ ॥

( ९३ )

दुधाचे घागरीं मद्याचा हा बुंद ॥ पडलिया शुद्ध नव्हे मग ॥ १ ॥
तैसें खळां-मुखें न करावें श्रवण ॥ अहंकारें मन विटाळलें ॥ २॥
काय करावीं तीं बत्तीस लक्षणें ॥ नाक नाहीं तेणें वांयां गेलीं ॥ ३ ॥
तुका म्हणे अन्न जिरों नेदी माशी ॥ आपुलोया जैशी संवसर्गें ॥ ४ ॥

( ९४ )

काय केलें जळचरीं ॥ ढीवर त्यांच्या घातावरी ॥ १ ॥
हा तों ठायींचा विचार ॥ आहे यातिवैराकार ॥ २ ॥

---

[1] वार्धक्य. [2] ईश्वरचिंतनावांचून इतर सर्व गोष्टी खोट्या समजून सोडून द्याव्या.

श्वापदातें वधी ॥ निरपराधें पारधी ॥ ३ ॥
तुका म्हणे खळ ॥ संतां पीडीती चांडाळ ॥ ४ ॥

( ९५ )

जाणतें लेकरूं ॥ माता लागे दुरी धरूं ॥ १ ॥
तैसें न करीं कृपावंते ॥ पांडुरंगे माझे माते ॥ २ ॥
नाहीं मुक्ताफळा ॥ भेटी मागुती त्या जळा ॥ ३ ॥
तुका म्हणे लोणी ॥ ताक सांडी नीवडूनी ॥ ४ ॥

( ९६ )

वाइटानें भलें ॥ हीनें दाविलें चांगलें ॥ १ ॥
एकावीण एका ॥ कैचें मोल होतें फुका ॥ २ ॥
विषें दाविलें अमृत ॥ कडू गोड घातें हित ॥ ३ ॥
काळिमेनें ज्योती ॥ दिवस कळों आला राती ॥ ४ ॥
उंच नीच गारा ॥ हिरा परीस मोहरा ॥ ५ ॥
तुका म्हणे भले ॥ ऐसे नष्टांनीं कळले ॥ ६ ॥

( ९७ )

आधीं होता वाघ्या ॥ दैवयोगें झाला पाग्या ॥ १ ॥
त्याचा येळकोट राहीना ॥ मूळस्वभाव जाईना ॥ २ ॥
आधीं होता ग्रामजोशी ॥ राज्यपद आलें त्याशी ॥ ३ ॥
त्याचें पंचांग राहीना ॥ मूळस्वभाव जाईना ॥ ४ ॥
आधीं होती दासी ॥ पट्टराणी केलें तिसी ॥ ५ ॥
तिचें हिंडणें राहीना ॥ मूळस्वभाव जाईना ॥ ६ ॥
आधीं होता संतसंग ॥ तुका झाला पांडुरंग ॥ ७ ॥
त्याचें भजन राहीना ॥ मूळस्वभाव जाईना ॥ ८ ॥

( ९८ )

दुष्टाचें चित्त न भिने अंतरीं ॥ जरी जन्मवरी उपदेशिला ॥ १ ॥
पालथे घागरी घातलें जीवन ॥ न धरीच जाण तें ही त्याला ॥ २ ॥
जन्मा येउनि तेणें पतनचि साधिलें ॥ तमोगुणें व्यापिलें जया नरा ॥ ३ ॥
जळो जळो हें त्याचे झालेपण ॥ कासया हें आले संसारासी ॥ ४ ॥
पाषाण जीवनीं असतां कल्पवरी ॥ पहातां अंतरीं कोरडा तो ॥ ५ ॥

कुचर मूग नयेचि पाका ॥ पाहातां सारिखा होता तैसा ॥ ६ ॥
तुका म्हणे असे उपाय सकळां ॥ न चले या खळा प्रयत्न कांहीं ॥७॥
म्हणऊनी संग न करितां भला ॥ धरितां अबोला सर्व हित ॥ ८ ॥

( ९९ )

ज्यासी माता परनारी ॥ त्याचे मुखीं खरा हरी ॥ १ ॥
इतर पोटासाठीं सोंग ॥ तेथें कैंचा पांडूरंग ॥ २ ॥
ज्याला परधन विष ॥ तोचि खरा हरीदास ॥ ३ ॥
तुका म्हणे सत्य सत्य ॥ कृष्णापायांची शपत ॥ ४ ॥

( १०० )

जेणें सांडीला संसार ॥ तयावरी माया फार ॥ १ ॥
धांवे चाले मागें मागें ॥ सुख दुःख सोशी अंगें ॥ २ ॥
ज्याणें घ्यावें नाम ॥ त्याचें करावें तें काम ॥ ३ ॥
तुका म्हणे भोळी ॥ विठ्ठल कृपेची साउळी ॥ ४ ॥

( १०१ )

घेईं घेईं माझे वाचे ॥ गोड नाम विठोबाचें ॥ १ ॥
मना तेथें धांव घेईं ॥ राहीं राघोबाचे पायीं ॥ २ ॥
डोळे तुम्ही घ्यारे सुख ॥ पाहा विठोबाचें मुख ॥ ३ ॥
तुम्ही आइकारे कान ॥ माझे विठोबाचे गुण ॥ ४ ॥
तुका म्हणे जीवा ॥ नको सांडू या केशवा ॥ ५ ॥

( १०२ )

ब्रह्मरस घेईं काढा ॥ तेणें पीडा वारेल ॥ १ ॥
पथ्य नाम विठोबाचें ॥ आणिक वाचे न सेवीं ॥ २ ॥
भवरोगा ऐसें जाय ॥ आणिक काय क्षुल्लक ॥ ३ ॥
तुका म्हणे न व्हे बाधा ॥ आणिक कदा भूताची ॥ ४ ॥

( १०३ )

पडतां जड भारी ॥ दासीं आठवावा हरी ॥ १ ॥
मग तो होऊं नेदी शीण ॥ आड घाली सुदर्शन ॥ २ ॥
हरिनामाचे चिंतनें ॥ बारा वाटे पळती विघ्नें ॥ ३ ॥
तुका म्हणे हरी ॥ कांहीं उरूं नेदी उरी ॥ ४ ॥

( १०४ )

नाहीं निर्मळ जीवन ॥ काय करील साबण ॥ १ ॥
वंध्ये न होती लेंकुरें ॥ काय किजे त्या भ्रतारें ॥ २ ॥
नपुंसका पुरुषासी ॥ बाइल काय होय त्यासी ॥ ३ ॥
वृक्ष नेदी पुष्प फळ ॥ काय करील वसंतकाळ ॥ ४ ॥
तुका म्हणे भक्तीवीण ॥ फळ कांहीं नाहीं जाण ॥ ५ ॥

( १०५ )

जे कां रंजले गांजले ॥ त्यांसी म्हणवी जो आपुले ॥ १ ॥
साधु तोची ओळखावा ॥ देव तेथेंची जाणावा ॥ २ ॥
ज्यासी आपंगिता नाहीं ॥ त्यासी धरी जो त्दद्यीं ॥ ३ ॥
दया करीजे पुत्रासी ॥ तेचि दास आणि दासी ॥ ४ ॥
तुका म्हणे सांगू किती ॥ तोचि भगवंताची मूर्ती ॥ ५ ॥

( १०६ )

जाऊनिया तीर्था काय तुवां केलें ॥ चर्म प्रक्षाळिलें वरी वरी ॥ १ ॥
अंतरीचें शुद्ध कासयानें झालें ॥ भूषण त्वां केलें आपणया ॥ २ ॥
वृंदावनफळ घोळिलें साकरा ॥ भीतरील थारा मोडेचिना ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं शांति क्षमा दया ॥ तोंवरी कासया फुंदां तुम्ही॥४॥

( १०७ )

गंगाजळा पाहीं पाठी पोट नाहीं ॥ अवगुण तो कांहीं अमृतासी ॥१॥
रवि दीप काळिमा काय जाणे हिरा ॥ आणिका तिमिरा नाश तेणें ॥२॥
कर्पूर कांडणीं काय कोंडा कणी ॥ सिंधू मिळवणी काय चाले ॥ ३ ॥
परिस चिंतामणि आणिकांचा गुणीं ॥ पालटे लागोनी नव्हे तैसा ॥४ ॥
तुका म्हणे तैसे जाणा संतजन ॥ सर्वत्र संपूर्ण गगन जैसें ॥ ५ ॥

( १०८ )

आलीया भोगासी असावें सादर ॥ देवावरी भार घालूनिया ॥ १ ॥
तोची कृपानीधी वारील सांकडें ॥ यैर ते बापुडे काय रंक ॥ २ ॥
भवाचीये पोटीं दुःखाचीया राशी ॥ शरण देवासी जातां भलें ॥ ३ ॥
तुका म्हणे जया भार घातलीया ॥ उपेक्षीना तया दीनबंधू ॥ ४ ॥

( १०९ )

तुझा दास ऐसें म्हणती सकळ ॥ म्हणोनी सांभाळ करीं माझा ॥ १ ॥
अनाथाचा नाथ पतितपावन ॥ हें आतां जतन करीं नाम ॥ २ ॥
नेणो तुझी कैसी करावी ते सेवा ॥ जाणसी केशवा अंतरींचें ॥ ३ ॥
तुका म्हणे तूं गा करुणेचा सिंधू ॥ तोडीं भव-बंधू माझा देवा ॥४॥

( ११० )

तुजवीण वाणी आणीकाची थोरी ॥ तरी माझी हरी जिव्हा झडो ॥१॥
नेत्र आणीकासी पाहती आवडी ॥ जावोत तेचि घडी चांडाळ हे ॥२॥
कथामृतपान न करिती श्रवण ॥ काय प्रयोजन ह्यांचें मग ॥ ३ ॥
हातपाय तुझे पथीं न चालतां ॥ जावोत अनंता गळोनिया ॥ ४ ॥
तुका म्हणे तुज विसंबीतां क्षण ॥ वांचोनी कारण काय मग ॥ ५ ॥

( १११ )

नरदेहा यावें हरीदास व्हावें ॥ तेणें चूकवावें गर्भवासा ॥ १ ॥
नाहीं तरी वांया शिणविली माय ॥ नरकासी जाय जन्मोजन्मीं ॥ २ ॥
तीर्थ व्रत दान देवाचें पूजन ॥ ऐसें हें साधन साधकाचें ॥ ३ ॥
तुका म्हणे मूर्खी नित्य म्हणे हरी ॥ तया सुखा सरो नाहीं पार ॥ ४ ॥

( ११२ )

कारे नाठवीसी कृपाळू देवासी ॥ पोसीतो जगासी एकलाची ॥ १ ॥
फुटे तरुवर उष्णकाळमासीं ॥ जीवन तयासी कोण घाली ॥ २ ॥
बाळा दुग्ध कोणी केलेंसे उत्पत्ती ॥ वाढवी श्रीपती सवें दोन्ही ॥ ३ ॥
तेणें तुझी काय नाहीं केली चिंता ॥ राहें त्या अनंतां आठवूनी ॥ ४ ॥
तुका म्हणे त्याचें नांव विश्वंभर ॥ करा निरंतर ध्यान त्याचें ॥ ५ ॥

( ११३ )

नारायणीं जेणें घडे अंतराय ॥ हो‍का बापमाय त्यजावीं तीं ॥ १ ॥
येर प्रिया पुत्रा असे कोण लेखा ॥ करीती ते दुःखा पात्र शत्रू ॥ २ ॥
प्रल्हादें जनक बिभीषणें बंधू ॥ आणि माता निद्य भरतें केली ॥ ३ ॥
तुका म्हणे सर्व धर्म हरी-पाय ॥ आणीक उपाय दुःखमूळ ॥ ४ ॥

---

होईनात कां.

( ११४ )

हरीचीया दासा नाहीं भयचिंता ॥ दुःखें नीवारीता नारायण ॥ १ ॥
न लगे वाहाणें संसार उद्वेग ॥ जडों नेदी पांग देवराय ॥ २ ॥
असों द्यावा धीर सदा समाधान ॥ आहे नारायण जवळी च ॥ ३ ॥
तुका म्हणे माझा सखा पांडुरंग ॥ व्यापीयेलें जग तेणें ऐकें ॥ ४ ॥

( ११५ )

तैसे नव्हों आम्ही विठोबाचे दास ॥ यावें आणीकास काकुळती ॥१॥
स्वामीचीये सत्ते ठेंगणें सकळ ॥ आले कळीकाळ हाताखालीं ॥ २ ॥
अंकितान्मा असे अभिमान देवा ॥ समर्पूनी ठेवा असें पायीं ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हां इच्छेचें बोलणें ॥ कोड नारायणें पूरवावें ॥ ४ ॥

( ११६ )

अंतरीं निर्मळ वाचेचा रसाळ ॥ त्याचे गळां माळ असों नसो ॥ १ ॥
आत्माअनुभवीं चोखाळीलया वाटा ॥ त्याचे माथां जटा असो नसो ॥२॥
परस्त्रीचे ठायीं जो का नपुंसक ॥ त्याचे आंगा राख असो नसो ॥ ३ ॥
परद्रव्या अंध निंदेसी जो मूका ॥ तोची संत देखा तुका म्हणे ॥ ४ ॥

( ११७ )

न मिळो खावया न वाढो संतान ॥ परि हा नारायण कृपा करो ॥१॥
ऐशी माझी वाणी मज उपदेशी ॥ आणीक लोकांसी हेंची सांगे ॥ २ ॥
विटंबो शरीर होत कां विपत्ती ॥ परी राहो चित्तीं नारायण ॥ ३ ॥
तुका म्हणे नाशवंत हें सकळ ॥ आठवी गोपाळ तेंची हीत ॥ ४ ॥

( ११८ )

सद्गुरुवांचूनी सांपडेना सोय ॥ धरावे ते पाय आधीं त्याचे ॥ १ ॥
आपणासारिखे करीती तात्काळ ॥ कांहीं काळवेळ न लगे त्यांशी॥२॥
लोहपरीसासी न साहे उपमा ॥ सद्गुरुमहीमा अगाधची ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसें आंधळें हें जन ॥ गेलें विसरून खऱ्या देवा ॥ ४ ॥

( ११९ )

विषयाचें सूख येथें वाटे गोड ॥ पुढें अवघड यमदंड ॥ १ ॥
हाणीती झोडीती मारीती निष्ठुर ॥ यमाचे किंकर बहूसाळ ॥ २ ॥
असीपत्रवन खैराचे विंगळ ॥ निघतील जाळ तैलपाकीं ॥ ३ ॥

वृक्ष भूमीवरी प्राणी लोळवीती ॥ बळें कवळवीती अग्निस्तंभ ॥ ४ ॥
म्हणोनिया तुका येतो काकुळती ॥ पुरे यातायाती गर्भ-वास ॥ ५ ॥

( १२० )

जननी हे जाणे बाळकाचें वर्म ॥ सुख दुःख धर्म जें जें कांहीं ॥ १ ॥
अंधापुढें जेणें दिधला आधार ॥ त्याचा हा विचार तोचि जाणे ॥२॥
शरणागता जेणें घातलें पाठीशीं ॥ तो जाणे तेविशीं राखों तया ॥३॥
कासे लागे तया न लगतो सायास ॥ पोहोणारा त्यास पार पावो ॥४॥
तुका म्हणे जीव विठ्ठलाचे हातीं ॥ दिला त्याची गति तोचि जाणे ॥५॥

( १२१ )

नको जाउ देउं भंगा ॥ गात्रें माझीं पांडुरंगा ॥ १ ॥
हरिकथेची सामुग्री ॥ देह-अवसानावरी ॥ २ ॥
माझें आयुष्य झालें ऊन ॥ परी मज आवडो कीर्तन ॥ ३ ॥
तुका म्हणे हाणी ॥ यावेगळी मना नाणीं ॥ ४ ॥

( १२२ )

मुंगियांच्या घरा कोण धाडी मूळ ॥ देखूनीया गूळ धांव घेती ॥ १ ॥
दुःखें पोडीयेला जाय वैद्य- घरा ॥ दुःख-परिहारा आपुलीया ॥ २ ॥
तुका म्हणे कां रे न करा स्वहीत ॥ कारण हे मोत धरा नामीं ॥ ३ ॥

( १२३ )

ढेंकणाचे संगें हिरा जो भंगला ॥ कुसंगें नाडला साधू तैसा ॥ १ ॥
वोढाळाचे संगें सात्वीक नाडले ॥ क्षण एक नासले समागमें ॥ २ ॥
तुका म्हणे धरा सत्संग हा बरा ॥ चुकेल तो फेरा चौऱ्यांशीचा ॥ ३ ॥

( १२४ )

आतां देवा ऐसा करीं उपकार ॥ देहाचा वीसर पडो माझ्या ॥ १ ॥
तरीच हा जीव सुख पावे माझा ॥ बरवें केशवराजा कळों आलें ॥ २ ॥
ठाव देईं चित्ता राखें पायांपाशीं ॥ सकळ वृत्तींशी अखंडीत ॥ ३ ॥
आस भय लाज चिंता काम क्रोध ॥ तोडावा संबंध यांचा माझा ॥ ४॥
मागणें हें देवा तुज एक आतां ॥ नाम मुखीं संतसंग देईं ॥ ५ ॥
तुका म्हणे नको वरपंग देवा ॥ घेईं माझी सेवा भावशुद्ध ॥ ६ ॥

( १२५ )

जरी झाला भाग्यवंत ॥ तरि का भेटेल भगवंत ॥ १ ॥

उंच वाढला एरंड ॥ तरि का होईल इक्षुदंड ॥ २ ॥
जरी गर्धभ वेगीं धांवे ॥ तरि का अश्वमोल पावे ॥ ३ ॥
तुका म्हणे तोची थोर ॥ ज्याचे मुखीं रघूवीर ॥ ४ ॥

( १२६ )

अग्नीमाजी गेलें ॥ अग्नि होऊन तेंच ठेलें ॥ १ ॥
काय उरलें तया पण ॥ मागील तें नाम गुण ॥ २ ॥
लोह लागे परिसा आंगीं ॥ तोही भूषण झाला जगीं ॥ ३ ॥
सरिता ओहळा ओघा ॥ गंगे मिळोनि जाहल्या गंगा ॥ ४ ॥
चंदनाच्या वासें ॥ तरु चंदन झाले स्पर्शें ॥ ५ ॥
तुका जडला संतां पायीं ॥ दुजेपणा ठाव नाहीं ॥ ६ ॥

( १२७ )

वेडिया उपचार करितां सोहळे ॥ काय सुख कळे तयासी तें ॥ १ ॥
अंधापुढें दीप नाचती नाचणें ॥ भक्तिभावेविण भक्ति तैशी ॥ २ ॥
तिमाणें रावण ठेवियेलें सेता ॥ घालुनिया माथां चुना तया ॥ ३ ॥
खादलें म्हणोनी शेवटीं बोंबली ॥ ठायींची भुली कां नेणां रया ॥ ४ ॥
मुकियापासाव सांगतां पुराण ॥ रोगिया मिष्टान्न काय होय ॥ ५ ॥
नपुंसका काय करील पद्मिणी ॥ रुचिविण वाणी तैसें होय ॥ ६ ॥
हात पाय नाहीं करील तो काय ॥ वृक्षा फळ आहे अमोलिक ॥ ७ ॥
ज्ञातां नये तैसा वांयांच तळमळी ॥ भावेंविण भोळीं म्हणे तुका ॥ ८ ॥

( १२८ )

आंधळ्यासी जन अवघेंची आंधळें ॥ आपणासी डोळे[1] दृश्य नाहीं ॥ १ ॥
रोगीयासी विषतुल्य हें मिष्टान्न ॥ तोंडासी कारण चवी नाहीं ॥ २ ॥
तुका म्हणे शुद्ध नाहीं जो आपण ॥ तया त्रिभूवन अवघें खोटें ॥ ३ ॥

( १२९ )

मायें मोकलिलें कोठें जावें बाळें ॥ आपुलिया बळें नेवंचे[2] तें ॥ १ ॥
रुसोनिया पळे सांडोनिया ताट ॥ मागें पाहे वाट यावें ऐसी ॥ २ ॥
भांडवल आम्हां आळी करावी हे ॥ आपणचि माये धांवसील ॥ ३ ॥
तुका म्हणे आळी करूनिया निकी ॥ देसील भातुकीं बुझाऊनी ॥ ४ ॥

१ (कारण) आपणास डोळ्यांनीं कांहीं दिसत नाहीं. २ न वांचे.

( १३० )

तिंत्रासीया लोड टाकूनी बैससी ॥ दंड तो करीसी अनाथातें ॥ १ ॥
अनाथासी दुःख देशी सर्वकाळ ॥ ऐसो तुज वेळ पुढें आहे ॥ २ ॥
आहे नाहीं काय न करी विचार ॥ काय तूं पामर जन्मलासी ॥ ३ ॥
तुका म्हणे धरीं एक भूत-दया ॥ अहंता ते वायां न धरीं मनीं ॥ ४ ॥

( १३१ )

संसाराच्या तापें तापलों मी देवा ॥ करितां या सेवा कुटुंबाची ॥ १ ॥
म्हणवोनी तुझे आठवीले पाय ॥ येईं वो माझे माय पांडुरंगे ॥ २ ॥
बहुतां जन्मांचा झालों भारवाही ॥ सुटीजेसें नाहीं वर्म ठावें ॥ ३ ॥
वेढीयेलों चोरीं अंतर्बाह्यात्कारीं ॥ कणवा न करी कोणी माझी ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां धांव घालीं वेगीं ॥ ब्रीद तुझें जगीं पांडुरंगे ॥ ५ ॥

( १३२ )

पाप ताप माझे गुण दोष वारीं ॥ कृष्णा विष्णू हरी नारायणा ॥ १ ॥
काम क्रोध वैरी घालूनी बाहेरी ॥ राहें तूं अंतरीं पांडूरंगा ॥ २ ॥
करीसील तरी नव्हे काय एक ॥ निर्मिलें त्रैलोक्य हेळामात्रें ॥ ३ ॥
समर्थाशी काय आम्हीं शीकवावें ॥ तुका म्हणे यावें पांडूरंगे ॥ ४ ॥

( १३३ )

धन्य तेचि प्राणी क्षमा ज्यांचे आंगीं ॥ न भंगे प्रसंगीं धैर्य-बळ ॥ १ ॥
न म्हणे कोणासी उत्तम वाईट ॥ महत्व वरिष्ठ नसे जेथें ॥ २ ॥
अंतरीं सबाह्य सारिखे निर्मळ ॥ त्द्दय कोमळ गंगारूप ॥ ३ ॥
तुका म्हणे काया कुरवंडी तयां ॥ ठेवोन मी पायां मस्तक हें ॥ ४ ॥

( १३४ )

सदा सर्वकाळ अंतरीं कुटिल ॥ तेणें गळां माळ घालूं नये ॥ १ ॥
ज्यासी नाहीं धर्म दया क्षमा शांति॥तेणें अंगीं विभूती लावूं नये ॥२॥
जयासी न कळे भक्तीचें महिमान ॥ तेणें ब्रह्मज्ञान बोलूं नये ॥ ३ ॥
ज्याचें मन नाहीं लागलें हातासी ॥ तेणें प्रपंचासी टाकूं नये ॥ ४ ॥
तुका म्हणे ज्यासी नाहीं हरिभक्ती ॥ तेणें भगवें हातीं धरूं नये ॥५॥

( १३५ )

पावलें पावलें तुझें आम्हां सर्व ॥ दुजा नको भाव होऊं देऊं ॥ १ ॥

॥ ध्रु० ॥ जेथें तेथें देखें तुझींच पाउलें ॥ त्रिभूवन संचलें विठ्ठला गा ॥ ध्रु ॥
भेदाभेदमतें भ्रमाचे संवाद ॥ आम्हां नको वाद त्यांशीं देऊं ॥ २ ॥
तुका म्हणे अणु तुजविण नाहीं ॥ नभाहूनि पाहीं वाढ आहे ॥ ३ ॥

( १३६ )

भेटीलागीं जीवा लागलीसे आस ॥ पाहे रात्रीं दिवस वाट तुझी ॥ १ ॥
पूर्णिमेचा चंद्र चकोरा जीवन ॥ तैसें माझें मन वाट पाहे ॥ २ ॥
दिवाळीच्या मुळा लेंकी आसावली ॥ पाहतसे वाटुली पंढरीची ॥ ३ ॥
भूकेलिया बाळ अति शोक करी ॥ वाट पाहे परि माउलीची ॥ ४ ॥
तुका म्हणे मज लागलीसे भूक ॥ धावूनी श्रीमुख दावीं देवा ॥ ५ ॥

( १३७ )

निंदी कोणी मारी ॥ वंदी कोणी पूजा करी ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ मज हें ही नाहीं तें ही नाहीं ॥ वेगळा दोहींपासूनी ॥ ध्रु ॥
देहभोग भोगें घडे ॥ जें जें जोडे तें तें बरें ॥ २ ॥
अवघें पावे नारायणीं ॥ जनार्दनीं तुक्याचें ॥ ३ ॥

( १३८ )

हिरा ठेवितां ऐरणीं ॥ वांचे मारितां जो घणीं ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ तोची मोल पावे खरा ॥ करणीचा[1] होय चुरा ॥ ध्रु ॥
मोहरा होय तोचि अंगें ॥ सूत न जळे ज्याचे संगें ॥ २ ॥
तुका म्हणे तोचि संत ॥ सोसी जगाचे आघात ॥ ३ ॥

( १३९ )

महारासि सिवे ॥ कोपे ब्राह्मण तो नव्हे ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ तया प्रायश्चित्त कांहीं ॥ देहत्यांग करितां नाहीं ॥ ध्रु ॥
नातळे चांडाळ ॥ त्याचा अंतरीं विटाळ ॥ २ ॥
ज्याचा संग चित्तीं ॥ तुका म्हणे तो त्या[4] याती ॥ ३ ॥

( १४० )

पराविया नारी माउलीसमान ॥ मानिलिया धन काय वेचे ॥ १ ॥
॥ध्रु०॥न करितां परनिंदा परद्रव्यअभिलाष॥काय तुमचें यास वेचे सांगा॥ध्रु॥

---

१ तुझ्या पेक्षां. २ मोठें. ३ कृतीनें केलेल्याचा. ४ त्या जातीचा.

बैसलिये ठायीं म्हणतां राम राम ॥ काय होय श्रम ऐसें सांगा ॥ २ ॥
संतांचे वचनीं मानितां विश्वास ॥ काय तुमचें यास वेचे सांगा ॥ ३ ॥
खरें बोलतां कोण लागती सायास ॥ काय वेचे यास ऐसें सांगा ॥ ४ ॥
तुका म्हणे देव जोडे याचसाठीं ॥ आणीक ते आटी न लगे कांहीं ॥ ५ ॥

( १४१ )

शुद्धबीजा पोटीं ॥ फळें रसाळ गोमटीं ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ मुखीं अमृताची वाणी ॥ देह वेचावा कारणीं ॥ ध्रु॥
सर्वांगीं निर्मळ ॥ चित्त जैसें गंगाजळ ॥ २ ॥
तुका म्हणे जातो ॥ ताप दर्शनें विश्रांती ॥ ३ ॥

( १४२ )

चित्त समाधानें[1] ॥ तरी विष वाटे सोनें ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ बहु खोटा अतिशय[2] ॥ जाणा भले सांगो काय ॥ ध्रु ॥
मनाच्या तळमळें ॥ चंदनें हो अंग पोळे ॥ २ ॥
तुका म्हणे दुजा ॥ उपचार पीडा पूजा ॥ ३ ॥

( १४३ )

परिमळ म्हूण[3] चोळूं नये फूल ॥ खाऊं नये मूल आवडतें ॥ १ ॥
मोतियाचें पाणी चाखूं नये स्वाद ॥ यंत्र भेदुनि नाद पाहूं नये ॥ २ ॥
कर्मफळ म्हणुनी इच्छूं नये काम ॥ तुका म्हणे वर्म दावूं लोकां ॥ ३ ॥

( १४४ )

काय नाहीं माता गौरवीत बाळा ॥ काय नाहीं लळा पाळीत ते ॥ १ ॥
काय नाहीं त्याची करीत ते सेवा ॥ काय नाहीं जीवा गोमटें तें ॥ २ ॥
अमंगळपणें कंटाळा न धरी ॥ उचलोनी करीं कंठीं लावी ॥ ३ ॥
लेववी आपुले आंगें अळंकार ॥ संतोषा ये फार देखोनिया ॥ ४ ॥
तुका म्हणे स्तुति योग्य नाहीं परी॥ तुम्हां लाज थोरी अंकिताची॥ ५ ॥

( १४५ )

मन करा रे प्रसन्न ॥ सर्व सिद्धीचें कारण ॥
मोक्ष अथवा बंधन ॥ सुख समाधान इच्छा ते ॥ १ ॥

---

१ समाधान पावे. २ विषयाचा हव्यास. ३ म्हणून.

मनें प्रतिमा स्थापिली ॥ मनें मना पूजा केली ॥
मनें इच्छा पुरविली ॥ मन माउली सकळांची ॥ २ ॥
मन गुरू आणि शिष्य ॥ करी आपुलेंचि दास्य ॥
प्रसन्न आपआपणास ॥ गति अथवा अधोगति ॥ ३ ॥
साधक वाचक पंडित ॥ श्रोते वक्ते ऐका मात ॥
नाहीं नाहीं आंनु दैवत ॥ तुका म्हणे दुसरें ॥ ४ ॥

( १४६ )

हीन माझी याति ॥ वरी स्तुति केली संतीं ॥ १ ॥
आंगीं वसूं पाहे गर्व ॥ माझें हरावया सर्व ॥ २ ॥
मी एक जाणता ॥ ऐसें वाटतसे चित्ता ॥ ३ ॥
राख राख गेलों वांयां ॥ तुका म्हणे पंढरीराया ॥ ४ ॥

( १४७ )

प्रीतीचिया बोला नाहीं पेसपाड ॥ भलतसें गोड करुनी घेई ॥ १ ॥
तैसें विठ्ठल-राया तुज मज आहे ॥ आवडोनें गायें नाम तुझें ॥ २ ॥
वेडे वाकडे बाळकाचे बोल ॥ करिती नवल मायबाप ॥ ३ ॥
तुका म्हणे तुज येवो माझी दया ॥ जीवींच्या सखया जीवलगा ॥ ४ ॥

( १४८ )

मान अपमान गोवींवे ॥ अवघे गुंडूनी ठेवावे ॥ १
॥ ध्रु० ॥ हें चि देवाचें दर्शन ॥ सदा राहे समाधान ॥ ध्रु ॥
जेथें शांतीची वसती ॥ तेथें खुंटे काळगती ॥ २ ॥
आली उर्मी ती साहें ॥ तुका म्हणे थोडें आहे ॥ ३ ॥

( १४९ )

दुर्जनाची गंधी विष्ठेचिया परी ॥ देखोनिया दुरी व्हावें तया ॥ १ ॥ .
॥ध्रु०॥ आइका हो तुम्ही मात हे सज्जन॥करूं संघट्टन नये बोलों॥ध्रु॥
दुर्जनाचे अंगीं अखंड विटाळ ॥ वाणी रजस्वला स्रवे तैशी ॥ २ ॥
दुर्जनाचें भय धरावें त्यापरी ॥ पिसाळलेवरी धांवे श्वान ॥ ३ ॥
दुर्जनाचा भला नव्हे अंगसंग ॥ बोलिलासे त्याग देशाचा त्या ॥ ४ ॥
तुका म्हणे किती सांगावे पृथक ॥ अंग कुंभिपाक दुर्जनाचें ॥ ५ ॥

---

१ अन्य. २ गोत्याच्या जागा.

( १५० )

अतिवादी नव्हे शुद्ध या[1] बीजाचा॥ ओळखा जातीचा अंत्यज तो॥१॥
॥ध्रु०॥ वेद श्रुति नाहीं ग्रंथ ज्या प्रमाण॥श्रेष्ठाचें वचन न मानी जो॥ ॥
तुका म्हणे मद्यपानाचें मिष्टान्न ॥ तैसा तो दुर्जन शिवों नये ॥ २ ॥

( १५१ )

शब्दा नाहीं धीर ॥ ज्याची बुद्धि नाहीं स्थिर ॥ १ ॥
॥ध्रु०॥ त्याचें न व्हावें दर्शन ॥ स्थळा पंगती भोजन ॥ ॥
संतास जो निंदी ॥ अधम लोभासाठीं वंदी ॥ २ ॥
तुका म्हणे पोटीं ॥ भाव आणीक जया होटीं ॥ ३ ॥

( १५२ )

माझे मज कळों येती अवगुण ॥ काय करूं मन अनावर ॥ १ ॥
आतां आड उभा राहें नारायणा ॥ दयासिंधुपणा साच करीं ॥ २ ॥
वाचा वदे परी करणें कठीण ॥ इंद्रियां आधीन झालों देवा ॥ ३ ॥
तुका म्हणे तुझा जैसा तैसा दास ॥ न धरीं उदास मायबापा ॥ ४ ॥

( १५३ )

होऊं नको कांहीं या मना आधीन ॥ नाइकें वचन याचें कांहीं ॥१ ॥
हटियाची गोष्टी मोडून टाकावी ॥ सोई ही धरावी विठोबाची ॥ २ ॥
आपुले आधीन करूनिया ठेवा ॥ नाहीं तरी जीवा घातक हें ॥ ३ ॥
तुका म्हणे जाले जे मना आधीन ॥ तयांसी बंधन यम करी ॥ ४ ॥

( १५४ )

काय वाणूं मी या संतांचे उपकार ॥ मज निरंतर जागविती ॥ १ ॥
॥ध्रु०॥ काय द्यावें यांसि व्हावें उतराई ॥ ठेवितां हा पायीं जीव थोडा ॥ध्रु॥
सहज बोलणें हित उपदेश ॥ करूनि सायास शिकविती ॥ २ ॥
तुका म्हणे वत्स धेनुचिया चित्तीं ॥ तैसें मज येती सांभाळित ॥ ३ ॥

( १५५ )

उपदेश तो भलत्या हातीं ॥ झाला चित्तीं धरावा ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ नये जाउं पात्रावरी ॥ कवटी सार नारेळ ॥ ध्रु ॥
स्त्री पुत्र बंदी जन ॥ नारायण स्मरविती ॥ २ ॥
तुका म्हणे रत्नसार ॥ परि उपकार चिंधीचे ॥ ३ ॥

---

१ अशा.

( १५६ )

सोनियाचें ताट क्षीरीनें भरिलें ॥ भक्षावया दिलें श्वानालागीं ॥ १ ॥
॥ध्रु०॥ मुक्ताफळहार खरासि घातला ॥ कस्तुरी सूकराला चोजविली ॥ छ ॥
वेदपरायण बधिरा सांगे ज्ञान ॥ तयाची ते खुण काय जाणे ॥ २ ॥
तुका म्हणे ज्याचें तोचि एक जाणे ॥ भक्तीचें महिमान साधु जाणे ॥३॥

( १५७ )

ऐसा हा लौकिक कदा राखवेना ॥ पतितपावना देवराया ॥ १ ॥
॥ध्रु॥ धर्म करी त्याला उधळा म्हणती॥ न केल्या बोलती पोटपोशा ॥छ॥
आचार करितां म्हणती हा पसारा ॥ न करितां नरा निंदिताती ॥ २ ॥
संतसंग करितां म्हणती हा उपदेशी ॥ येरा अभाग्यासि ज्ञान नाहीं ॥३॥
धन नाहीं त्यासि ठायींचा करंटा ॥ समर्थासि ताठा लाविताती ॥ ४ ॥
बहु बोलों जातां म्हणति हा वाचाळ॥ न बोलतां सकळ म्हणती गर्वी॥५॥
भेटिसि नव जातां म्हणती निष्ठुर ॥ येतां जातां घर बुडविलें ॥ ६ ॥
लग्न करूं जातां म्हणती हा मातला ॥ न करितां हा झाला नपुंसक॥७॥
निपुत्रिका म्हणती मुख न पहा हो ॥ पातकाचें मूळ पोरवडा ॥ ८ ॥
लोक जैसा ओक धरितां धरवेना ॥ अभक्ता जिरेना संतसंग ॥ ९ ॥
तुका म्हणे आतां ऐकावें वचन ॥ त्यजुनिया जन भक्ति करा ॥ १० ॥

( १५८ )

केला मातीचा पशुपति ॥ परि मातीसि काय म्हणती ॥
शिवपूजा शिवासि पावे ॥ माती मातीमाजी सामावे ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ तैसें पूजिती आम्हां संत ॥ पूजा घेतो भगवंत ॥
आम्ही कीं संताचें दास ॥ संतपदवी नको आम्हांस ॥ छ॥
केला पाषाणाचा विष्णु ॥ परी पाषाण नव्हे विष्णु ॥
विष्णुपूजा विष्णूसि अर्पे ॥ पाषाण राहे पाषाणरूपें ॥ २ ॥
केली कांशाची जगदंबा ॥ परि कांसें नव्हे अंबा ॥
पूजा अंबेची अंबेला घेणें ॥ कांसें राहे कांसेंपणें ॥ ३ ॥
ब्रह्मानंद पूर्णामाजी ॥ तुका म्हणे केली कांजी॥
ज्याची पूजा त्यानेंचि घेणें ॥ आम्ही पाषाणरूपें राहाणें ॥४॥

---

१ खदाड. २ न काष्ठे विद्यते देवो न पाषाणे न मृन्मये ॥ भावे हि विद्यते देवस्तस्माद्भावो हि कारणं. ह्या श्लोकाचेंच तात्पर्य ह्या अभंगांत आहे.

( १५९ )

आणिकांच्या घातें ॥ ज्यांचीं निवतील चित्तें ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ तेचि ओळखावे पापी ॥ निरयवासी शीघ्रकोपी ॥छ॥
कान पसरोनी ॥ ऐके वदे दुष्ट वाणी ॥ २ ॥
तुका म्हणे भांडा ॥ धीर नाहीं ज्याच्या तोंडा ॥ ३ ॥

( १६० )

न लगे चंदना सांगावा परिमळ ॥ वनस्पतिमेळ हाकारूनी ॥ १ ॥
॥ध्रु०॥अंतरींचें धांवे स्वभावें बाहेरी॥धरितां ही परी आवरेना॥छ॥
सूर्य नाहीं जागें करीत या जनां ॥ प्रकाश किरणा कर म्हून ॥२॥
तुका म्हणे मेघ नाचवी मयूरें ॥ लपवितां खरें येत नाहीं ॥ ३ ॥

( १६१ )

चंदनाचे हात पाय ही चंदन ॥ परिसा नाहीं हीन कोणी अंग ॥ १ ॥
॥ध्रु०॥दीपा नाहीं पाठीं पोटीं अंधकार॥सर्वांगें साकर अवघी गोड ॥ छ॥
तुका म्हणे तैसा सज्जनापासून ॥ पाहतां अवगुण मिळे चि ना ॥ २ ॥

( १६२ )

अंगीं ज्वर तया नावडे साकर ॥ जन तो इतर गोडी जाणे ॥ १ ॥
॥ध्रु०॥एकाचिये तोंडीं पडिली ते माती॥अवघे ते खाती पोटभरी॥छ॥
चारितांची बळें येत असे दांतीं ॥ मागोनिया घेती भाग्यवंत ॥२॥
तुका म्हणे नसे संचित हें बरें ॥ तयासि दुसरें काय करी ॥ ३ ॥

( १६३ )

धिग जीणें ज्याचें बाईले आधीन ॥ परलोक मान नाहीं दोन्ही ॥ १ ॥
॥ध्रु०॥धिग जीणें ज्याचें लोभावरी मन ॥ अतीत-पूजन घडे चि ना॥छ॥
धिग जीणें आळस निद्रा जया फार ॥ अमित आहार अघोरिया ॥२॥
धिग जीणें नाहीं विवेक वैराग्य ॥ झुरे मानालागीं साधुपणा[१] ॥ ३ ॥
तुका म्हणे धिग ऐसे झाले लोक ॥ निंदक वादक नरका जाती ॥ ४ ॥

( १६४ )

न लगे द्यावा जीव सहजींच जाणार॥ आहे तो विचार जाणा कांहीं॥१॥
मरण जो मागे गाढवाचा बाळ ॥ बोलिजे चांडाळ शुद्ध त्यासी ॥ २ ॥
तुका म्हणे काई होईल स्वहित ॥ निधान जो थीत टाकूं पाहे ॥ ३ ॥

---

१ साधुपणाच्या मानाकरितां.

( १६५ )

विधीनें सेवन ॥ विषयत्यागातें समान ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ मुख्य धर्म देव चित्तीं ॥ आदिअवसानअंतीं ॥ छ ॥
बहु अतिशय खोटा ॥ तर्कें होती बहु वाटा ॥ २ ॥
तुका म्हणे भावें ॥ कृपा करीजेते देवें ॥ ३ ॥

( १६६ )

भला देवा कुणबी केलों ॥ नाहीं तरी दंभें असतों मेलों ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ भलें केलें देवराया ॥ नाचे तुका लागे पायां ॥ छ ॥
विद्या असती कांहीं ॥ तरी पडतों अपायीं ॥ २ ॥
सेवा चुकतों संताची ॥ नागवण हे फुकाची ॥ ३ ॥
गर्वें होतां ताठा ॥ जातों यमपंथें वाटा ॥ ४ ॥
तुका म्हणे थोरपणें ॥ नरक होती अभिमानें ॥ ५ ॥

( १६७ )

भुंकोनिया सुणें लागे हस्ती-पाठी ॥ होऊनी हिंपुटी दुःख पावे ॥ १ ॥
काय त्या मशकें तयाचें करावें ॥ आपुल्या स्वभावें पीडतसे ॥ २ ॥
मातलें बोकड विटवी पंचानना ॥ घेतलें मरणा धरणें तेणें ॥ ३ ॥
तुका म्हणे संता पीडितील खळ ॥ घेती तोंड काळें करूनिया ॥ ४ ॥

( १६८ )

दुबळें सदैवा ॥ म्हणे नागवेल केव्हां ॥ १ ॥
आपणासारिखें त्या पाहे ॥ स्वभावासी करिल काये ॥ २ ॥
मूढ सभेआंत ॥ इच्छि पंडीताचा घात ॥ ३ ॥
गांढें देखुनी शूरा ॥ उगें करितें बुरबुरा ॥ ४ ॥
आणिकांचा हेवा ॥ न करीं शरण जाईं देवा ॥ ५ ॥
तुका म्हणे किती ॥ करूं दुष्टांची फजिती ॥ ६ ॥

( १६९ )

माकडा दिसती कंवटी नारळा ॥ भोक्ता तो निराळा वरील सारी ॥१॥
एका रस एका तोंडीं पडे माती ॥ आपुलाले नेती विभाग ते ॥ २ ॥
सुनियांसि क्षीर वाढिल्या ओकवी ॥ भोगत्या पोसवी धणीवरी ॥ २ ॥
तुका म्हणे भार वागविती मूर्ख ॥ नेतील ते सार परीक्षक ॥ ४ ॥

( १७० )

तुम्हीं माझा देवा करिजे अंगीकार ॥ हा नाहीं विचार मज-पाशीं ॥ १ ॥
आतां दोहीं नक्षीं लागलें लंछन ॥ देवभक्तपण लाजविलें ॥ २ ॥
एकांतीं एकलें न राहे निश्चळ ॥ न राहे चपळ मन ठायीं ॥ ३ ॥
पायीं महत्वाची पडली शृंखला ॥ बांधवीला गळा स्नेहा हातीं ॥ ४ ॥
शरीर सोकलें देखिलीया सुखा ॥ कदान्न हें मुखा मान्य नाहीं ॥ ५ ॥
तुका म्हणे जाला अवगुणाचा थारा ॥ वाढली हे निद्रा आळस बहु ॥ ६ ॥

( १७१ )

सकळ गुणें संपन्न ॥ एक देवाचें लक्षण ॥ १ ॥
वरकड कोठें कांहीं ॥ एक आहे एक नाहीं ॥ २ ॥
षड्गुणऐश्वर्यसंपन्न ॥ एक भगवंतीं जाण ॥ ३ ॥
तुका म्हणे जें जें बोला ॥ तें तें साजे ह्या विठला ॥ ४ ॥

( १७२ )

दर्पणासी बुजे ॥ नखटें तोंड पळवी लाजे ॥ १ ॥
गुण ज्याचे जो अंतरीं ॥ तोचि त्यासी पीडा करी ॥ २ ॥
चोरा रुचे निशी ॥ देखोनिया विटे शशी ॥ ३ ॥
तुका म्हणे जन ॥ देवा असे भाग्यहीन ॥ ४ ॥

( १७३ )

कोणी एकाचिया पोरें केली आळी॥ ठावो नाहीं पोळी मागे देखी॥१॥
बुझाविलें हातीं देउनी खापर ॥ छंद करकर वारियेली ॥ २ ॥
तैसें नको करूं मज कृपावंता ॥ काय नाहीं सत्ता तुझे हातीं ॥ ३ ॥
तुका म्हणे मायबापांचें उचित ॥ करावें हें हित बाळकांचें ॥ ४ ॥

( १७४ )

भगवें तरी श्वान सहज वेष त्याचा ॥ तेथें अनुभवाचा काय पंथ॥१॥
वाढवुनी जटा फिरे दाही दिशा ॥ तरी जंबुवेषा सहज स्थिति ॥ २ ॥
कोरोनिया भूमि करिती मधीं वास ॥ तरी उंदरास काय वाणी ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसें कासया करावें ॥ देहासि दंडावें वाउगेंचि ॥ ४ ॥

( १७५ )

आपणा लागे काम वाण्याघरीं गुळ॥त्याचें याति कुळ काय कीजे॥१॥
उकरड्यावरी वाढलो तुळसो ॥ टाकावो ते कैसी ठाया गुणें ॥ २ ॥

गाईचा जो भक्ष अमंगळ खाय ॥ तीचें दुग्ध काय सेवूं नये ॥ ३ ॥
तुका म्हणे काय सलपटासी काज ॥ फणसांतील बीज काढुनि घ्यावें॥४॥

( १७६ )

वांझेनें दाविलें गऱ्हवारलक्षण ॥ चिरगुटें घालून वाथयाला ॥ १ ॥
तेंवि शब्दज्ञानी करिती चावटी ॥ ज्ञान पोटासाठीं विकूनिया ॥ २ ॥
बोलाचीच कढी बोलाचाचि भात ॥ जेवुनिया तृप्त कोण जाला ॥ ३ ॥
कागदीं लिहितां नामाची साखर ॥ चाटितां मधुर गोडी नेदी ॥ ४ ॥
तुका म्हणे जळो जळो ते महंती ॥ नाहीं लाज चित्तीं आठवण ॥ ५ ॥

( १७७ )

जुंझायाच्या गोष्टी ऐकतांचि सुख ॥ करितां हें दुःख थोर आहे ॥ १ ॥
तैसी हरिभक्ति सुळावरिल पोळी ॥ निवडे तों बळी विरळा शूर ॥ २ ॥
पिंड पोसलिया विषयांचा पाईक ॥ वैकुंठनायक कैचा तेथें ॥ ३ ॥
तुका म्हणे व्हावें देहासी उदार ॥ रखुमादेवीवर जोडावया ॥ ४ ॥

( १७८ )

क्षुधार्थी अन्नें दुष्काळें पीडिलें ॥ मिष्टान्न देखिलें तेणें जैसें ॥ १ ॥
तैसें तुझे पायीं लाचावलें मन ॥ झुरे माझा प्राण भेटावया ॥ २ ॥
मांजरें देखिला लोणियाचा गोळा ॥ लावूनिया डोळा बैसलेंसे ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां झडी घालूं पाहे ॥ पांडुरंगे माये तुझे पायीं ॥ ४ ॥

( १७९ )

आयुष्य वेंचूनि कुटुंब पोशिलें ॥ काय हित केलें सांग बापा ॥ १ ॥
फुकाचा चाकर जालासि काबाडी ॥ नाहीं सुख घडी भोगावया ॥२ ॥
दुर्लभ मनुष्यजन्म कष्टें पावलासी ॥ दिला कुटुंबासी कामभोग ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसें आयुष्य नासिलें ॥ पाप तें सांचिलें पतनासी ॥ ४ ॥

( १८० )

अर्थेंविण पाठांतर कासया करावें ॥ व्यर्थचि मरावें घोकूनिया ॥ १॥
घोकूनिया काय वेगीं अर्थ पाहें ॥ अर्थरूप राहें होऊनिया ॥ २ ॥
तुका म्हणे ज्याला अर्थीं आहे भेटी ॥ नाहीं तरी गोष्टी बोलूं नका ॥ ३ ॥

( १८१ )

वसतां चोरापाशीं तैसी होय बुद्धि ॥ देखतांचि चिंधी मन धावे ॥ १ ॥
व्यभिचाऱ्यापाशीं बैसतां क्षणभरी ॥ देखतांचि नारी मन धावे ॥ २ ॥

प्रपंचाचा छंद टाकुनिया गोंवा ॥ धरावें केशवा त्दृदयांत ॥ ३ ॥
सांडूनिया देई संसाराची बेडी ॥ कीर्तनाची गोडी धरावी गा ॥ ४ ॥
तुका म्हणे तुला सांगतों मी एक ॥ रुक्मिणीनायक मुखीं गावा ॥ ५ ॥

( १८२ )

पतिव्रतेची ही कीर्ति वाखाणितां॥ सिंदळीच्या माथां तिडिक उठे ॥ १ ॥
आमुचें तें आहे सहज बोलणें ॥ नाहीं विचारुन केलें कोणीं ॥ २ ॥
अंगें उणें त्याच्या बैसे टाळक्यांत ॥ तेणें ठिणग्या बहुत गाळीतसे ॥३॥
तुका म्हणे आम्हीं काय करणें त्यासी ॥ ढका खवंदासी लागतसे ॥४॥

( १८३ )

कामाचा अंकित कांतेतें प्रार्थित ॥ तूं कां हो दुश्चित निरंतर ॥ १ ॥
माझीं मायबापें बंधु हो बहीण ॥ तुज करी सीण त्यागीन मी ॥ २ ॥
त्यांचें जरी तोंड पाहेन मागुता ॥ तरी मज हत्या घडो तुझी ॥ ३ ॥
सकाळ उठोन वेगळा निघेन ॥ वहातों तुझी आण निश्चयेंसी ॥ ४ ॥
वेगळें निघतां घडीन दोरेचुडा ॥ तूं तंव माझा जोडा जन्माचा कीं॥५॥
ताईत सांकळी गळांचि दुलडी ॥ बाजूबंद जोडी हातसर ॥ ६ ॥
वेणीचे जे नग सर्वही करीन ॥ नको धरूं सीण मनीं कांहीं ॥ ७ ॥
नेसावया साडी सेलारी चुनडी ॥ अंगींची काचोळी जाळिया फुलें ॥८॥
तुका म्हणे केला रांडेनें गाढव ॥ मनासवें धांव घेतलीसे ॥ ९ ॥

( १८४ )

मृगाचिये अंगीं कस्तूरीचा वास ॥ असे ज्याचा त्यास नसे ठावा ॥ १॥
भाग्यवंत घेती वेंचोनिया मोलें ॥ भारवाही मेले वाहतां वोझें ॥ २ ॥
चंद्रामृतें तृप्ति पारणें चकोरा ॥ भ्रमरासी चारा सुगंधाचा ॥ ३ ॥
अधिकारी येथें घेती हातवटी ॥ परीक्षवंता दृष्टि रत्न जैसें ॥ ४ ॥
तुका म्हणे काय अंधळिया हातीं ॥ दिलें जैसें मोतीं वायां जाय ॥५॥

( १८५ )

कोणी वंदा कोणी निंदा ॥ आम्हां स्वहिताचा धंदा ॥ १ ॥
काय तुम्हांसी गरज ॥ आम्ही भजूं पंढरराज ॥ २ ॥
तुम्हां-सारिखें चालावें ॥ तेव्हां स्वहिता मुकावें ॥ ३ ॥
तुका म्हणे होकां कांहीं ॥ गळ दिला विठ्ठलपायीं ॥ ४ ॥

( १८६ )

बोले तैसा चाले ॥ त्याचीं वंदीन पाउलें ॥ १ ॥
अंगें झाडीन अंगण ॥ त्याचें दासत्व करीन ॥ २ ॥
त्याचा होईन किंकर ॥ उभा ठाकेन जोडोनि कर ॥ ३ ॥
तुका म्हणे देव ॥ त्याचे चरणीं माझा भाव ॥ ४ ॥

( १८७ )

भक्ति ऋण घेतलें माझें ॥ चरण गहाण आहेत तुझे ॥ १ ॥
प्रेम व्याज देई हरी ॥ माझा हिशेब लौकर करीं ॥ २ ॥
माझें मी न सोडीं धन ॥ नित्य करितों कीर्तन ॥ ३ ॥
तुझें नाम आहे खत ॥ सुखें करी पंचाईत ॥ ४ ॥
तुका म्हणे गरुडध्वजा ॥ यासी साक्ष श्रीगुरुराजा ॥ ५ ॥

( १८८ )

किडा अन्नाचें माणुस ॥ त्याचा म्हणवील्या दास ॥ १ ॥
तें ही त्यासी उपेक्षीना ॥ बोल आपुला सांडीना ॥ २ ॥
तो तूं नराचा नरेंद्र ॥ तुजपासूनि इंद्र चंद्र ॥ ३ ॥
तुका म्हणे विश्वंभर ॥ तुज वर्णी फणीवर ॥ ४ ॥

( १८९ )

पाया जाला नारू ॥ तेथें बांधला कापूरू ॥ १ ॥
तेथें बिबव्याचें काम ॥ अधमासि तों अधम ॥ २ ॥
रुसला गुलाम ॥ धणी करीतो सलाम ॥ ३ ॥
तेथें चाकराचें काम ॥ अधमासि तों अधम ॥ ४ ॥
रुसली घरची दासी ॥ धणी समजावी तियेसी ॥ ५ ॥
तेथें बटकीचें काम ॥ अधमासि तों अधम ॥ ६ ॥
देव्हाऱ्यावरि विंचू आला ॥ देवपूजा नावडे त्याला ॥ ७ ॥
तेथें पैजारेचें काम ॥ अधमासि तों अधम ॥ ८ ॥
तुका म्हणे जाती ॥ जातीसाठी खाती माती ॥ ९ ॥

( १९० )

कामक्रोध आड पडले पर्वत ॥ राहिला अनंत पलीकडे ॥ १ ॥
नुलंघवे मज न सांपडे वाट ॥ दुस्तर हा घाट वैरियांचा ॥ २ ॥

आतां कैचा मज सखा नारायण ॥ गेला अंतरून पांडुरंग ॥ ३ ॥
तुका म्हणे व्यर्थ मोलाचें शरीर॥गेलें हा विचार कळों आला॥४॥

( १९१ )

तुझें म्हणों आम्हां ॥ मग उणें पुरुषोत्तमा ॥ १ ॥
ऐसा धर्म काय ॥ अमृतानें मृत्यु होय ॥ २ ॥
कल्पवृक्षा तळीं ॥ गांठीं बांधिलिया झोळी ॥ ३ ॥
तुका म्हणे परीस ॥ सांपडल्या उपवास ॥ ४ ॥

( १९२ )

रासभ धुतला महातीर्थामाजी ॥ नव्हे जैसा तेजी श्यामकर्ण[१] ॥ १ ॥
तेवीं खळा काय केला उपदेश ॥ नव्हेचि मानस शुद्ध त्याचें ॥ २ ॥
सर्पासी पाजीलें शर्करापीयूष ॥ अंतरीचें विष जाऊं नेणे ॥ ३ ॥
तुका म्हणे श्वाना क्षीरीचें भोजन ॥ सवेंचि वमन जेवीं तया ॥४ ॥

( १९३ )

दुधाळ गाढवी जरी झाली पाहे ॥ पावेल ते काय धेनुसरी ॥ १ ॥
कागाचिया गळां पुष्पांचिया माळा॥हंसाची तो कळा काय जाणे ॥२॥
मर्कटें आंघोळी लावीयले टिळे ॥ ब्राह्मणाचे लीळे वर्तूं नेणे ॥ ३ ॥
जरी तो ब्राह्मण झाला कर्मभ्रष्ट ॥ तुका म्हणे श्रेष्ठ तिहीं लोकीं ॥ ४ ॥

( १९४ )

देव भक्तालागीं करूं नेदी संसार ॥ अंगें वारावार करूनि ठेवी ॥ १ ॥
भाग्य द्यावें तरी अंगीं भरे ताठा ॥ म्हणूनि करंटा करूनि ठेवी ॥ २ ॥
स्त्री द्यावी गुणवंती नसती गुंते आशा॥यालागीं कर्कशा पाठी लावी॥३॥
तुका म्हणे मज प्रचित आली देखा॥आणीक ह्या लोकां काय सांगूं॥४॥

( १९५ )

वाघें उपदेशिला कोल्हा ॥ सुखें खाऊं द्यावें मला ॥ १ ॥
अंतीं मरसी तें न चुके ॥ मजही मारीतोसी भुके ॥ २ ॥
येरू म्हणे भला भला ॥ निवाड तुझ्या तोंडें झाला ॥ ३ ॥
देह तंव जाणार ॥ घडेल परउपकार ॥ ४ ॥

१ ब्रह्मवेत्ता.

येरू म्हणे मनीं ॥ ऐसें जावें समजोनी ॥ ५ ॥
गांठी पडली ठकाठका ॥ त्यांचा धर्म बोले तुका ॥ ६ ॥

( १९६ )

नको नको मना गुंतूं मायाजाळीं॥ काळ आला जवळी ग्रासावया॥१॥
काळाची हे उडी पडेल बा जेव्हां ॥ सोडवीना तेव्हां मायबाप ॥ २ ॥
सोडवीना राजा देशींचा चौधरी ॥ आणीक सोइरीं भलीं भलीं ॥ ३ ॥
तुका म्हणे तुला सोडवीना कोणी ॥ एका चक्रपाणीवांचुनीया ॥ ४ ॥

( १९७ )

होऊं नको कांहीं ह्या मना आधीन ॥ नाइकें वचन ह्याचें कांहीं ॥१॥
हटीयाची गोष्टी मोडून टाकावी ॥ सोय हीं धरावी विठोबाची ॥ २ ॥
आपुले आधीन करूनिया ठेवा ॥ नाहीं तरी जीवा घातक हें ॥ ३ ॥
तुका म्हणे झाले जे मना आधीन ॥ तयांसि बंधन यम करी ॥ ४ ॥

( १९८ )

जिव्हा जाणे फिकें मधुर कीं क्षार ॥ येर मांस पर हाता न कळे॥ १ ॥
देखावें नेत्रीं बोलावें मुखें ॥ चित्ता सुख-दुःखें कळों येती ॥ २ ॥
परिमळांसि घ्राण ऐकती श्रवण ॥ एकाचें कारण एका नव्हे ॥ ३ ॥
एकदेहीं भिन्न ठेवियेल्या कळा ॥ नाचवी पुतळा सूत्रधारी ॥ ४ ॥
तुका म्हणे ऐशी जयाची ते सत्ता ॥ कां तया अनंता विसरलेती ॥ ५॥

---

## तुकारामाची स्त्री तुकारामास रागानें बोलली ते अभंग.

( १९९ )

मजचि भोंवता केला येणें जोग ॥ काय याचा भोग अंतरला ॥ १ ॥
॥धु०॥चालोनिया घरा सर्व सुखें येती॥माझी तों फजीती चुके चि ना ॥ध्रु॥
कोणाची बाईल होऊनीया वोढूं ॥ संसारा काढूं आपदा किती ॥ २ ॥
काय तरी देऊं तोंडितील पोरें ॥ मरतीं तरी बरें होतें आतां ॥ ३ ॥
कांहीं नेदी वांचों धोवियेलें घर ॥ सारवाया ढोर-शेण नाहीं ॥ ४ ॥
तुका म्हणे रांड न करितां विचार ॥ वाहुनिया भार कुंथे माथां ॥५॥.

---

२ काम.

( २०० )

आतां पोरा काय खासी ॥ गोहो जाला देवलसी[1] ॥ १ ॥
॥ध्रु०॥ डोचकें चिंधो घातल्या माळा॥ उदमाचा सांडी चाळा॥छ॥
आपल्या पोटा केली थार ॥ आमचा नाहीं येसपोर ॥ २ ॥
हातीं टाळ तोंड वासो ॥ जाय देउळीं देवापासीं ॥ ३ ॥
आतां आम्ही करूं काय ॥ न बसे घरीं राणा जाय ॥ ४ ॥
तुका म्हणे धीर धरी ॥ अझुनि काय जालें तरी ॥ ५ ॥

( २०१ )

न करवे धंदा ॥ आइता तोंडीं पडे लेंदा ॥ १ ॥
॥ध्रु०॥ उठितो तो कुटितो टाळ॥अवघा मांडिला कोल्हाळ॥छ॥
जीवंतचि मेले ॥ लाजा वाटुनिया प्याले ॥ २ ॥
संसागकडे ॥ न पाहाती ओस पडे ॥ ३ ॥
तळमळतो यांच्या रांडा ॥ घालिती जीवा नांवें धोंडा ॥ ४ ॥
तुका म्हणे बरें जालें ॥ घे गे बाईले लीहिलें ॥ ५ ॥

( २०२ )

कोण घरा येतें अमुच्या कशाला॥काय ज्याचा त्याला धंदा थोडा॥१॥
॥ध्रु०॥ देवासाठीं झालें ब्रह्मांड सोइरें ॥ कोमळ्या उत्तरें काय वेंचे॥छ॥
मानें पाचारितां नव्हे आराणुक ॥ आपें येती लोक मीतोसाठीं ॥ २ ॥
तुका म्हणे रांडे नावडे भूषण ॥ कांतेलेंसें[3] श्वान लागे पाठी ॥ ३ ॥

( २०३ )

[4]भाव धरी तया तारील पाषाण ॥ दुर्जना सज्जन काय करी ॥ १ ॥
॥ध्रु०॥करितां नव्हे नीट श्वानाचें हें पुच्छ॥खापरा परीस काय करी॥छ॥
काय करिल तया साखरेचें आळें ॥ बीज तैसीं फळें येती तथा ॥ २ ॥
तुका म्हणे वज्र भंगे एक वेळ ॥ कठीण हा खळ तयाहूनी ॥ ३ ॥

---

१ देवपिसा. २ अगत्य. ३ कांतावलेलें ( पिसाळलेलें ). ४ कारलें, कडूवृंदावन वगैरे वनस्पतीस.

## शिवाजी-राजानें कारकुनाबरोबर पत्र, अबदागीर वगैरे देऊन तुकारामास बोलावणें पाठविलें, तेव्हां त्यानें उत्तर पाठविलें ते अभंग.

( २०४ )

दिवट्या छत्री घोडे ॥ हें तो बऱ्यांत न पडे ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ आतां येथें पंढरिराया ॥ मज गोंविसी कासया ॥ ध्रु ॥
मान दंभ चेष्टा ॥ हे तो शूकराची विष्ठा ॥ २ ॥
तुका म्हणे देवा ॥ माझे सोडवणे[1] धांवा ॥ ३ ॥

( २०५ )

नावडे जें चित्ता ॥ तेंचि होसी पुरविता ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ कां रे पुरविली पाठी ॥ माझी केली जीवेसाटी ॥ ध्रु ॥
न करावा संग ॥ वाटे दुरावावें जग ॥ २ ॥
सेवावा एकांत ॥ वाटे न बोलावी मात ॥ ३ ॥
जन धन तन ॥ वाटे लेखावें वमन ॥ ४ ॥
तुका म्हणे सत्ता ॥ हातीं तुझ्या पंढरिनाथा ॥ ५ ॥

( २०६ )

विरिंचीनें केलें ब्रह्मांड सकळ ॥ तयामाजी खेळ नाना युक्ति ॥ १ ॥
॥ध्रु०॥ युक्तीचा चाळक ब्रह्मनिष्ठ ज्ञानी ॥ गुरुभक्ति मनीं विश्वासेंसी ॥ ध्रु ॥
ऐसा तुझा प्रेमा कळला हा एक ॥ पाहूनिया लेख पत्रिकींचे ॥ २ ॥
शिव तुझें नाम ठेविलें पवित्र ॥ छत्रपति सूत्र विश्वाचें कीं ॥ ३ ॥
व्रत नेम तप ध्यान योग केला ॥ करूनि मोकळा जालासी तूं ॥ ४ ॥
हेत हा लागला आमुचिये भेटी ॥ पत्रामाजी गोष्टी हेचि थोर ॥ ५ ॥
याचें हें उत्तर ऐके गा भूपती ॥ लिहिली विनंती हेताची हे ॥ ६ ॥
अरण्यवासी आम्ही फिरूं उदासीन ॥ दर्शन हें हीन अमंगळ ॥ ७ ॥
वस्त्राविण काया जालीसे मळीन ॥ अन्नाविणे जीण फळाहारी ॥ ८ ॥
रोड हात पाय दिसे अवकळा[2] ॥ काय तो सोहळा दर्शनाचा ॥ ९ ॥
तुका म्हणे माझी विनंती सलगीची ॥ वार्ता हे भेटीची करूं नका ॥ १० ॥

---

१ मला सोडविण्याकरितां. २ निस्तेज.

( २०७ )

ऐसी माझी वाणी दीनरूप वाहे ॥ करुणा त्या आहे त्हृदयस्थाशी॥१॥
॥ध्रु०॥नहों कोविलवाण नहों आम्ही दीन ॥ सर्वदा शरण पांडुरंगीं॥ध्रु०॥
पांडुरंग आम्हां पाळिता पोसिता ॥ आणिकांची कथा काय तेथें ॥२॥
तुझी भेट घेणें काय हो मागणें ॥ आशेचें हें शून्य केलें तेणें ॥ ३ ॥
निराशेचा गांव दिधला आम्हांसी ॥ प्रवृत्तिभागासी सांडियेलें ॥ ४ ॥
पतिव्रतामन पतिशीच भेटो ॥ तैसे आम्ही विठोमाजी नांदों ॥ ५ ॥
विश्व हें विठ्ठल नाहीं दुजें काहीं ॥ देखणें तुझें ही तयामाजी ॥ ६ ॥
तुजही विठ्ठल हवा ऐसा वाटे ॥ परि ऐक गोष्टी आवडीची ॥ ७ ॥
सद्गुरुश्रीरामदासाचें भाषण ॥ तेथें घालीं मन चळों नको ॥ ८ ॥
बहुतांठायीं वृत्ति चावळली जेव्हां ॥ रामदास्य तेव्हां घडे कैसें ॥ ९ ॥
तुका म्हणे बापा चातुर्यसागरा ॥ भक्तिभाव थारा भाविकांसी ॥१०॥

( २०८ )

तुम्हांपासीं आम्ही येऊनिया काय ॥ वृथा सीण आहे चालण्याचा॥१॥
॥ध्रु०॥मागावें हें अन्न तरी भिक्षा थोर॥वस्त्रासी हे थार चिंध्या बिंदीं॥ध्रु०॥
निद्रेसी आसन उत्तम पाषाण ॥ वरी हें प्रावर्ण आकाशाचें ॥ २ ॥
तेथें काय करणें कोणाची ही आस॥ वायां होय नाश आयुष्याचा॥३॥
राजगृहा यावें मानाचिये आसे ॥ तेथें काय वसे समाधान ॥ ४ ॥
रायाचिये घरीं भाग्यवंता मान ॥ इतरां सन्मान नाहीं तेथें ॥ ५ ॥
देखोनिया वस्त्रा-भूषणांचे जन ॥ तात्काळ मरण येतें आम्हां ॥ ६ ॥
ऐकोनिया मानाल उदासता जरी ॥ तरी आम्हां हरी उपेक्षीना ॥ ७ ॥
आतां हेंचि तुम्हां सांगणे कौतुक ॥ भिक्षे ऐसें सुख नाहीं नाहीं ॥ ८ ॥
तपव्रतयोगें महा भले जन ॥ आशाबद्ध लीन वर्तताती ॥ ९ ॥
तुका म्हणे तुम्ही श्रीमंत मानाचे ॥ पूर्वील देहाचे हरिभक्त ॥ १० ॥

( २०९ )

आतां एक योग साधावा हा नीट ॥ भल्याचा तो वीट मानूं नये ॥१॥
॥ ध्रु० ॥ जेणे योगें तुम्हां लागूं पाहे दोष ॥ ऐसा हा सायास करूं नये ॥ध्रु०॥
निंदक दुर्जन संग्रहीं असतो ॥ त्यांची युक्ति चित्तीं आणूं नये ॥ २ ॥
परीक्षावे कोण राज्याचे रक्षक ॥ विवेकाविवेक पाहोनिया ॥ ३ ॥

१ संसारमार्गास. २ मार्गीन. ३ सारासार विचार.

सांगणें न लगे सर्वज्ञ तूं राजा ॥ अनाथांच्या काजा साह्य व्हावें ॥ ४ ॥
हेंचि ऐकोनिया पावें समाधान ॥ आतां या दर्शना काज नाहीं ॥ ५ ॥
घेऊनिया भेटी कोण हा संतोष ॥ आयुष्याचे दिस गेले गेले ॥ ६ ॥
तुका म्हणे राया धन्य जन्म क्षिती ॥ त्रैलोकीं हे ख्याति कीर्ति तुझी ॥७॥

( २१० )

आतां हे विनंती प्रधानअष्टका ॥ प्रभूसी विवेक ऐसा सांगा ॥ १ ॥
॥ध्रु०॥ प्रतिनिधि मनरक्षक चतुर ॥ सात्विकाचें घर तुम्हांपाशीं ॥ ध्रु ॥
मुजुमीचे धनी लेखनकारक ॥ पत्रींचा विवेक समजाववा ॥ २ ॥
पेशवे सुरनिस चिटनिस डबीर ॥ राजाज्ञा सुमंत सेनापति ॥ ३ ॥
भूषण पंडितराय विद्याधन ॥ वैद्यराजा नमन माझें असो ॥ ४ ॥
पत्रींचा हा अर्थ अंतरीं जाणोनि ॥विवंचोनि श्रवणीं घाला राया॥ ५ ॥
सात्विक प्रेमळ दृष्टांताच्या मतें ॥ बोलिलों बहुत कळावया ॥ ६ ॥
यथास्थित निरोप सांगणें हा राया ॥ अर्थ पाहा वांयां जाऊं नद्या॥७॥
भिडेसाठीं बोलाल गाळूनि अर्थातें ॥ अनर्थकारी तुमतें होइल तेणें॥८॥
तुका म्हणे तुम्हां नमन अधिकाऱ्यां ॥ सांगणें हें राया पत्र माझें॥९॥

---

# वामनपंडित.

वामनपंडित हा सातारजिल्यांतील कोरेगांव कुमठें येथला जोशी होता. हा जातीचा ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. ह्याच्या बायकोचें नांव गिरीबाई. ह्यानें काशीस शास्त्राध्ययन केलें, व वादविवाद करून पुष्कळ पंडितांस जिंकिलें. प्रथम ह्यानें संस्कृत कविता बरीच केली; पण पुढें ह्यास पश्चात्ताप होऊन रामदासस्वामीच्या सांगण्यावरून ह्यानें लोकोपयोगी मराठी ग्रंथ करण्यास आरंभ केला.

वामनाची कविता गंभीर आणि रसभरित आहे. ह्याचे कवितेंत यमकें फार म्हणून ह्यास रामदास "यमक्यावामन" म्हणत असे. वामनपंडित कृष्णातीरीं वांईक्षेत्राजवळ पांडववाडी म्हणून एक गांव आहे तेथें वारला. त्याच्या शिष्यमंडळीनें त्याच्या पादुका अद्यापि सांभाळून ठेविल्या आहेत; व त्यांची ते पूजा करीत असतात, असें ऐकण्यांत आहे. वामनाचे वंशज अद्यापि काशीस आहेत.

मरणशक १५९५ वैशाख शुद्ध ६. इ० स० १६७३

## ह्यानें केलेले ग्रंथ.

ओंवीबद्ध—यथार्थ दीपिका ( गीतेवर टीका ). २ निगमसार.
श्लोकबद्ध—सुमारें ४० प्रकरणें आहेत.

---

## वेंचे, वामनी श्लोक.

### मंगलाचरण.

शिखरिणीवृत्त. नसे ठावा ब्रह्मा न शिव अथवा श्रीपति हरी ॥
हरी जो तापातें उचलुनि कॄपासिंधुलहरी ॥
हरी वांटे काळा करिस विपती भृत्युंभुजगा ॥
जगाचा तूं ऐसा धनि कवण तो पाव मज गा ॥ १ ॥

### वेंचे, नामसुधेंतील.

अमृताप्रमाणें मधुर व जन्ममरणप्रवाहांतून सोडविणारें असें जें भगवंताचें नाम, त्याचा महिमा ह्या प्रकरणांत वर्णिला आहे; म्हणून ह्यास नामसुधा असें नांव दिलें आहे.

मालिनीवृत्त. हरिपण हरिनामें धातुमूर्तींस आलें ॥
हरिमय हरिनामें विश्व संतांसि जालें ॥
भवभय हरिनामें साधकांचें पळालें ॥
वद वद वद जिव्हे रामनामें रसालें ॥ १ ॥

वसंततिलका. आकाशअंतें न कळूनिहि अंतरिक्षीं ॥
आकाश आक्रमिति शक्त्यनुसार पक्षी ॥

---

१ नदीच्या लाटा ज्याप्रमाणें दाह शांत करितात त्याप्रमाणें जो परमेश्वर आपल्या कृपेच्या योगानें लोकांचें दुःख निवारितो. २ यमरूप हत्तीस हरि म्ह० सिंहच. ३ मृत्युरूप सर्पास विपति म्ह० गरुडच. ४ मोक्षप्राप्तिकरितां यत्न करणारांचें. ५ हा सामासिक शब्द असून येथें कवीनें संधि केला नाहीं. वामनाच्या कवितेंत अशीं उदा० पुष्कळ आढळतात.

नामप्रतापहि यथामति याच रीती ॥
सीमा न पावति तथापि मुनींद्र गाती ॥ २ ॥

द्रुतविलं- न कळतां पद अग्निवरी पडे ॥ न करि दाह असें न कधीं घडे ॥
बित. अजितं-नाम वदो भलत्या मिसें॥सकळ पातक दग्ध करीतसे॥३॥

भुजंगप्रयात. न जाणे शिशू अग्निची शक्ति कांहीं ॥
जळो तूळ इच्छा अशी ज्यास नाहीं ॥
तरी घालितां अग्नि कार्पासराशी ॥
जळे; येरिती नामही पाप नाशी ॥ ४ ॥

वसंततिलका. येथें म्हणाल जळती जरि सर्व पापें ॥
मूळें न कां जळति नाममहामृतापें ॥
नेणोनि नाम म्हणतां दुरितासि जैसें ॥
जाळी न कां सकळ पातकमूळ तैसें ॥ ५ ॥
धातूवरी अनळ नेणत बाळ घाली ॥
तो अग्नि धातुमळ तों अतिशीघ्र जाळी ॥
ताम्रादि भस्महि तया अनळेंचि जेव्हां ॥
कर्ता अभिज्ञ बहु जाळिल धातु तेव्हां ॥ ६ ॥

पृथ्वी. न जाणतांहि ये मुखा हरि तथापि पापें हरी ॥
स्मरोनि महिमा स्मरे वदनिं तीच नामें जरी ॥
प्रवृत्तिविषयीं जरी असति त्या जनांचीं मनें ॥
विरक्त करितो हरी स्वगुणनामसंकीर्तनें ॥ ७ ॥

वसंततिलका. अत्यंत शुद्धि हरिकीर्तन भक्तिभावें ॥
होतां खरें, परि न जाणत ही स्वभावें ॥
नारायण-स्मरण-कीर्तन मात्र कांहीं ॥
ज्याला घडेल तरि पातक त्यास नाहीं ॥ ८ ॥

मालिनी. कडुवट हरिनामें वाटती पापियाला ॥
परि दवडुनि पापें गोड होतीं तयाला ॥

---

१ परमेश्वराचें नांव. २ कापसाचा ढीग. ३ ह्यावर अशी शंका घ्याल कीं. ४ पापाचें मूळ जी वासना ती. ५ संसाराविषयीं. ६ आपले गुण व नाम ह्यांच्या संकीर्तनानें लोकांच्या मनांत प्रपंचाविषयीं वैराग्य उत्पन्न करितो. ७ होते ह्यां अध्याहृत क्रियापदाचा कर्ता. ८ सहजगत्या. ९ त्याचें पातक नाहींसें होतें.

मग विषयसुखाची नाठवे त्यास वार्ता ॥
म्हणउनि न पुन्हा तो होय अन्यायकर्ता ॥ ९ ॥

शार्दूलवि० आयासाविण ही कथा परिसतां गोडी हरीच्या[1] गुणीं ॥
ज्या चित्तीं उपजे निघे सहज तो त्याच्या पदीं तत्क्षणीं ॥
ऐसे येरिति अर्पिती सहज ही जे एकदा त्यां मना ॥
ते स्वप्नीं नयनीं न देखति यमा कैच्या तयां यातना ॥१०॥

मालिनी. सकळ हि अघबीजें नाशती अंतरींचीं ॥
अति अघहर नामें ह्यास्तव श्रीहरीची ॥
हरि विषय मतीचा कीर्तनें होय जेव्हां ॥
करतळगत त्याला चार[2] ही मोक्ष तेव्हां ॥ ११ ॥

शार्दूलवि० नामोच्चारण मात्र ज्यांस घडलें ते पावले सद्गती ॥
सामर्थ्य हरिचीं अशीं घडिघडी जे वर्णिती ऐकती ॥
त्यांला जे उपजेल भक्ति हरिची अत्यंत ते शुद्धता ॥
तैशीं तीर्थतपोव्रतें न करिती हें जाण तूं सुव्रता[3] ॥ १२ ॥

शार्दूलवि० हस्तीतें धुतलें जळीं बसविलें मालिन्य ही नाशिलें ॥
तेणें तें पहिलें स्वकर्म वहिलें तीरींच आरंभिलें ॥
शुंडाग्रें धरिलें धुळीस भरिलें सर्वांग ही आपलें ॥
प्रायश्चित्त दिलें तथापि न भलें ज्याचें मन क्षोभलें ॥ १३ ॥

स्वागता शर्वकंठ[4]विषगर्व हराया ॥ शक्त नामचि तुझें रघुराया ॥
सेतु सागर कपी[5] उतराया ॥ नामसेतु भवसिंधु तराया ॥ १४ ॥
प्राणप्रयाण[6]समयीं यमदूत जेव्हां ॥
येती घडे किमपिही हरिदास्य तेव्हां ॥

---

१ हरीला. २ सलोकता, समीपता, सरूपता, आणि सायुज्य असे चार मुक्तीचे प्रकार. ३ हे परीक्षितिराजा. ४ देवदैत्यांनीं समुद्रमंथन केलें त्यावेळीं त्यांतून हालाहल नांवाचें अतिप्रखर विष उत्पन्न होऊन तें साऱ्या जगतास जाळूं लागलें, तेव्हां देवादिकांच्या प्रार्थनेवरून तें सांबानें भक्षिलें. तें त्याच्या कंठास फार जाळूं लागलें. ती पीडा शांत व्हावी म्हणून त्यानें मस्तकीं गंगा व चंद्र धारण करणें इत्यादि अनेक उपाय केले, तथापि पीडा शांत होईना. शेवटीं त्यानें रामनामाचा जप चालविला, तेव्हां तें विष शांत झालें. अशी कथा आहे. ५ सागर उतराया कपींना जसा सेतु तसा इ० ६ प्राण जाते वेळीं.

आजन्मपातक[1] जळे मग त्या पवित्रा ॥
होतील दुर्गति[2] कशा विविधा विचित्रा ॥ १५ ॥

## वेंचे, वनसुधेंतील

कृष्णानें कुंजवनांत गोपाळांसहवर्तमान जी क्रीडा केली तीं सुधे-सारिखी गोड आहे आणि ती ह्या प्रकरणांत वर्णिली आहे, म्हणून ह्यास वनसुधा असें नांव दिलें आहे.

वसंततिलका.
बोले मुलांप्रति हरी पहिले दिशीं कीं ॥
रात्रींच सिद्ध करणें अशनादि[3] शिकीं ॥
जाऊं समस्तहि उद्यां वनभोजनातें ॥
पोटांत भाव वधणें अघदुर्जनातें[4] ॥ १ ॥

एके दिनीं मनिं धरूनि असें हरी तो ॥
चाले प्रभातसमयीं खळ जो हरीतो[5] ॥
शृंगीरवेंचि[6] करि जागृत मित्रसेना ॥
देणार जागृतिस[7] ज्याविण हो असेना ॥ २ ॥

द्रुतविलंबित. खडबडोनि समस्तहि धांवले ॥ सहितवत्स हरीप्रति पावले ॥
सकळ खेळति सोडुनि वासुरां ॥ परम कौतुक जें गगनीं सुरां ॥ ३ ॥

भुजंगप्रयात. वनीं खेळती बाळ ते बल्लवांचे[8] ॥ तुरे खोविती मस्तकीं पल्लवांचे ॥
फुलांचे गळां घालिती दिव्य हार ॥ स्वनाथासवें ते करीती विहार ॥ ४ ॥
स्वकौशल्य ज्या गुंजमाळांत नाना ॥ गळां घालिती ते करीती तनाना[9] ॥
शिरीं बांधितो मोरपत्रें[10] विचित्रें ॥ शरीरावरी रेखिती दिव्य चित्रें ॥ ५ ॥

इंद्रवज्रा. पक्ष्यांचिया साउलिच्याच संगें ॥ ते धांवती हास्यरसप्रसंगें ॥
हंसाचिया दाखविती गतीतें ॥ जे लाधले हंसगुरु-गतीतें[11] ॥ ६ ॥

उपजाति. धांवोनि लावी पहिलें करातें ॥ श्रेष्ठत्व दे त्या अजि लेकरातें ॥

---

१ उपजल्यापासून मरेपर्यंत केलेलें पाप. २ नरकयातना. ३ खाण्याचे वगैरे पदार्थ. ४ दुष्ट अघासुरातें; (कृष्णास मारण्याकरितां ह्या पूतनेचा भाऊ कंसानें पाठविला होता. त्यानें कपटानें अजगराचें रूप धरिलें होतें, त्याला कृष्णानें मारिलें.) ५ नाशितो. ६ ल्हान शिंगाच्या शब्दानें. ७ अज्ञाननिद्रेपासून सुटका—ज्ञान. ८ गवळ्यांचे. ९ गाण्याचे आलाप घेती. १० मोरांचीं पिसें—(संस्कृत व प्राकृत शब्दांचा समास). ११ योगिजनांमध्यें जे श्रेष्ठ त्यांना प्राप्त होणाऱ्या गतीला.

जो तो म्हणे लाविन मीच पाणी॥धरीन आधीं प्रभु चक्रपाणी॥७
परोपरी खेळति जी वनांत ॥ अर्पूनि चित्तें जगजीवनांत ॥
धरूनिया मर्कटपुच्छ हातीं ॥ तयांसवें वृक्ष उडों पहाती ॥ ८ ॥
मुखें वासुनी लोचन भ्रूतटातें ॥ उभारूनिया वाकुल्या मर्कटातें ॥
अहो दाविती शब्द तैसे करीती॥असे खेळती बाळ निःशंकरीती॥९॥
भुजंग- वनीं देखुनी मेघनीळांस[1] मोर ॥ प्रमोदें[2] करी नृत्यलीला समोर ॥
प्रयात. तयांसारिखे नाचती तोक सारे॥खुणावूनि अन्योन्य कीं तो कसारे१०
जसे दांभिक ध्यानमुद्रा[3] धरीती॥जना दाविती ज्ञानही बोधरीती[4]॥
तसी दाविती ते बकाभ्यासमुद्रा[5]॥गडी हांसवीती कृपेच्या समुद्रा[6]॥११॥
वदे कृष्ण गोपाळबाळां जनांतें ॥ बसूनी करूं ये स्थळीं भोजनातें॥
वनीं वत्स सोडा चरायासि,पाणी॥तयां पाजुनीया,म्हणे चक्रपाणी१२
बरें कृष्णजी बोलसी तूं जसा रे ॥ तसें वर्ततों लक्षितों तूज सारे॥
असें बोलुनी सोडिती वासुरातें॥नभीं होय आश्चर्य सर्वा सुरांते॥१३॥
इंद्र- संतोषतो नंदकुमार साचा ॥ बाळांत तैशा परमा रसाचा[7] ॥
वज्रा. पंक्तीस दे लाभ अजी[8] वनांत ॥ बुद्धी जयांच्या जगजीवनांत[9]॥१४॥

मालिनी. निजमुख कवणाही आड दृष्टी असेना ॥
रचुनि बसवि ऐसी भोंवतीं बाळसेना ॥
हरिवदन पहाया सर्व दृष्टी भुकेल्या ॥
म्हणुन बहुत पंक्ती मंडळाकार केल्या ॥ १५ ॥

भुजंगप्र० हरी कर्णिकेच्या स्थळीं मध्यभागीं ॥
मुलें भोंवतीं न्हस्वदीर्घ[10] विभागी ॥
लहानापुढें थोर अंभोज-पत्रें[11] ॥

---

१ मेघासारिख्या निळ्या कृष्णास. २ अत्यानंदानें. ३ ईश्वरचिंतन एकाग्रमनानें करीत बसल्यासारिखी निश्चल स्थिति. ४ उपदेश करण्याच्या रीतीवरून. ५ माशांनीं आपणाजवळ निःशंकपणें यावें म्हणून बगळा जसा (ध्यानस्थ मुनी प्रमाणें) स्तब्ध बसतो, तसें बसणें. ६ कृष्णाला. ७ अत्युत्कट आनंदाचा. ८ अहो. ९ जगताला आधारभूत जो कृष्ण त्याचे ठायीं. ह्या श्लोकाचा अन्वय— अजी, जयांच्या बुद्धि जगजीवनांत (आहेत) तैशा बाळांत (ही) नंदकुमार साचा संतोषतो, (म्हणून)• वनांत त्यांच्या पंक्तीस परमा रसाचा लाभ दे. १० ठेंगणीं आणि उंच निराळीं करी. ११ कमळाच्या पाकळ्या.

अशीं बैसवीलीं भवार्कातपत्रें[1] ॥ १६ ॥
असे कर्णिका अंबुजामाजि जेवीं ॥
मुलांमध्यभागीं बसे कृष्ण जेवी ॥
मुखीं ग्रास सप्रेम घालूनि हातीं ॥
दहींभात दे, देव लीला पहाती ॥ १७ ॥

शार्दूलवि० वंशी[2] नादनटी[3], तिला कटितटीं[4] खोवोनि पोटीं पेटीं[5] ॥
कक्षे[6] वामपुटीं स्वशृंगें[7], निकटीं वेताटिही गोमटी ॥
जेवी नीरतटीं तरू[8] [illegible]वटीं, श्रीश्यामदेहीं उटी ॥
दाटी व्योमघटीं[9] सुरां; सुखलुटी घेती जटी धूर्जटी[10] ॥ १८ ॥

---

## वेंचे, वेणुसुधेंतील.

श्रीकृष्ण वनांत वेणु वाजवीत असतां त्याचा अमृतासारखा गोड ध्वनि ऐकून सर्वप्राणि मोहित झाले; ही कथा ह्या प्रकरणांत वर्णिली आहे; म्हणून ह्यास वेणूसुधा हें नांव दिलें आहे.

स्वागता· अंग वक्र अधरीं धरि पांवा ॥ गोपवेष हरि तोचि जपावा ॥
वामबाहुवरि गालहि, डावा ॥ तो ठसा स्वत्हृदयांत पडावा॥१॥

उपजाति. वेणुध्वनी तो सुरगायकांनीं[11]॥ त्यांच्या विमानांतहि बायकांनीं ॥
आश्चर्य कानीं पडतांचि केलें॥ न तृप्त ज्यांचें मन हें भुकेलें॥२॥

स्वागता- मोहती व्रजपशू[12] मृगगाई ॥ आमुचें नवल काय अगाई ॥
स्तब्ध होति लिखितें जसिं चित्रें॥वेणुच्या ध्वनिरसेंचि विचित्रें॥३॥

उपजाति. मातृ-स्तनींचा रस आननांत॥ तो होय वेणु-ध्वनि काननांत ॥
गळे गिळेना पय वासुरांतें ॥ आश्चर्य वाटे गगनीं सुरांतें ॥ ४ ॥

स्वागता. मल्लवेष रचिला अभिराम ॥ श्रीधर प्रभु सवें बळराम ॥

---

१ ( भव+अर्क+आतप+त्र )—संसार हाच सूर्य त्याच्या संतापापासून रक्षिणारा ह्यानें. २ ( वेळूची केलेली ) मुरली किंवा पांवा. ३ नादानें नटनारी म्हणजे मंजूळ नादाची. ४ कंबरेस. ५ निऱ्या खोवण्याच्या ठिकाणीं. ६ डाव्या काखेमध्यें. ७ आपलें वाजविण्याचें शिंग. ८ यमुनेच्या काठीं. ९ आकाशाच्या पोटांत. १० ह्या शब्दाचा अर्थ शंकर असा आहे, परंतु एथें हा शब्द तपस्वी ह्या अर्थानें योजिला आहे असें दिसतें. ११ गंधर्वांनीं. १२ गोकुळांतील पशु.

मोरपत्र-मुकुटीं तरुपत्रें ॥ नेत्र सुंदर जसीं शतपत्रें ॥ ५ ॥

उपजा- सये[1] असा म्यां हरि देखिला गे ॥ तो प्रेम-रंगीं[2] मनिं रेखिला[3] गे ॥
ति. पाचारितो वेणु-रवेंचि गाई ॥ आश्चर्य तेव्हां करितों अगाई ॥ ६ ॥

स्वागता. गोधनीं[4] बहु पुढें नव जावें[5] ॥ ठाव एकचि धरूनि थिजावें[6] ॥
वाजवी म्हणुनि जो निज पांवा[7] ॥ कृष्ण तोचि हृदयांत जपावा ॥ ७ ॥

इंद्र— आपाद माळा प्रभु कृष्णजीची ॥ सुधा पिती षट्पद[8] कृष्ण जीची ॥
वज्रा. प्रदक्षिणा ते अवघे तिला हो ॥ करूनि गुंजारव घेति लाहो ॥ ८ ॥

वसंततिलका.
गुंजारवें भ्रमर गुंजति त्यांत देवें ॥
वेणुध्वनी मिसळिला मृदु वासुदेवें ॥
आपादकंठ वनमाळ[9] अशी विराजे ॥
ते सेविती मधुप होउनि देवराजे[10] ॥ ९ ॥

भुजं- वनीं राजहंसीं पिकांनीं शुकांनीं ॥ ध्वनी गोड तो आयकोनी सुकानीं[11] ॥
प्रया० त्वरें येउनी सेवियेलें हरीतें ॥ महापाप हीनाम ज्याचें हरी तें ॥ १० ॥

द्रुत- वदन लावुनि ते सकल क्षितीं[12] ॥ नयन झांकुनि अन्य न लक्षिती ॥
विलं० स्थिरमनें करुनी स्थिर आसना ॥ करिति ते खग कृष्ण-उपासना ॥ ११ ॥

भुजं- जगज्जीवन[13] श्रीहरी आणि काळा ॥ करी तो जगीं जीवनाच्या[14] सुकाळा ॥
प्रया० असे मेघ ही, या निमित्तें सखा हो[15] ॥ सुहृद्भाव ऐसा नसे आणिकां हो १२
झणी उष्ण लागे सख्या केशवातें ॥ म्हणुनी त्वरें येउनी लेशवातें[16] ॥
मुकुंदावरी मेघ तो छत्र झाला ॥ करी स्वात्मदेहार्पण[17] श्रीअजाला[18] १३

द्रुत- हळुहळू घन गर्जतसे नभीं ॥ मुरलिहूनि चढेल[19] म्हणोन भी ॥
विलं० श्रवणभक्ति-अतिक्रम[20] वर्जतो[21] ॥ करित कीर्तन ही घन गर्जतो ॥ १४ ॥

---

१ हे सखि. २ प्रेमरूप रंगांनीं. ३ तजवीज काढिली. ४ गायींच्या समुदायांनीं. ५ न जावें. ६ थांबून रहावें. ७ पायघोळ. ८ काळे भुंगे. ९ कृष्णाच्या गळयांतील माळ. १० देवश्रेष्ठ. ११ कान देऊन. १२ भूमीकडे. १३ जगताच्या स्थितीला कारण. १४ वांचणें, पाणी. १५ होय. १६ वाऱ्याच्या झुळकीच्या योगानें. १७ आपलें मन व शरीर ह्यांचें अर्पण. १८ जन्मरहित जो परमेश्वर त्याला. १९ ह्याचा आपला ध्वनि हा अध्याहृत कर्ता. २० आपल्या गर्जनेनें मुरलीचा शब्द लोपविला तर नवविध भक्तींतील श्रवणभक्तीचें उल्लंघन होईल म्हणून तें टाळण्याकरितां हळू शब्द करितो, हा भाव. २१ टाळतो.

भुजंगप्र० यशोदे तुझा पुत्र वंशस्वरांनीं॥सुधा ओष्ठिंची वषतो या स्वरानीं॥
तई भोंवते मोहती देवजाती॥जयांचीं मनें उन्मनैंत्वास जाती॥१५

---

# वामन.

## रुक्मिणी—पत्रिका.

वसंतति. श्रोत्यांचिया श्रवणरंध्रि रिघोनि चित्तीं ॥
तूझे गुण त्रिविध१ताप हरी हरीती
ऐकोनिया भुवनसुंदर या गुणातें ॥
निर्लज्ज चित्त हरि हें तुजला वरीतें ॥ १ ॥
विद्या वय द्रविण रूप इहां करोनी ॥
हा आत्मतुल्य पति हेंचि मनीं धरोनी ॥
जे सर्वलक्षणविचक्षण सत्कुलीना ॥
ते कां नृसिंह नवरी तुजला वरीना ॥ २ ॥
जे सर्वलक्षणविचक्षण आणि धीरा ॥
तेही तुझे गुण असे जगदेक वीरा ॥
ऐकोन कोण नवरी नवरील तूतें ॥
निर्लज्ज यास्तव झणी म्हणशील मातें ॥ ३ ॥
देहार्पणा करूनि तूं पति म्यां वरीला ॥
जाया करीं हरि तु नेउनि शीघ्र माला ॥
सिंहांगनेसि मज नेइल अंबुजाक्षा ॥
जंबूक चैद्य जरि तूं करिसी उपेक्षा ॥ ४ ॥
म्यां तूज निश्चित मनें वरिलें अनंता ॥
येऊनिया करिं धरूनि करीं स्वकांता ॥
सिंहांगनेसि मज जंबुक अंबुजाक्षा ॥
नेईल चैद्य जरि तूं करिशी उपेक्षा ॥ ५ ॥
आराधिला जरि गदाग्रज म्यां अगण्यें ॥

---

१ पांव्याच्या सुरानीं. २ आपल्या वनांत. ३ ज्या स्थितींत मनाचा ही लय होतो अशा (उन्मनी) स्थितीस. ४ सर्व लक्षणांनीं संपन्न. ५ गद म्हणून वसुदेवाचा मुलगा होता त्याचा अग्रज—वडील भाऊ.

पूर्तेष्टदत्तनियमादि बहूत पुण्यें ॥
येऊनिया करिं धरू मज चक्रपाणी ॥
चैद्यादि दुष्ट हरि हे न धरूत पाणी ॥ ६ ॥
सर्वेश्वरार्पण-विधी-करुनी अगण्यें ॥
केलीं जरी असति कीं बहुजन्मपुण्यें ॥
येऊनिया मज करीं धरि चक्रपाणी ॥
हे नातळोत दमघोषसुतादि कोणी ॥ ७ ॥
लग्नाचिया पहिलिया दिवसांत यावें ॥
संगीं समग्र बळ यादवसैन्य घ्यावें ॥
या चैद्यमागधबळांबुधितें मथावें ॥
मातें निशाचरविधीकरूनी हरावें ॥ ८ ॥
अंतःपुरातुनि तुझे न वधूनि बंधू ॥
न्यावें कसें म्हणसि तूं जरि सौख्यसिंधू ॥
यांचे कुळीं हरि असे कुलदेवियात्रा ॥
तेथूनि तूं मज असि ने शतपत्रनेत्रा ॥ ९ ॥
शर्वादि सर्व तुझि इच्छिति पायधूळी ॥
तूझा प्रसाद नव्हता मज याच काळीं ॥
जन्मा शतांत मरणें स्मरणें मुकुंदा ॥
अंतीं तुझ्याच वरणें चरणारविंदा ॥ १० ॥
मालिनी. हरिचरणसरोजीं रुक्मिणीचो शिराणी ॥

---

१ (पूर्त+इष्ट+दत्त+नियम+आदि) पूर्त लोकोपयोगार्थ (धर्मशाळा, विहिरी वगैरे बांधणें), इष्ट (यजन), दत्त (दान), व नियम इत्यादि पुण्यकर्मानें. २ चेदि देशाचा राजा शिशुपाळ वगैरे. ३ दमघोष हें शिशुपाळाच्या बापाचें नांव. ४ शिशुपाळ व जरासंध यांच्या सैन्यरूप समुद्रास. ५ राक्षस विधि; विवाहाचे आठ प्रकार आहेत; १ ब्राह्म-सालंकृत कन्यादान. २ दैव-यज्ञाच्या शेवटीं ऋषिजास सालंकृत कन्यादान; ३ आर्ष-हीं दोघें ( वर व वधु ) मिळून धर्माचरण करोत, अशा बुद्धीनें कन्यादान. ४ प्राजापत्य-वरापासून गोमिथुन ( गाई व बेल ) घेऊन कन्यादान. ६ गांधर्व-वर व वधु यांच्या ऐकमत्यानें होणारा. ५ आसुर-वरापासून पुष्कळ द्रव्य घेऊन कन्यादान. ७ राक्षस-कन्येकडील लोकांस हाणामार करून त्यांच्या इच्छेविरुद्ध तिचें हरण. ८ पैशाच-कन्येकडील लोक निजले असतां किंवा दारू वगैरे पिऊन मत्त झाले असतां तिचें हरण.

विशद लिखितरूपें बोलिली जे पुराणीं ॥
मनुजतनुज जैसा भूतळीं चक्रपाणी ॥
जगदघ हरि भाषारूप हे व्यासवाणी ॥ ११ ॥

द्रुतवि० असि विदर्भमहीपतिपुत्रिका ॥
लिहि हरीप्रति संस्कृत पत्रिका ॥
लिखितभाव तिचा बरवा मनें ॥
उकलिला त्हृदयांतुनि वामनें ॥ १२ ॥

---

## वेंचे, भामाविलासांतील.

शिखरिणी. लता सत्या[1] अंकीं खगगमन[2] भक्तामरतरू[3] ॥
तरू[4] हातीं तो श्रीपति भवनदीपार उतरू ॥
धरी लक्ष्मी पक्षी करतलयुगीं पादयुगळा ॥
गळां रत्न ध्यावा द्रुम-गरुड-संयुक्त सगळा ॥ १ ॥

वसंतति० कृष्णासि कृष्ण-पद-भक्ति-विशारदानें[6] ॥
जें स्वर्गपुष्प दिधलें मुनिनारदानें ॥
तें रुक्मिणीप्रति दिलें त्रिजगन्निवासें ॥
जें द्वारका करि भरोनि सुगंधि वासें ॥ २ ॥

भुजंगप्र० असी गोष्टि दासी जनीं बायकांनीं ॥
विचारूनिया सांगतां जाय कानीं[7] ॥
तई सत्यभामा महाक्रोध दावी ॥
बुझावी[8] हरी तेचि लीळा वदावी ॥ ३ ॥

द्रुतवि० गडबडां धरणीवरि लोळते ॥
वदवती न कवीसहि लोळ ते ॥
रडत मूर्छित होय घडी घडी ॥
पवन[9] निश्चळ, नेत्र न ऊघडी ॥ ४ ॥

---

१ सत्यभामा कृष्णाची स्त्री. २ गरुडावर बसून संचार करणारा. ३ भक्तांना कल्पवृक्षासारखा. ४ पारिजातक. ५ गरुड ह्या 'धरी', 'आणि', लक्ष्मी ह्यांचा कर्ता. ६ कृष्णाच्या पायांच्या भक्तीविषयीं प्रवीण. ७ लोकांच्या बायकांनीं फूल काढून आणिलें असें विचारिल्यावरून रुक्मिणीच्या दासींनीं सांगितलें तेव्हां ती गोष्ट सत्यभामेच्या कानीं गेली. ८ समजूत करी. ९ श्वास बंद होई.

द्रुतविलं० अलक हार गळ्यांतिल तोडिते ॥
कुरळ केश मुखावरि सोडिते ॥
करयुगें उर मस्तक ताडिते ॥
वसन आणिक कंचुकि फाडिते ॥ ५ ॥

शिखरि० महा-उष्णश्वासें करुनि वदते शुष्क अधरा ॥
धरापृष्ठीं जोडा न शठ दुसरा या गिरिधरा ॥
धराया माझा हा कर कपटि कैचा जनमला[1] ॥
मला जो निंदूनी कुसुम तिस देऊनि रमला ॥ ६ ॥
सख्या हो मेल्या ही शवहि न शिवो हें यदुपती ॥
पती नानास्त्रींचा पतित जन ही ज्यास जपती ॥
नका येऊं देऊं सदनिं सवतीच्या प्रियकरा ॥
करातें लावीना मज कपटि ऐसें तुम्हि करा ॥ ७ ॥

मालिनी. रडत रडत मूर्छेमाजि वृत्ती[2] बुडाल्या ॥
परम विकळ, मी तूं या स्मृती ही उडाल्या ॥
उचलुनि सखियांहीं मंचकीं दिव्य सेजे ॥
निजविलि मृत-तुल्या सत्यभामा दिसे जे ॥ ८ ॥

स्वागता. ये अशांत सदनांत हरी तो ॥
जो अनादि भवशोक हरीतो ॥
किंकरी नमुनिया चरणातें ॥
सांगती सकळ आचरणातें ॥ ९ ॥

भुजंगप्र० म्हणे शोक कां प्राप्त झाला महा हा ॥
अशी कष्टली कां शुभांगी अहाहा ॥
न बोलेचि कां आमुशीं[3] आज राणी ॥
जिच्या बोलण्याचीच आम्हां शिराणी ॥ १० ॥

शिखरिणी. जयीं श्रीवत्सांक[4] प्रभु करि निजांकेंस्थित[5] शिरा[6] ॥
शिरानाडीप्राण प्रगटति न लावूनि उशिरा ॥
शिराणी शब्दाची पुरवि तरि डोळे न उघडी ॥

१ जन्मास आला. २ अंतःकरणव्यापार. ३ आम्हापाशीं. ४ ज्याच्या उरःस्थलावर भृगूच्या लाथेची श्रीवत्स नांवाची खूण आहे असा प्रभु (कृष्ण). ५ आपल्या मांडीवर ठेवलेलें. ६ मस्तकास.

घडी जों मानाची विघडलि असे तोंवरि[1] घडी ॥ ११ ॥
बजागी ते जागी स्वमनिं परि डोळे न उघडी ॥
घडी एक क्रोधीं मन बुडवि मानें अवघडीं[2] ॥
घडी पूर्वप्रेमस्थितिस बसतां तीस विघडी ॥
घडी स्त्री जातीची घडविलि[3] असे ख्याति सुघडी ॥१२॥

शिखरि. सख्या दुःखी तूझ्या मजसहित कीं कान उगले ॥
गळे नेत्रीं पाणी न निघति मुखीं शब्द सगळे ॥
किती मी मार्थीबों धरुनि शिर अंकाच उपरी ॥
परी क्रोधाचो हे अधिकचि दिसे अद्भुत परी ॥ १३ ॥
वदे भामा कोपें अति विकळ चाऊनि अधरा ॥
धरा-पृष्ठीं नाहीं ठक तुज असा अंबुजधरा[4] ॥
धरावें या अंकीं शिर अजि तिचें पक्षिगमना ॥
मना आलें देणें कुसुम जिस तें कंसदमना ॥ १४ ॥

वसंतति० जों नेत्र मोडुनि वदे ढकलूनि मांडी ॥
भ्रूमंडळीं भ्रमणें अंगुलिभंग[5] मांडी ॥
तों कृष्णजी करुनि हास्य म्हणे अहाहा ॥
वेडे अनर्थ इतुक्यास्तव कां महा हा ॥ १५ ॥

स्वागता० अर्पितां मुनिवरें सुमनातें ॥
वाटलें प्रथम हेंचि मनातें ॥
कीं असा तरु पुरींत असावा ॥
त्यांतही स्व-सदनींच वसावा ॥ १६ ॥

वसंतति. तत्रापि जे प्रिय बहू स्ववधूचि माजी ॥
तो स्थापणें तरु तिच्या सदनाचिमाजी ॥
ते तूं प्रिया तुजचि देइन त्या द्रुमातें ॥
हें वाटलें प्रथम आण तुझीच मातें ॥ १७ ॥
फूल देउनि तिला उतराई॥ होइं मी, समज हे चतुराई ॥

---

१ जों मानाची घडी बिघडली असे, तोंवरि घडि (घटकाभर) डोळे न उघडी, असा अन्वय. २ दुर्वह. हें क्रोधाचें विशेषण. ३ स्त्रीजातीची सुघडी ( चांगली ) घडी घडविली ( अशी. ) ख्याति असे-असा अन्वय. ४ कमल हातांत धरणाऱ्या कृष्णा. ५ भिंवया फिरविणें. ६ बोटें मोडणें.

देतसें तरुचि तो तुजला गे ॥ खेद हा न करणें तुज लागे ॥ १८ ॥

शिखरिणी. हरी जाणे हें कीं न वदत असे क्रोध-निकरें[1] ॥
करें आलिंगावी प्रिय वदत हे त्यां प्रियकरें ॥
करें श्रीचंद्राच्या कठिन शशिकांत द्रवतसे ॥
तसी हे ही भाव[2] प्रगट करणारी अमृतसे ॥ १९ ॥

भुजंगप्र० तुतें वृक्ष देणेंचि यालागिं आधीं ॥
फुलें नाशिला जो तिला[3] होय आधी ॥
न जाणोनि केले तुवां कष्ट भारी ॥
समाधान ऐसें करी कैटभारी[4] ॥ २० ॥
अशी ते बुझावूनि रंभोरु[5] हातें ॥
तिच्या धूतसे हो मुखांभोरुहातें[6] ॥
उटी लावुनी वाटल्या केशरा जी[7] ॥
स्वहस्तांबुजीं विंचरी केशराजी[8] ॥ २१ ॥

मालिनी. करि हरि यमुना हो मूद गंगावनाची ॥
मिरवि धवल पुष्पीं दीप्ति गंगावनाची[9] ॥
सित असित नद्यांच्या संगमीं श्री त्रिवेणी[10] ॥
तशिच यदुपतीनें घातली चित्र वेणी ॥ २२ ॥

---

## वेंचे, रुक्मिणीविलासांतील.

करुनि नमन देवा रुक्मिणीनायकातें ॥
निजपद[11] हरि दे जो कीर्तिच्या गायकातें ॥
स्मरत पद तयाचें त्याचिया लोकलीला ॥
कथिन हरिति गातां वर्णितां ज्या कलीला[12] ॥ १ ॥

वसंतति० चिच्छक्तिला[13] सतत चिन्मय[14] जेविं योग ॥

---

१ रागाच्या झपाट्यांत. २ अमृतसे भाव प्रकट करणारी हे ही तसी ( द्रवेल ), असा अन्वय. ३ रुक्मिणीला. ४ कैटभ दैत्य मारणारा कृष्ण. ५ केळीच्या खांबाप्रमाणें आहेत मांड्या जीच्या अशी सत्यभामा. ६ मुखकमलातें. ७ अहो. ८ केशपंक्ति. ९ भागीरथीच्या पाण्याची. १० गंगा, यमुना, सरस्वती ह्यांचा प्रवाह. ह्या तिहींपैकीं सरस्वती गुप्त आहे, तशी येथें वेणींत घातलेली मूद समजावयाची. ११ मुक्ति. १२ अधर्मप्रवृत्तीला. १३ मायेला. १४ ज्ञानस्वरूप—ब्रह्म ( त्याशीं ).

श्रीरुक्मिणीस न कधीं हरिसीं वियोग ॥
मी यास्तव प्रियतमा परमा रमा ते ॥
मानी, अहंकृति शिवे असि मारमाते[1] ॥ २ ॥

मालिनी. म्हणउनि खिजवीतो रुक्मिणीतें हरी तो ॥
परम करुण तीच्या मीपणाला हरीतो ॥
कथिन चरित तें जें वर्णिलें श्री-शुकानें ॥
मनिं धरुनि पहावें सज्जनीं हें सुकानें ॥ ३ ॥

उप- श्रीरुक्मिणीची बहु गोड वाणी ॥ ग्रंथास तेथें न करीन वाणी[2] ॥
जाति. कीं[3] कृष्ण जे शब्द अगाध वाचे ॥ वदेल ते वर्णिन माधवाचे ॥ ४ ॥
हा प्रेमसंवाद सुखी सुजाणा[4] ॥ करीतसे, नामहि तेंचि जाणा[5] ॥
आतां शुकाचार्य परीक्षितीतें ॥ सांगे कथा धन्य करी क्षितीतें ॥ ५ ॥

भुजं पलंगावरी रुक्मिणीच्या सुसेजे ॥ बसे कृष्ण, ते त्यास सेवीतसे जे ॥
गप्र० उभी सुंदरी ढाळिते चामरातें ॥ मनीं जे शिवे मीपणा पामरातें[6] ॥ ६ ॥

द्रुत- करें मुद्यांवलयांसह[7] चाळितां ॥ चवर माधवजीवरि ढाळितां ॥
विलं० ध्वनि उठे चरणीं मृदु भूषणीं ॥ त्दृदय लग्न जिचें यदुभूषणीं[8] ॥ ७ ॥
चहुंकडूनि हि आनन शोभलें ॥ पदक खालुनि शोभतसे भलें ॥
श्रवणिंचे नग शोभति दोंकडे ॥ वरुनि चांचर केशहि वांकुडे ॥ ८ ॥
गळसरी दुसरी न धरी गळां ॥ प्रति-भवीं न पती हरिवेगळा ॥
अवतरे अवतीर्ण जयीं पती ॥ स्व-अनुरूप परस्पर दंपती ॥ ९ ॥
कसि असीस अहमति वाटते ॥ नरक-जन्म-मृतींसहि वाट ते ॥
म्हणउनी खिजवूनि तितें हरी ॥ निपुण कृष्ण अहंकृति ते हरी ॥ १० ॥

शिखरिणी. वरावे ते राजे निजसम तुवां राजतनये ॥
नये आम्हां ऐसा क्वचिदपि[10] वरूं वो सुविनये[11] ॥
दिलें बापें भावें त्यजुनि बरवे ते क्षितिपती ॥
पती केला ज्याचे कुलपति समुद्रांत लपती[12] ११ ॥

---

१ मदनाची आई रुक्मिणी हिला. २ कमताई. ३ आणि. ४ सुज्ञास. ५ ह्या प्रकरणाचें नांव ही 'प्रेमसंवाद' हेंच समजा. ६ अहंपणा ह्या नीचातें. ७ अंगठ्या व बांगड्या ह्यांसह. ८ कृष्णाचे ठिकाणीं. ९ चंचल. १० कधींही. ११ अतिनम्र. १२ जरासंधाच्या भयानें कृष्णानें समुद्रांत द्वारकानगरी बांधून तींत आपले सर्व भाऊ व इष्ट घेऊन तो राहिला, अशी कथा आहे, तीस लक्षून हें लिहिलें आहे.

स्वाग- घालिती नृपति येउनि घाले ॥ यानिमित्त जलधींत निघाले ॥
ता. शत्रु ज्यास नृप दानव, [1]रीती ॥ ऐशियास नवऱ्या न वरीती॥ १२॥

द्रुतवि- त्यजियलें अजिहि स्वनृपा[2]सना॥करिल त्याचि हि कोण उपासना॥
लं० प्रगट गोष्टिहि हे जनिं हो असी॥कळत तूं ठकलीस अहा कसी॥१३॥

वसंत ति० ऐश्वर्यवंत वयआकृतिहीं समान ॥
स्वा[3]र्थार्थ होतिल परस्पर त्यांस मान ॥
मैत्री विवाह न घडे अधमोत्तमांतें ॥
तूं भा[4]ळलीस नृपनंदिनि,काय मातें ॥ १४ ॥

येथें सुजाणपण जाण तुझें बुडालें ॥
कीं दीर्घदृष्टिपण तें अवघें उडालें ॥
ज्याला न लेश गुण तो पति काय केला ॥
ज्याकारणें जन अकिंचन तो भुकेला ॥ १५ ॥

मालिनी. अटन करित भिक्षा भक्षणें ज्या समाजीं ॥
गगन-वसन, वारा सूत्र ही त्यास माजीं ॥
अगुणपण जयाचें ऐसिया स्वादु लागे ॥
तुज नृपति-सुते तो कायसा दादुला गे ॥ १६ ॥

उपजाति. आतां तरी क्षत्रिय तूं भला गे ॥ वरीं जयाचा तुज लोभ लागे ॥
जेणें तुला साधति लोक दोनी॥आम्हीं वृथा काय बहू वदोनी १७

वसंततिं० झाली असें परिसतांचि अनाथ-वाणी ॥
ठावी नसे जिस कधीं असि नाथ-वाणी ॥
त्रैलोक्यनाथ पति हा प्रिय आपणातें ॥
त्यागावया तिस गमे करितो पणातें ॥ १८ ॥

दाटूनि कंठ पडली वदनास मुद्रा ॥
शोकें भरे जल जसें भरितें समुद्रा ॥
घेऊनि चामर चुडा सह मुद्रिकांहीं ॥
भूई पडे [12]उरि नुरे तनुमाजि कांहीं ॥ १९ ॥

---

१ अशी चाल आहे. २ ययातिराजाच्या आज्ञेनें यदुवंशास राज्याधिकार नव्हता, त्यास उद्देशून हें म्हटलें आहे. ३ एकमेकांच्या हितास कारण. ४ भोळेपणानें वश झालीस. ५ ऐश्वर्यादि; पक्षीं सत्वरजस्तम हे तीन. ६ भिकारी; पक्षीं विरक्त. ७ आकाश हेंच वस्त्र. ८ कमरेला. ९ गुणराहित्य (मूर्खपणा; पक्षीं सत्वादि गुणांचा अभाव ). १० दीनासारिखी. ११ बोलवेनासें झालें. १२ बाकी.

भुजंगप्र० पडे केळ जैसी महाचंड-वातें॥असें देखतां ये कृपा माधवातें॥
उडी शीघ्र टाकी पलंगावरूनी ॥धरी उत्तरीयांबरा[1] सांवरूनी२०

मालिनी. मजविण न सुखाचा तूज तों हेतु कांहीं ॥
समजत तुझिया या पाहतों कौतुकांहीं ॥
निजवचन विनोदें बोलिलों तूजला गे ॥
न कळत गति[2] यांची खेद हा तूज लागे ॥ २१ ॥

नयन-शर धनुष्यें भोवयांच्या प्रतापें[3] ॥
श्रवणवरिहि येती तांबडे कोपतापें ॥
अधर थरथरीती रक्तवर्ण स्वभावें ॥
असिस तुज पहावें बोललों याचि भावें ॥ २२ ॥

उपजाति. लक्ष्मी[4] अपांगें मुख कृष्णजीचें ॥
विलोकनीं चित्त अखंड जीचें ॥
स्नेहें सलज्जें नयनींच पाहे ॥
टाकून चिंता कळतां कृपा हे ॥ २३ ॥

मालिनी. जरि निपट दरिद्री जो न लाहेचि कांजी ॥
तरि अमृत मिळाल्या त्यास सोडील कां जी ॥
तसि बहुत उणी मी लभ्य झालास मातें ॥
म्हणउनि वरिलें म्यां तूज सर्वोत्तमातें ॥ २४ ॥

उपजाति. राज्यादिकें टाकुनि निर्विकारी[5]॥ त्वदर्थ होतात असे भिकारी॥
राज्यांत दुःखें, सुख तूजमाजीं ॥
म्हणून तूं श्लाघ्य तया समाजीं ॥ २५ ॥

भुजंगप्र० सुधा मानुनीया पितो एक कांजी ॥
सुधापान-कर्ता शिवे त्यास कां जी ॥
तसा टाकुनी मी तुला मंगळाला[6] ॥
नृपांला तया कां भजों वोंगळांला ॥ २६ ॥

---

१ पांघरलेल्या वस्त्राला. २ ह्या वचनाचा रोख. ३ कोपतापें तांबडें नयनशर (कटाक्षरूप बाण) भोवयांच्या धनुष्यें प्रतापें श्रवणवरिहि (कर्णपर्यंत). येती असा अन्वय-म्ह० जी रागानें लाल झालले डोळे भिवया चढवून आकर्ण फिरवीत आहे अशीस. ४ अन्वय-कृष्णजीचें मुख अपांगें विलोकनीं जिचें चित्त अखंड, (ती). लक्ष्मी हे कृपा कळतांच सलज्जें स्नेहें नयनीं (कृष्णाकडे) पाहे. ५ कामक्रोधादि विकाररहित. ६ कल्याणस्वरूपाला.

## वेंचे, लोपामुद्रासंवादांतील.

शालिनी. वंदूनि श्रीराम संसारसाक्षी[1] ॥
ज्याचे अंकीं जानकी सारसाक्षी ॥
लोपामुद्रेशीं तिशीं शब्दमाला[2] ॥
झाल्या अर्पू त्याचि सर्वोत्तमाला ॥ १ ॥

वसंतति० मारूनि रावण विदेहसुता-श्रमातें[3] ॥
नासूनि ये कलश-संभव-आश्रमातें[4] ॥
तो सिंधु बिंदु करि हा मनिं गर्व वाहे ॥
त्याची वधू, विदितसे मनिं राघवा हें ॥ २ ॥

उपजाति. न तोपुढें सेतुकथा वदावी ॥ म्हणोनि सीतेप्रति भाव दावी ॥
बोलोनि ही सांवरिजे स्ववाचा ॥ हा शब्द तो सूचवि लाघवाचा[6] ॥ ३ ॥

भुजंगप्र० विचारी मनीं सर्व-संसार-साक्षी ॥ जरी वारिली जानकी सारसाक्षी ॥
सदा सेतुलीला-निदिध्यास तीतें ॥ वदेल स्ववाचे ऋषीचे सतीतें ॥ ४ ॥

वसंतति० सर्वा कथा कथि अगस्तिवधूसि सीते ॥
क्षाराब्धिसेतुरचना न कथीं सतीतें ॥
कीं चूळ जो जलधिची करि त्या मुनीची ॥
कांता वदेल तव वल्लभ-कीर्ति नीची ॥ ५ ॥

उपजाति. प्रमाण आज्ञा म्हणवूनि रामा ॥ वंदूनि जातां मुनिवर्य-धामा ॥
पुसे तिला क्षेम तया प्रसंगीं ॥ संवाद हा[10] राघव-विप्रसंगीं[11] ॥ ६ ॥

स्वागता. राम तो स्वरत[12] नित्य विरक्त ॥ हा नसेल तुजशीं अनुरक्त ॥
कीं असेल सुख तें वद सीते ॥ सांग गोष्टि हि सुख-प्रदसी[13] ते ॥ ७ ॥
काय बोलत असे अभिराम ॥ श्रांत तूज अवलोकुनि राम ॥
सांग आणिकहि वल्लभवार्ता ॥ ज्या कथा करिति सौख्य भवार्ता[14] ॥ ८

---

१ आपण अलिप्त राहून प्राण्यांचीं सदसत्कर्में पाहणारा. २ शब्दपरंपरारूप माला. ३ जनकाची मुलगी सीता तिच्या दुःखानें. ४ अगस्तिऋषीच्या पवित्र स्थानातें. ५ अगस्तिऋषि. ६ खुबीचा. ७ मोठा ध्यास. ८ क्षारसमुद्रावर सेतु बांधणें. ९ तुच्छ. १० ह्याचा कर्ता लोपामुद्रा. ११ राम व अगस्ति हे एकीकडे असतां लोपामुद्रा व सीता ह्यांचा हा पुढील संवाद झाला १२ आपल्या स्वरूपीं रममाण. १३ सुखप्रद-अशी. १४ संसारदुःखानें पिडलेल्यास.

उपजाति. विरक्त बाई रघुराज साचा ॥ भोक्ता नव्हे राजसतामसांचा[1] ॥
न या बहू कल्पतरूपमा[2] ते ॥ दे सोहळे कल्पितरूप[3] मातें॥९॥

मालिनी. जसि बहु रवितप्ता साउली गोड वाटे ॥
तसि वनि पतिलाडें मानितें कोड वाटे[4] ॥
घरिंहुनि[5] मज बाई सोहळे काननाचे ॥
सजलजलदसंगें[6] मोर वो कां न नाचे ॥ १० ॥

शिखरिणी. पथीं मागें मागें परम अनुरागें रघुपती ॥
उभा राहे पाहे मुणहि मुनि हे हेचि जपती ॥
कृपापांगें[7] आंगें निववि करि संसारार्धिवसा[8] ॥
धरा माता, भ्राता शशिच[9] सविता होय दिवसा ॥ ११ ॥

मालनी. रघुपतिसह शय्या भूमि हे माय वाटे ॥
मृदु सुपथिहुनी ही मानितें पायवाटे ॥
श्वशुर दिनमणी[10] ही होय एणांक भाऊ ॥
न कळत जन ऐसें क्लेश निःशेष भाऊं[11] ॥ १२ ॥

भुजंगप्र० तिघें पावलों अत्रिच्या आश्रमातें ॥
तयाची वधू ते हरी वो श्रमातें ॥
तयीं हार हे गंध लावूनि घाली ॥
स्वआतिथ्यकौशल्य दावूं निघाली ॥ १३ ॥

वसंतति० ये देखतां बहु कृपा मज दत्तमाते[12] ॥
पूजूनि येरीत वदे सति उत्तमा ते ॥
वेणी फणी करिल वो तुज कोण वाटे ॥
वाईट हें मज म्हणे मुलि फार वाटे ॥ १४ ॥

स्वागता म्लानता कधिं न यो सुमनांतें ॥

---

१ राजस व तामस ह्या विषयांचा. २ कल्पतरूची उपमा. ३ जे जे मनांत आणावे ते. ४ मार्गांत. ५घरांतल्यापेक्षां. ६पाण्यानें भरलेल्या मेघाच्या संगतीनें. ७ कृपाकटाक्षानें. ८ हौस. ९ दिवसा सविता भ्राता शशिच होयः—म्हणजे रामाच्या बरोबर असल्यानें सूर्य ही चंद्रासारखा थंड वाटला. १० सूर्य हा सासरा असून भाऊ जो चंद्र ह्यासारखा वाटला. ११अशी माझी स्थिति न समजणारे लोक मला सारे क्लेशच होतात असे ( खुशाल ) मानोत असा अर्थ. १२ दत्तात्रेयाची आई अनसूया तिला.

क्लेश केश न करोत मनातें ॥
गंध आर्द्रचि असो अनसूया ॥
दे असा वर न जीस असूया ॥ १५

मालिनी. करतल न दुखों दे फांड वो[1] जेविंवाणी ॥
वनिं धरि मन माझें येरिती चापपाणी[2] ॥
कनक[3]मृग म्हणें, तों पाठिसी राम लागे ॥
दशमुख हरि ऐशा[4]माजि मेला मला गे ॥ १६ ॥

भुंज- मृग प्राण सोडी तयीं दीनवाणी ॥
अरे लक्ष्मणा धांव ऐशी सुवाणी ॥
वदे; तों मला रामवाणीच वाटे ॥
म्हणोनी बळें लाविलें त्याच वाटे ॥ १७ ॥
न जातां, तया बोलिलें दुष्ट वाचा ॥
अरे घात तूं इच्छिसी राघवाचा ॥
तुला प्राप्त होणार कां देवरा मी ॥
धरीसी असा कां म्हणें भाव रामीं ॥ १८ ॥
अशा शब्दबाणीं सुमित्रात्म[6]जाला ॥
अवो विंधितां तो मृतप्राय जाला ॥
रडे जाय तो राघवा लोकपाळा ॥
करूं काय आतां म्हणे मी कपाळा ॥ १९ ॥

स्वागता. जाय तो रडत दाटत कंठ ॥ प्राप्त होय मजला दश-कंठ ॥
पद्मिनी उपडुनी गज हस्तीं॥ने तसा उचलुनी मज हस्तीं॥२०॥

मालिनी. असि सकळ अनर्था मूळ माझीच वाणी ॥
धरुनि मज पळे तैं होय मी दीनवाणी ॥
बहुत मजनिमित्तें राघवें शोक केला ॥
करुण म्हणुनि नं[7] स्त्रीकाम कामीं भुकेला ॥ २१ ॥

---

१ जसें. २ धनुष्य धारण करणारा राम. ३ सोन्याचा हरिण. ४ इतक्यांत. ५ ह्याचें कर्म लक्ष्मणास (अध्याहृत). ६ सुमित्रेचा मुलगा लक्ष्मण त्याला. ७ स्त्रीकाम म्ह० स्त्रीलंपट, किंवा विषयासक्त असल्यामुळें त्यानें शोक केला असें नाहीं, तर त्याचें अंतःकरण अत्यंत दयार्द्र होतें म्हणून मज अबलेवर भयंकर प्रसंग गुदरलेला पाहून त्यानें शोक केला.

द्रुत- मजनिमित्त करी गडि वानरां ॥ सुलभ जो न सुरां अथवा नरां ॥
विलं०धरि मदर्थ असा व्यवसाय कीं॥दशमुखा वधि राघव सायकीं॥२२॥
करिं करी कमला कमलापती॥ मथुनि सिंधु असाचि मला पती ॥
जलधिमध्यपुरींत तिचा धणी॥वधुनि दे मज आत्मसुखें धणी॥२३॥
स्वाग-जे जळांत बुडणार तीव्र ते ॥ थोर पर्वत अवो पतिव्रते ॥
ता. सागरीं तरति सेतुवाट ते ॥ हे अतर्क्य करणीच वाटते ॥ २४ ॥
द्रुत- परततां जळधीवरि पाहतें ॥ तरति पर्वत, विस्मित राहतें ॥
विलं०जळतळावरि हो धरणी सये॥करि, नसे तुळणा करणीस ये[४]॥२५॥
भुजं-समुद्रावरी सैन्य ये पायवाटे ॥ मनीं हें सदा जीस आश्चर्य वाटे ॥
गप्र०कशी सेतुची गोष्ट तीच्या सुवाचे॥नये, वीसरे बोल ते राघवाचे॥२६॥
शरीरीं भरे वर्णितां रामवारें ॥ उठाणें मनाचीं तयीं दुर्निवारें ॥
पतीचीं यशें जे निरोपीत जाते॥वदे गोष्टि हेही विदेहात्मजा ते॥२७॥
विदेहात्मजा पावली विस्मृतीतें॥म्हणे बांधिला सिंधु जों त्या सतीतें॥
जसें हास्य ये,स्वामिच्या भारतीतें॥स्मरे,तों स्फुरे हा चमत्कार तीतें२८

वसंतति० क्षाराब्धि-सेतु झणि सांगसि तीस सीते ॥
जीचा पती जळधि चूळ करी तसी ते ॥
शब्दांत या रघुपतीच खुणेस दावी ॥
कीं क्षार मूत्र अशि गोष्ट पुन्हा वदावी ॥ २९ ॥

शिखरिणी. म्हणे लोपामुद्रा चुळभरि समुद्रा करि पती ॥
तया या आयासेंकरुनि उतरे कां रघुपती ॥
द्विजाच्या हो मूत्रा शिवति अपवित्रा न कपि ते ॥
म्हणे सीता नाहीं-तरि सगिरिसप्ताब्धि हि पिते ॥ ३० ॥

---

## वेंचे, वामनचरित्रांतील.

बळीनें इंद्रपदहरण केल्यानंतर तें पुन्हा इंद्रास द्यावें म्हणून, विष्णूनें वामनाचा अवतार घेऊन बळी यज्ञ करीत होता तेथें येऊन त्यापाशीं आपल्या पावलानें तीन पावलें जमीन मागितली. बळीनें

---

१ धारिता झाला. २ समुद्रामध्यें असणाऱ्या पुरींत (लंकेंत). ३ रावण. ४ या. ५ आलें (लोपामुद्रेला). ६ पर्वतासहवर्तमान सात समुद्र.

घे म्हटल्यावर वामनानें विश्वव्यापक रूप धरून दोन पावलांत भूलोक व स्वर्गलोक व्यापिले, आणि पूर्वीच्या वचनाप्रमाणें तो बळीपाशीं आणखी पाऊलभर जमीन मागूं लागला, तेव्हां बळीनें आपलें बोलणें सत्य करण्यासाठीं आपल्या मस्तकावर तिसरें पाऊल ठेवावयास सांगितलें. मग वामनानें त्याच्या मस्तकावर पाय देऊन त्यास पाताळीं घातलें; अशी कथा ह्या आख्यांनात आहे.

शार्दूलवि० इंद्राचें पद दैत्यराज बळि तो विप्रप्रसादें[1] हरी ॥
तेव्हां कश्यपमंदिरीं अदितिच्या दिव्यव्रतें श्रीहरी ॥
झाला वामन, मुंजि तेचि समयीं होतांच भिक्षाछळें ॥
सर्वस्व त्रिपदें[2] हरी, स्मर मना त्याचीं पदें कोमळें ॥ १ ॥

भुजं- बळी याग तो नर्मदेच्या तटाकीं॥करी,आहुती शुक्र अग्नींत टाकी॥
गप्र०अकस्मात तों देखिलें वामनाला॥सुखाचा गमे पूर्ण ठेवा मनाला॥२॥

द्रुत- करिं कमंडलु दंड मृगाजिन ॥ त्रिजगमाप करी बटु वामन ॥
विलं०सकलवेदविशारद चांगला ॥ कटितटीं अति सुंदर मेखला ॥ ३ ॥

शार्दूलवि० तूं गा कोण?, अपूर्व[3]; कोठ वससी?, हें विश्व[4] जी तत्वता; ॥
पाळी कोण तुतें?; अनाथ[5] अजि मी त्राता न माता पिता; ॥
द्यावें काय तुतें?, त्रिपाद धरणी माझ्या पदें; फार घे; ॥
नेघे, वामन बोलिला बळिस कीं तृप्ति त्रिलोकीं रिघे[6] ॥ ४ ॥

वसंतति० पूजी बळी मग म्हणे बटु वामनातें ॥
कीं माग जें तव अभीष्ट गमे मनातें ॥
देणार गा इतर[7] मी मज काम नाहीं ॥
तूं माग जे पुरवितों तव कामना ही ॥ ५ ॥

---

१ दैत्यांचे कुलगुरु जे भृगु त्यांच्या प्रसादानें.—इंद्राचा पराभव करण्याकरितां भृगूंनीं बळीच्या हातून विश्वजित् नांवाचा यज्ञ करविला; तेव्हां अग्नींतून दिव्यरथ व धनुष्यबाण वगैरे युद्धोपयोगी सामग्री उत्पन्न झाली. ती मिळाल्यावर बळीनें अजिंक्य रथांत बसून इंद्रावर स्वारी केली, आणि त्याचा पराजय करून इंद्रपद घेतलें; अशी कथा आहे. (भाग० स्कं०८ अ० १५.) २ तीन पावलांनीं. ३ अपूर्व (अनादि; पक्षीं विलक्षण, नौखा). ४विश्वव्यापक, पक्षीं जगांत कोठें तरी राहणारा. ५ज्याहून कोणी समर्थ नाहीं; पक्षीं ज्याचें रक्षण करणारा कोणी नाहीं. ६तीन पावलांनीं तिन्ही लोक व्यापले म्हणजे अधिक कांहींच उरणार नाहीं, असा आशय. ७हें कामाचें विशेषण.

भुजंगप्र० म्हणे धन्य राया स्ववंशानुसारें[1]॥प्रभू बोलसी तूं तुझा बोल सारे॥
रणीं आणि दानीं तुझीया कुळीं रे॥न दे पाठि कोणीच राया बळी रे॥६॥

इंद्रवज्रा राया मला एक असे अपेक्षा ॥ त्यावेगळी सर्व जनीं उपेक्षा ॥
मोजूनि माझ्या त्रिपदेंचि मातें ॥ दे भूमि विप्रप्रवरोत्तमातें[3] ॥ ७ ॥

द्रुतविलं० बळि म्हणे अति सादर वामना॥बहुत वाटसि गा बरवा मना ॥
मज अशा भुवनत्रय-पाळका॥बहु न मागसि कां द्विज-बाळका॥८॥

रथोद्धता० शब्द मी धरिन मस्तकावरी॥ब्राह्मणा अधिक भूमिका[4] वरी ॥
वाटसी बहुत नेटका मना॰॥ जे असेल वद नीट कामना ॥ ९ ॥

द्रुतविलं० द्विजसुता तुझिया वचनामृतें ॥ मज गमे उठतील शवें मृतें ॥
निपुण दीससि निर्मळ आरसा॥परि न मागसि अर्थचि फारसा॥१०॥
हरि म्हणे मजला इतुकें पुरे ॥ त्रिभुवनात्मक होउनिया उरे[5] ॥
त्रिपदमात्रचि कार्य असें बरें॥अधिक इच्छिति लोक न ते बरे॥११

रथोद्धता. शब्दभाव बळिलाहि नाकळे॥ शुक्र सन्निध तयासि तो कळे ॥
तो वदे भुज सभे उभारुनी॥त्या बळीप्रतिच हाक मारुनी ॥१२॥

द्रुतविलं० अदितिच्या उदरीं हरि जन्मला॥म्हणुनि ये समर्या कळलें मला॥
विभव राज्य समस्त हरील रे॥यशहि होइल विस्तृत अस्त[6] रे॥१३॥
म्हणुनि सांगतसें तुज मी अगा ॥ बस तुं मौनपणें अथवा उगा[7] ॥
म्हणसि देइन यावरि ही जरी ॥रिघसि दाटुनि पातकपंजरीं ॥१४॥

उपजाति० संकल्प जो तूं करिसील बापा॥न देववे जासिल सद्य पापा[8] ॥
पद-द्वयीं विश्व नुरेचि जेव्हां॥जावें तुवां कीं नरकासि तेव्हां॥१५॥
करूनि संकल्प न दे द्विजा तो ॥ प्राणी स्वपापें नरकासि जातो ॥
आधींच नेदीं म्हणतां भला हो॥घेसी झणी वैखरिमात्रलाहो[9]॥१६॥

द्रुतवि० जरि विचारुनि गोंविसि वैखरी॥तरिच होइल जाण अगा खरी ॥

---

१ आपल्या कुळाला शोभेल अशा रीतीनें. २ साज. ३ ब्राह्मणांमध्यें अतिश्रेष्ठ जो मी त्या मला. ४ जास्त भूमि माग. ५ तीन पावलें जागा दिली असतां ती त्रैलोक्याहून ही जास्त होईल असा उत्तानार्थ व तीन पावलें मावण्याला त्रैलोक्यही पुरणार नाहीं असा गर्भितार्थ. ६ नाहींसें. ७ हे दोन्ही शब्द एक अर्थाचेच आहेत—अशीं वामनाच्या कवितेंत पुष्कळ दुसरीं उदाहरणें आहेत. ८ 'पापा जाशील' म्ह० तुला पाप लागेल. ९ नाहींतर मी देतों असें म्हणण्याचा मात्र लाभ घेशील, वस्तुतः तुझ्यानें म्हटल्याप्रमाणें करवणार नाहीं, हा भाव.

म्हणुनि शुक्र अजी बहु बोलतो॥परि तयीं वदला बळि बोल[1] तो१७॥
भुजं- विचारूनि[2] आचार्यवाचा[3] निदानीं॥बळी तो धरी बुद्धि सर्वस्वदानीं॥
गप्र० म्हणे बोलतां जी जरी सत्य वाणी॥द्विजा केंवि वाचा वदों दैन्यवाणी१८
इंद्र- हे भूमि वेश्या इसि सर्व जाती[4] ॥ भोगोनिया मृत्युपथास जाती ॥
वज्रा. लोभें इच्या लंघुनि विप्रवाणी॥धिक् बोलती वैखरि दैन्यवाणी॥१९
मालिनी. निगमविधिं-विधानें मांडुनी हे पसारे[5] ॥
यजुनि विविध यागीं वंदिती ज्यासि सारे ॥
वरद हरिच तो हा विप्र कोण्हीच हो जी ॥
किति तरि मज मागो भूमि देतों अहो जी ॥ २० ॥
इंद्र- सर्वस्वदानीं बळि सिद्ध झाला ॥ पूज्यासनीं बैसवि त्या द्विजाला ॥
वज्रा. प्रक्षाळि त्या श्रीपदपंकजातें[7]॥ध्याती रमाअब्जभवादि[8] ज्यांतें॥२१॥
वसंततिल० आली समीप यजमानिन पट्टराणी ॥
पाहे हरीस जिचि हो न पुरे शिराणी ॥
ओती करें कनकपात्र धरूनि वारी ॥
सर्वस्व दे पति तयास न जे निवारी ॥ २२ ॥
उप- करूनि संकल्प करांत पाणी ॥ घालूं म्हणे पूजुनि चक्रपाणी ॥
जाति. निघे न झारींतुनि नीरबिंदू ॥ म्लानत्व पावे बळिचा मुखेंदू ॥२३॥
कीं शुक्र झारींत रिघोनि गोळा॥ करूनि आंगें अजि होय बोळा॥
फोडी हरी घालुनि दर्भ डोळा ॥ दिसे जना विप्रकुमार भोळा॥२४॥
ऐशा रिती पूजुनि दानवारी ॥ घाली करीं तें मग दानवारी[9] ॥
म्हणे स्वपादीं अजि भूमि मोजीं॥जे अर्पिली;[10][11]त्याचि पदा नमो जी२५
वसंतति. संकल्पयुक्त पडतां स्वकरांत पाणी ॥
वाढे त्वरेंकरूनि वामन चक्रपाणी ॥
पाताळि पादतळ मस्तक सत्यलोकीं ॥
कर्णीं दिशा दिनमणी नयनावलोकीं ॥ २६ ॥
उपजाति. एक्या पदें भूमि भरोनि थोडी ॥ दुज्या पदें अंडकटाह[12] फोडी ॥

---

१ भाषण,—हें 'वदला' ह्याचें कर्म. २ विचार करून. ३ दैत्यगुरु शुक्र त्याची वाणी. ४ सर्व जातीचे लोक. ५ वेदोक्त कर्ममार्गाप्रमाणें. ६ खटपटी. ७ वामनाच्या सुंदर चरणकमलास. ८ लक्ष्मी, ब्रह्मा आदिकरून. ९ दानव—अरि (दानवांचा शत्रु वामन). १० दानोदक. ११ नमस्कार असो. १२ कटाह म्ह० कढई तीसारखें अंड म्ह० ब्रह्मांड.

दे तीसरा पाद म्हणे बळीला ॥ म्हणोनि पाशीं दृढ आकळीला ॥२७॥
याकारणें प्रार्थुनिया हरीची ॥ करी स्तुती प्रेमरसें विरिंची ॥
प्रल्हाद आजा बळिभूपतीचा ॥ आला महाभक्त रमापतीचा ॥२८॥
म्हणे तुवां हे दिधली त्रिलोकी ॥ नेली तुवां पूर्णकृपावलोकीं ॥
केला तुवां दंड कृतार्थ झाला ॥ प्रल्हाद इत्यादि वदे अजाला ॥२९॥
पत्नी बळीची जगदीश्वरातें ॥ वंदोनि बोले कमळावरातें ॥
म्हणे धणी तूंचि चराचरांचा ॥ वृथाऽभिमान प्रभुजी नरांचा ॥३०॥
सर्वांचिया आइकतां स्तुतीतें ॥ बोलावुनी त्याच महामतीतें ॥
म्हणे बळी दे तीसऱ्यापदातें ॥ कीं भोगिं पापें बहु आपदांतें ॥३१॥
करूनि संकल्प न देसि जेव्हां ॥ जाशील राया नरकासि तेव्हां ॥
म्हणे बळी देइन देवराया ॥ आहें स्वसंकल्प खरा कराया ॥३२॥
तसा न भीं मी नरकासि देवा ॥ या पाशबंधासहि वासुदेवा ॥
नभीं सुरांच्या जयवाद्यनादा ॥ भीतों जसा मी अपकीर्तिवादा ॥३३॥
करूनि संकल्पहि तूज देना ॥ कोण्ही मला धन्य जगीं वदेना ॥
माझ्या शिरीं ठेव निजा पदातें ॥ जें छेदितें सर्वहि आपदांतें ॥३४॥
द्रुत- पदयुगें भुवनत्रय मोजिलें ॥ पद तिजें बळिचे शिरि योजिलें ॥
विलं० पदनखें विधिअंड विदारिलें ॥ पदतळेंचि जगत्त्रय तारिलें ॥ ३५ ॥
उप- करो बळी स्वात्मनिवेदनातें ॥ संतोष झाला मधुसूदनातें ॥
जाति. दैत्येंद्र तात्काळचि मुक्त केला ॥ प्रेमामृताचा हरि हा भुकेला ॥३६॥

---

## वेंचे, भरतभावांतील.

राम वनांत जातांच त्याच्या वियोगानें दशरथ मरण पावला. तेव्हां भरत आपल्या मामाच्या घरीं होता, त्यास वसिष्ठऋषीनें बोलावून आणिलें. राम वनवासास जाण्याला व दशरथ मरण्याला आपली आई कैकेयी हीच कारण झाली, असें भरतास समजतांच त्यास परम खेद झाला. बापाची क्रिया संपल्यावर तो रामाला वनांतून परत

---

१ उदार आहे बुद्धि ज्याची अशा बळीतें. २ देतों म्हणून दिलें नाहीं ह्या पातकामुळें. ३ माझा पराजय झाल्यामुळें देवांनीं केलेल्या जयसूचक वाद्यनादास. ४ दुष्कीर्तीचे भाषणाला. ५ ब्रह्मांड. ६ आपल्या चित्ताचें अर्पण. ७ मधुनामक दैत्याला मारणारा, वामन.

आणावें म्हणून त्याजकडे गेला; परंतु मी वनांत जावें व तूं राज्य चालवावें अशी पित्याची आज्ञा आहे, ती आपण दोघांनीं ही उल्लंघूं नये, असें रामानें सांगून त्यास राज्याधिकार चालविण्यास परत पाठविलें. नंतर भरत रामाच्या पादुका घेऊन अयोध्येस आला. हें ह्या आख्यानांत सांगितलें आहे; ह्यांत भरताची रामचंद्राविषयीं अलौकिक भक्ति वर्णिली आहे, म्हणून ह्यास 'भरतभाव' ही संज्ञा कवीनें योजिली आहे.

द्रुत- करुनि वंदन जानकि-नायका ॥ भरतभाव निरोपिन आयका ॥
विलं० जननि टाकुनि[1] रामपदीं निघे ॥ सुकृति तो मति हे समजोनि घे ॥१॥

मालिनी. भरत जवळि नाहीं मातुल-ग्राम[2] वासी ॥
भरत-जननि धाडी कानना राघवासी ॥
दशरथ मृत झाला राम जातां वियोगें ॥
तृण बहुत दिसाचें अग्निच्या जेविं योगें ॥ २ ॥
मग भरत वसिष्ठें आणिला जों अयोध्ये ॥
नगरि गतधवा तों आणि निर्वीर्य योद्धे ॥
जन मृत-सम देखे हेतु कांहीं कळेना ॥
जननिकृत कुचेष्टा बुद्धितें आकळेना ॥ ३ ॥

उपजाति. वृत्तांत सांगे भरतासि माय ॥ स्वानंद जीचा त्रिजगीं न माय ॥
भेदूनि वक्ष:स्थळ शब्द तीचा ॥ करी महाक्षोभ महा-मतीचा[3] ॥४॥
जाळील तीतें निजदृष्टिपातें ॥ पाहे असा हालविनाच पातें ॥
म्हणे अवो पापिणि[4] पापरूपे[4] ॥ जळो तुझें तोंड जड[5]-स्वरूपे ॥५॥
जाळीन हें तोंड चि जाण आधीं ॥ मुखें जया देशि अनंत आधी ॥

---

१ 'जननि टाकुनि (जो) रामपदीं निघे तो सुकृति, हे मति समजोनि घे'—अत्यंत प्रिय जी आई तिला ही सोडून देऊन जो ईश्वरास शरण जाऊन त्याची सेवा करितो तोच धन्य होय, असा उपदेश घे, असें वाचकास कवि म्हणतो. २ मामाच्या गांवीं राहिलेला. ३ थोर अंतःकरणाचा जो भरत त्याचा. ४ हीं दोन विशेषणें देण्याचें तात्पर्य हें कीं, तुला नुसतें पापिणी म्हणजे पाप करणारी असें म्हणणें शोभत नाहीं, तर तूं पापरूप म्हणजे साक्षात् पापाची मूर्तिच आहेस. ५ जड म्ह० पाषाणादि त्याप्रमाणें आहे स्वरूप जीचें म्ह० तुला अंतःकरणच नाहीं असा भावार्थ.

न माय तूं वैरिण होसि साची ॥ माझे मनीं भाव खरा असाची ॥ ६ ॥
केला तुवां देखत[1] भर्तृ-घात ॥ क्षणें तिं-वाटा रचिल्या तिघांत ॥
शत्रुघ्न[2] मी लक्ष्मण राम जोडे ॥ राजा तिजा तींस अनर्थ जोडे ॥ ७ ॥

द्रुतविलं. गिरि-वनाप्रति राम रमापती ॥ दवडिल्यावरि मृत्यु-मुखीं पती ॥
निजविला, मज हे विधवा धरा ॥ म्हणसि भोग अभोग्य वसुंधरा ॥ ८ ॥

भुजंगप्र० वना धाडिलें जेधवां रामराया ॥ तुवां हेतु केला स्वभर्ता मराया ॥
अहा, रामसीता अशा दंपतींतें ॥ वना धाडिलें, मारिलें कां पतीतें ॥ ९ ॥

मालिनी. न कळत पतिताचें, खादलें अन्न वोकी ॥
तरि पतित नव्हे तो पापरूपे अवो कीं ॥
म्हणुन उदरिं तुझ्या देह हा जन्मला गे ॥
त्यजिन तरि मला हें पाप तूझें न लागे ॥ १० ॥

वसंततिल. हे[3] अग्नितापितघृतांत तनू जळेना ॥
प्रत्यक्ष तो कधिंहि पावक आतळेना ॥
रामापराधिनि[4]-सुतास शिवेल कां जी ॥
घे ब्राह्मणोत्तम न अंत्यज-पात्र-कांजी[5] ॥ ११ ॥
मारील सद्य मज खाइन त्या विखातें ॥
कीं पापियास निजपातक जेविं खातें ॥
तूं पापिणी त्वरित जाशिल रौरवासी ॥
होसी सदा निरयदारुणलोकवासी ॥ १२ ॥

## घनाक्षरी.

अवो कैकेयी हें काय ॥ केलें तुवां हाय हाय ॥
न म्हणवे तुज माय ॥ जन्मोजन्मीं वैरिणी ॥ १ ॥
सर्वजगदभिराम[6] ॥ वना धाडिला तो राम ॥
केलें विख्यात कुनाम ॥ कीं हे पति-मारिणी ॥ २ ॥
तुझ्या वधें न अधर्म ॥ तुज मारावें हा धर्म ॥

---

१ पाहतां पाहतां. २ शत्रुघ्न ( व ) मी ( आणि ) लक्ष्मण ( व ) राम ( हे दोन जोडे, ( आणि ) निजा राजा, ( ह्या ) तीन वाटा ) तिवाटा तिघांत रचिल्या, आणि तींस ( तिघांस ) अनर्थ जोडे असा अन्वय. ३ हे तनु म्ह० हें माझें शरीर. ४ येथें संस्कृत नियमाप्रमाणें 'नी' दीर्घ असावी. ५ अतिशूद्राच्या भांड्यांतील पेज. ६ संपूर्ण जगतामध्यें सुंदर.

परि निंदील हें कर्म ॥ राम-पाप-कारिणी ॥ ३ ॥
नाहीं तरी प्राण आज्य ॥ तुझे घालूनिया प्राज्य ॥
जाळूनिया सामराज्य ॥ दाखवितों करणी ॥ ४ ॥ १३ ॥

शालिनी. धिक्कारूनी गोष्टि मातेसि सांगे ॥ कौसल्येच्या ये गृहा सानुरागें॥
त्यातें देखे जेधवां राम-माय॥श्रीरामाचा शोक लोकीं न माय॥१४॥

रथोद्धता. मोकळा करुनि कंठ तेधवां ॥ आठवूनि मनिं जानकीधवा ॥
ते रडे भरतही तसा रडे ॥ जोंवरी नयन होति कोरडे ॥ १५ ॥

भुजंगप्र० म्हणे वासरा घात झाला असा रे॥तुझ्या माउलीचेच हे खेळ सारे॥
वृथा धाडिला राम माझा वनासी॥न देखों शके त्या जगज्जीवनासी१६
अरे राघवें व्यापिले लोक सारे ॥ तरी नावरे शोक माझा कसा रे ॥
तृषाक्रांत डोळे घनश्याम रामा॥पहायास रे सर्व-लोकाभिरामा॥१७

स्वागता. जानकी जनकराजकुमारी ॥ पाय कोमळ जिचे, सुकुमारी ॥
चालली जसि वना अन्हवाणी ॥ बोलली कटकटा जन-वाणी॥१८॥
सून सूनुहि वनाप्रति जाती ॥ आणि जो जित असेल कुजाती ॥
मानवी तनु पशूंत गणावी ॥ ते शिळा परि सजीव म्हणावी ॥ १९ ॥

द्रुतविलं. भरत शोक अनेक तिचे असे ॥ परिसतां मग बोलत तो असे ॥
जननि गोष्टि समस्तहि हे खरी ॥ परिस येविषयीं मम वैखरी ॥२०॥

उपजाति. मी ब्रह्महत्याशतपाप लाहें ॥ ठावें असे लेश जरी मला हें ॥
खड्गें वसिष्ठासि अरुंधतीतें ॥ वधीं जरी ठाउक हें मतीतें ॥ २१ ॥
म्हणे राम-माता अरे वासरा मी॥ तुझा जाणतें प्रेम-उल्हास रामीं॥
तुला रामसेवेविणें काम नाहीं॥न राज्यादिकांची जया कामना ही२२

स्वागता. तों वसिष्ठ वदला भरतातें ॥ रामपादनिज-लाभरतातें ॥
पाळिं यावरि समस्त धरा हे ॥ राजनीति करिं, सावध राहें ॥ २३ ॥

वसंततिο राये तुतेंचि दिधलें स्वनृपासना रे ॥
संपूर्ण तूं जननिची करिं वासना रे ॥
शब्दार्थ हे न कळती गुरु-लाघवाचे ॥

---

१ साम्राज्य ( सार्वभौमराज्य. ) २ आवडीनें. ३ ह्याचा 'तीं' हा अध्याहृत कर्ता. ४ प्रेमभर. ५ रामाच्या चरणाची आपणाला प्राप्ति करून घेण्याविषयीं उत्सुक. ६ भरताची फक्त परीक्षा पाहण्यासाठीं राज्य कर वगैरे जे वसिष्ठ फार खुबीचे शब्द बोलला त्यांचा उत्तानार्थच खरा मानून गुरुही असें बोलतो. असें पाहून भरतास फार दुःख झालें व त्यानें रामाचें स्मरण केलें.

साचे म्हणूनि पद आठवि राघवाचें ॥ २४ ॥

**घनाक्षरी.**

म्हणे भरत हा राम ॥ त्राहे[1] त्राहे मेघश्याम ॥
वसिष्ठ हा गुरु नाम[2] ॥ तोही मज कोपला ॥
अंतरले तुझे पाय ॥ तया राज्याचे उपाय ॥
सांगे मज हाय हाय ॥ नव्हे गुरु आपला ॥
अग्नितुल्य वाटे राज्य ॥ मज ज़ाळिल सामराज्य ॥
वरी ऋषी घाली आज्य ॥ त्याणें जीव तापला ॥
दावीं सत्वर चरण ॥ किंवा स्वामी दे मरण ॥
तुझ्या नामाचें स्मरण ॥ त्यांचा भव संपला ॥ २५ ॥

उप- स्मरोनि ऐसें रघुनंदनातें ॥ त्या राघवाच्या पदवंदनातें ॥
जाति. जावें असा भाव धरूनि साच॥बोले वसिष्ठामतिही तसाच ॥२६॥

वसंततिलका. राजाधिराज रघुराजचि एक जाणा ॥
पाहों चला सकळ जाउनि त्या सुजाणा ॥
आम्ही समस्त जन किंकर राघवाचे ॥
जे रामनाम जपतों अजि नित्य वाचे ॥ २७ ॥

भुजं- विना राक्षसी-कैकयी काननातें॥ चला सर्व पाहूं मृगांकाननातें[3] ॥
गप्र० प्रयत्नेंचि घेऊनि येऊं गृहातें ॥ न येतां समर्पूं शरीरें[4] स्वहातें ॥२८॥

इंद्रव- येणार ते या अथवा नका हो ॥ राहेन मी हें न घडेचि कांहीं ॥
ज्रा. बोलोनिया स्पष्टचि चालिला हो॥शोकांत ही घे प्रभुनामलाहो॥२९॥

उप- हा राम हा राम असेंचि वांचे ॥ चित्तांत पाय प्रभु राघवाचे ॥
जाति. त्यजी कुलाचार्य हि रामवाटे[6] ॥ कीं तो गुरू त्यास गुरू न वाटे ॥३०॥

इंद्रव- येणार ते या अथवा नका ही ॥ शब्दांत या अर्थ सखोल कांहीं ॥
ज्रा. कीं जो गुरू अंतर राम-पायीं॥पाडी,त्यजावा गुरु तो उपायीं॥३१॥

उप- श्रीरामही टाकुनि राज्य मातें ॥ जो घे म्हणे त्या ऋषिसत्तमातें ॥
जाति. गुरुत्त्व कैचें, तरि मी उपेक्षा॥करीन, त्याची न मला अपेक्षा॥३२॥

---

१ त्राहि—तार. २ उघड किंवा निंदा ह्या अर्थी हें अव्यय आहे. ३ मृगाचें—हरिणाचें चिन्ह ज्याला आहे तो मृगांक म्ह० चंद्र त्यासारखें आहे मुख ज्याचें त्याला. ४ प्राणत्याग करूं हा भाव. ५ म्हणे व स्मरे अशीं अध्याहृत क्रियापदें घ्यावीं. ६ रामाकडे जाण्याकरितां.

इंद्रव- याकारणें या अथवा नका ही ॥ राहेन मी हें न घडेचि कांहीं ॥
ज्रा. ऐशी उपेक्षा वदनीं वदे तो॥ श्लोकांत हा व्यासहि भाव देतो॥३३॥
उप- नाहीं तरी या अथवा नका ही ॥ गुरूस बोलेल घडेल कांहीं ?॥
जाति. रामानिमित्तें गुरुही त्यजावा॥वाक्यांत भावार्थ असा भजावा॥३४॥
इंद्रव- रामानिमित्तें जननीस टाकी ॥ पाणी न पी राज्यनदीतटाकीं ॥
ज्रा. लंघूनिया हो गुरु-संगतीतें ॥ पावे अहो दे गुरु ज्या गतीतें ॥३५॥
द्रुत- गुरुविणे न घडे परमा गती ॥ गति शुकादि गुरूसचि मागती ॥
विलं० परि गुरू करि अंतर राघवीं॥न गुरु तो ठक दांभिक लाघवी ॥३६॥
उप- तो बाप जो राघव-भक्ति दावी ॥ तसीच जे मायहि ते वदावी ॥
जाति. जो राम दावी गुरु तोंवि साच॥श्रुत्यर्थ-ईत्यर्थ असे असाच॥३७॥
वसिष्ठ घे राज्य म्हणेचि साच ॥ परंतु भावार्थ नव्हे तसाच ॥
त्याच्यापरीक्षार्थचि बोलिला हो॥त्याहूनि आधीं मुनि चालिला हो३८
आज्ञा गुरूची अवघे करीती ॥ सच्छिष्य ते लोक-अलोकरीती ॥
परंतु त्यांच्या वचनें तयातें ॥ न टाकिती सत्पद-दातयातें ॥३९॥
स्वाग- राम न त्यजि तईच गुरूतें ॥ न त्यजी स्वसुख-कल्पतरूतें ॥
ता. जो असें वचन ही न मनीतो ॥ श्रीगुरूनमनि हीन मनीं तो ॥४०॥
उप- म्हणे परीक्षार्थचि टाकि मातें ॥ तसा म्हणे टाकि रघूत्तमातें ॥
जाति. उल्लंघितां शब्दांचि इष्ट वाटे ॥ म्हणोनि लागे ऋषिवर्य वाटे ॥४१॥
द्रुत- प्रकरणीं पुढिल्या गुरुराज तो ॥ भरतसंगतिनेंच विराजतो ॥
विलं० जरि पथीं गुरु होय समागमीं॥तरिच राम मिळे निगमागमीं ॥४२॥
उप- वसिष्ठ, तो, आणि समस्त माया॥रामार्थ टाकूनि समग्र माया ॥
जाति. सेना प्रजा सर्वहि त्याच वेळे॥जाती, जसे लंघिती सिंधु वेळे॥४३॥

---

१ रामाकडे जाऊं नको व राज्य कर असें म्हणणारा गुरूच नव्हे असा भरताचा भाव; असें नसतें तर 'या अथवा नका' असें तो गुरूस बोलल असें घडेल काय ? २ घ्यावा. ३ कावेबाज. ४ तात्पर्यार्थ. ५ भरताच्या अगोधर. ६ लोकरीतीस अनुसरून असो अथवा नसो. ७ तथापि गुरूनें आपला त्याग करायास सांगितलें तरी तो सत्पद दाता म्ह० परमेश्वरप्राप्ति करून देणारा आहे, म्हणून सच्छिष्य त्याला टाकीत नाहींत. असें असतां भरतानें गुरूचा त्याग केला, ह्याचें खरें तात्पर्य पुढील श्लोकांत कवीनें स्पष्ट केलें आहे. ८ भरत. ९ भरताच्या आया. १० समुद्र जसा वेळेला म्ह० मर्यादेला सोडतो तसे सर्व लोक अयोध्या सोडून रामाकडे गेले.

बसंतति० पाई निघे भरत सानुज रामवाटे ॥
रामाविणें इतर इष्ट न काम वाटे ॥
माथां जटामुकुट, वल्कल नेसला हो ॥
श्रीराम-वेष, वदनीं प्रभूनाम-लाहो ॥ ४४ ॥

स्वाग- राम-वल्कल-जटादिकरीती ॥ वेष तो उभय बंधु करीती ॥
ता. राम सानुज तसें भरतातें ॥ देखती सकळ रामरतातें ॥ ४५ ॥

वसंतति० तो भेटला गुहक-नाम किरात वाटे ॥
श्रीरामभक्त परमाप्त तयास वाटे ॥
गंगातटीं रघुपती-शयनास[१] दावी ॥
ते भक्ति काय म्हणुनी मुखि वो वदावी ॥ ४६ ॥

स्वाग-दर्भ-निर्मित तया शयनातें ॥ देखतां उदक ये नयनातें ॥
ता. भूतळीं भरत घालुनि घे वो॥त्या स्थळींहुनि न चित्त निघे वो॥४७॥
रामवृत्त रघुवंशवरातें ॥ सर्व वर्णुनि गुहाख्य किरातें ॥
लंघुनी सुरनदी[२] भरतातें ॥ ने स-सैन्य रघुराजरतातें ॥ ४८ ॥

उप- ब्रह्मा रमा वंदिति नित्य जातें ॥ त्या राघवाच्या चरणांबुजातें ॥
जाति. पाहूं त्वरे हे भरता असोसी॥वियोग तो प्राण-वियोग सोसी॥४९॥

शालि-कैकेयीच्या दुष्टभावें जळाला ॥ इच्छी रामाच्या पदाच्या जळाला ॥
नी. तों स्वामीच्या देखिलें आश्रमातें॥कांहीं चित्तें टाकिलें हो श्रमातें॥५०॥

स्वाग- पादचिन्हित तये वसुधेतें ॥ देखतां तृषित जेविं सुधेतें ॥
ता. रामचंद्र-पदसारसमुद्रा[३] ॥ वाढवी भरत-सौख्य-समुद्रा ॥ ५१ ॥

बसंततिल० घालूनि घे भरत देखुनि त्या रजातें ॥
शत्रुघ्नही अनुसरोनि निजाग्रजातें ॥
चित्तीं स्मरे प्रभुचिया पदनीरजातें ॥
प्रेम-प्रवाह नयनीं सुखनीर[४] ज्यातें[५] ॥ ५२ ॥

द्रुतवि-तनुवरी गुढियांच[६] उभारती ॥ कविमुखें किति वर्णिल भारती ॥
लंबि० भरत ये रितिनें अजि लोळला॥प्रभुपदाब्जरजीं[७] बहु घोळला॥५३॥

---

१ रामाच्या आंथरुणास. येथें ती ऱ्हस्व असावी. २ भागीरथी. ३ रामाच्या पदकमलाचा ठसा. ४ आनंदाश्रु. ५ डोळ्यांस. ६ शरीरावर आनंदानें रोमांच उभे राहिले. ७ रामाच्या पदकमलाच्या धूळींत.

वसंततिल० हा राम राम रघुनंदन हेंचि वाचे ॥
चित्तांत ते चरण दीसति राघवाचे ॥
ते रेणु हे मुकुटमंडण[1] जे शिवाचे ॥
ऐसें म्हणे त्यजुनि भावें अहो जिवाचे ॥ ५४ ॥

मालिनी. भरत पदरजीं त्या घोळला दीर्घ काळ ॥
त्रिभुवनिं हि सुखाचा होय तेव्हां सुकाळ ॥
न मिळति पदरेणू जे विरिंच्यादिकांही ॥
सुलभ मज म्हणे हें भाग्य माझेंचि कांहीं ॥ ५५ ॥

वसंततिल० देखोनि राघव-पदाब्ज-रजास वाटे ॥
लोटांगणीं गडबडे सुख फार वाटे ॥
आनंद-नीर ह्रदयीं नयनांबुजाचें ॥
चित्तांत राम शिव घे पदअंबु ज्यांचें[3] ॥ ५६ ॥

स्वाग- वाम-अंक-गत[4] भूमि-कुमारी[5] ॥ वाम-बाहु-सुरता[6] सुकुमारी ॥
ता. वल्कलांबरजटा-अभिरामा ॥ देखतो भरत त्या अभिरामा ॥५७॥

इंद्र- दूर्वादलश्यामल दीप्ति देहीं ॥ सेवी पदें लक्ष्मण तो विदेही[7] ॥
वज्रा. गंगातटीं सेवित मंदवातें ॥ देखे अशा श्रीरघुपुंगवातें ॥ ५८ ॥

उपजा- देखोनि ऐसें रघुनंदनातें ॥ धांवे त्वरेनें पदवंदनातें ॥
ति. अलभ्य जो हर्ष सुरादिकां ही॥तो होय,त्या माजिच शोक कांहीं५९

भुजं- रडे, फुंदफुंदे, शिरीं पादपद्मा॥धरी, सद्म मानी जया नित्य पद्मा॥
गप्र० बळें क्षेम[8] दे त्यासि वोढूनि राम॥स्वभक्तप्रिय स्वामि विश्वाभिराम॥६०

स्वागता. मांडिये उपरि बैसविला हो ॥ अश्रुनीर पुसि दे सुखलाहो ॥
वासरा न रड, सांग सुवार्ता॥शब्द हा निववि दुःखदवार्ता[9]॥६१॥

वसंतति० तों देखिला गुरु वसिष्ठ तयासि वंदी ॥
ब्रह्मण्य देव जडला चरणारविंदीं ॥
तों माउल्या तिघिहि सत्वर पावल्या हो ॥
भेटोनिया तिघिहि सत्वर सेविल्या हो ॥ ६२ ॥

---

१ मुकुटास शोभविणारे. २ जिवाचे भाव त्यजुनि म्ह० देहभान सोडून. ३ ज्या. रामाचें. ४ डाव्या मांडीवर बसलेली. ५ सीता. ६ रामाच्या डाव्या हातास चिकटून बसलेली. ७ वैराग्ययुक्त. ८ आलिंगन देता झाला. ९ दुःखरूप वणव्यानें पिडलेल्या भरतास.

उपेंद्र- पिता सुखी कीं म्हणतांचि रामा ॥ रडोनि त्या सांगति सूपरामा[1]॥
वज्रा. रडे अहो रामहि लोकरीती॥स्त्रिया पुन्हा शोक महा करीती ॥६३॥
भुजं- सपिंडी-क्रिया राम गंगातटाकीं॥करी, आणि ते पिंड गंगेंत टाकी॥
गप्र० रडे लोकदृष्टीस शोकश्रमातें॥प्रभू दाउनी ये पुन्हा आश्रमातें॥६४॥
स्वाग- तों वदे भरत गोष्टि मनाची ॥ प्रार्थना बहुत आगमनाची ॥
ता. मांडिली, परि न राघव मानी ॥ देखतां सुरवरांस[3] विमानीं ॥ ६५॥
द्रुत- झणि फिरे स्वपुरीप्रति राम हा॥म्हणुनि आधि मनीं अमरां महा ॥
वि० भरतशब्द तदर्थ न ये मना ॥ पुरवणें प्रभुला सुरकामना ॥ ६६ ॥
उप. आज्ञा पित्याची मज मोडवेना ॥ वत्सा तुझी गोष्टहि तोडवेना ॥
जाति घालूं नको बा मज संकटांत॥नको पडों या सहसा हटांत[4] ॥ ६७॥
भुजं- असी आयके जेधवां रामवाणी॥मुख-श्री करी बंधु तो दीनवाणी॥
गप्र० म्हणे तात-आज्ञा मृगांकाननारे॥मला सांग जाईन मी काननारे॥६८॥
शालि- बापा ऐसें वर्ततां तों विशेषें ॥ आज्ञाभंग प्राप्त दोघां अशेषें ॥
नी. एवं[5] राज्यातें तुवांरे भजावें॥ताताज्ञेनें कानना म्यांच जावें ॥६९॥
वसंततिल० येना असें भरत देखुनि रामराया ॥
गंगातटीं रचुनि दर्भ बसे मराया ॥
पाहे वसिष्ठमुनि-वक्त्रसरोरुहातें ॥
श्रीराम, आणि खुण दाखवि हो स्वहातें ॥ ७० ॥
कीं सांग गुह्य अवतारचरित्र याला ॥
जें तारितें चहुं युगांत जगत्त्रयाला ॥
बोले वसिष्ठ मग सन्निध जाउनीया ॥
कां प्राण टाकिसि म्हणे समजावुनीया ॥ ७१ ॥
उपजा- हा राम मारील दशाननासी ॥ यालागिं जातो प्रभु काननासी ॥
ति. नको निवारूं भरता तयाला ॥ब्रह्मादिकांच्या पददातयाला॥७२॥
वसंततिल० येणार मागुति चतुर्दश वत्सरांतीं ॥
राहो वनांत तितुके दिन आणि राती ॥

---

१ बायका. २ मरणाला. ३ देवकार्यासाठीं राम वनास निघाला होता, म्हणून परत गेल्यानें तें सिद्धीस जाणार नाहीं ह्याचें स्मरण देवांना आकाशांत पाहून रामाला झालें; म्हणून त्यानें भरताचें म्हणणें मान्य केलें नाहीं; असा भाव. ४ आग्रहांत. ५ सर्वप्रकारें. ६ म्हणून.

आत्मोच तो तुज वियोग तयासि नाहीं ॥
येऊनि हे करिल जे तव कामना ही ॥ ७३ ॥
हें आयकोनि जरि शोकहि दूर केला ॥
प्रत्यक्ष दर्शनसुखास बहू भुकेला ॥
तेव्हां उठोनि भरतें पदवंदनातें ॥
केलें, दुरूनि म्हणतो रघुनंदनातें ॥ ७४ ॥
देखोनिया गमननिग्रह राघवाचा ॥
बोले उभा भरत निश्चयरूप वाचा ॥
वर्षें चतुर्दशवरीच धरीन देहा ॥
त्यानंतरें त्यजिन यास निरोप दे हा ॥ ७५ ॥
वर्षें द्विसप्तभरि काल समाप्त जाला ॥
त्यानंतरें अजि तुझ्या चरणांबुजाला ॥
स्पर्शे शिरें न जरि देह तयाच वारीं ॥
यातें त्यजीनचि विरिंचि जरी निवारी ॥ ७६ ॥
वर्षें चतुर्दशहि रक्षिन शासनातें ॥
अंगीकरीन न बसेन नृपासनातें ॥
सिंहासनावरि तुझ्या पदपादुका मी ॥
पूजीन तों तव पदांबुजलाभकामी ॥ ७७ ॥

राग- पादुका जडितें[3] आणुनि हातें ॥ रामचंद्रचरणांबुरुहांतें ॥
ता. लावुनी निजशिरीं भरतानें ॥ वंदिल्या रघुवरांघ्रिरतानें[4] ॥ ७८ ॥

मालिनी. भरतजननि जागी होय रामप्रतापें ॥
विकळ[5] रघुपतीच्या द्रोहपापानुतापें[6] ॥
रडत म्हणतसे मी पापिणी रामराया ॥
न धरिन तनु, आज्ञा ये स्थळीं दे मराया ॥ ७९ ॥
रघुपति तिस बोले टाकि हा शोक माते ॥
इतुकिहि मम माया जींत हे सृष्टि माते ॥

---

१ सर्वव्यापक ईश्वर. २ चवदा. ३ रत्नखचित. ४ रघुकुळांत श्रेष्ठ जो राम त्याच्या चरणीं आसक्त अशा. ५ दुःखी. ६ रामाच्या द्वेषाच्या पापापासून झालेल्या पश्चात्तापानें.

सकळहि सुरकार्या म्यांच हे हेतु केले ॥
अमर दशमुखाच्या मृत्युतें वो भुकेले ॥ ८० ॥

शिखरिणी- झणी वो कैकेयी बुडविशिल शोकांत त्हदया ॥
तुझी माझे ठायीं सुमति भरताहूनि सुदया ॥
तुतें मी कौसल्येहुनि अधिक माते समजतों ॥
तुवां ऐसें केलें म्हणउनि न वाटेचि मज तों ॥ ८१ ॥

द्रुतवि. करुनि मागुति बुद्धिस कोमला ॥ क्षण भरी विसरोंच नको मला ॥
लं० तरि असा न पडे भ्रम मागती॥जितचि पाविस हो परमा गती॥८२॥

---

## नृसिंहावतार.

मालिनी. हरि नरहरिरूपें क्रूर दैत्या विभक्ता ॥
परम सुलभ शांत श्रीकर स्वात्मभक्ता ॥
स्वचरणशरणातें सौम्य ही शीघ्र तो कीं ॥
जननिभय मनीं का मानिजे व्याघ्रतोकीं ॥ १ ॥
जयविजय असे ते जावळे दो दितीचे ॥
असुर इतर जाले पुत्रपौत्रादि तीचे ॥
प्रथमचि उपजे तो धाकुटा बंधु होतो ॥
धरणिधर-वराहें मारिला बंधु हो तो ॥ २ ॥

भुजंगप्र. बुडे क्ष्मा तयीं उद्धरी जो क्षमेला॥तया क्रोडरूपें हिरण्याक्ष मेला॥
तया दूसरा ज्येष्ठ त्या अग्रजाला॥मनीं क्रोध अत्युग्र उत्पन्न जाला॥३

१ असे. २ मुक्ति. ३ अभक्ता. ४ ( जसे ) दितीचे इतर पुत्रपौत्रादि असुर जाले, असे जयविजय (ही) तीचे दो(दोन) जावळे (असुर जाले). एकदा सनकादिक ब्रह्मदेवाचे पुत्र वैकुंठास गेले असतां विष्णूचे द्वारपाळ जयविजय ह्यांनी त्यांस आंत जाण्यास अटकाव केला. त्यामुळे त्यांस कोप येऊन त्यांनीं तुम्ही राक्षस व्हाल असा जयविजयांस शाप दिला; पण पुन्हा त्यांस दया येऊन ते म्हणाले कीं, तुम्ही तीन वेळ राक्षसजन्म पावून नंतर पुनः पूर्वपदाप्रत याल. त्याप्रमाणें जयविजय हे अनुक्रमानें हिरण्यकशिपु व हिरण्याक्ष, रावण व कुंभकर्ण, आणि शिशुपाळ व दंतवक्त्र असे तीन जन्म राक्षस झाले. अशी कथा आहे. (भागवत स्कं० ७ अ० १). ५ वराह (डुकर).

स्वागता. तो हिरण्यकशिपु प्रियभावा ॥ कारणें निज तमोगुणभावा ॥
दाखवी त्वरित ठोकुनि मांडी ॥ द्वेष विष्णुचरणांप्रति मांडी॥४ ॥

मालिनी. अजर अमर काया आपली तो कराया ॥
तप करि वर मागे धातया लोकराया ॥
न मृति मज म्हणे हो चेतनाचेतनांहीं ॥
मरण हरिं असें कीं दीसरातींत नाहीं ॥ ५ ॥

स्वागता. त्या वरें अमरमानवलोकीं ॥ स्वामि तोचि फळ हें अवलोकीं ॥
देववृंद अवघाच पळाला ॥ भीति सर्वहि तया चपळाला॥ ६ ॥

इंद्रवज्रा. ते देव ही प्रार्थिति देवदेवा ॥ कीं आपुलें घे पद देव्र देवा ॥
झाली बहू बुद्धि अधीरवाणी॥तों बोलली हो अशरीर वाणी॥७
कीं हा तपें तोषुनि अब्जजाला॥त्याच्या वरें सर्वअवध्य झाला ॥
तथापि मारीनचि दुर्धरा या॥गांजील माझ्या जयिं भक्तराया८
प्रल्हाद त्याचा सुत त्या कुमारीं ॥ घडे जयीं द्वेष मुकुंद मारी ॥
केव्हां असें होइल ही असोशी॥दुःखें बहू तो सुरवृंद सोशी॥९॥
ऐशी प्रतीक्षा ल्हदयांत देवां ॥ तो दैत्य त्या भागवता सदेवां ॥
पुरोहिताच्या सदनींच ठेवी॥ते शीकवीती अति नीच ठेवी ॥१०॥
एके दिनीं घे सुत दैत्य अंकीं ॥ तो स्नेह त्याचा गणवे न अंकीं॥
पुसे तया भागवतोत्तमातें॥ कीं आवडे जें तुज सांग मातें ॥११॥
प्रल्हाद बोले सदन त्यजावें ॥ तपोवना-लागिं अगत्य जावें ॥
तेथें भजावें हरिच्या पदातें॥जो आपदातें हरि, दे पदातें॥१२॥
दैत्येश्वरा आवडि हेचि मातें ॥ कीं सेवणें श्रीपुरुषोत्तमातें ॥
त्यजूनि विष्णूस भजे गृहातें॥तो आपला नाश करी स्वहातें१३
दुःखार्णवीं जो धरि कास याची॥चिंता तयाला मग कासयाची॥
न वीसरावेंचि कदापि त्याला॥प्रल्हाद इत्यादि वदे पित्याला१४

द्रुतवि० परिसतां असुरेश्वर हासिला॥ मग म्हणे कवणें शिशु नासिला॥
शिकविलें बरवें अथवा जसें॥ वदति तेंचि मुलें असि राजसें१५

भुजंगप्र० म्हणे हा करावा गुरूनें विचार॥स्वयें ठाउके लेंकुरा काय चार॥
हरी आमुच्या वाइटाचा भुकेला॥तयाच्या जनीं हा कुळीं भेद केला१६

---

१ क्रोधास २ कीं, ( हे ) देव, आपुलें ( आमचें ) पद ( हिरण्यकशिपू ) घे (नें) देवा ( देववा. ) ३ तोषवून. ४ सदैव, नेहमीं. ५ रीति.

गुरूतें असें दैत्य सांगोनि धाडी ॥ तयां गोष्टि हे वाटली देवधाडी ॥
भिऊनी मनीं तर्क नाना करोती॥ तया पूसती विप्र सामादिरीती॥१७॥

शिखरि० अरे हें प्रऱ्हादा गुरु पुसति कोठून शिकसी ॥
कसी होती प्रज्ञा त्यजुन तिस तूं स्वैर ठकसी ॥
स्वयें तूझ्या पोटा मधिल अथवा बुद्धिउकळी ॥
कळी त्वत्पद्माची उगवलि कळी घेउनि कळी ॥ १८ ॥
म्हणे श्री प्रऱ्हाद स्वपर म्हणजे भ्रांतिउकळी ॥
कळी ईच्यामूळें असुरअमरीं आणि सकळीं ॥
कळी त्वत्पद्माची उकलिल कसी मोहरजनी ॥
जनीं ऐशा मूढीं मति न धरितां विष्णुभजनीं ॥ १९ ॥

मालिनी स्वपर म्हणुनि ज्याची मोहिते स्वैर माया ॥
स्ववश करि तिला जो षड्गुणत्वीं रमाया ॥
नमिन मि भगवंता जो तुम्हां आकळेना ॥
स्वपरकुमतिभेदें तोचि आत्मा कळेना ॥ २० ॥

शिखरिणी शिळाचुंबी लोह भ्रमवि तिज येतांचि जवळी ॥
वळी तैशी माझी मतिहि हरि ते त्यास कवळी ॥
वळी पोथ्यांच्या ह्या तुम्हि असुररीती शिकवितां ॥
वितां व्यर्थ काव्यें अलवण हरीवीण कविता ॥ २१ ॥

इंद्रवज्रा प्रऱ्हाद बोलोनि असें द्विजाला॥जाला उगा ध्यात अधोक्षजाला॥
पुढें न बोलेचि पुरोहितातें॥तातें दिला धाडुनि जो हितातें ॥२२
तों बुद्धि कोपें खवळे द्विजाची॥जाची म्हणे टाकिं कथा अजाची॥
बाभूळ हे चंदनकाननाशी ॥नाशील भेटूनि निरंजनाशी ॥२३॥
प्रऱ्हाद हा विष्णुकुठारदंड॥ दंडप्रसंगीं असुरां उदंड ॥
दैत्यांचिया चंदनकाननाशी ॥ नाशील भेटूनि निरंजनाशी॥२४॥

भुजंगप्र. भविष्यानुरूपें वदे विप्रवाणी॥ नसे तर्जनाभर्जनालागिं वाणी ॥
असे दंड दुःशब्ददंडें करीती॥पुन्हा शीकवीती तया लोकरीती२५

इंद्रवज्रा. बापासि तो भेटवितां, सुतातें ॥ तातें निजांकावरि सुव्रतानें ॥

---

१ वाटे. २ ऐश्वर्य ( आधिपत्य ), धर्म, यश, श्री, ज्ञान, वैराग्य, हे ईश्वराच्या आंगचे सहा गुण सामर्थ्यें. ३ चुंबी शिळा—लोहचुंबक. ४ निरुपाधिक चैतन्य जो विष्णु त्यास. ५ बाचाला.

घेतां सुखाची न दिसेचि वाणी॥वाणी वदे मानसमंजुवाणी२६

वसंत. वा शीकलासि गुरुपासुनि जो पसारा ॥
सारा असो, तुज रुचे वद त्याच सारा ॥
गोष्टी वदे कुशल त्यावरि ज्या पित्याला ॥
त्या लागतील मधुरा न कदापि त्याला ॥ २७ ॥

मालि. श्रवण हरिकथेचें, कीर्तनीं गात जावें ॥
स्मरण चरणसेवा अर्चनींही भजावें ॥
नमन करुनि दास्यें सख्य आत्मार्पणातें ॥
करिति तरति, वाटे सार हें आपणातें ॥ २८ ॥

पृथ्वी. हिरण्य-कशिपु स्वयें परिसतां असी वैखरी ॥
म्हणे गुरुस तो तुझी कपटमित्रता हे खरी ॥
पुरोहित म्हणे न मी न जन अन्य हा भाव दे ॥
अजी सहज बुद्धि हे तव कुमार जें जें वदे ॥ २९ ॥

द्रु०वि० गुरुमुखें न अरे जरि शीकसी॥कुमति उद्भवली तुज हे कसी ॥
सुत म्हणे विषयांत सदा पित्या॥असि न बुद्धि नरासि कदापि त्या३०

स्वागता. सार मानित असे विषयातें ॥ विष्णुभक्ति गमते विष यातें ॥
न स्वयें हरि तया प्रिय वाटे॥बोधिला तरि न येचि सुवाटे॥३१॥

उपजा. सर्व प्रयत्नें भजती गृहातें ॥ न सेविती भागवता महा ते ॥
गृहव्रती ते मति त्या जनांची॥न गोष्टि ही घे भवभंजनाची॥३२

इंद्रव. हे तों गुरू पापतरू म्हणावे ॥ अंधासवें अंध तसे गणावे ॥
दे प्रीति कृष्णीं गुरु तोच साच॥श्रुत्यर्थ इत्यर्थ असे असाच॥३३

उपजा. पशू जसे चार्वित चार्विल्यातें॥पुनः पुन्हा सेविति सेविल्यातें ॥
कृष्णीं नव्हे प्रीति कदापि त्यांला॥प्रल्हाद इत्यादि वदे पित्याला३४

भुजंग. असा वर्णितां वर्णितां श्रीअजाला ॥
पित्याच्याच अंकीं समाधिस्थ जाला ॥
अहो तो निजांकावरूनी अभाग्यें ॥

---

१ मनोरंजक २ श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनं ॥ अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनं ॥ ही नवविधा भक्ति ह्या श्लोकांत वर्णिली आहे. ३ दैत्यांचा गुरु शुक्राचार्य ह्याचे शंड व अमर्क असे दोन पुत्र हिरण्यकशिपूचे आचार्य होते. त्यांपैकीं एकास लक्षून हें हिरण्यकशिपूचें वाक्य आहे.

दिला लोटुनी लभ्य जो पूर्वभाग्यें ॥ ३५ ॥

इंद्रव० याचा वधो जो चुलता सखा रे॥हा त्यास पूजी तुम्हि यास खा रे॥
दातें नखें पर्वतशस्त्रपातें ॥ मारा म्हणे सत्वर निस्त्रपातें ॥ ३६॥
मी बाप माझी न लगेच माया॥ तो आवडे विष्णु कुलाधमा या॥
हें पांचवें वर्षचि या कुमारा॥तों हा असा, सत्वर यास मारा॥३७॥

उपजा० ते मारिती बाप म्हणेच मारा॥ मारा न लागे तरि त्या कुमारा॥
न तोडि तें खड्ग रुते न भाला॥भा लागते कीं तम हो नभाला॥३८॥
न अग्नि ही माजि अहो जळाला॥ न मग्न ही तो करवे जळाला ॥
उरावरी आदळि पर्वतातें॥ केलें उपायांतर सर्व तातें ॥ ३९ ॥

वसंतति० चिंतार्णवांत बुडतां असुरोत्तमातें ॥
वाटे तदा मरण याचि निमित्त मातें ॥
तों नीतिनें करिति ते द्विज बोध राया ॥
कीं बालचेष्टित न योग्य मनीं धराया ॥ ४० ॥
राजा म्हणे मग तयाच पुरोहितातें ॥
कीं यास न्या स्वसदनीं शिकवा हितातें ॥
ऐसा करा त्वरित कीं धरि लोकरीती ॥
नेऊनि ते द्विज घरास तसें करीती ॥ ४१ ॥

इं०व० तेथें मुलें जीं गुरुगेहवासी ॥ तीं योजिलीं सर्व जगन्निवासीं ॥
त्या दैत्यबाळां गुरु हाचि जाला॥जो दाखवी स्वात्मसुखीं अजाला४२

उपजा० मुलांस त्या विस्मय थोर वाटे॥कीं लागला हाचि कसा सुवाटे॥
ते पूसती हें तरि या द्विजाला॥ठावें न, तूतें गुरु कोण जाला॥४३॥

द्रु०वि० उमजला मजला हरि ज्यामुखें॥ गुरुच तो रुचतो ह्रदयीं सुखें ॥
शिकविणें कवणें मज त्याविना॥निजपणीं जपणी जड दाविना४४

उ०जा० दैत्यार्भकां हा हित शब्द वाटे ॥ समस्त ही लागति त्याच वाटे ॥
हें सर्व ही आइकतांचि तातें ॥पाचारिलें क्रोधवशें सुतातें॥४५॥
गालिप्रदानीं न करूनि वाणी॥ वाणी वदे हो अपवित्र-वाणी ॥
म्हणे खळा दैत्यकुळाधमातें॥ मारीन जो तूं न भिशीच मातें४६

---

१ सखा सा. २ नभाला भा (प्रकाश) कीं (किंवा) तम लागते (काय)? ३ आत्म्याव्यतिरिक्त कांहीं नाहीं अशी मनाची खातरी करून देणें हें मूलाचें काम नाहीं. ४ जपणें.

इं० व० मी क्रुद्ध होतां मज लोक सारे॥भीती,भिशी एक न तूं कसा रे॥
या शासना लंघिशि दुर्गमातें॥कोण्या बळें सत्वर सांग मातें४७
प्रऱ्हाद बोले जग गांजितोसी॥ज्याच्या बळें आत्मपणें जितोसी
रक्षी अनाथा मजला हरी तो॥ज्याला असा बापाच संहरीतो४८

वसं० माझें तुझेंचि बळ तो इतुकेंचि नाहीं॥
त्याचेंच कीं बळ असे सकळा जनांही॥
तूं शत्रु मानिशि तया असुरस्वभावें॥
तो यांकिशील मग देखसि आत्मभावें॥ ४९ ॥

या गोष्टिनें फारचि तप्त जाला॥घे खड्ग बोले मग आत्मजाला॥
कीं तूं मरूं इच्छिसि तो निपातें॥स्वयें असें बोलवि सन्निपात५०

द्रु० वि० त्रिभुवनेश्वर जो मज वेगळा॥ तुज गमे सकळांहुनि आगळा॥
जरि दिसेल अरे मज ईक्षणीं॥वधिन त्याचि पुढें तुज ये क्षणीं५१
जरि समर्थ असेल तुझा धणी॥तरि तुझी पुरवीलचि तो धणी॥
परि वदे स्थळ कोण तया असे॥म्हणुनि गर्जत शब्द करीतसे५२

॥ घनाक्षरी ॥

प्रऱ्हादाशी दैत्य घोर ॥ म्हणे मज थोर थोर ॥
भीति बोलतां समोर ॥ भें न वाटे तूजला ॥
तूं ना तरुण किशोर ॥ पांचा वरषांचें पोर ॥
म्हणशी साजणें हे चोर ॥ नागविती मजला ॥
बोल बोलसी तिखट ॥ मरों पाहसी फुकट ॥
मृत्यु आलासे निकट ॥ नाहीं तुज समजला ॥
तुझा मी प्रत्यक्ष काळ ॥ हाका मारून विशाळ ॥
अरे तुझा रक्षपाळ ॥ लपे जाणों लाजला ॥ ५३ ॥
अरे तुझा कोठें देव ॥ म्हणे सर्व वासुदेव ॥
विश्वपटीं स्वयमेव ॥ तंतु तोचि वसतो ॥
दैत्य म्हणे अरे थांब ॥ गोष्टी ठेवि लांबलांब ॥

१ अहंपणानें. २ जिवंत आहेस. ३ मृत्यु. ४ कौमारंपंचमाब्दांतं पौगंडं दशमावधि ॥ कैशोरमापंचदशात् यौवनं हिततःपरं ॥ तरुण १५ वर्षांपुढे वयाचा. किशोर १० पासून १५ वर्षांपर्यंत आणि कुमार ( पोर ) पांच वर्षांपर्यंत. ५ कामादि सहा.

मजसमोर हा खांब ॥ येथें कैसा आसतो ॥
म्हणे स्तंभ दारुरूप ॥ दारुमध्यें चित्स्वरूप ॥
थिजलें तथापि तूप ॥ रस तो न भासतो ॥
तरी दिसेना कां मज ॥ म्हणे भजोनि समज ॥
प्रत्यक्ष ही अधोक्षज ॥ दिसेना तो दीसतो ॥ ५४ ॥
स्तंभीं दिसतसे जाण ॥ ऐसें बोलतां सुजाण ॥
दैत्यें घेतलें उड्डाण ॥ सिंहासनावरुनी ॥
खवळला उच्छृंखळ ॥ दातें दांत खाय खळ ॥
हाणी खांबास निखळ ॥ खड्ग-मुष्टि धरुनी ॥
तेचि समयीं कठोर ॥ बहु भयंकर थोर ॥
ध्वनी उठे महा घोर ॥ मोठ्या बळेंकरूनी ॥
म्हणे असुर विकळ ॥ कोण गर्जतो प्रबळ ॥
पाहे चहुंकडे चळ ॥ लोचनांसि पसरुनी ॥ ५५ ॥
ध्वनी उठला अखंड ॥ व्यापी द्वीप खंड खंड ॥
वाटे करो खंड खंड ॥ ब्रह्मांड विदारुनी ॥
दिग्गजांचे चंडचंड ॥ भग्न होति शुंडादंड ॥
लेंडें टाकिती उदंड ॥ पायुवायु सारुनी ॥
भ्याले दैत्य भंड भंड ॥ दानवेंद्र मुंड मुंड ॥
होती त्यांचे पिंड पिंड ॥ रोमांच उभारुनी ॥
रात्रिचर कलभंड ॥ झाले षंढ थंड थंड ॥
जेव्हां सिंह रणशौंड ॥ निघे हाक मारुनी ॥ ५६ ॥

शिखरिणी

असे रे तो कोठें तुज बहु जयाचे भरंवसे ॥
वसे सर्वां ठायीं स्थिरचरपटीं तंतु गवसे ॥
दिसेना कां स्तंभीं, मज दिसतसे तो नरहरी ॥
हरी तो दुष्टाचे त्वरित मद जो एकचि हरी ॥ ५७ ॥
असे स्तंभीं, ऐसा श्रवणिं पडतां शब्द असुरा ॥
सुरापानीं मत्त स्वहितविषयीं जो निजसुरा ॥
सुराधीशद्वेषें करुनि दृढखड्गें क्षयकरें ॥
करें हाणी मुष्टी वळुनि खळ खांबास निकरें ॥ ५८ ॥

स्रग्धरा स्तंभ तो अवचिताचि कडाडी॥अब्जजांड अवघेंचि कडाडी ॥

अब्जजादिहृदयांत धडाडी ॥ काळमेघशतनाद गडाडी ॥५९॥

उपजा० खरी कराया निजभृत्य-वाणी॥आणी स्व कीं व्यापिसही न वाणी॥
स्तंभीं सभे अद्भुतरूप दावी॥मनुष्य ना सिंह तनू वदावी ॥६०॥

॥ घनाक्षरी ॥

मुख सिंहाचें उत्कट ॥ नरतनु जे विकट ॥
होय नरसिंह प्रकट ॥ विधिवररक्षणीं ॥
बाहू बहू चंड चंड ॥ काळदंडसे उदंड ॥
ज्वाळा तोंडांत अखंड ॥ चंडरश्मि ईक्षणीं ॥
नखें वज्रेंशीं[1] तिखट ॥ दांतीं शब्द खट्ट खट्ट ॥
जीभ चंचळ चोखट ॥ जाणों खड्गदक्षिणी[2] ॥
कुंडलें मंडित गंड ॥ अंगीं बाणलें श्रीखंड ॥
हृदयाचे खंड खंड ॥ दैत्याचे तया क्षणीं ॥ ६१ ॥

द्रु०वि० मनुजरूप नव्हे नरकेसरी ॥ कनकवर्ण करीं पट केसरी ॥
सकळ सृष्टि करूं न शके सरी॥ प्रकट होय असा नरकेसरी ॥६२॥

मालिनी० पसरट मुख मोठें आंत दाढा कराळा ॥
परम चपळ जिव्हा खड्ग जैसा निराळा ॥
नयनयुगुळ जाणों तापलें हेमपाणी ॥
बहु भुज नखशस्त्रें देखिला चक्रपाणी ॥ ६३ ॥

उपजाति० सिंहावरी त्या मग दैत्यहस्ती ॥ धांवे गदा घेउनि थोर हस्तीं॥
पतंग अग्नीवरी जेंवि जातो॥हाणी गदा घोर अधोक्षजा तो॥६४॥

द्रु०वि० विधिवरप्रतिपाळक जो हरी ॥ न दिवसांत निशींतहि संहरी ॥
म्हणुनि युद्ध निशामुखि तो करी॥मग वधी बुडतां रवि लौकरी ॥६५॥
अमर तो मरतो अतिलौकरी ॥ चपळ तो पळतो धरितां करीं ॥
उखळला खळ लाघवलक्षणीं॥विलपती लपती सुर त्या क्षणीं॥६६॥

वसंतति० आश्चर्य हें नृहरि मानुनिया महास्यें ॥
सक्रोध हास्य करि उत्कट अट्टहास्यें ॥
तों झांकले नयन भीति मनीं निघाली ॥
मांडीवरी हरि अशास धरूनि घाली ॥ ६७ ॥

---

१ उणीव २ नळबारीप्रमाणें लवणारी व तीक्ष्ण.

द्रु० वि० न धरणीवरि मृत्यु न वा नभीं ॥
वर असा म्हणवूनिच तो न भी ॥
निजतनूवर त्या खळशेखरा ॥
चिरि धरूनि करो वर तो खरा ॥ ६८ ॥

भुजंगप्र० न गेहीं न बाहेरि यालागिं दारीं ॥
बसे उंबरा पोट त्याचें विदारी ॥
सजीवें अजीवें मरेना तसाची ॥
चिरूनी नखें तो करी गोष्टि साची ॥ ६९ ॥

द्रु० वि० चुळबुळे निसटे करि तांतडी॥असुर, तों हरि काढुनि आंतडी ॥
उदर फाडुनि घालितसे गळां॥करिसुमंगळ देव अमंगळा॥७०॥
चिरुनि वारणगंड जसा हरी ॥ असुर मारुनि शोभनसे हरी ॥
दितिज तो गज केशव केसरी॥इतर साम्य करूं नशके सरी॥७१॥
दितिज यूथप जों मृति पावला ॥ असुरवारणयूथहि धांवला ॥
मृतकें तें ढकलूनि धरातळीं॥वधि तया हरि लातबुक्यां तळीं॥७२॥
पदतळें कितिएक नखें करें ॥ तुडविले दनुजेंद्र भयंकरें ॥
असुरनाथनृपासन त्यावरी॥हरि बसे परि कोप न सांवरी॥७३॥
स्तविति देव अजो कनकांबरा ॥ असुर मारियला म्हणती बरा ॥
परि न आवरि कोप रमापती॥सभय लोक चतुर्दश कांपती ॥७४॥
प्रार्थिती अमर सागरजा ते ॥ सांवरूनि कनकांबर जातें ॥
जाय पाद कितिएक रमा ते ॥ तों गमे भय चराचरमाते ॥ ७५ ॥
परततां कबरांबर नावरे ॥ पदर ही ह्दयावरी वावरे ॥
स्मरणभाव न शीघ्र तिचा वळे॥नयन चंचळ जीर्भाह चावळे॥७६॥

शिखरि. मग प्रऱ्हादातें म्हणति अवघे भक्तपरमा ॥
रमा ब्रह्मा खिन्न स्वकृतविभुकोपाभ्युपरमा ॥
रमाकांता येना तुजविण कृपा दैत्य-दमना ॥
मनाच्या विश्रामा त्वरित करि गा कोपशमना ॥ ७७ ॥

उपजा. ज्याला भिती देव विरंचि पद्मा॥प्रऱ्हाद त्याच्या धरि पादपद्मा॥
आणी जया वंदिति सर्व भूतें ॥ करी तया दंडवत प्रभुतें ॥ ७८ ॥

स्वाग. बाळकें स्वचरणांबुरुहातें ॥ वंदितां प्रभु जगद्गुरु हातें ॥

---

१ प्रेत. २ ती लवकर शुद्धीवर येईना.

ऊचलोनि अवलोकुनि ठेवी ॥ मस्तकीं अभयहस्तक ठेवी ॥७९॥

शिखरि. करस्पर्शें जालें परम सुख त्या दैत्यतनया ॥
न या संसाराचें स्मरण उरलें त्या सुविनया ॥
नद्या नेत्रीं दोहीं स्रवति न निघे शब्द सगळा ॥
गळा दाटे प्रेमें त्वरित हरि घे मोहुनि गळां ॥ ८० ॥

वसंतति० प्रऱ्हाद त्याउपरि होऊनि सावधान ॥
प्रेमें स्तवी त्रिभुवनेश दयानिधान ॥
ब्रह्मादि सात्विक तया कळसी न देवां ॥
मी तो म्हणे असुर राजस वासुदेवा ॥ ८१ ॥
भक्ती करूनि भुज गाय अधोक्षजाला ॥
जालासि तूं स्वपददायक त्या गजाला ॥
मारूनि नक्र गति दे द्विरदा तयाला ॥
यालागिं मी स्तवितसें वरदातयाला ॥ ८२ ॥

भुजंगप्र० मुखांतूनि नक्राचिया कुंजराशी ॥ जसें सोडवीलें कृपापुंजराशी ॥
मला सोडवीलें तसें वासुदेवा॥पित्याच्या करापासुनी वासुदेवा८३

उपजाति प्रऱ्हाद इत्यादि करी स्तुतीतें ॥ अर्पी नृसिंहास सरस्वती ते ॥
कृपा तया ऊपरि देव दावी ॥ यानंतरें तेंचि गमे वदावी ॥ ८४ ॥

इंद्रव० ऐशा स्तुतीनें हरि तुष्ट झाला ॥ बोले कृपेनें असुरात्मजाला ॥
कीं वर्णितां या निगमागमातें॥संतोषलों मी वर माग मातें ॥८५॥

शिखरि० म्हणे श्री प्रऱ्हाद प्रभुवचन हें लोभकर जी ॥
रजीं मातें घाली झणि, म्हणुनि हे शब्द वरजीं ॥
रजीं या पायांच्या सुख कवण नाहीं मज हरी ॥
हरी दुःखें सारी तव गुणकथा श्रीनरहरी ॥ ८६ ॥

स्वागता अंतरीं धरूनि पूर्णनिरीक्षा ॥ पाहतोसि निजभृत्यपरीक्षा ॥
अन्यथा स्वजनभाव चनाशी॥कां वदे करुण या वचनाशी८७

इं०व० स्वामीस जो वेंचिल काम्यवाणी ॥वाणिज्य तें भक्तिहि दीनवाणी॥
वाणीच कीं सेवक वेतनाचा ॥ निष्काम तो पंथ पुरातनाचा॥८८॥

द्रु०वि० म्हणसि मागचि जी कमलावरा॥ त्वरित दे तरि या अमला वरा॥

---

१ रजोगुणांत. प्रपंचांत. २ नाहीं तर करुण ( करुणाकर ) जो परमेश्वर तो आपल्या भक्ताची भक्ती नाहींशी करणारें हें ( वर माग असें ) वचन कां बोलले?

किमपि ही उपजेच न कामना॥ करिं असें विधिच्या जनका मना॥८९॥

इं०व० प्र्ल्हादशब्दा हरि तुष्टला हो ॥ घ्यावा म्हणे आजि यथेष्ट लाहो ॥
लक्ष्मीपतीचें मन मोहरी तो ॥ बोलों अशा, त्यास वदे हरी तो ॥९०॥

वसंतति० ऐसें तथापि जिस सिंधुचियाच पाळी ॥
पाळीं स्वभूमि फळ हें तुझिया कपाळीं ॥
पाळी तुझी म्हणुनि सर्व वसुंधरा या ॥
राया तुझ्या इतर योग्य नसे धराया ॥ ९१ ॥

शार्दूलवि० एकाहत्तर चौकडया कलिकृतत्रेतायुगद्वापरीं ॥
हें मन्वंतर एक काळ इतुका जों होय याऊपरी ॥
प्र्ल्हादा इतुकीं युगें अधिकही काहीं तुझ्या शासनीं ॥
पृथ्वी सर्व असो, म्हणे नरहरी, ये बैस सिंहासनीं ॥ ९२ ॥

इंद्रव० त्यामाजि माझी स्मर हे कृपा कीं॥ या पूर्विल्या पातकपुण्यपाकीं॥
उद्विग्न दुःखीं न सुखीं स्पृहाही॥ ऐसें असावें अतिनिस्पृहांहीं॥९३॥
दे मुक्तिही भुक्तिहि भक्तराया ॥ दे भक्तिहि अन्यजना तराया ॥
प्र्ल्हाद माथां धरि शासनातें ॥ अंगीकरी तातनृपासनातें ॥ ९४ ॥

द्रु०वि० स्वपितयास न हो अधमा गती ॥ म्हणवुनी विनवी शिशु मागती॥
हरि म्हणे सुत ज्यांस असा असे॥ सुगति पावति पातकिही असे॥९५॥
एकवीस निजपूर्वज सारे ॥ उद्धरी सुत पितां तुजसा रे ॥
सत्क्रिया करिं तथापि तयाची॥ स्पर्शी तनू चिरिलि ज्या पितयाची॥९६॥
ये रिती निजकृपा अवलोका ॥ दावुनी नरहरी निज लोका ॥
जाय, हें चरित लोक तराया ॥ ठेविलें भवनदी उतराया ॥ ९७ ॥

---

## स्फुट श्लोक.×

भुजंग० करूं ये समाधान जो मूर्ख त्याचें॥ धरूं ये सुखें चित्त पैं जाणत्याचें॥
न जाणे न नेणे अशा पामराला॥ बुझावूं शकेना विधाता तयाला[१]॥

शिखरि० बळानें काढूं ये मणि मकरदाढेंत दडला ॥
महासिंधू-लाटातरण करु येई भुजबळा ॥
महासर्पातें ही सुमसम धरूं ये निजशिरीं ॥

---

× भर्तृहरीचें संस्कृत नीतिशतक व वैराग्यशतक ह्यांचे वामनानें केलेल्या मराठी पद्यरूप भाषांतरांतील वेंचे. १ फुलासारखें.

परंतु क्षुद्राचें त्द्दयें धरवेना क्षणभरी ॥ २ ॥

शार्दूल वि० सर्पातें बिसतंतुनें सुदृढ तो बांधावया इच्छितो ॥
किंवा वज्रमणी शिरीषकुसुमें भेदावया धांवतो ॥
किंवा तो मधुबिंदुनें मधुरता क्षाराब्धिला आणितो ॥
जो मूर्खास सुभाषितें वश करूं ऐसें ह्मणी बोलतो ॥ ३ ॥

उपजा० विनिर्मिलें झांकण अज्ञतेचें ॥ स्वाधीन हें पद्मभवें फुकाचें ॥
मूर्खांसि जें मौनचि फार साजे॥सभेसि त्यांच्या बहु जाणते जे ४

शिखरि० जधीं कांहीं कांहीं हरि कवि असे शब्द शिकलों ॥
तधीं मी सर्वज्ञ द्विपसम मदें याच भरलों ॥
जधो कांहीं नेणे म्हणुनि वदले पंडित मला ॥
तदा माझा गर्व-ज्वर सकळही हा उतरला ॥ ५ ॥

शार्दूल वि० चंद्राला दिवसा प्रकाश नसणें, ये कामिनीला जरा ॥
पद्मावीण जलें, निरक्षर मुखीं जो साजिरा गोजिरा ॥
दात्याला धनलोभ, नित्य वसते दारिद्र्य विद्वज्जनीं ॥
दुष्टाचा पगडा महीपति-गृहीं, हीं सात शल्यें मनीं ॥६॥
शाणोल्लेखें जया असा मणि, रणीं जो वीर घायाळला ॥
संभोगें शिणली अशी नववधू, हस्ती न मस्तावला ॥
ज्यांचीं स्वच्छ शरदृतूंत पुलिनें त्या निम्नगा, चंद्र ही ॥
बीजेचा, प्रभु पात्र-दत्त-धन जो, हे शोभती सर्व ही॥७॥

पृथ्वी विपत्काळीं धैर्य, प्रभुपणिं सहिष्णुत्व बरवें ॥
सभे पांडित्याचा प्रसर, समरीं शौर्य मिरवे ॥
स्वकीर्तीच्या ठायीं प्रचुर रति, विद्याव्यसन जें ॥
तयांचे हे स्वाभाविक गुण सदा सत्पुरुष जे ॥ ८ ॥

उपजा० वानोत निंदोत सुनीतिमंत ॥ चलो असो वा कमला गृहांत ॥
हो मृत्यु आजीच घडो युगांतीं ॥ सन्मार्ग टाकूनि भले न जाती ९

शिखरि० न चोराला लाधे प्रगट न दिसे दे सुख सदा ॥

---

१ मूर्खांची मनोधारणा करितां येत नाहीं. २ शिरीष ( म्हणून एक झाड आहे.) त्याच्या फुलानें ( हें फूल फार नाजूक असतें.) ३ अन्वय-तधीं मी सर्वज्ञ याच मदें द्विपसम भरलों-त्या वेळेस मला सर्व कांहीं समजतें अशा मदानें ( गर्वानें ) हत्ती सारखा भरून गेलों ४ साहणेवर घासणें. ५ नद्या. ६ ऐश्वर्य आलें असतां. ७ बिंदूचा नाद.

दुणावें कीं देतां किमपि न सरे लेशहि कदा ॥
न कल्पांतीं पावे निधन धन विद्याभिध[1] असे ॥
असे ज्याचें त्याशीं प्रतिभटति[2] जे पामर पिसे ॥ १० ॥

शालिनी० जे कां ज्ञानें लाधले सद्विचारा ॥ संपत्तीचा त्यांपुढें काय तोरा ॥
पद्माचा जो तंतु तो वारणाला ॥ वारायाला पै म्हणे सिद्ध झाला ११

शार्दूल वि० झाला क्षीण बहु क्षुधेस्तव जरी कीं व्यापिला वार्धकें ॥
आली कष्टदशा घडो मरण हीं कीं तेज गेलें निकें ॥
ऐसाही मृगराज जीर्ण तृण तो खाईल कीं काय हा ॥
शौर्यें भेदुनि हस्तिमस्तक शुभग्रासींच[3] ज्याला स्पृहा ॥ १२ ॥

पृथ्वी० सुनीतिपथ सेवणें मलिन कर्म मानेचना ॥
घडो मरण नावडे खलजनाप्रति प्रार्थना ॥
विपत्तिसमयींहि जो प्रगटवीच ना दीनता ॥
भल्याविण असें असिव्रत[4] करूं शके कोणता ॥ १३ ॥

शार्दूलवि० ज्यांचीं देहमनें तशींच वचनें पुण्यामृतें वोतिलीं ॥
कीं ज्यांहीं स्वकृतोपकारविभवें सर्वत्र विस्तारिलीं ॥
लोकांचे परमाणुतुल्य गुण जे मेरुपरी वानिती ॥
चित्तीं तोषहि पावती सुजन ते नेणो किती नांदती ॥ १४ ॥

शिखरी० महीपृष्ठीं केव्हां अवचट पलंगीं पहुडतो ॥
क्षुधेतें शाकान्नें अवचट सदन्नें निवटितो[5] ॥
कधीं कंथाधारी अवचट सुवस्त्रीं मिरवतो ॥
मनस्वी कार्यार्थी किमपि सुखदुःखें न गणितो ॥ १५ ॥

शार्दूलवि० दुर्मंत्रें नृप, संगतीस्तव यती, कीं पुत्रही लालनें ॥
वेदानध्ययनें द्विजाति, कुल दुष्पुत्रें, खलाराधनें ॥
नासे शील, न पाहतां कृषि, मदें मा, लाज मद्यें फुका ॥
शाठ्यें मित्रपण, प्रवासगमनें स्नेह, प्रमादें रुका ॥ १६ ॥
लज्जेनें जड, दांभिक व्रतिपणें, कापट्य शौचें गणी ॥
शौर्यें निर्दय, आर्जवें लडबडया, कीं दीन सद्भाषणीं ॥
मानेच्छा तरि मूर्ख, कीं बडबड्या वक्ता, निकामी भला ॥

---

१ ( विद्या + अभिधा ) विद्या ह्या नांवाचें. २ स्पर्धा करितात. ३ ( हत्तीच्या मांसाचे ) मृग्रास्साविषयीं. ४ तरवारीच्या धारेसारखा तीव्र नियम. ५ दूर करितो.

ऐसा तो गुण कोणता खलजनीं नाहींच जो निंदिला॥१७॥
राहो जाति रसातळीं, सुगुण हे राहोत कीं खालते ॥
शैलाग्राहुनि शील सत्वर पडो, सौजन्य अग्नींत तें ॥
शूरत्वावरि आदळो अशनि का, हें सर्वही नावडे ॥
अर्थप्राप्ति असो निरंतर मला, त्यावीण हें बापुडें ॥१८ ॥
पेटीमाजि निरोधिला न सुटका ज्याला भुकेला फणी ॥
तों केलें बिळ मूषकें अवचितां तो आंत गेला झणी ॥
त्यातें भक्षुनि सर्प तत्कृतपथें निश्चित गेला पहा ॥
ऐसें कर्म अतर्क्य यास्तव तुम्ही कीं स्वस्थ चित्तें रहा॥१९॥

वसंत ति० जो तोषवी स्वजनकास सुपुत्र तोच ॥
जें दे पतीस सुख फार कलत्र तेंच ॥
जो एकरूप सुखदुःखपणीं गडी तो ॥
हा लाभ पूर्व सुकृताविण काय होतो ॥ २० ॥

शालिनी० संपत्कालीं कोंवळें सज्जनांचे ॥ होतें चित्त ज्ञाति पंकेरुहाचें[1] ॥
आपत्कालीं शैल हो आदळो कां॥धाकेना जें गाजवी धैर्यडंका॥२१

वसंत ति० विद्यासमन्वितहि दुष्ट परि त्यजावा ॥
त्याशीं बुधें न सहवास कधीं करावा ॥
ज्याच्या असे विमलही मणि उत्तमांगीं ॥
तो सर्प काय न डसे खल अंतरंगीं ॥ २२ ॥

मालिनी. मलिन रुधिरमांसावेगळें हाड दैवें ॥
अवचट मिळतां तें श्वान संतोष पावे ॥
क्षुधितहि गजहंता जंबुकातें न मारी ॥
अवसरिं समजावी क्षुद्रता आणि थोरी ॥ २३ ॥

वसंततिं० योजी हितामति निवारुनि पापकर्मे ॥
वर्णी बरेच गुण झांकुनिया कुकर्मे ॥
दे आपणास असतां व्यसनीं त्यजीना ॥
सन्मित्रलक्षण असें वदतात जाणा ॥ २४ ॥

उपजा० तृणें मृगाला सलिलें झषाला ॥ संतोष हे वृत्ति महाजनाला ॥

[1] कमळाचें नानेबाईक म्ह ० मृदु.

तयांस निष्कारण तीन वैरी ॥ किरात कैवर्तक दुष्ट भारी ॥२५॥

शार्दूलवि० तोयाचें परि नांवही न उरतें संतप्त लोहांतरीं ॥
तें भासे नलिनीदलावरि पहा सन्मौक्तिकाचे परी ॥
तें स्वातीस्तव आब्धिशुक्तिपुटकीं मोतीं घडे नेटकें ॥
जाणा उत्तममध्यमाधम दशा संसर्गयोगें टिके ॥ २६ ॥

उपजा० पुष्पापरी दों मरीचीच साची ॥ हे वृत्ति संभावित जे तयांची ॥
लोकांचिये एक शिरीं सजावें॥वनींच कीं एक सुकोनि जावें२७

शार्दूलवि० मौनें मूक दिसे, वदे तरि महावाचा, स्वपार्श्वीं फिरे ॥
तेव्हां धीट, तसा विवेकचि नसे जैं चालतां अंतरें ॥
क्षांतीनें तरि भ्याड, शांति न धरी तै गांवढा यापरी ॥
सेवाधर्म असा अगाध कथिला हा जाण योगीश्वरीं॥२८॥

मदिरा. नम्रपणेंच सभेंत महोन्नत जे गुण वर्णुनिया परक्याचे ॥
सांगितल्याविण दावित कौशल सर्व जनांप्रति जे स्वगुणांचें ॥
स्वार्थ परार्थ हि साधिति जिंकिति शांतिबळें मुखरत्व खलांचें॥
संत महाद्भुतभाजन[2] यापरि सेवन कोण करी न तयांचें ॥२९ ॥

शार्दूलवि० तें कां दुर्गुण लोभ जैं, पिशुनता जैं कां महापातकें ॥
काशाला तप सत्य जैं, मन पुरे जैं कां सुतीर्थादिकें ॥
काशाला जन जैं भलेपण असे, कां भूषणें कीर्ति जैं ॥
सद्विद्या जरि कां धनें, मरण कां दुष्कीर्ति लोकींच जैं ॥ ३०॥

वसंतति० खल्वाट चंडकिरणें अति तप्त झाला ॥
छायार्थ तालतरुमूलसमीप गेला ॥
तत्काल थोर पडलें फल तो निमाला ॥
ये जेथ दैवहत येइल तेथ घाला ॥ ३१ ॥

शार्दूलवि० भाग्याला सुजनत्व भूषण असे, कीं मौन शौर्यास तें ॥
ज्ञानाला शम, त्या श्रुतास विनय, द्रव्यास दातृत्व तें ॥
अक्रोधत्व तपा, क्षमा प्रभुपणा, धर्मास निर्दंभता ॥
या सर्वांसहि मुख्य भूषण पहा सच्छील हें तत्वतां ॥ ३२ ॥
हे तों सत्पुरुष स्वकार्य त्यजिती अन्यार्थ हो साधिती ॥

---

१ लोकांत प्रतिष्ठेनें रहावें हें तात्पर्य ( संभावित–पक्षी. ) २ अत्यंत आश्चर्यकारक गुणांनीं भरलेले.

हे तों मध्यम जे निजार्थ करुनी अन्यार्थ संपादिती ॥
हे तों राक्षस जे स्वकार्यविषयीं अन्यार्थ विध्वंसिती ॥
जे कां व्यर्थ परार्थ-हानि करिती ते कोण कीं दुर्मती ॥ ३३ ॥
वांछा सज्जनसंगमीं, गुरुकुळीं वदोरुता नम्रता ॥
निंदेचें भय, तुष्टता परगुणीं, स्वस्त्रीसुखीं लुब्धता ॥
विद्याभ्यास, महेशभक्ति, खलसंसर्गीं अनासक्तता ॥
चित्ताचा जय, या गुणांस निधि जे त्यां वंदिजे तत्वतां ॥ ३४॥

उपजा० होतीं अरण्येंच पुरें तयाला ॥ समस्तही होतिल आप्त त्याला ॥
महो तया होईल पूर्णरत्न॥ ज्याला असे संचित पूर्व पुण्य॥ ३५ ॥

वंशस्थ वनीं रणीं शत्रुजलाग्नि-संकटीं॥ महार्णवीं पर्वत-वास-दुर्घटीं ॥
निजो बसो आणि फिरो अरण्यें॥तया स्थलीं रक्षिति पूर्व पुण्यें॥३६॥

उपजा० आलस्य जें कार्यविघातकारी ॥ असूं नये तो रिपु या शरीरीं ॥
उद्योग सद्बंधु तया न टाकीं॥त्या सेवितां पावसि सौख्य लोकीं३७

द्रुतवि० वनचरांसह शैलवनांतरें ॥ निजसुखें फिरणें तरि तें बरें ॥
जरि घडे सहवासचि पामरीं ॥ तरि जळो असणें सुरमंदिरीं॥३८

वसंतति० द्रव्यास हे गमनमार्ग यथावकाश ॥
कीं दान भोग अथवा तिसरा विनाश ॥
जो घे न भोग जरि, पात्रकरीं न दे ही ॥
त्याच्या धनास मग केवळ नाश पाहीं ॥ ३९ ॥

वंशस्थ० असे जयाला धन तोचि पंडित॥कुलीन तो तोची गुणी बहुश्रुत॥
सुपूज्य तो सुंदर तो विचक्षण॥धनाश्रयें राहति सर्वही गुण॥४०॥

उपजा० श्रुतेंचि कीं श्रोत्र न कुंडलानें॥दानेंचि कीं पाणि न कंकणानें॥
साजे तसा देहहि हा न आनें॥ परोपकारेंचि न चंदनानें॥४१॥

शार्दूलवि० ब्रह्मयानें लिहिलें ललाटफलकीं जें द्रव्य ज्याला असे ॥
तें लाधे मरुमंडलीं अधिकही मेरूस गेल्या नसे ॥
सेवीं धैर्य धनांध त्यांप्रति वृथा दावूं नको दीनता ॥
कूपीं कीं जलधींत कुंभ जल घे जें मापिलें तत्वतां ॥ ४२ ॥

वसंत ति० तें श्वान एक तुकड्यास्तव चोर नाना ॥

---

१ स्तुति करण्याचें शील. २ मारवाडात.. ३ चेष्टा.

दावी धन्यास जठरार्थ करें पहाना ॥
दे आळवूनि जरि हस्तिप बाप भाई ॥
घेतोंचि घांस गजराज कशी बढाई ॥ ४३ ॥

भुजंगप्र० प्रजा हाच कीं वत्स भूधेनुकेचा ॥
नृपा तूं करीं फार सांभाळ त्याचा ॥
स्ववत्साचिया जाण वात्सल्ययोगें ॥
अभीष्टार्थ देईल हे भूमि वेगें ॥ ४४ ॥

शार्दूलवि० केव्हां सत्य वदे वदे अनृत ही केव्हां वदे गोड ही ॥
केव्हां अप्रिय ही दयालुहि असे केव्हां करी घातही ॥
जोडी अर्थहि जे यथेष्ट समयीं कीं वेच ही आदरी ॥
ऐशी हे नृपनीति भासत असे वारांगनेचे परी ॥ ४५ ॥

उपजा० ह्मणो विसंबाल महीपतीला ॥ स्वकीय कोणीच नसे तयाला ॥
अध्वर्यु हो कीं यजमान त्यातें॥ हुताश जाळी धरितांच हातें ४६

भुजंगप्र० फुका कोरडें वैर कीं निर्दयत्व ॥
परस्त्री परद्रव्य हें मुख्य तत्व ॥
अनिष्टत्व चिंती सुहृद्बांधवांचें ॥
स्वतः सिद्ध हें रूप पै दुर्जनांचें ॥ ४७ ॥

वसंतति० कांताकटाक्षशर हे रुतती न ज्याला ॥
तावी न कोपज हुताशन ही जयाला ॥
ज्याच्या मनीं न जडती विषयादि पाश ॥
तो धीर जिंततें[1] जगत्रय सावकाश ॥ ४८ ॥

शालिनी० आरंभीं जे फार शेवटीं न कांहीं ॥
आधीं थोडी जे क्रमें फार पाहीं ॥
छाया पूर्वार्द्धा परार्द्धा[2] दिनाची ॥
तैशी मैत्री दुर्जनाची भल्याची ॥ ४९ ॥

वसंतति० दे दान गुप्त, उपकार करी न बोले ॥
मानी प्रमोद जरि मान्य घरास आले ॥
दावी न गर्व विभवें, गुण घे पराचे ॥
खड्गाग्रतुल्य विषमव्रत हें भल्यांचें ॥ ५० ॥

---

[1] जिंकितो अशा अर्थी हा शब्द योजिला आहे. [2] सकाळची व दुपारची.

की तोडिला तरु फुटे अणखी भरानें ॥
तो क्षीणही विधु महोन्नति घे क्रमानें ॥
जाणोनि हें सुजन ज्या दुबळीक आली ॥
त्याशीं कधीं न करिती सहसा टवाळी ॥ ५१ ॥

उपजा० आली जरी कष्टदशा अपार ॥ न टाकिती धैर्य तथापि थोर ॥
केला जरी पोत बळेंचि खालें॥ज्वाला तरी ते वरती उफाळे५२

वसंत ति० दारिद्र्य ज्यांजवळि अप्रियबोलण्याचें ॥
भांडार ज्यांजवळि वाग्रसमाधुरीचें ॥
स्वस्त्रीपरायण अनिंदक जेच त्यांहीं ॥
भूभाग हे विलसती अतिरम्य पाहीं ॥ ५३ ॥
पद्में प्रफुल्ल करितो सविता स्वयें हा ॥
रात्रीं विकास कुमुदांप्रति चंद्र दे हा ॥
न प्रार्थितां जलद दे जल या जनाला ॥
मुक्तार्थ कीं परहितोत्सव सज्जनाला ॥ ५४ ॥

शिखरि० बरें तें या देहीं महिवरी कडेलोट करणें ॥
महासर्पाच्या कीं वदनि तरि हा हात धरणें ॥
उडी कां वन्हींत त्वरित जरि घालूनि मरणें ॥
जळो तें तें लोकीं त्यजुनि निजसच्छील फिरणें ॥ ५५ ॥

वसंतति० क्रोधें जळे मणि अचेतन सूर्यकांत ॥
ज्या लागतांच दिननायकपादघात[३] ॥
संभावितांत गणना पहिली जयाची ॥
साहेल तो पण कशी शठता दुज्याची ॥ ५६ ॥

शा० वि० विद्या हें पुरुषास रूप बरवें कीं झांकलें द्रव्य ही ॥
विद्या भोगसुकीर्तिदायक पहा ते मान्य मान्यास ही ॥
विद्या बंधु असे विदेशगमनीं विद्या महादेवता ॥
विद्या पूज्य नृपास हा नर पशू तीविगळा तत्वतां ॥ ५७ ॥

शिखरि० करीं साजे त्याग, श्रवणयुगुलीं सच्छ्रवण जें ॥
मुखीं सत्य, स्वच्छाचरण विलसे, शौर्यहि भुजे ॥
स्वशीर्षे थोराला नमन, विभवावांचुनि पहा ॥

---

१ मशाल. २ स्वार्थ बुद्धि रहित. ३ सूर्यकिरणांचा तडाखा.

भल्याचा कीं स्वाभाविक शुभ अलंकारविधि हा ॥ ५८ ॥

द्रुतवि० उपजणें मरणें न चुके नरा॥फिरत नित्य असे भवभोंवरा॥
उपजला तरि तोच मला गमे॥कुल समुन्नति ज्यास्तव घे रमे५९

स्वागता वृक्ष फार लवती फलभारें ॥ लोंबती जलद घेउनि नीरें ॥
थोर गर्व न धरो विभवाचा॥हा स्वभाव उपकार-पराचा॥६०॥

वसंतति० जें पात्र कां पुरुषरत्न महागुणांचें ॥
तें निर्मितो विधि विभूषण भूमिकेचें ॥
कीं त्यासही त्वरित मृत्युमुखांत लोटी ॥
त्याची गमे मज अपंडितता करंटी ॥ ६१ ॥
सद्रत्नहार मणि ताइत बाहुदंडीं ॥
कीं स्नान चंदन फुलें अणि लांब शेंडी ॥
यानीं खरी घडतसे पुरुषा न शोभा ॥
वाणीच भूषण सुशिक्षितशब्दगर्भा ॥ ६२ ॥

उपजा० वाणी खरी दान बरें अहिंसा ॥ नसे परद्रव्यसतीपिपासा ॥
दया अतृष्णा नति[३]भाव जो कां ॥
सन्मार्ग हा धोपट सर्व लोकां ॥ ६३ ॥

वसंतति० म्यां साहिली खलजनोक्ति कठोर पाहीं ॥
पोटांत दुःख वरिचेवरि हासलों हो ॥
कीं प्रार्थिलें स्वजठरार्थ मदांध लोकां ॥
आशे अणीक मज नाचविशी किती कां ॥ ६४ ॥

शिखरि० दिसे ज्या प्राणाची स्थिति जलजपत्रोदक[४] जसें ॥
तयासाठीं केलें विविध बहु म्यां पातक असें ॥
पुढें द्रव्याढ्यांच्या प्रचुर धनलोभास्तव वृथा ॥
विलज्जें म्यां केली बहुतर मृषात्म-स्तुतिकथा ॥ ६५ ॥

तोटक वदना रदनावलिनें त्यजिलें ॥ शिर सर्वहि शुभ्रपणें पिकलें ॥
उठतां बसतां अणु शक्ति नसे॥ परि आस निरंतर माजतसे॥६६॥

वसंतति० भिक्षाटणें अशन तें क्षण एकवार ॥
शय्या महीवरि जयास न रांडपोर ॥

---

१ भूषणप्रकार. २ आनंद पावतें. ३ नम्रपणा. ४ कमळाच्या पानावरील उदकाप्रमाणें म्ह० चंचल.

कंथा जया वसन कीं शतखंड तेंही ॥
टाकीचना तदपि तो विषयांस देही ॥ ६७ ॥

उपजा० न जाणतां टोळ पडे हुताशीं॥ नेणोनिया मीन गिळी गळाशी ॥
अभिज्ञ आम्ही विषयांसि जेव्हां॥सोडूंच ना मोह बलिष्ठ तेव्हां६८

शार्दूलवि० मोठेंमंदिर पुत्र पंडित बरे संपत्तिही फारशी ॥
भार्या हे गुणशालिनी वय नवें मूढासि माया अशी ॥
मानी शाश्वत विश्व हें पडतसे संसारकारागृहीं ॥
ज्ञानी नश्वर दृश्य मानुनि मनीं संन्यास घे सत्वरीं ॥ ६९॥

वसंतति० पोरें सदैव रडतो क्षुधितें कृशांगें ॥
स्त्री वस्त्र जर्जरित् नेसुनि दीन वागे ॥
पाहोनि दुःख घरिंचें जठरार्थ कैसें ॥
देहीति गद्गदरवें वदिजे भयासें ॥ ७० ॥

शार्दूलवि० होती वासर दीर्घ जे धनपतिद्वारीं तयां प्रार्थितां ॥
नाना सौख्यभरें क्षणोपम मला जे लोटले नेणतां ॥
निःसंगत्वपणें धरोनि बसलों हे पर्वताची गुहा ॥
आतां त्या दिवसांसि हांसत असे ध्यानावसानीं पहा ॥७१॥
मृत्यूनें जननास, वार्धकपणें कीं यौवना रोखिलें ॥
लोभें आक्रमिली स्वतुष्टि वनितामोहें शमा व्यापिलें ॥
मात्सर्यें सुगुणा, वना फणिकुलें, पृथ्वीपतीला खलें ॥
अस्थैर्यें विभवास, सांग कवणें कोणास न ग्रासिलें ॥७२॥
हें आयुष्य तरंगतुल्य, युवती कीं दो दिसांची असे ॥
हे तों अर्थ अनर्थ, वीज चमके जे भोग तेही तसे ॥
कांतेचें परिरंभण स्थिर नसे, टाका झणी हें पिसें ॥
ब्रह्मीं चित्त धरा, भवांबुधि तरा, हें आयका सौरसें ॥ ७३॥

वसंतति० व्याघ्रीपरी भय करीत उभी जरा रे ॥
देहासि रोग करिती रिपुतुल्य मारे ॥
आयुष्य भिन्नघटनीर सरे तसें हे ॥
पापें तथापि जन आचरतात पाहें ॥ ७४ ॥

शार्दूलवि० गेला तो नृप ते प्रधान अवघे ते पंडितांची सभा ॥

---

१ (देहि+इति) दे असें. २श्रीमंताच्या दारांत. ३फुटक्या भांड्यांतील पाणी.

गेली ते नगरी तशा शशिमुखी ज्या तप्तहेमप्रभा ॥
गेला तो नृपपुत्र त्या शुभ कथा म्यां देखिलें सर्व जें ॥
तें जेणें स्मरणास योग्य रचिलें कालास त्या वंदिजे ॥ ७५ ॥
येतो वासर तोच तेच रजनी व्यापार नानापरी ॥
प्राणी हे करितात्ति आयु सरतें हें नेणवे अंतरीं ॥
तुच्छें चर्वितचर्वणोपम सुखें जीं तींच तीं भोगितां ॥
संसारीं न तिरस्कृती उपजते हे कोण निर्लज्जता ॥ ७६ ॥

उपजा॰ झालों जयांपासुनि ते निमाले॥ ते आमुचे तुल्य-वयस्क गेले॥
आम्ही असों संप्रति जाण तैसे॥नदीतटीं जर्जरवृक्ष जैसे॥७७॥

वसंतति॰ आयुष्य वर्षशत त्यांत निमे निजेलें ॥
त्याही निमेंतहि निमे दिन बाद झाले ॥
वार्धक्य शैशवपणें, उरलें वियोगें ॥
दुःखामयेंचि सरलें, सुख काय सांगें ॥ ७८ ॥

रथोद्धता एकदां तरुण बाल एकदां ॥ भाग्यवंतहि अभाग्य एकदां ॥
एकदां जरठ जाय सत्वरीं ॥ धर्मराजसदना[2] नटापरी ॥ ७९ ॥

शार्दू॰ वि॰ तूं राजा जरि, मी श्रुतिस्मृतिमहाविद्याभिमानी असें ॥
भाग्यें विश्रुत तूं, मदीय कवितासत्कीर्ति लोकीं वसे ॥
आहे अंतर फार तूज मज रे तूं गर्व जें दाविशी ॥
मीही निस्पृह भाग्यवंतगणना नाहीं मला फारशी ॥ ८० ॥

मालिनी धनपति जरि तूं रे मी असे शास्त्रवेत्ता ॥
भट समरिं जरी तूं मी महावादिजेता ॥
अनुचर जरि तूतें सेविती छात्र मातें ॥
न गणिशि मज जातों तुच्छ मानूनि तूतें ॥ ८१ ॥

शार्दूलवि॰ भेटावें तरि हा नसे समय तो अंतःपुरीं तो वसे ॥
आहे निद्रित अश्व पाहत असे स्वारीस गेला असे ॥
आतां क्रुद्ध म्हणूनि भृत्य वदती टाकी तया दुर्जना ॥
मुक्तद्वार महेशमंदिर सुखें जाऊनि सेवीं मना ॥८२ ॥

मंदाक्रांता या संसारीं फिरत फिरतां फार म्यां शोध केला ॥
ऐसा नाहीं पुरुष विषय श्रोत्रनेत्रांस झाला ॥

---

1 झोपेंत गेलें. 2 यमसदनास.

जो कां ज्ञाता विषयकरिणी भोगितां घे मदाला ॥
जेणें अंतःकरणगज तो संयमें रुद्ध केला ॥ ८३ ॥

शार्दू० वि० त्यांतें तूं भज रे महापुरुष जे मोहासि संहारिती ॥
निष्ठा सांबशिवीं धरीं, सुरनदीतीरीं वसे संमती ॥
लक्ष्मी सर्व तरंग बुद्बुद तशी सौदामिनी कामिनी ॥
त्या माझ्या स्थिर राहती म्हणुनिया मानूं नको कीं मनीं॥८४॥

लक्ष्मीनें जरि तुष्ट तू, बहु सुखी मी वल्कलानें असें ॥
दोघांचा परितोष तुल्य असतां आधिक्य कांहीं नसे ॥
आशा ज्यास दरिद्र तोचि समजें, नैराश्य पैं बाणतां ॥
भाग्याचा नर कोणता मग बरें निर्भाग्य तो कोणता ॥८५॥

ज्यांचें पात्र पवित्र पाणियुग हें भिक्षान्न जे भक्षिती ॥
ज्यांचें वस्त्र दिशा जया मल नसे, शय्या जयांची क्षिती॥
ज्यांला दैन्य नसे,विरक्ति-वनिता जे तीसवें नांदती ॥
ज्यांला कर्मकलाप[1] बाधित नसे, ते धन्य येणें रिती ॥८६ ॥

उपजा० चंडाळ कीं, ब्राह्मण शूद्र कीं हा॥योगीश कीं यापरि लोक पाहा॥
वदे, जया हर्ष विषाद नाहीं॥निःसंग तो धन्य जनांत देही॥८७॥

भुजंगप्र० पुढें गायनें सत्कवी पार्श्वभागीं॥स्त्रिया ढाळिती चामरें सुंदरांगी॥
असें जें घडे तें वसे तूं भवीं या॥सख्या अन्यथा सोडि संसारमाया८८॥

शार्दूलवि० हिंसात्याग, अलोभता परधनीं, सत्यत्व संभाषणीं ॥
तृष्णाच्छेद, परांगनाविमुखता, भूतानुकंपा मनीं ॥
दान, प्रश्रय, भाव सद्गुरुकुलीं, सन्मार्ग सर्वांस हा ॥
संसाराब्धि तरावया स्मृतिशतीं कीं बोलिजेला पहा ॥८९॥

उपजा० पुरे पुराणें स्मृति वेद शास्त्रें ॥ आमुष्मिकें[2] वैदिक कर्मतंत्रें ॥
जेणें सरे हा भव तें विचारी॥यावेगळी सर्व दुकानदारी॥९०॥

वसंत० स्वेच्छाविहार गतसंग महातपस्वी ॥
भिक्षान्नभक्षक विरक्त असा मनस्वी ॥
कंथैकवस्त्र निरहंकृति जो सुखी तो ॥
टाकूनि भोग शमसौख्य मनीं वरी तो ॥ ९१ ॥

शार्दूल० वि० जों हें स्वस्थ तनू, जरा वसतसे जों दूर, जों इंद्रियें ॥

---

१ कर्मसमुदाय. २ परलोक प्राप्तकरून देणारीं.

शकें, कीं सरलें न आयु पुरतें जों, पंडितानें स्वयें ॥
आत्मप्राप्तिसुखार्थ यत्न करणें कीं तोंच हा फारसा ॥
होतां मंदिर दीप्त कूपखननीं उद्योग तो कायसा ॥ ९२ ॥
झाले जीर्ण मनीं मनोरथ पहा मी वंचलों यौवना ॥
होते जे गुण सर्व ही विफल ते झाले गुणज्ञाविना ॥
युक्तायुक्तविचार काल न करी निःशंक सर्वात्मना ॥
आतां हें सुचलें दुजी गति नसे गौरीशपायांविना ॥ ९३ ॥

---

# रामदास.

गोदातीरीं राक्षसभुवनापासून २० कोसांवर जांब म्हणून एक गांव आहे. तेथें सूर्यीपंत म्हणून एक कुळकरणी राहत असे. हा जातीचा जामदग्न्यगोत्री ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. हा सूर्योपासक असे. त्याचा पुत्र रामदास. ह्याचे आईचें नांव राणूबाई. ह्याचें पहिलें नांव नारायण; परंतु पुढें तो रामाची भक्ति करूं लागला, म्हणून त्याचें नांव रामदास असें पडलें. याचा वडील भाऊ गंगाधर म्हणून होता, त्यास रामीरामदास म्हणत. ह्याचा जन्म शके १५२७ त झाला. ह्यानें भक्तिरहस्य नामें ग्रंथ केला आहे; शिवाय अध्यात्मपर पदें केलीं आहेत. हा शके १५९९ त फाल्गून वद्य१३ स निजधामास गेला.

रामदास लहानपणापासून विरक्त होता. हा मारुतीचा अवतार असें म्हणतात. त्याच्या आईबापांनीं त्याचें लग्न करण्याची सर्व तयारी केली होती;पण त्याचे मनांत लग्न करून घेण्याचे नव्हतें, म्हणून तो पळून गेला. तो कांहीं दिवस नाशिकक्षेत्रीं पंचवटींत राहून पुढें साताऱ्याजवळ चांफळ येथें जाऊन राहिला. तो बहुतकरून तीर्थयात्रा करीत फिरत असे. त्याच्या शिष्यमंडळींत शिवाजीराजा होता. शिवाजीनें आपलें सगळें राज्य रामदासास दिलें, तेव्हां त्यानें त्याचा स्वीकार करून तें पुनः शिवाजीच्या स्वाधीन केलें, आणि तो म्हणाला कीं, माझ्या स्वामित्वाची इतकीच खूण असावी कीं, तुझ्या

१ सर्वभावेंकरून.

फौजेचा झेंडा भगवा असावा. तेव्हांपासून शिवाजीनें आपल्या फौजेंत भगव्या झेंड्याची चाल पाडली. शूद्रवगैरे हलक्या जातीचे हिंदूंत " जोहार " म्हणण्याचे ठिकाणीं "रामराम" म्हणण्याची जी चाल पडली आहे तीही शिवाजीनेंच नवी पाडिली.

रामदास निवांतपणें राहण्याकरितां साताऱ्याजवळ परळी नांवाचा किल्ला आहे तेथें जाऊन राहात असे. तेथें शिवाजीराजा त्याची बरदास्त ठेवी. रामदास तेथें राहिल्यामुळें तेथें संतमंडळी जाऊं येऊं लागली, म्हणून त्या किल्ल्यास सज्जनगड असें नांव पडलें. येथेंच रामदास वृद्ध होऊन आपले वयाचे ७३ वे वर्षीं समाधिस्थ झाला. त्याचे सांप्रदायी पुष्कळ आहेत, त्यांस रामदासी असें म्हणतात.

रामदासाच्या ओंव्या, श्लोक व अभंग पुष्कळ आहेत. ह्याची कविता सुलभ व भक्तिरसप्रधान आहे.

रामदासाचा जन्मशक १५३० चैत्र शुद्ध ९: इ०स० १६०८.
समाधिशक १६०३माघ वद्य ९; इ०स० १६८१.

### त्यानें केलेले प्रसिद्ध ग्रंथ

दासबोध, स्फुट अभंग, मनाचे श्लोक, समासआत्माराम.

## स्फुट अभंग.

### वेंचे,रामदासाचे अभंगांतील.

( १ )

सुखाचे सांगातीं सर्वही मीळतो ॥ दुःख होतां जाती निघोनीया ॥ १॥
निघोनीया जाती संकटाचे वेळे ॥ सुख होतां मीळे समुदाव ॥ २ ॥
समुदाव सर्व देहाचे संबंधी ॥ तुटली उपाधी रामदासीं ॥ ३ ॥

( २ )

मूर्ख तो संसारीं माझें माझें करी ॥ मृत्यु बरोबरी हिंडतसे ॥ १ ॥
हिंडतसे काळ सांगातीं सरीसा ॥ धरी भरंवसा नेणोनीया ॥ २ ॥
नेणोनीया प्राणी संसाराशी आला ॥ आला तैसा गेला दैन्यवाणा ॥ ३ ॥
दैन्यवाणा गेला सर्वही सोडोनी ॥ ठेवीलें जोडोनी जनालागीं ॥ ४ ॥
लागलेली मळी दोषाची सूटेना ॥ आसक्ती तूटेना अंतरींची ॥ ५ ॥

अंतरींची मूर्ती अंतरली दूरी ॥ कदाकाळीं हरी आठवेना ॥ ६ ॥
आठवेना अंतकाळीं रामावीण ॥ धन्य तें मरण दास म्हणे ॥ ७ ॥

( ३ )

सुख पाहों जातां कोठेंची न दिसे ॥ संसार हा असे दुःखमूळ ॥ १ ॥
दुःखमूळ जन्म जन आणि नारी ॥ पाहतां संसारीं सूख नाहीं ॥ २ ॥
सुख नाहीं कदा शाश्वतावांचूनी ॥ जाणती सुज्ञानी दास म्हणे ॥ ३ ॥

( ४ )

साधूसंगे साधू भोंदूसंगें भोंदू ॥ वाद्यासंगे वादू होत असे ॥ १ ॥
होत असे भला भल्याच्या संगतीं ॥ जाय अधोगती दुष्ट-संगें ॥ २ ॥
दुष्ट-संगें दुष्ट झाला महा-पापी ॥ होतसे निष्पापी साधूसंगें ॥ ३ ॥
संग जया जैसा लाभ तया तैसा ॥ होतसे आपैसा आनायासें ॥ ४ ॥
आनायासें गती चूके अधोगती ॥ धरोतां संगती सज्जनाची ॥ ५ ॥
सज्जनाची कृपा जयालागीं होय ॥ तयालागीं सोय परत्राची ॥ ६ ॥
परत्राची सोय भक्तीच्या उपायें ॥ चुकती अपाय दास म्हणे ॥ ७ ॥

( ५ )

तोंवरी तोंवरी डगमगीना कदा ॥ देहाची आपदा झाली नाहीं ॥ १ ॥
तोंवरी तोंवरी परमार्थ स्वयंभ ॥ जंव पोटीं लोभ आला नाहीं ॥ २ ॥
तोंवरी तोंवरी अत्यंत सद्भाव ॥ विशेष वैभव आलें नाहीं ॥ ३ ॥
तोंवरी तोंवरी सांगे निरभिमान ॥ देहासी अभिमान झाला नाहीं ॥ ४॥
तोंवरी तोंवरी धीरत्वाची मात ॥ प्रपंचीं आघात झाला नाहीं ॥ ५ ॥
रामदास म्हणे अवघेची गाबाळी ॥ ऐसा विरळा बळी धैर्यवंत ॥ ६ ॥

( ६ )

कर्ता एक देव तेणें केलें सर्व ॥ तयापाशीं गर्व कामा नये ॥ १ ॥
देह तें देवाचें वित्त कुबेराचें ॥ तेथें ह्या जीवाचें काय आहे ॥ २ ॥
देता देववीता नेता नेववीता ॥ कर्ता करवीता देव एक ॥ ३ ॥
निमित्ताचा धनी केला असे प्राणी ॥ पाहातां निर्वाणीं देव एक ॥ ४
लक्ष्मी ही देवाची सर्व सत्ता त्याची ॥ त्यावीणें जीवाची उर्मी नाहीं ॥५॥
दास म्हणे मना सावध असावें ॥ दुश्चित्त नसावें कदाकाळ ॥ ६ ॥

( ७ )

ऐसा कोण आहे मुकीयाचा जाण ॥ कळे बोलखण न सांगतां ॥ १ ॥

न सांगतां जाणे अंतरींचा हेत ॥ पुरवी मनोरथ सर्व कांहीं ॥ २ ॥
सर्व कांहीं जाणे चतुराचा राणा ॥ धन्य नारायणा लीला तुझी ॥ ३ ॥
तुझी लीला जाणे ऐसा कोण आहे ॥ विरिंची तो पाहे चाकाटला ॥ ४॥
चाकाटला मनु देवासी पाहातां ॥ दास म्हणे आतां सीमा झाली॥ ५ ॥

( ८ )

शौच केलें तेणें शुचिर्भूत झाला ॥ जळीं स्नान केला मलत्यागें ॥ १ ॥
मळत्यागें झाला शरीरें निर्मळ ॥ अंतरीचा मळ कैसा गेला ॥ २ ॥
कैसा जातो काम क्रोध लोभ दंभ ॥ नांदतो स्वयंभ अंतर्यामीं ॥ ३ ॥
अंतर्यामीं आधीं होईजे निर्मळ ॥ तेणें तुटे मूळ संसाराचें ॥ ४ ॥
विश्रमासी बरें शोधूनी पाहावें ॥ अंतरीं राहावें निष्ठावंत ॥ ५ ॥
निष्ठावंत ज्ञान पूर्ण समाधान ॥ मग संध्यास्नान सफळचीं ॥ ६ ॥
सफळची संध्या संदेह नसतां ॥ निःसंदेह होतां समाधान ॥ ७ ॥
समाधान नाहीं स्नानसंध्याकाळीं ॥ लोकांचिया मेळीं लोक लाजे॥ ८ ॥
लोकलाजे सर्व लौकीकचो केला ॥ देव दूरावला वरपंगें ॥ ९ ॥
वरपंगें देव कदा सांपडेना ॥ निष्ठेचा घडेना भक्तिभाव ॥ १० ॥
भक्तिभाव देवीं दृढ होय ज्याचा ॥ कर्म लौकीकाचा खटाटोप ॥ ११ ॥
खटाटोप देव कदा पावीजेना ॥ निश्चय घडेना शाश्वताचा ॥ १२ ॥
शाश्वताचा शोध अंतरीं असतां ॥ सर्वही पाहातां निरर्थक ॥ १३ ॥
निरर्थक तीर्थें निरर्थक व्रतें ॥ दास म्हणे जेथें ज्ञान नाहीं ॥ १४ ॥

( ९ )

बाळक जाणेना मातेसी ॥ तिचें मन बाळापासीं ॥ १ ॥
तैसा देव हा कृपाळू ॥ करी भक्ताचा सांभाळू ॥ २ ॥
धेनु वत्साचेनि लागें ॥ धांवे त्याच्या मागेंमागें ॥ ३ ॥
पक्षी घेतसे गगन ॥ पिलापाशीं त्याचें मन ॥ ४ ॥
मत्स्य आठवितां पाळी ॥ कूर्म दृष्टीनें संभाळी ॥ ५ ॥
रामीं रामदास म्हणे ॥ मायाजाळाचीं लक्षणें ॥ ६ ॥

( १० )

ऐसें कैसें रे सोवळें ॥ शिवतां होतसें वोवळें ॥ १ ॥
स्नान संध्या टिळे माळा ॥ पोटीं क्रोधाचा उमाळा ॥ २ ॥

१ चकित झाला.

नित्य दंडीतोसी देह ॥ परी फिटेना संदेह ॥ ३ ॥
नित्य नेम खटाटोप ॥ मनीं विषयाचा जप ॥ ४ ॥
बाह्य केलो झळफळ ॥ देहबुद्धीचा वीटाळ ॥ ५ ॥
रामदास दृढभाव ॥ तयावीण सर्व वाव ॥ ६ ॥

( ११ )

देह विटाळाचा गोळा ॥ कैसा होतोसी सोंवळा ॥१ ॥
तुज कळेना विचारू ॥ ऐसीयासी काय करूं ॥ २ ॥
दृढ केला अभिमान ॥ तेणें जाहालें बंधन ॥ ३ ॥
रामदास स्वामीविण[1] ॥ केला तितुकाही शीण ॥ ४ ॥

( १२ )

काळ जातो क्षणक्षणा ॥ मूळ येईल मरणा ॥१ ॥
कांहीं धांवाधांव करी ॥ जंव तो आहे मृत्यु दुरी ॥ २ ॥
देह आहे जाईजिणें ॥ भूललासी कोण्या गुणें ॥ ३ ॥
मायाजाळीं गुंतलें मन ॥ परि हें दुःखासी कारण ॥ ४ ॥
सत्य वाटतें सकळ ॥ परि हें जातां नाहीं वेळ ॥ ५ ॥
रामीं रामदास म्हणे ॥ आतां होई सावधान ॥ ६ ॥

( १३ )

अंतकाळ येतो येतां ॥ तेथें नये चूकवीतां ॥ १ ॥
अकस्मात लागे जावें ॥ कांहीं पुण्य आचरावें ॥ २ ॥
पुण्याविना जातां प्राणी ॥ घडे यमाची जाचणी ॥ ३ ॥
रामदास म्हणे जना ॥ कंठीं यमाच्या यातना ॥ ४ ॥

( १४ )

ज्याच्या उदरासी आला ॥ त्यासि फिरोनी पडला ॥ १ ॥
तोची जाणावा चांडाळ ॥ देव-ब्राह्मणांचा काळ ॥ २ ॥
झाला स्त्रियेचा लंपट ॥ मायबापासीं उद्धट ॥ ३ ॥
भय पापाचें न धरी ॥ सज्जनाची निंदा करी ॥ ४ ॥
नेणे माय कीं मावसी ॥ कोणें सांगावें तयासी ॥ ५ ॥
रामीं रामदास म्हणे ॥ यम केला त्याकारणें ॥ ६ ॥

---

१ जाणारा—नश्वर.

( १५ )

कोणी पुत्र कामा नये ॥ मित्र करी तो ऊपाये ॥ १ ॥
कैचें आपुलें परावें ॥ आवघें ऋणानुबंधें घ्यावें ॥ २ ॥
जिवलग जीव घेती ॥ त्यासी परावे रक्षिती ॥ ३ ॥
जिवलगाचिये परी ॥ मातेहुनी लोभ करी ॥ ४ ॥
रामीं रामदास म्हणे ॥ न कळे देवाचें करणें ॥ ५ ॥

( १६ )

घात करूनी आपुला ॥ काय रडवीसी पूढिला ॥ १ ॥
बहुत मोलाचें आयुष्य ॥ विषयलोभें केला नास ॥ २ ॥
नाहीं वोळखिलें सत्था ॥ तेणें केली आत्महत्या ॥ ३ ॥
नरदेहाची संगती ॥ गेली गेली हातोहातीं ॥ ४ ॥

( १७ )

कोणें कोणासीं रडावें ॥ एकामागें एकीं जावें ॥ १ ॥
एकवेळ गेली माता ॥ एकवेळ गेला पिता ॥ २ ॥
द्रव्य दारा जाती पुत्र ॥ जिवलग आणि मित्र ॥ ३ ॥
प्राणी संसारासीं आला ॥ तितुका मृत्यु-पंथें गेला ॥ ४ ॥
पूर्वज गेले देवापासी ॥ तेची वाट आपणासी ॥ ५ ॥
रामदास म्हणे लोक ॥ करिति गेलीयाचा शोक ॥ ६ ॥

( १८ )

ज्याचें होतें त्याणें नेलें ॥ येथें तुझें काय गेलें ॥ १ ॥
वेगीं होई सावधान ॥ करीं देवाचें भजन ॥ २ ॥
गती न कळे होणाराची ॥ हे तो इच्छा भगवंताची ॥ ३ ॥
पूर्व संचितार्चे फळ ॥ होती दुःखाचे कल्लोळ ॥ ४ ॥
पूर्वी केलें जें संचीत ॥ तें तें भोगावें निश्चित ॥ ५ ॥
दास म्हणें पूर्व-रेखा ॥ भाग्य न टळे ब्रह्मादिकां ॥ ६ ॥

( १९ )

आतां कोठें धरूं भाव ॥ बहुसाल झाले देव ॥ १ ॥
एकाहुनी एक थोर ॥ मुख्य पूजा पारंपर ॥ २ ॥
माझे कुळींचीं दैवतें ॥ सांगों जातां असंख्यातें ॥ ३ ॥
रामदासा देव एक ॥ येर सर्वही मायिक ॥ ४ ॥

( २० )

आतां शरण कोणा जावें ॥ सत्य कोणातें मानावें ॥ १ ॥
नानापंथ नानामतें ॥ भूमंडळीं असंख्यातें ॥ २ ॥
एक मानिती सगुण ॥ एक म्हणती निर्गुण ॥ ३ ॥
एकीं केला सर्वत्याग ॥ एक म्हणती राजयोग ॥ ४ ॥
रामदास सांगे खूण ॥ भक्तिवीण सर्व शीण ॥ ५ ॥

( २१ )

शरण जावें संतजना ॥ सत्य मानावें निर्गुणा ॥ १ ॥
नाना मतीं काय चाड ॥ करणें सत्याचा नीवाड ॥ २ ॥
ज्ञान भक्तीनें शिणवावें ॥ भक्ति तयेसी म्हणावें ॥ ३ ॥
रामीं रामदास सांगे ॥ सर्वकाळ संतसगें ॥ ४ ॥

( २२ )

एक देव आहे खरा ॥ मायें नाथिला पसारा ॥ १ ॥
हेंचि विचारें जाणावें ॥ ज्ञाता तयासी म्हणावें ॥ २ ॥
रामदासाचें बोलणें ॥ स्वमापरी जायी जिणें ॥ ३ ॥

( २३ )

गेला प्रपंच हातींचा ॥ लाभ नाहीं परमार्थाचा ॥ १ ॥
दोहींकडे अंतरला ॥ थोरपणें भांबावला ॥ २ ॥
गेली अवघी निस्पृहता ॥ नाहीं स्वार्थही पूरता ॥ ३ ॥
क्रोधें गेला संतसंग ॥ लोभें जाहला वीरंग ॥ ४ ॥
पूर्ण झाली नाहीं आशा ॥ इकडे बुडाला अभ्यासा ॥ ५ ॥
दास म्हणे क्रोधें केलें ॥ अवघें लाजिरवाणें झालें ॥ ६ ॥

( २४ )

संग स्वार्थाचा धरिला ॥ तेणें काम खवळला ॥ १ ॥
थोरपण हें मातलें ॥ तेणें अव्हाटें घातलें ॥ २ ॥
कामामागें आला क्रोध ॥ क्रोधें केला बहु खेद ॥ ३ ॥
लोभ दंभाचें कारण ॥ मोहें केलें विस्मरण ॥ ४ ॥
कामीं लांचावलें मन ॥ झालें बुद्धीचें पतन ॥ ५ ॥
दास म्हणे हें सकळ ॥ अवघें अनर्थाचें मूळ ॥ ६ ॥

( २५ )

काम क्रोध खवळला ॥ तोचि सन्निपात झाला ॥ १ ॥
यासी औषध करावें ॥ पोटीं वैराग्य धरावें ॥ २ ॥
कुपथ्य अवघें जें झालें ॥ मग तें पुढें उफाळलें ॥ ३ ॥
रामदास सांगे भलें ॥ लोक म्हणती पीसाळलें ॥ ४ ॥

( २६ )

व्यर्थ मायाजाळीं गुंतोनी राहासी ॥ हित गमावीसी आपुलें तें ॥ १ ॥
गृह दारा सुत नव्हेत अंतींचीं ॥ मग इतरांची काय आशा ॥ २ ॥
सर्व हें सांडोनी जाशील बा झणी ॥ काळ तो बांधोनी नेई तुज ॥ ३ ॥
तेथें सोडवीता नसे तूज कोणी ॥ एका चक्रपाणी-वांचोनीया ॥ ४ ॥
नको गुंतूं गळां मायिकासी टाळी ॥ स्वहित सांभाळीं भिक्षु म्हणे ॥५॥

( २७ )

वाजे पाऊल आपलें ॥ म्हणे मागें कोण आलें ॥ १ ॥
कोण धांवतसे आड ॥ पाहों जातां झालें झाड ॥ २ ॥
भावीतसे अभ्यंतरीं ॥ कोण चाले बरोबरी ॥ ३ ॥
शब्दपडसाद ऊठला ॥ म्हणे कोण रे बोलिला ॥ ४ ॥
रामीं रामदास म्हणे ॥ संशयाचीं हीं लक्षणें ॥ ५ ॥

( २८ )

कांहीं दिसे अकस्मात ॥ तेथें वाटे आलें भूत ॥ १ ॥
वायां पडावें संदेहीं ॥ मुळीं तेथें कांहीं नाहीं ॥ २ ॥
झाडझुडूप देखिलें ॥ जिवीं वाटे कोणी आलें ॥ ३ ॥
रामदास सांगे खूण ॥ भितो आपणा आपण ॥ ४ ॥

( २९ )

छाया देखुनी आपली ॥ शंका अंतरीं वाटली ॥ १ ॥
ऐसें भ्रमाचें लक्षण ॥ भुले आपणा आपण ॥ २ ॥
मुखें बोलतां उत्तर ॥ तेथें झालें प्रत्युत्तर ॥ ३ ॥
डोळां घालितां आंगोळी ॥ एकाचीं तीं दोन झालीं ॥ ४ ॥
पोटीं आपण कल्पिलें ॥ तेंचि आलेंसें वाटलें ॥ ५ ॥
दास म्हणे हा उपाधी ॥ शंका धरितां अधिक बाधी ॥ ६ ॥

( ३० )

नाहीं एक उपासना ॥ कैची भक्तीची वासना ॥ १ ॥
नाहीं निश्चय अंतरीं ॥ मन फिरे दारोदारीं ॥ २ ॥
ज्यासी नाहीं एक देव ॥ सातां पांचा ठायीं भाव ॥ ३ ॥
नानाकार झालें मन ॥ कैचें निष्ठेचें भजन ॥ ४ ॥
रामीं रामदास म्हणे ॥ निष्ठेवीण सर्व सुणें ॥ ५ ॥

( ३१ )

जया ज्ञान हें नेणवे ॥ पशु तयासी म्हणावें ॥ १ ॥
*कोणें केलें चराचर ॥ कोण विश्वाचा आधार ॥ २ ॥
ब्रह्मादिकांचा निर्मिता ॥ कोण आंहे त्या परता ॥ ३ ॥
अनंत ब्रह्मांडांच्या माळा ॥ हे तो भगवंताची लीला ॥ ४ ॥
रामदासाचा विवेक ॥ सर्वकर्ता देव एक ॥ ५ ॥

( ३२ )

ज्ञानाविणे जे जे कळा ॥ ते ते जाणावी अवकळा ॥ १ ॥
ऐसें भगवंत बोलिला ॥ चित्त द्यावें त्याच्या बोला ॥ २ ॥
एकें ज्ञानेंची सार्थक ॥ सर्व कर्म निरर्थक ॥ ३ ॥
दास म्हणे ज्ञानावीण ॥ प्राणी जन्मला पाषाण ॥ ४ ॥

( ३३ )

अस्थीचा विटाळ होतां स्नान केलें ॥ चुंडे दांतवलें कासयासी ॥ १ ॥
आचमन करावें शूद्राच्या विटाळे ॥ हाडाचे चौढाळे कोण जाणे ॥ २ ॥
नदीचे प्रवाहीं आंत पाहों नये ॥ स्नानसंध्या होय अग्नोदकीं ॥ ३ ॥
ओले चर्मी दूध होत आहे हिंग ॥ स्वयंपाकीं सांग सेवीताती ॥ ४ ॥
रामदास म्हणे हे कोणी न पाहे ॥ देह मूळीं आहे विटाळाचा ॥ ५ ॥

( ३४ )

चित्त आहे कैसें मळिण तें कैसें ॥ शुद्ध होतें कैसें विचारावें ॥ १ ॥
वैद्य ओळखीना रोग ही कळेना ॥ औषध मिळेना प्रचीतीचें ॥ २ ॥
अनुमानें देव अनुमानें भक्त ॥ अनुमानें मुक्त अनुमानी ॥ ३ ॥
अनुमानें केलें अनुमानें कल्पिलें ॥ निर्फळ जाहलें सर्व कांहीं ॥ ४ ॥
सर्व कांहीं बरें प्रचीति आलिया ॥ दास म्हणे वाया अप्रचीति ॥ ५ ॥

( ३५ )

प्रत्ययाचें ज्ञान तेंचि तें प्रमाण ॥ येर अप्रमाण सर्व कांहीं ॥ १ ॥
सर्व कांहीं धर्म आणि कर्माऽकर्म ॥ चुकलिया वर्म व्यर्थ जाती ॥ २ ॥
व्यर्थ जाती जन्म ज्ञानावांचुनिया ॥ केले कष्ट वांया निरर्थक ॥ ३ ॥
निरर्थक जन्म पशूचिया परी ॥ जंव तें अंतरीं ज्ञान नव्हे ॥ ४ ॥
ज्ञान नव्हे सोपें तें आधीं पहावें ॥ शाश्वत शोधावें दास म्हणे ॥ ५ ॥

( ३६ )

प्रपंचीं तें भाग्य परमार्थीं वैराग्य ॥ दोनी यथासांग दोहींकडे ॥ १ ॥
दोहींकडे सांग होतां तो समर्थ ॥ नाहीं तरी व्यर्थ तारंबळी ॥ २ ॥
तारंबळी होते विचार नसतां ॥ दास म्हणे आतां सावधान ॥ ३ ॥

( ३७ )

पतित हे जन करावे पावन ॥ तेथें अनुमान करूं नये ॥ १ ॥
करूं नये गुणदोषउठाठेवी ॥ विवेकें लावावी बुद्धि जना ॥ २ ॥
बुद्धि सांगे जना त्या नांव सज्जन ॥ पतितपावन दास म्हणे ॥ ३ ॥

( ३८ )

माता पिता जन स्वजन कांचन ॥ प्रिया-पुत्रीं मन गोवूं नये ॥ १ ॥
गोवूं नको मन राघवावांचूनि ॥ लोकलाज जनीं लागलीसे ॥ २ ॥
लागलीसे परी तुवां न धरावी ॥ स्वहितें करावी रामभक्ति ॥ ३ ॥
रामभक्तिविण होसील हिंपुटी ॥ एकलें शेवटीं जाणें लागे ॥ ४ ॥
जाणें लागे आतां बाळा सुलक्षणा ॥ ध्यायीं रामराणा दास म्हणे ॥ ५ ॥

( ३९ )

काया हे काळाची घेवोनि जाणार ॥ तुझेनि होणार काय बापा ॥ १ ॥
काय बापा ऐसें जाणोनि नेणसी ॥ मी मी म्हणतोसी वायावीण ॥ २ ॥
वायावीण शीण केला जन्मवरी ॥ दंभलोकाचारी नागवण ॥ ३ ॥
नागवण आली परलोका जातां ॥ स्वहिताची चिंता केली नाहीं ॥ ४ ॥
केली नाहीं चिंता नामीं कानकोंडें ॥ अंतीं कोण्या तोंडें जात असे ॥ ५ ॥
जात असे सर्व सोडोनि करंटा ॥ जन्मवरी ताठा धरूनिया ॥ ६ ॥
धरूनिया ताठा कासया मरावें ॥ भजन करावें दास म्हणे ॥ ७ ॥

( ४० )

रावणासारखी कोणाची संपत्ति ॥ तो ही गेला अंतीं एकलाची ॥ १ ॥
एकलाचि गेला वाळी तो वानर ॥ कपि थोर थोर तेही गेले ॥ २ ॥
गेले चक्रवर्ती थोरा वैभवाचे ॥ फार आयुष्याचे ऋषीश्वर ॥ ३ ॥
ऋषीश्वर गेले मार्कंडासारिखे ॥ इतराचे लेखे कोण करी ॥ ४ ॥
कोण करी सर्व शाश्वत आपुलें ॥ सर्व राज्य गेलें कौरवांचें ॥ ५ ॥
कौरव निमाले पांडव गळाले ॥ यादवहि गेले एकसरें ॥ ६ ॥
एकसरें गेले राजे थोर थोर ॥ आणिक श्रीधर भाग्यवंत ॥ ७ ॥
भाग्यवंत गेले एकामागें एक ॥ हरिश्चंद्रादिक पुण्यशीळ ॥ ८ ॥
पुण्यशीळ गेले कीर्ति ठेवूनिया ॥ पापी गेले वांया अधोगती ॥ ९ ॥
अधोगती गेले देवा न भजतां ॥ संसारीं म्हणतां माझें माझें ॥ १० ॥
माझें माझें करी साचाचिये परी ॥ अंतीं दुराचारी एकलाचि ॥ ११ ॥
एकलाचि येतां एकलाचि जातां ॥ मध्येचि दुश्चिता मायाजाळ ॥ १२ ॥
मायाजाळीं पापी जन गुंडाळले ॥ पुण्यशीळ गेले सुटोनिया ॥ १३ ॥
सुटोनिया गेले सायुज्यपदासी ॥ रामीं रामदास चिरंजीव ॥ १४ ॥

( ४१ )

वासनेची झाडी कुबुद्धि वांकुडी ॥ वाजे हुडहुडी ममतेची ॥ १ ॥
वैराग्याचा वन्हि विझोनिया गेला ॥ संचित खायाला पुण्य नाहीं ॥२॥
भक्ति पांघरूण तें माझें सांडलें ॥ मज वोसंडिलें संतजनीं ॥ ३ ॥
नामसंजीवनी मुखीं नाहीं पाणी ॥ निंदेची पोहणी[1] मळेचि ॥ ४ ॥
रामदास म्हणे ऐसीयाचें जिणें ॥ सदा दैन्यवाणें रामेवीण ॥ ५ ॥

( ४२ )

देउळाचे मिसें द्रव्य तें जोडावें ॥ गांठींचें मोडावें पुण्यधन ॥ १ ॥
येरवीं तें काय न घडे भाण्याला ॥ व्यय करण्याला आग लागो ॥२॥
राजाज्ञे हे वाचे कवन करावें ॥ धन्य म्हणवावें लोकाहातीं ॥ ३ ॥
राजसा तामसा राघवाची भेटी ॥ गेल्या जन्मकोटी तरी नाहीं ॥ ४ ॥
रामदास म्हणे करितों निवाडा ॥ सोडवितों खोड मना तुझी ॥ ५ ॥

( ४३ )

करोनी कीर्तन योग्यता मिरवणें ॥ देशोदेशीं जाणें द्रव्यासाठीं ॥ १ ॥

---

१ पाण्याचा खोल प्रवाह.

द्रव्य येतां पुढें भेमानें कीर्तन ॥ सुचवितो मान-धन-इच्छा ॥ २ ॥
राजा देऊं जातां देऊळ बांधणें ॥ येवढिया धनें काय होतें ॥ ३ ॥
दात्यांनीं त्रासावें सर्वांनीं हांसावें ॥ त्या मानवा पावे देव कैसा ॥ ४ ॥
रामदास म्हणे देव तो समीप ॥ गांठीं ऐसें पाप जोडा परी ॥ ५ ॥

## भक्तिपर अभंग.

( १ )

भक्ति न लगे भाव न लगे ॥ देव न लगे आम्हांशीं ॥ १ ॥
आम्ही पोटाचे पाईक[1] ॥ आम्हां न लगे आणीक ॥ २ ॥
आम्ही खाऊं ज्यांची रोटी ॥ त्यांची कीर्ति करूं मोठी ॥ ३ ॥
रामीं रामदास म्हणे ॥ ऐशीं मूर्खांचीं लक्षणें ॥ ४ ॥

( २ )

अन्न व्हावें पोटभरी ॥ मग तें ज्ञानचर्चा करी ॥ १ ॥
ऐसें बोलती अज्ञान ॥ ज्यांसि नाहीं समाधान ॥ २ ॥
आधीं अन्न तें पाहिजे ॥ मग ध्यानस्थ राहिजे ॥ ३ ॥
अन्नावीण तळमळ ॥ अन्न करी तें सकळ ॥ ४ ॥
कैचा राम कैचा दास ॥ अवघे पोटाचे सायास ॥ ५ ॥

( ३ )

देव एका भाग्य देतो ॥ एका भीकेसि लावितो ॥ १ ॥
न कळे भगवंताचें करणें ॥ राव रंक तत्क्षणें ॥ २ ॥
तयासि चुकलीं बापुडीं ॥ अन्न अन्न करितीं वेडीं ॥ ३ ॥
रामदास म्हणे पाहीं ॥ देवाविण कांहीं नाहीं ॥ ४ ॥

( ४ )

क्षुधा लागतांचि अन्न ॥ तृषा लागतां जीवन ॥ १ ॥
निद्रा लागतां शयन ॥ आळस येतां चुके मन ॥ २ ॥
मळमूत्र संपादणें ॥ शौच आचमन करणें ॥ ३ ॥
खाणें लागे नानापरी ॥ सर्व काळ भरावरी ॥ ४ ॥

[1] चाकर.

अवघा धंदाची लागला ॥ दिवसें-दिवस काळ गेला ॥ ५ ॥
रामीं रामदास म्हणे ॥ देह सुखवाडा करणें ॥ ६ ॥

( ५ )

सीतकाळींच हुताश ॥ उष्णकाळीं वारा वास ॥ १ ॥
आले पर्जन्याचे दिवस ॥ केले घराचे सायास ॥ २ ॥
नाना व्याधींचीं औषधें ॥ पथ्य करावें निरोधें ॥ ३ ॥
विषयीजनासीं आदर ॥ करणें लागे निरंतर ॥ ४ ॥
अवघा धंदाची लागला ॥ दिवसें-दिवस काळ गेला ॥ ५ ॥
दास म्हणे सांगो किती ॥ ऐसी देहाची संगती ॥ ६ ॥

( ६ )

पोटधंदा जन्मवरी ॥ करूं जातां नाहीं पुरी ॥ १ ॥
करितां संसारीं सायास ॥ नाहीं क्षणाचा अवकाश ॥ २ ॥
अन्न निर्माण कराया ॥ सर्व काळ पीडी काया ॥ ३ ॥
काम करितां दिवस थोडा ॥ ऐशा कष्टा नाहीं जोडा ॥ ४ ॥
अवघा धंदाची लागला ॥ दिवसे-दिवस काळ गेला ॥ ५ ॥
दास म्हणे सावधान ॥ झालें सदृढ बंधन ॥ ६ ॥

( ७ )

शिंक जांभई खोंकला ॥ तितुका काळ व्यर्थ गेला ॥ १ ॥
आतां ऐसें न करावें ॥ नाम जीवीं तें धरावें ॥ २ ॥
श्वास उश्वास निघतो ॥ तितुका काळ व्यर्थ जातो ॥ ३ ॥
पांत्या पातें न लागत ॥ तितुकें वय व्यर्थ जात ॥ ४ ॥
लागे अवचित उचकी ॥ तितुकें वय काळ लेखी ॥ ५ ॥
म्हणे रामीं रामदास ॥ होतो आयुष्याचा नाश ॥ ६ ॥

---

## कलियुग.

### पंचक.

( १ )

आलें भगवंताच्या मना ॥ तेथें कोणाचें चालेना ॥ १ ॥
जैसा कली राजा आला ॥ धर्म अवघाची बुडाला ॥ २ ॥

---

सुखाचें आगर. २ प्रतिबंधानें. ३ डोळ्याच्या पात्यास.

नीति मर्यादा उडाली ॥ भक्ति देवाची चुकली ॥ ३ ॥
दास म्हणे पाप झालें ॥ पुण्य अवघेंची बुडालें ॥ ४ ॥

( २ )

विप्रीं सांडिला आचार ॥ क्षेत्रीं सांडिला विचार ॥ १ ॥
मेघवृष्टी मंदावली ॥ पिकें भूमीनें सांडिलीं ॥ २ ॥
बहु वृष्टी अनावृष्टी ॥ दास म्हणे केली सृष्टी ॥ ३ ॥

( ३ )

लोक दोष आचरती ॥ तेणें दोषें भस्म होती ॥ १ ॥
जनीं दोष जाहले फार ॥ तेणें होतसे संहार ॥ २ ॥
रामदास म्हणे बळी ॥ दिसें दिसें पापें कळी ॥ ३ ॥

( ४ )

नाहीं पापाचा कंटाळा ॥ येतो ह्न्यास आगळा ॥ १ ॥
जना सुबुद्धि नावडे ॥ मन धावे पापाकडे ॥ २ ॥
रामीं रामदास म्हणे ॥ पुण्य उणें पाप दुणें ॥ ३ ॥

( ५ )

पुण्य क्षेत्रें तीं मोडावीं ॥ आणि ब्राह्मण्यें पीडावीं ॥ १ ॥
पुण्यवंत ते मरावे ॥ पापी चिरंजीव व्हावे ॥ २ ॥
रामदास म्हणे वाढ ॥ विघ्नें येतीं धर्मा आड ॥ ३ ॥

---

## मूर्खपण.

### पंचक.

( १ )

येथें कायरे वाजतें ॥ कोठें काय गजबजतें ॥ १ ॥
उगा करीती कोल्हाळ ॥ माझें उठलें कपाळ ॥ २ ॥
हाका मारुनि वरडती ॥ टाळ अवघेची कूटिती ॥ ३ ॥
कोठें कैंचें आले लुटे ॥ वाया झाले टाळकुटे ॥ ४ ॥
वेडें संसार सांडिला ॥ व्यर्थ गलबला मांडिला ॥ ५ ॥
दास म्हणे या मूर्खाला ॥ हरिकथेचा कंटाळा ॥ ६ ॥

( २ )

हरिकथेचा आला राग ॥ खेळ होतां घाली त्यागं[1] ॥ १ ॥
ऐसे प्रकारचे जन ॥ नाहीं देवाचें भजन ॥ २ ॥
कळावंतांचें जो गाणें ॥ ऐकतांची जीव मोने ॥ ३ ॥
करिति लग्नाचा उत्साव ॥ नाहीं देवमहोत्साव[3] ॥ ४ ॥
भूत-दया नाहीं पोटीं ॥ खातीं लोभाचीं चोरटीं ॥ ५ ॥
रामीं रामदास म्हणे ॥ देव धर्म कोण जाणे ॥ ६ ॥

( ३ )

स्वार्थ केला जन्मवरी ॥ लोभें राहीला श्रीहरी ॥ १ ॥
धन धान्य अहर्निशीं ॥ गाइ महिषी घोडे दासी ॥ २ ॥
शेत वाडे घर ठावो ॥ प्राणी जीवीं धरी हावो ॥ ३ ॥
माता पिता बहिणी भ्राता ॥ कन्या पुत्र आणि कांता ॥ ४ ॥
व्याही जावई आपुले ॥ इष्ट मित्र सुखी केले ॥ ५ ॥
दास म्हणे वो शेवटीं ॥ प्राप्त झाली मसणवटी ॥ ६ ॥

( ४ )

जन्मवरी शीण केला ॥ अंतकाळीं व्यर्थ गेला ॥ १ ॥
काया स्मशानीं घातली ॥ कन्यापुत्र मुरडलीं[4] ॥ २ ॥
घर वाडा तो राहिला ॥ प्राणी जातसे एकला ॥ ३ ॥
धन धान्य तें राहिलें ॥ प्राणि चर्फडित गेले ॥ ४ ॥
इष्ट मित्र आणि सांगाती ॥ आपुलाले घरा जाती ॥ ५ ॥
दास म्हणे प्राणी मेले ॥ कांहीं पुण्य नाहीं केलें ॥ ६ ॥

( ५ )

दैन्यवाणा झाला प्राणी ॥ चंद्री लागली नयनीं ॥ १ ॥
म्हणती ऊचला ऊचला ॥ आतां भूमीभार झाला ॥ २ ॥
घोर लागला अमूप ॥ प्राणि झाला प्रेतरूप ॥ ३ ॥
दांतखिळी बसली वाणी ॥ ताठा भरला कर-चरणीं ॥ ४ ॥
डिळविक्राळ दीसती ॥ झांका झांका मुलें भीती ॥ ५ ॥
रामीं रामदास म्हणे ॥ अवघीं सुखाचीं पीसुनें ॥ ६ ॥

---

१ उडी. २ हर्षे. ३ महत्-उत्साह-मोठा उत्साह. ४ परतलीं. ५ कुत्रीं.

# वेंचे दासबोधांतील.

## ओंव्या—कविवर्णन.

आतां वंदूं कवीश्वर ॥ जे शब्द-सृष्टीचे ईश्वर ॥ नातरी हे परेमेश्वर ॥ वंदावे तरी ॥ १ ॥ कीं हे सरस्वतीचें स्थान ॥ कीं हे नानाकळांचें जीवन ॥ नाना सद्विद्यांचें भुवन ॥ यथार्थ होय ॥ २ ॥ कीं हे पुरुषार्थाचें वैभव ॥ कीं हे जगदीश्वराचें महत्त्व ॥ नाना-लाघवें सत्कीर्ती-स्तव ॥ निर्माण कवी ॥ ३ ॥ कीं हे शब्दरत्नाचे सागर ॥ कीं हे मुक्त-सरोवर ॥ नाना-विधीचे वैरागर ॥ निर्माण झाले ॥ ४ ॥ कवी मुमुक्षूचें अंजन॥ कवी साधकाचें साधन॥ कवी सिद्धाचें समाधान॥निश्चयात्मक

१ येथें कवि शब्दानें केवळ कविता करणारेच विवक्षित नाहींत. निरनिराळ्या विषयांवरचे जे ग्रंथ लिहिणारे आहेत तेही विवक्षित आहेत. २ सर्वशक्तिमंत याच ओवींत मागें कवींस " शब्दसृष्टीचे ईश्वर " असें म्हटलें आहे, पण त्यांत ब्रह्मदेवाप्रमाणें कवींस नियमित सृष्टिकर्तृत्व येतें तसें न यावें म्हणून त्यांस परमेश्वर म्हणजे ईश्वरापेक्षां ( ब्रह्मदेवापेक्षां ) मोठे ईश्वर असें म्हटलें. ह्याचें कारण कीं, ब्रह्मदेवाचे सृष्टींत मुख तें मुखच, कमल तें कमलच असा नियम आहे. पण कविसृष्टींत मुखाचें कमल, कमलाचें मुख असें पाहिजे तसें होतें. ह्यावरून ब्रह्मदेवापेक्षांही कवींचें सामर्थ्य अधिक आहे असें सुचविलें. ३ कवि नानाप्रकारच्या कलांवर ग्रंथ लिहितात म्हणून त्या कला राहतात ( जगतात ); म्हणून त्यांस कलांचें ' जीवन ' असें म्हटलें. ४ महत्व. चतुर्विध पुरुषार्थांचें वर्णन करून त्यांचें वैभव म्हणजे महत्व प्रसिद्धीस आणतात, म्हणून त्यांस पुरुषार्थांचें वैभव असें म्हटलें. पुढें जीं कवीवर रूपकें केलीं आहेत तीं बहुतकरून अशाच वर्णनाच्या संबंधानें आहेत, असें समजावें. ५ मुक्त म्हणजे मोत्यें सरोवरापासून होतात, त्याप्रमाणें मुक्त ( संसारांतून सुटलेले ) ह्यांपासून होतात म्हणजे ह्यांचे ग्रंथ वाचून होतात, म्हणून ह्यांस 'मुक्तसरोवर' असें म्हटलें. ६ जशीं रत्नांच्या खाणींत हवीं तीं रत्नें मिळतात तसे नानाप्रकारचे विधी म्हणजे शास्त्रीय किंवा धर्मप्रकरणीं नियम ह्यांच्याकडे मिळतात, म्हणजे ते पाहिजे त्यानें ह्यांच्याकडून समजून घ्यावे. ७ डोळ्यांत अंजन घातलें म्हणजे डोळ्यांतला मळ जाऊन दिसूं लागतें, त्याप्रमाणें मुमुक्षूंस कवींचें ग्रंथ अंजनच होतें, म्हणजे ते वाचल्यानें मुमुक्षूंस दिसूं लागतें म्हणजे आत्मज्ञान होतें. ८ ज्ञानसंपादक ह्यांस ज्ञानप्राप्ति करून घेण्यास कवींचे ग्रंथ साधनभूत होतात. ९ ज्ञानसंपन्न. ह्यांस कवींचे ग्रंथ मनाचें समाधान करणारे होतात. ह्यांस ज्ञान तर झालेलेंच असतें म्हणून ह्यांस नुसतेंच मनाचें समाधान म्हणजे संतोष होतो.

॥ ५ ॥ कवी स्वधर्माचा आश्रयो ॥ कवी मना मनोजयो ॥ कवी धार्मिकाचा विजयो ॥ विजयकर्ते ॥ ६ ॥ कवी वैराग्याचें संरक्षण ॥ कवी भक्तांचें भक्तिलक्षण ॥ नाना स्वधर्मसंरक्षण ॥ ते हे कवी ॥ ७ ॥ कवी प्रेमळांची प्रेमळ स्थिती ॥ कवी ध्यानस्थांची ध्यानमूर्ती ॥ कवी उपासकांची वाढकीर्ती ॥ विस्तारली ॥ ८ ॥ नाना साधनांचे मूळ ॥ कवी नाना प्रयत्नांचें फळ ॥ नाना कार्यसिद्धि केवळ ॥ कवीचेनि प्रसादें॥९॥ आधीं कवीचा वाग्विलास ॥ तरी मग श्रवणीं तुंबळे रस ॥ कवीचेनि मति-प्रकाश ॥ कवित्वासी होय ॥ १० ॥ कवी व्युत्पन्नाची योग्यता ॥ कवी सामर्थ्यवंताची सत्ता ॥ कवी विचक्षणाची कुशलता ॥ नाना प्रकारीं ॥ ११ ॥ कवी कवित्वाचा प्रबंध ॥ कवी नाना-धाटी-मुद्रा-छंद ॥ कवी गद्य-पद्य-भेदाभेद ॥ पदप्रकार कर्ते ॥ १२ ॥ कवी सृष्टीचा अळंकार ॥ कवी लक्ष्मीचा शृंगार ॥ सकळ सिद्धींचा निर्द्धार ॥ ते हे कवी ॥ १३ ॥ कवी सभेचें मंडण ॥ कवी भाग्याचें भूषण ॥ नाना सुखांचें संरक्षण ॥ ते हे कवी ॥ १४ ॥ कवी देवांचे रूप-कर्ते ॥ कवी ऋषींचे महत्त्व-वर्णिते ॥ नानाशास्त्रांचें सामर्थ्य ते ॥ कवी वाखाणिती ॥ १५ ॥ नसता कवीचा व्यापार ॥ तरी कैचा असता जगदोद्धार ॥ म्हणोनि कवी हे आधार ॥ सकळ सृष्टीसी ॥ १६ ॥ नाना-विद्या-दातृत्व कांहीं ॥ ऋषीश्वरावीण तों नाहीं ॥ कवीपासून सर्व कांहीं ॥ सर्वज्ञता ॥ १७॥ मागें वाल्मीकिव्यासादिक ॥ झाले कवीश्वर अनेक ॥ तयांपासूनि

---

१ मनास जिंकणारा. कवींचे ग्रंथांस असें म्हणण्याचें कारण, ते मनोरंजक असल्यामुळें ते मनास इकडे तिकडे जाऊं देत नाहींत, आपल्या अटकेंत ठेवतात. २ व्युत्पन्नाची योग्यता म्हणजे योग्य व्युत्पन्न. तात्पर्य कीं माहितगार किंवा ज्ञानी म्हणून जे आहेत ते हे आहेत. ३ सामर्थ्यवंताची सत्ता म्हणजे सामर्थ्यवंत म्हणून ज्यांस म्हणावें ते हे आहेत. ब्रह्मदेवापेक्षां ह्यांचें सामर्थ्य अधिक हें वरती दर्शविलेंच आहे. ४ विचक्षणाची कुशलता म्हणजे मोठे कुशल-शोधक जे ते हे आहेत. ५ रचना, म्हणजे कविता. ६ धाटी म्ह० रीति ( शब्दरचनेचा प्रकार ), मुद्रा म्ह० चिन्ह म्ह० व्यंजक शब्द. छंद म्ह० वृत्त. ७ गद्यपद्यभेदाभेद म्ह० गद्यपद्यांचा भेद म्ह० गद्य कविता आणि पद्य कविता हा भेद. भेदाभेद हा शब्द प्राकृतांत केवळ भेद ह्या अर्थी येतो. ८ निरनिराळीं पदें म्ह० पदरूप कविता. ह्या ओवींत मागील प्रबंधादिक पदांचा शेवटील कर्ते ह्या पदाशीं अन्वय आहे. येथें कवि निरनिराळ्या प्रकारांची कविता करतात ते प्रकार सांगितले.

विवेक ॥ सकळ जनांसी ॥ १८ ॥ पूर्वी काव्यें होतीं केलीं ॥ तरीच व्युत्पत्ती माम झाली ॥ तेणें पंडितता अंगीं बाणली ॥ परम योग्यता ॥ १९ ॥ ऐसे पूर्वी थोर थोर ॥ झाले कवीश्वर अपार ॥ आतां आहेति पुढें होणार ॥ नमन माझें त्यांसि पैं ॥ २० ॥ नानाचातुर्यांच्या मूर्ती ॥ कीं हे साक्षात् बृहस्पती ॥ वेद-श्रुति बोलों म्हणती ॥ ज्यांच्या मुखें ॥ २१ ॥ परोपकाराकारणें ॥ नानानिश्चय अनुवादणें ॥ शेखीं बोलिले पूर्णपणें ॥ संशयातीत ॥ २२ ॥ कीं हे अमृताचे मेघ वोळले ॥ कीं हे नवरसांचे वोघ लोटले ॥ नानासुखांचें उचंबळलें ॥ सरोवर हे ॥ २३ ॥ कीं हे विवेकनिधीचीं भांडारें ॥ प्रकट झालीं मनुष्याकारें ॥ नाना वस्तूंचेनि विचारें ॥ कोंदाटले हे ॥ २४ ॥ कीं हे आदिशक्तीचें ठेवणें ॥ नाना शक्तींशी आणी उेणें ॥ लाधलें पूर्वसंचिताच्या गुणें ॥ विश्व-जनासी ॥ २५ ॥ कीं हीं सुखाचीं तारुवें लोटलीं ॥ अक्षयीं आनंदें उतटलीं ॥ विश्वजनासी उपेगा आलीं ॥ नानाप्रयोगाकारणें ॥ २६ ॥ कीं हे ईश्वराचा पवाड ॥ पाहतां गगनाहूनि वाड ॥ ब्रह्मांड-रचनेहूनि जाड ॥ कवि-प्रबंध-रचना ॥ २७ ॥ आतां असो हा विस्तार ॥ जगासि आधार कवीश्वर ॥ तयांसि माझा नमस्कार ॥ साष्टांग भावें ॥ २८ ॥

---

## वेंचे, मनाचे श्लोकांतील.

( भुजंगप्रयातवृत्त )

मना सज्जना भक्तिपंथेंचि जावें ॥ तरी श्रीहरी पाविजेतो स्वभावें ॥
जनीं निंद्य तें सर्व सोडून द्यावें ॥ जनीं वंद्य तें सर्व-भावें करावें ॥ १ ॥
मना वासना दुष्ट कामा न ये रे ॥ मना सर्वथा पापबुद्धी नको रे ॥
मना सर्वथा नीति सोडूं नको हो ॥ मना अंतरीं सार-वीचार राहो ॥ २ ॥
मना पाप-संकल्प सोडोनि द्यावा ॥ मना सत्य-संकल्प जीवीं धरावा ॥
मना कल्पना ते नको वीषयाची ॥ विकारें घडे हो जनीं सर्व छी छी ॥ ३ ॥
नको रे मना क्रोध हा खेदकारी ॥ नको रे मना काम नानाविकारी ॥
नको रे मना सर्वदा अंगिकारूं ॥ नको रे मना मत्सरू दंभ-भारू ॥ ४ ॥
मना श्रेष्ठ धारिष्ट जीवीं धरावें ॥ मना बोलणें नित्य सोसीत जावें ॥

---

१ नाना मतें. २ उणेपणा. ३ धैर्य.

स्वयें सर्वदा नम्रवाचे वदावें ॥ मना सर्वलोकांसि रे नीववावें ॥ ५ ॥
तनू त्यागितां कीर्ति मागें उरावी ॥ मना सज्जना हेचि क्रीया धरावी ॥
मना चंदनाचेपरी त्वां झिजावें ॥ परी अंतरीं सज्जना नीववावें ॥ ६ ॥
नको रे मना द्रव्य तें पूढिलाचें ॥ अति स्वार्थबुद्धी नको पाप सांचे ॥
घडे भोगणें पाप तें कर्म खोटें ॥ न होतां मना-सारिखें दुःख मोठें ॥७॥
जगीं सर्वसूखी असा कोण आहे ॥ विचारी मना तूंचि सोधोनि पाहें ॥
मना त्वांचि रे पूर्वसंचीत केलें ॥ तयासारिखें भोगणें प्राप्त झालें ॥ ८ ॥
जिवा कर्मयोगें जगीं जन्म जाला ॥ परी शेवटीं काळ घेवोनि गेला ॥
महा-थोर ते मृत्युपंथेंचि गेले ॥ असंख्यात ते जन्मले आणि मेले॥ ९ ॥
मना पाहतां सत्य हे मृत्युभूमी ॥ जितां बोलती सर्वही जीव मी मी ॥
चिरंजीव हे सर्वही मानिताती ॥ अकस्मात सोडोनिया सर्व जाती॥१०॥
मरे एक त्याचा दुजा शोक वाहे ॥ अकस्मात तोही पुढें जात आहे ॥
पुरेना जनीं लोभ, रे क्षोभ[1] होतो॥म्हणोनी जनीं मागुती जन्म घेतो॥११॥
मना मानसीं व्यर्थ चिंता वहाते ॥ अकस्मात होणार होवोनि जातें ॥
घडे भोग ना त्याग हा कर्मयोगें ॥ मतीमंद तो खेद मानी वियोगें॥१२॥
मना सर्वथा सत्य सोडूं नको रे ॥ मना सर्वथा मिथ्य मानूं नको रे ॥
मना सत्य तें सत्य वाचे वदावें॥मना मिथ्य तें मिथ्य सोडोनि द्यावें॥१३॥
समर्थाचिया सेवका वक्र पाहे ॥ असा सर्व-भू-मंडळीं कोण आहे ॥
जयाची लिळा वर्णिती लोक तीन्ही॥नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥१४॥
अहल्याशिळा राघवें मुक्त केली ॥ पदीं लागतां दिव्य होवोनि गेली ॥
जया वर्णितां शीणली वेदवाणी ॥ नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥१५॥
असे हो जया अंतरीं भाव जैसा ॥ वसे हो तया अंतरीं देव तैसा ॥
अनन्योस[2] रक्षीतसे चाप-पाणी ॥ नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥१६॥
सदा चक्रवाकासि[3] मार्तंड जैसा ॥ उडी घालितो संकटीं स्वामि तैसा ॥

१ संताप. ऐहिक विषयांवर जो लोभ म्ह० आसक्ति असते ती पुरेशी होत नाहीं; त्यामुळें चित्ताचा संताप होतो. पण ह्या संतापामुळें ऐहिक विषयांवरचा लोभ निदिध्यासानें दृढ होतो. तोच फिरून जन्म घेण्यास कारण होतो, असा भाव. २ अनन्य भावानें शरण आलेल्यास. ३ चक्रवाकपक्ष्यांचा जोडा (नर-मादी) रात्रीं वियुक्त असतो आणि सूर्योदय झाल्यावर संयुक्त होतो. तेव्हां ह्यांच्या संकटाला जसा सूर्य तसा लोकांच्या संकटाला राम, असा दृष्टांत घेतला आहे.

हरीभक्तिचा घाव घालीं निशाणीं ॥नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥१७॥
जयाचेनि संगें समाधान भंगे ॥ अहंता अकस्मात येऊनि लागे ॥
तया संगतीची जनीं कोण गोडी ॥ जिये संगतीनें मना राम सोडी॥१८॥
सदा बोलण्यासारिखें चालतोहे ॥ अनेकीं सदा एक देवासि पाहे ॥
सगूणीं भजे लेश नाहीं भ्रमाचा॥जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा॥१९॥
मेदें मत्सरें सांडिली स्वार्थबुद्धी ॥ प्रपंचीक नाहीं जयातें उपाधी ॥
सदा बोलणें नम्र-वाचा सुवाचा॥जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा॥२०॥
सदा आर्जवी प्रीय जो सर्व लोकीं ॥ सदा सर्वदा सत्यवादी विवेकी॥
न बोले कदा मिथ्य वाचा त्रिवाचा॥जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा॥२१॥
मना कल्पना कल्पितां कल्पकोटी ॥ न हो रे न हो सर्वथा रामभेटी ॥
मनीं कामना, राम नाहीं जयाला॥ अती-आदरें प्रेम नाहीं तयाला॥२२॥
अती-मूढ त्या दृढ बुद्धी असेना ॥ अती-काम त्या राम चित्तीं वसेना ॥
अती-लोभ त्या क्षोभ होईल जाणा॥अती-वीषयी सर्वदा दैन्यवाणा॥२३॥
सुखानंदकारी निवारी भयातें ॥ जनीं भक्तिभावें भजावें तयातें ॥
विवेकें त्यजावा अनाचार हेवा ॥ प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ॥२४॥
जयाचेनि नामें महादोष जाती ॥ जयाचेनि नामें गती पाविजेती ॥
जयाचेनि नामें घडे पुण्यठेवा ॥ प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ॥२५॥
न वेंचे कदा ग्रंथिचा अर्थ कांहीं ॥ मुखें नाम उच्चारितां कष्ट नाहीं ॥
महा-घोर संसार-शत्रू जिणावा ॥ प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ॥२६॥
न हो कर्म ना धर्म ना योग कांहीं॥न हो भोग ना त्याग ना सांग कांहीं॥
म्हणे दास विश्वास नामीं धरावा ॥ प्रभाते मनीं राम चिंतीत जावा॥२७॥
भजा राम विश्राम योगेश्वराचा ॥ जपा नेमिला नेम गौरीहराचा ॥
निवाला स्वयें तापसी चंद्रमौळी॥तुम्हां सोडवी राम हा अंतकाळीं ॥२८॥

१ षड्रिपूंच्या निशाणावर. २ मदासह आणि मत्सरासह. ३ सत्य सत्य सत्य असें त्रिवार सत्याचें उच्चारण. म्ह० खरोखरच कधींही खोटें बोलत नाहीं असा भाव. ४ यथासांग, पूर्ण, म्हणजे कोणतेंच पूर्णपणें होत नाहीं असें तात्पर्य. ५ जो जपा "गौरीहराचा नेम नेमिला." असा अन्वय. म्ह० ज्याला (रामाला) गौरीहरानें (शिवानें) जपण्याचा नेम केला. ६ शिवानें विषप्राशन केल्यावर त्याच्या आंगाचा फार दाह होऊं लागला, त्यावेळीं त्यानें रामस्मरण केलें आणि त्याच्या योगानें त्याचा दाह शांत झाला, अशी कथा आहे तिचा संबंध येथें दर्शविला आहे.

मुखीं नाम नाहीं तया मुक्ति कैंची ॥ अहंता-गुणें यातना ते फुकाची ॥
पुढें अंत येईल तो दैन्यवाणा ॥ म्हणोनी म्हणा रे म्हणा देवराणा॥२९॥
यथासांग रे कर्म तेंही घडेना ॥ घडे कर्म तें पुण्य गांठीं पडेना ॥
दया पाहतां सर्वभूतीं असेना ॥ फुकाचें मुखीं नाम तेंही वसेना ॥३०॥
अती लीनता सर्व भावें स्वभावें ॥ सदा सज्जनांलागिं संतोषवावें ॥
तयांकारणीं सर्व लावीत जावें ॥ सगूणा अती आदरेंशीं भजावें ॥३१॥
क्रियेवीण नानापरी बोलिजेतें ॥ परी चित्त दुश्चित्त तें लाजवीतें ॥
मना कल्पना धीट सैराट धांवे ॥ तया मानवा देव कैसेनि पावे ॥३२॥
विवेकें क्रिया आपुली पालटावी ॥ अती आदरें शुद्धबुद्धी धरावी ॥
जनीं बोलण्यासारखें चाल बापा॥मनीं कल्पना सोड संसार-तापा ॥३३॥
वरीं स्नानसंध्या धरीं एक-निष्ठा ॥ विवेकें मना आंवरीं स्थानभ्रष्टा[1] ॥
दया सर्व भूतीं जया मानवाला ॥ सदा प्रेमळू भक्तिभावें निवाला ॥३४॥
सदा सर्वदा सज्जनाचेनि योगें ॥ क्रिया पालटे भक्ति भावार्थ लागे ॥
क्रियेवीण वाचाळता ते निवारीं ॥ तुटे[2] वाद, संवाद तो हीतकारी ॥३५॥
जनीं सांगतां ऐकतां जन्म गेला ॥ परी वादवीवाद तैसाच ठेला ॥
उठे संशयो वाद हा दंभ-धारी ॥ तुटे वाद, संवाद तो हीतकारी ॥३६॥
जनीं हीत पंडीत सांगूनि गेले ॥ अहंतागुणें राक्षसें[3] ब्रह्म जाले ॥
तयांहून व्युत्पन्न तो कोण आहे ॥ मना सर्व जाणीव सांडून राहे॥३७॥
फुकाचें मुखीं बोलतां काय वेचे ॥ दिसंदीस अभ्यंतरीं गर्व सांचे ॥
क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे॥विचारें तुझा तूंचि शोधून पाहें॥३८॥
जनाकारणें देव लीलावतारी ॥ बहूतांपरी आदरें वेषधारी ॥
तया नेणती ते जनीं पापरूपी ॥ दुरात्मे महानष्ट चांडाळ पापी ॥३९॥
मना वासना वासुदेवीं वसों दे ॥ मना कामना कामसंगीं नसों दे ॥
मना कल्पना वाउगी ते न कीजे॥मना सज्जना सज्जनीं वस्ति कीजे॥४०॥
नसे गर्व अंगीं सदा वीतरागी ॥ क्षमा शांति भोगी दया-दक्ष योगी ॥
नसे लोभ ना क्षोभ ना दैन्यवाणा॥अशा लक्षणीं जाणिजे योगिराणा॥४१॥
धरीं रे मना संगती सज्जनाची ॥ जिणें वृत्ति हे पालटे दुर्जनाची ॥

१ स्थानभ्रष्ट यथें पुढील भ्र हें जोडाक्षर असल्यामुळें मागील नकारास गुरुता येते त्यामुळें छंदोभंग होतो. पण असले छंदोभंग प्राकृत कवितेंत कोठें कोठें येतात. २ ज्या संवादानें वाद तुटे तो संवाद हितकारी असा अर्थ. ३ राक्षस ब्रह्म म्ह० ब्रह्मराक्षस.

वळे भाव हा वृत्ति सन्मार्गि लागे॥महाक्रूर तो काळ विक्राळ भंगे॥४२॥
जिवा श्रेष्ठ ते स्पष्ट सांगोनि गेले ॥ परी जीव आज्ञान तैसेच ठेले ॥
देहबुद्धिचा निश्चयो त्यां ढळेना ॥ जुनें ठेवणें मीपणें तें टळेना ॥ ४३ ॥
जगीं पाहतां साच तें काय आहे ॥ अती आदरें सर्व शोधोनि पाहें ॥
पुढें पाहतां पाहतां देव जोडे ॥ भ्रम भ्रांति अज्ञान हें सर्व मोडे ॥४४॥
दिसेना जनीं तेंचि शोधूनि पाहें ॥ बरें पाहतां गूज तेथेंचि आहे ॥
करें घेउं जातां कदा आकळेना ॥ जनीं सर्व कोंदाटलें तें कळेना ॥४५॥
म्हणे जाणतों तो मनीं मूर्ख आहे॥अतर्क्यासि तर्की असा कोण आहे॥
जनीं मीपणें पाहतां पाहवेना ॥ तया पाहतां वेगळें राहवेना ॥ ४६ ॥
जयें मक्षिका भक्षिली जाणिवेची ॥ तया भोजनाची रुची प्राप्त कैंची ॥
अहंभाव ज्या मानसींचा विरेना॥ तया ज्ञान हें अन्न पोटीं जिरेना॥४७॥
अहंतागुणें सर्वही दुःख होतें ॥ मुखें बोलिलें ज्ञान तें व्यर्थ जातें ॥
सुखें राहतां सर्वही सूख आहे ॥ अहंता तुझी तूंचि शोधोनि पाहें ॥४८॥
फुटेना तुटेना कदा देवराणा ॥ चळेना ढळेना कदा दैन्यवाणा ॥
कळेना वळेना कदा लोचनासी ॥ असेना दिसेना जना मीपणासी॥४९॥
जया मानला देव तो पूजिताहे ॥ परी देव शोधून कोणी न पाहे ॥
जगीं पाहतां देव कोट्यानुकोटी॥जया मानली भक्ति जे तेचि मोठी॥५०॥
तिन्ही लोक जेथूनि निर्माण झाले ॥ तया देवरायासि कोणी न बोले ॥
जगीं थोरला देव तो चोरिलासे ॥ गुरूवीण तो सर्वथाही न दीसे ॥५१॥
गुरू पाहतां लक्ष कोट्यानुकोटी ॥ बहूसाल मंत्रावळी शक्ति मोठी ॥
मना कल्पना चेटकें घात-पाता॥जनीं व्यर्थ रे तो नव्हे मुक्तिदाता॥५२॥
नव्हे चेटकू चाळकू द्रव्य-भोंदू ॥ नव्हे निंदकू मत्सरू भक्तिमंदू ॥
नव्हे उन्मतू वेसनीं संगबाधू॥ जनीं ज्ञानिया तोचि साधू अगाधू ॥५३॥

---

१ जेवणाची पक्षीं. ईश्वरसुखाची. २ कदा लोचनासी वळेना. म्ह० डोळ्यांनीं दिसणारा नव्हे. ३ अमुक प्रकारानें आहे असें सांगतां येत नाहीं असा. ४ जना मीपणासी दिसेना. म्ह० लोकांत अहंपणा असल्यामुळें त्यांस जो दिसत नाहीं. अहंपणा नसेल तर ज्ञान दृष्टीनें दिसेल असा भाव. ५ मत्सरी. ६ भक्तिशून्य. ७ ज्या "ज्ञानिया जनीं वेसनीं संगबाधू न" असा अन्वय. ज्या ज्ञान्याला लोकांमध्यें संगतीच्या योगानें वेसन म्ह० दुःख नाहीं म्ह० कोणतीही संगती असली तरी ह्याला बाधत नाहीं. इतरांला कुसंगती असली तर ती बाधते, तशी ह्याला बाधत नाहीं असा भाव. असा असेल तोच साधु.

नव्हे वाउगी चावटी काम पोटीं ॥ क्रियेवीण वाचळता तेचि मोठी ॥
मुखें बोलिल्यासारिखें चालता हे॥मना सद्गुरू तोचि शोधूनि पाहें ॥५४॥
न जायें जपासी न जायें तपासी ॥ न जायेंचि काशी न जायें गयेसी ॥
हरीचिंतनेवीण कोठें न जायें ॥ त्रिकाळीं सदा पाय तूं तेचि पाहें॥५५॥
मना गूज रे तूजला प्राप्त झालें ॥ परी पाहिजे अंतरीं यत्न केले ॥
सदा ऐकतां पाविजे निश्चयासी ॥ धरीं सज्जनीं संगती धन्य होसी॥५६॥
मना संग हा सर्व सोडूनि द्यावा ॥ अती आदरें सज्जनाचा धरावा ॥
जयाचेनि संगें महादुःख भंगे ॥ जनीं साधनेंवीण सन्मार्ग लागे ॥ ५७ ॥
मना संग हा सर्व-संगासि तोडी ॥ मना संग हा मोक्ष तात्काळ जोडी ॥
मना संग हा साधना शीघ्र जोडी ॥ मना संग्र हा द्वैत निःशेष मोडी॥५८॥
मनाचीं शतें ऐकतां दोष जाती ॥ मतीमंद ते साधना योग्य होती ॥
चढे ज्ञान वैराग्य सामर्थ्य अंगीं॥म्हणे दास विश्वासतां मुक्ति भोगी॥५९॥

---

## अभंग-सत्संगतिशतक.

संताचे संगतीं काय प्राप्त होतें ॥ तें तुम्हां निरूतें सांगईन ॥ १ ॥
संसारीचें सार जया नाश नाहीं ॥ तेंची पडे ठाई संतसंगें ॥ २ ॥
संतसंगें कळे सर्व शास्त्रभाग ॥ आणि ज्ञानयोग अप्रयासें ॥ ३ ॥
प्रयासें साधीतां कधीं न ये हाता ॥ तें लाभे तत्वतां साधूसंगें ॥ ४ ॥
झालीयानें कृपा संतसज्जनांची ॥ मग विवेकाची वाट फूटे ॥ ५ ॥
पावीजेना देव संतसंगावीण ॥ मार्ग हा कठीण विवेकाचा ॥ ६ ॥
विवेकाचा मार्ग विवेकें चालावा ॥ मनाचा त्यागावा संग सर्व ॥ ७ ॥
सर्व-त्याग करी पावसी श्रीहरी ॥ परी एक धरीं संतसंग ॥ ८ ॥
संतसंगावीण त्याग हा घडेना ॥ श्रीहरी पडेना कदा ठाईं ॥ ९ ॥
ठाव सज्जनाचा सज्जन जाणती ॥ तेथें नाहीं गती मीपणाची ॥ १० ॥
संत जन परी कोण ओळखावे ॥ कैसे ते जाणावे साधू जन ॥ ११ ॥
सांगीतलें आहे मागें थोरथोरीं ॥ तेंची अवधारीं आलीया रे ॥ १२ ॥
आलीया रे साधू जाणावा कवणें ॥ तयाचें लक्षण असंख्यात ॥ १३ ॥
असंख्यात परी वोळखीकारणें ॥ साधू पूर्णपणें सारिखाची ॥ १४ ॥
सारीखाची दीसे जनाचीया परी ॥ परी तो अंतरीं वेगळाची ॥ १५ ॥

वेगळाचि ज्ञानें पूर्ण समाधानें ॥ स्वस्वरूपीं[1] मनें वस्ती केली ॥ १६ ॥
वस्ती केली मनें निर्गुणीं सर्वदा ॥ मीपणें आपदा तया नाहीं ॥ १७ ॥
तया नाहीं काम तया नाहीं क्रोध ॥ तया नाहीं खेद स्वार्थबुद्धी॥१८॥
दंभ हा लौकीक विवेकें सांडीला ॥ दुरी वोसंडीला अहंकार ॥ १९ ॥
अहंकार नाहीं दुराशा[2] अंतरीं ॥ ममता ही दोरी मोकळली ॥ २० ॥
लोलंगता[3] नसे ज्ञानें धालेपणें ॥ ऐसीं हीं लक्षणें सज्जनाची ॥ २१ ॥
जयाचेनी ज्ञानें तरती अज्ञानें ॥ साधूसंगतीनें समाधान ॥ २२ ॥
हरी-भक्ति करी जन तरावया ॥ स्वधर्मा वीलया जाऊं नेदी ॥ २३ ॥
जाऊं नेदी भक्ती जाऊं नेदी ज्ञान ॥ अनुतापीं मन निरंतर ॥ ३४ ॥
निरंतर भाव सगुणीं भजन ॥[4]येणें बहु जन उद्धरती ॥ २५ ॥
उद्धरती जन करीतां साधन ॥ क्रियेचें बंधन आचरतां ॥ २६ ॥
आचरतां साधू जना होय बोधू ॥ लागतसे वेधू भक्तीभावें ॥ २७ ॥
भक्तीभावें देवप्रतिष्ठा पूजन ॥ कथानिरूपण महोत्साव ॥ २८ ॥
महोत्साव साधु भक्तीचें लक्षण ॥ करी तीर्थाटण आदरेसी ॥ २९ ॥
आदरेसी विधी करणें उपाधी ॥ लोकांतें सद्बुद्धी लागावया ॥ ३० ॥
लोकाचार करी तो जना उद्धरी ॥ ज्ञाता अनाचारी कामा न ये ॥३१॥
क्रियावंत साधू विरक्त विवेकी ॥ तोचि तो लौकिकीं मान्य आहे॥३२॥
उपेगासीं येणें जना पूर्णपणें ॥ तयाचीं लक्षणें निरूपिलीं ॥ ३३ ॥
निरूपीलीं येणें लक्षणें जाणावा ॥ साधू वोळखावा मुमुक्षूनें ॥ ३४ ॥

---

## रामदास.

### वंचे. वैराग्यशतक-अभंग.

थोर झाले कष्ट मातेच्या उदरीं ॥ शीणलों श्रीहरी दास तूझा ॥ १ ॥
फोडीयला टाहो पडतां भूमीवरी ॥ दिवसें दिवस हरी विसरलों ॥ २ ॥
दुःख होय देहीं माता नेणे कांहीं ॥ मज वाचा नाहीं काय करूं ॥३॥
काय करूं दुःखें पोळे अभ्यंतर ॥ मातेसी अंतर जाणवेना ॥ ४ ॥
जाणवेना माझें दुःख मी अज्ञान ॥ मग मी रुदन करीं देवा॥ ५ ॥
मायाजाळीं झालें दृढ माझें मन ॥ रामा तुझें नाम आठवेना ॥ ६ ॥

---

१ आत्मस्वरूपीं. २ दुष्ट इच्छा. ३ चांचल्य. ४ तृप्तपणें.

आठवेना चित्तीं स्वहिताचें ज्ञान ॥ मायबापें लग्न केलें लोभें ॥ ७ ॥
लोभें लग्न केलें मानिली आवडी ॥ पायीं ओविली बेडी बंधनाची ॥८॥
बंधनाची बेडी प्रबळला काम ॥ मग कैचा राम आठवेना ॥ ९ ॥
आठवेना राम स्वामी त्रैलोक्याचा ॥ झालों कुटुंबाचा भारवाही ॥१०॥
उगवेना मन आठवे कांचन ॥ सर्व काळ ध्यान प्रपंचाचें ॥ ११ ॥
प्रपंचाचें ध्यान लागलें मानसीं ॥ चिंता अहर्निशीं दुश्चंचळ ॥ १२ ॥
चंचळ मानस संसार-उद्वेगें ॥ क्षणक्षणीं भंगे चित्तवृत्ति ॥ १३ ॥
वृत्ति कांता धन पाहे जनमान ॥ इच्छेचें बंधन दृढावलें ॥ १४ ॥
थोर होय व्यथा तारुण्याच्या भरें ॥ कामाचें काबरें आवरेना ॥१५॥
आवरेना क्रोध तेणें होय खेद ॥ वृत्तीचा उच्छेद करूं पाहे ॥ १६ ॥
अंतरलों भक्ति ठाकेना विरक्ति ॥ देवा तुझी प्राप्ति केवीं घडे ॥ १७ ॥
केवीं घडे प्राप्ति मज पतितासी ॥ झाल्या पापराशि सांगूं किती ॥१८॥
सांगूं किती दोष झाले लक्ष कोटी ॥ पुण्य माझे गांठीं आढळेना ॥१९॥
आढळेना पुण्य पापाचे डोंगर ॥ करीतां संसार माझें माझें ॥ २० ॥
माझी माता पिता माझे बंधुजन ॥ कन्या पुत्र धन सर्व माझें ॥२१ ॥
सर्व माझें ऐसा मानीला भरंवसा ॥ तुज जगदीशा विसरलों ॥ २२ ॥
विसरलों तुज वैभवाकरितां ॥ शेवीं माता पिता राम झालीं ॥२३॥
राम झाली माता देखत देखतां ॥ तरी म्हणे कांता पुत्र माझे ॥ २४ ॥
माझे पुत्र माझे स्वजन सोयरे ॥ दृढ देहीं भरे अहंभाव ॥ २५ ॥
अहंभावें मनीं दुःख आच्छादुनी॥ वर्ततसें जनीं अभिमानें ॥ २६ ॥
अभिमान माथां वाहें कुटुंबाचा ॥ अंतरीं सुखाचा लेश नाहीं ॥ २७ ॥
नाहीं नाहीं सुख संसारीं पहातां ॥ पुरे देवा आतां जन्म नको ॥२८॥
नको नको आतां घालूं या संसारीं ॥ पोळलों अंतरीं काय करूं ॥२९॥
काय करूं माझें नेणती स्वहित ॥ आपुलालें हित पहाताती ॥ ३० ॥
पहाताती सुख वैभवाचीं सखीं ॥ कोणी मज शेवीं कामा नये॥३१॥
कामा नये कोणी तुजवीण रामा ॥ नेई निजधामा माहियेरा ॥ ३२ ॥
जीवालागीं मज मोकलीलें देवा ॥ काय करूं हेवा प्रारब्धाचा ॥३३॥
प्रारब्धाचा ठेवा प्रपंचीं रंगला ॥ देहांतीं खंगला वृद्धपणीं ॥ ३४ ॥
वृद्धपणीं माझें चळलें शरीर ॥ श्रवण बधीर नेत्र गेले ॥ ३५ ॥
नेत्र गेले मज पहातां दिसेना ॥ स्वयें उठवेना पाय गेले ॥ ३६ ॥

पाय गेले तेणें दुःख होय भारी ॥ तेथेंचि बाहेरीं जाववेना ॥ ३७ ॥
जाववेना तेणें झालें अमंगळ ॥ अत्यंत कुश्चीळ वात पित्त ॥ ३८ ॥
वात पित्त जन देखोनी पळती ॥ दुर्गंधी गळती नव नाळीं ॥ ३९ ॥
नवनाळीं वाहे दुर्गंधी न साहे ॥ वांती होऊं पाहे देखतांची ॥ ४० ॥
देखती सकळ सुटले पाझर ॥ मळमूत्र धीर धरवेना ॥ ४१ ॥
नेदी कोणी कांहीं क्षोण झालों देहीं ॥ जीवलग तेही वोसंडीले ॥ ४२ ॥
वोसंडीलें मज वैभव गेलिया ॥ देह खंगलोया दुःख झालें ॥ ४३ ॥
दुःख झालें थोर क्षुधा आवरेना ॥ अन्नही जिरेना वांती होय ॥४४॥
वांती होय तेणें निर्बुजे वासना ॥ स्वादिष्ट चावेना दांत गेले ॥ ४५ ॥
दांत गेले तेणें जिव्हेसी बोबडी ॥ कंठ गडगडी बोलवेना ॥ ४५ ॥
बोलवेना अंत-काळींच्या विपत्ती ॥ सर्व ही म्हणती मरेना कां ॥४६॥
आला थोर त्रास जिवलग बोलती ॥ देवा याची माती उचलावी ॥४७॥
उचलावी माती सर्वांचे अंतरीं ॥ सुखाचीं सोयरीं दुरी ठेलीं ॥ ४८ ॥
दुरीं ठेलीं सर्व दुःखाचीं चोरटीं ॥ कोणीच संकटीं सोडवीना ॥ ४९ ॥
सोडवीना कोणी श्रीरामावांचुनी ॥ संकटीं धावणी राम करी ॥५०॥
राम करीतसे दासाचा संभाळ ॥ भक्तांचा स्नेहाळ राम माझा ॥ ५१ ॥

---

# मुक्तेश्वर.

एकनाथास लीलाबाई[1] म्हणून एक कन्या होती. तिचा मुलगा

---

१ एकनाथाचे चरित्रकार केशवदास व महीपति ह्यांचे लेख त्याच्या कुटुंबाच्या संबंधानें पुढें लिहिल्याप्रमाणें यथाक्रम आढळतातः—"श्रीनाथरूपेशी सत्पात्र ॥ गिरिजाबाई सुक्षेत्र ॥ प्रसवली ते पुत्र ॥ कन्या विचित्र पैं दोघी ॥ पुत्राभिधान ठेविलें हरी ॥ गोदूबाई जेष्ठ कुमरी ॥ चिंतोपंत प्रतिष्ठानपुरी॥ त्याचे घरीं ते अर्पिली॥ कनिष्ठ गंगाबाई ॥ कर्नाटकाप्रांतीं दिधली विवाहीं ॥ पुंड निजपुत्रप्राप्ति पाहीं ॥ हरिभक्ति तेही विशेष " ॥ " गिरिजाबाई सुक्षेत्र जाण ॥ प्रथम प्रसवली कन्यारत्न ॥ गोदूबाई नामाभिधान ॥ तिजकारणें ठेविलें ॥ तिचे पाठीवर पुत्र जाहला ॥ हरिनाम ठेविलें तयाला ॥ थोर होतांचि व्रतबंध केला ॥ पढों लागला ब्रह्म शाळे ॥ तयाचे पाठीवर कन्या पाहीं ॥ तिचें नाम गंगाबाई ॥ दिधली असे कवणे ठायीं ॥ वृत्तांत तोही अवधारा ॥ एक चिंतोपंत नामें निर्धारीं ॥ गृहस्थ होता प्रतिष्ठान

मुक्तेश्वर; हा जातीचा देशस्थ ब्राह्मण, पैठणचा राहणारा. ह्याचे बापाचें नांव विश्वंभरबावा. हा जन्मतः मुका होता, परंतु एकनाथाच्या कृपेनें त्यास वाचा फुटली, अशी कथा आहे.

मुक्तेश्वरानें भारताच्या अठरा पर्वांवर प्राकृत ओंव्या केल्या होत्या, परंतु त्यांपैकीं पहिलीं चार पर्वें मात्र हल्लीं प्रसिद्ध आहेत. बाकीचीं कोणीं द्वेषानें बुडविलीं असें म्हणतात. मुक्तेश्वरानें प्राकृत रामायणही केलें आहे, अशी प्रसिद्धि आहे. परंतु तो ग्रंथ सांपडत नाहीं.

मुक्तेश्वराच्या अंगीं कविताशक्ति चांगली होती. त्याची वर्णनाची शैली प्रौढ असून त्याच्या वाणींत माधुर्य हा गुण विशेष आहे.

जन्म शके १५३१ इ.स.१६०९.

### त्यानें केलेले ग्रंथ.

भारत, भागवत, शतमुख-रावणाख्यान.

हे सर्व ग्रंथ ओंवीबद्ध आहेत.

---

## वेंचे; आदिपर्वांतील.

ओंव्या.

### दुष्यंतशकुंतलाख्यान.

कौरववंशीं प्रख्यातकीर्ती ॥ दुष्यंतनामा गुणैकमूर्ती ॥ श्रेष्ठ भूपाळ चक्रवर्ती ॥ वीर्यें शौर्यें आगळा ॥ १ ॥ प्राची प्रतीची दक्षिणोत्तरा ॥ चारी दिशा चतुःसमुद्रा ॥ आक्रमूनि महीमहीध्रा ॥ सुरेंद्र जैसा भूलोकीं ॥ २ ॥ हिंसाकारी अधर्मकारी ॥ अथवा वर्णसंकरकारी ॥ दुष्यंतराज्यीं अनाचारी ॥ स्वप्नींही परी असेना ॥ ३ ॥ धर्मरीती धर्मधन ॥

---

क्षेत्रीं ॥ गोदूबाई ज्येष्ठ कुमरी ॥ तयाचे घरीं दीधली ॥ आणीक कर्नाटक देशांत ॥ जुना सोयरा नांदे गृहस्थ ॥ गंगाबाई त्याच्या पुत्रातें ॥ देवोनि त्वरित लग्न केलें ॥ गंगाबाईस पुत्र जाण॥ पुंडोजी त्याचें नामाभिधान॥ तोही करीत विष्णुभजन॥ निज प्रीतीनं आपुल्या ॥ " ह्या लेखांवरून पहातां लीलाबाई ही नाथाची मुलगी असावी असें दिसत नाहीं. कदाचित् दोघीं पैकीं एकीचें लीलाबाई हेंही नांव असेल. मुक्तेश्वराचा वरील मजकूर कविचरित्रांतून उतरून घेतला आहे. ह्या ग्रंथाच्या कर्त्यानें हा मजकूर कोणत्या आधारावरून लिहिला आहे हें कळत नाहीं.

सेवूनि संतुष्ट सर्व जन ॥ स्वस्वकर्मी सकळवर्ण ॥ विहिताचारें वर्तती ॥ ४ ॥ रोग दारिद्र्य कीं बंधन ॥ दुःख दुर्भिक्ष अकालमरण ॥ सर्प वृश्चिक तस्कर जाण ॥ दुष्यंतराज्यीं असेना ॥ ५ ॥ स्वकाळीं पर्जन्य वोपी उदका ॥ रत्नधान्यसमृद्धि पिका ॥ पृथ्वी पिके हे, मांत्रिकां ॥ फळे जैसी श्रीविद्या ॥ ६ ॥ विष्णुसमान-सत्ताबळ ॥ प्रतापतेजें सूर्य तेजाळ ॥ धरातुल्य सहनशील ॥ अक्षोभ जैसा सागरू ॥ ७ ॥ निपुण शस्त्रास्त्र-प्रहरणीं॥आरूढों जाणे सर्व-वहनीं ॥ ऐसा भूपाळ-चूडामणी ॥ दुष्यंतराजा भूलोकीं ॥८॥ सप्त समुद्रींचे लोट ॥ धरा-मंडळीं एकवट ॥ तैसे सेनेचे संघाट ॥ घेऊनि वना चालिला ॥ ९ ॥ वाजी वारण रथ पदाती ॥ संख्या करितां न करवे गणती ॥ सेना-वसनें सर्व जगती ॥ पांघुरविली समर्थे ॥ १० ॥ देखे प्रचंड महागिरी ॥ विशाळ पर्वताचिया दरी ॥ जळें तुंबलीं सरिता-सरीं ॥ समुद्रतुल्य अगाध ॥ ११ ॥ नाना वृक्षांची अचाट ॥ डांगें लांगलीं घनदाट ॥ माजी निर्झरोदकांचे पाट ॥ सरोवरा धांवती ॥ १२ ॥ मस्तकें उचलूनि दिनकर ॥ छाये रक्षिला अंधकार ॥ माजी श्वापदगणांचे भार ॥ सुखावती सुखवस्ती ॥ १३ ॥ मृग मारूनि असंख्यात ॥ भक्षूनि भर्जित अभर्जित ॥ पारधी खेळतां झाले श्रांत ॥ ते विश्रांती पावले ॥ १४ ॥ अवलोकूनि तें वन ॥ राजा करी पुढारां गमन ॥ तंव देखिलें कश्यपारण्य ॥ सिद्ध-साधकीं वसविलें ॥ १५ ॥ नदी मालिनी पवित्र-जीवनी ॥ वाहे जैशी देव-तटिनी॥ तरंगलिंगें[1] सुफेन-सुमनीं[2] ॥ सुपूजिता शोभती ॥ १६ ॥ साष्टांग करूनिया नमन ॥ राहवूनि सेना प्रधान ॥ निःसंग एकाकी आपण ॥ कश्यपाश्रमीं प्रवेशे ॥ १७ ॥ अवलोकूनि कश्यपाश्रम ॥ आंत जों पाहे नृपसत्तम ॥ तंव कण्वऋषीचा आश्रम ॥ अति रमणीय देखिला ॥ १८ ॥ आदरें जाऊनि तया निकटीं ॥ आंत पाहे पर्णकुटी ॥ मनुष्यावीण सर्व दृष्टी ॥ गृहसामग्री दिसताहे ॥ १९ ॥ मग गर्जूनि नराधीशें ॥ म्हणितलें आश्रमीं कोण असे ॥ हें परिसोनि इंदिरावेशें ॥ लावण्यकलिका प्रगटली ॥ २०॥ कनक-लतिका सौदामिनी॥ कीं चंद्रकलिका तनुधारिणी ॥ सुवर्ण-केतकी-पत्र-वर्णी ॥ सुवर्णखाणी हरिणाक्षी ॥ २१ ॥ रूप-यौवन-चातुर्यलता ॥ बाहेर पातली मुनीश्वर-दुहिता ॥ अत्यादरें

१ तरंग (लाटा) हींच (शिवाचीं) लिंगें. २ सुफेन ( शुभ्र फेस ) हींच सुमनें पुष्पें.

धरित्री-कांता ॥ पवित्रासन वोपिलें ॥ २२ ॥ स्वागत वदूनिया वचनीं ॥ अर्घ्यें पाद्यें विधि-पूजनीं ॥ राजा तोषवूनि बहु मानी ॥ कुशल वृत्त विचारिलें ॥ २३ ॥ दर्शनें आनंद जाहला नयना ॥ नामश्रवण करवावें श्रवणा ॥ परिचय[1]-ज्ञानें अंतःकरणा ॥ आप्तभाव भेटवणें ॥ २४ ॥ ऐकोनि चातुर्याची गोष्टी ॥ राजा चमत्कारला पोटीं ॥ म्हणे हे वयें अति धाकुटी ॥ परि विचारें वृद्ध दिसताहे ॥ २५ ॥ राजा बोले या जगती ॥ दुष्यंतनामा चक्रवर्ती ॥ ऐकिला असेल तरी हे मूर्ती ॥ ओळखें दृष्टी सुजाणे ॥ २६ ॥ कण्वऋषीचें दर्शन ॥ इच्छूनि येथें ममागमन ॥ केव्हां होईल बोल वचन ॥ विलंबें कीं अविलंबें ॥ २७ ॥ शकुंतला म्हणे नृपती ॥ मम पिता विवेकमूर्ती ॥ वनफळें घेऊनि शीघ्रगती ॥ आतांच येईल आश्रमा ॥ २८ ॥ यालागीं नरेंद्र-चूडामणी ॥ क्षण एक बैसावें या स्थानीं ॥ इच्छित कामना ऋषि-दर्शनीं ॥ पूर्ण होईल निर्धारें ॥ २९ ॥ राजा पुसे लावण्यराशी ॥ ऊर्ध्वरेता कण्वऋषी ॥ त्यास तूं कन्या झालीस कैशी ॥ हें मज कळलें पाहिजे ॥ ३० ॥ भुजंगवेणीधरा चतुरा ॥ म्हणे गा राजराजेश्वरा ॥ पूर्वीं एक तपस्वी घरा ॥ ऋषिदर्शना पातला ॥ ३१ ॥ तेणें पुशिलें तुमचिया ऐसें ॥ त्याप्रति कण्वें कथिलें जैसें ॥ तें मी सांगेन सावकाशें ॥ श्रवण केलें पाहिजे ॥ ३२ ॥ पूर्वीं गाधिज मुनी-द्रवर्यें ॥ खडतर करितां तपश्चर्यें ॥ देखूनि सांडिला धैर्य ॥ देवेंद्र कांपे चळचळां ॥ ३३ ॥ म्हणे इंद्रपदाची चाड ॥ धरूनि विश्वामित्रें वाड ॥ तपश्चर्या अति अवघड ॥ मांडिली असे निर्धारें ॥ ३४ ॥ यासि उपाय करावा कवण ॥ जेणें तयाचें सुकृत-धन ॥ हारवूनि हा ब्राह्मण ॥ दीन होय सर्व-स्वें ॥ ३५ ॥ ते वेळीं अप्सरांमाजि श्रेष्ठ ॥ मेनका पाचारूनि निकट ॥ तिये म्हणे हें माझें संकट ॥ वारि ऐसें करावें ॥ ३६ ॥ तूंवा जाऊनि तपोवना ॥ कौशिकऋषीच्या दर्शना ॥ विघ्न करावें जेविं दाना ॥ दुरुक्ती नाशी क्षणार्धें ॥ ३७ ॥ मेनका म्हणे अमरोत्तमा ॥ प्रतिसृष्टीचा अपर ब्रह्मा ॥ ज्याचे तपश्च-र्येचें तुम्हां ॥ भय सर्वदा अपार ॥ ३८ ॥ क्षोभवितां तयाची प्रतिमा ॥ स्वर्गासहित आम्हां तुम्हां ॥ भस्म करील येथें भ्रमा ॥ संशयाच्या न धरणें ॥ ३९ ॥ सुरेंद्र म्हणे मृगडोळसे ॥ बोलसी तितुकें ठाउकें असे ॥ तथापि आमु-च्या कार्योद्देशें ॥ अवश्य गेलें पाहिजे ॥ ४० ॥ शंका सांडोनि करीं

---

१ ओळख पटवून.

गमना ॥ ऐशी होतां सुरेंद्र-आज्ञा ॥ मेनका आली कौशिक-वना ॥ सालंकारा सुवस्त्रा ॥ ४१ ॥ विश्वामित्रासि करूनि नमन ॥ त्याचेच दृष्टीपुढें जाण ॥ क्रीडा-कौतुकें सुनर्तन ॥ दाविती झाली विनोदें ॥ ४२ ॥ तियेचा कटाक्षवज्राघात ॥ पडतां मुनिमानसगहनांत ॥ तपो-धैर्याचा पर्वत ॥ चूर्ण झाला क्षणार्धें ॥ ४३ ॥ ऋषीच्या अमोघ वीर्यें धरी॥ दिव्य गर्भ कन्याकारी ॥ हिमवंतगिरीच्या पाठारीं ॥ सांडूनि गेली अप्सरा ॥ ४४ ॥ वनीं एकलें सुंदर बाळ ॥ पडिलें देखोनि पक्षी सकळ॥ पक्षमंडपातळीं स्नेहाळ ॥ रक्षिते झाले साक्षेपें ॥ ४५ ॥ चंचूपुटीं मधु सुढाळीं ॥ मुखीं वोपिती क्षुधा-काळीं ॥ श्वापदें येऊं न देती जवळी ॥ झडपोनि लाविती परौतें ॥ ४६ ॥ अकस्मात तेणें पंथें ॥ कण्व-ऋषी पावला तेथें ॥ बाळ रक्षिलें शकुंतें ॥ देखोनि करी आश्चर्य ॥ ४७ ॥ उचलोनि ओसंगीं घेतलें ॥ गृहा आणोनी प्रतिपाळिलें ॥ म्हणूनि पिता येणें बोलें ॥ कथिलें तें म्यां यथार्थ ॥ ४८ ॥ शकुंतीं रक्षिलें वेल्हाळा ॥ यालागीं नाम शकुंतला ॥ हा काळपर्यंत भूपाळा ॥ पालन केलें स्नेहाळें ॥ ४९ ॥ वीर्यदानें उपजविता ॥ अन्नदानें प्रतिपाळिता ॥ संकटीं प्राणरक्षिता ॥ हे तिघे पिते बोलिजेती ॥ ५० ॥ पुसलिया प्रश्नाचें उत्तर ॥ तुज सांगितलें साचार ॥ कथा ऐकूनि राजेश्वर ॥ अति संतुष्ट मानसीं ॥ ५१ ॥ म्हणे हे मेनकेच्या उदरीं ॥ जन्मली ऋषीश्वर-वीर्यें खरी ॥ म्हणून हे दिव्य स्त्री निर्धारीं ॥ मनुष्यलोकीं दुर्लभ ॥ ५२ ॥ आमच्या ठायीं ठेवूनि भाव ॥ भार्या होय तो उपाव ॥ केला पाहिजे म्हणोनि राव ॥ बोलता झाला साक्षेपें ॥ ५३ ॥ राजा बोले अत्यादरें ॥ ऐकें मद्वाक्य साचारें ॥ भार्या होऊनिया चतुरे ॥ मनोरथ पुरवावे ॥ ५४ ॥ ऐकुनि राजमुखीची गोष्टी ॥ सारसाक्षी पैं गोरटी ॥ वचनसुमनें श्रवणपुटीं ॥ पूजितो झाली नृपातें ॥ ५५ ॥ धराधीशा धर्मपाळा ॥ तुझिया शुद्ध यशाचळा ॥ कीर्तिशृंग रविमंडळा ॥ भेदूनि गेलें सतेज ॥ ५६ ॥ कुकर्मकुलिश घेऊनि हातीं ॥ अमर त्यातें छेदूं इच्छिती ॥ हा उपाव माझिये मतीं ॥ अयुक्त ऐसा दिसताहे ॥ ५७ ॥ अमृत म्हणोनि हाळाहाळ ॥ प्राशी त्याचें कवण फळ ॥ बाळ म्हणोनि धरिला व्याळ ॥ अनर्थ वोजे रोकडा ॥ ५८ ॥ आम्हां स्त्रियांची संगती ॥ भली नव्हे गा मेदिनीपती ॥ मातला काम

भद्रजाती ॥ विवेकांकुशें वळवावा ॥ ५९ ॥ राजा म्हणे कनकलतिके ॥ बोलसी तितुकें परम निकें ॥ परस्त्री अभिलाषितां दुःखें ॥ भोगिती हे मानव ॥ ६० ॥ परस्त्री आणि परधन ॥ अखंड वांछी जयाचें मन ॥ तो जीतचि मेतासमान ॥ त्यासी सज्जन नातळती ॥ ६१ ॥ तूं तंव कुमारी ऋषिबाळा ॥ हातीं घेऊनि सुमनमाळा ॥ घालीं मजवर नृपाच्या गळां ॥ होईं अंतुरी सुजाणे ॥ ६२ ॥ अयोग्य वास तुज काननीं ॥ राजमंदिरीं गृहस्वामिणी ॥ होऊनि नानावस्त्राभरणीं ॥ देह शृंगारीं मत्संगें ॥ ६३ ॥ शकुंतला बोले वचन ॥ विध्युक्त न होतां पाणिग्रहण ॥ अविचारें घडतां संगमन ॥ अधःपात दोघांशी ॥ ६४ ॥ नृप म्हणे चातुर्यभरिते ॥ विशालाक्षी लावण्यसरिते ॥ विधि आठ विवाहातें ॥ ऐसें शास्त्रें बोलती ॥ ६५ ॥ अष्टविवाहांमाजी येथें ॥ गांधर्व बोलिजे श्रेष्ठ ग्रंथें ॥ तेणें विधी विवाह त्वरितें ॥ करूनि अंकीं आरूढें ॥ ६६ ॥ तयावरी चंद्रानना ॥ चारुहासा मृगनयना ॥ म्हणे राजया विचक्षणा ॥ विहित धर्म बोलसी ॥ ६७ ॥ कन्या-देह तंव निश्चिती ॥ दिधला पाहिजे पुरुषाहातीं ॥ तुज ऐसा विशिष्ट नृपती ॥ परम दैवें पाविजे ॥ ६८ ॥ तुझिया ऐसें माझिया चित्तीं ॥ वर्तताहे अत्यंत प्रीती ॥ परि वडिलां नेणतां हे रीती ॥ व्यभिचारदोष आणील ॥ ६९ ॥ यालागीं नावेक धरीं धीरू ॥ आश्रमा येईल ऋषीश्वरू ॥ वचन मान्य करूनि अत्यादरू ॥ मज वोपील तुज हातीं ॥ ७० ॥ नरेंद्र म्हणे वो सुजाणी ॥ विचारें आपें आप धनी ॥ आदिमध्य अवसानीं ॥ संगीं आपण आपणिया ॥ ७१ ॥ यालागीं आपुल्या देहदाना ॥ समर्थ करीं तूं आपल्या मना ॥ माझेनि संगें सर्व कामना ॥ पूर्ण तुझिया होतील ॥ ७२ ॥ ऐसें बोलतां धरारमण ॥ शकुंतला हास्यवदन ॥ म्हणे आतां ऐक वचन ॥ नियमाचें अवधारीं ॥ ७३ ॥ तुजपासोनि माझे पोटीं ॥ पुत्र जन्मेल जो या सृष्टी ॥ राज्यधर तो तुझिया पाटीं ॥ पदाधिकारी त्वां करणें ॥ ७४ ॥ ऐशिया नेमा देशील भाके ॥ तरी घडणार तें घडो सुखें ॥ हें ऐकोनि अत्यंत हरिखें ॥ राजा सरके पुढारां ॥ ७५ ॥ हस्त धरोनि स्वहस्तकें ॥ देता झाला त्रिवार भाके ॥ तुझा पुत्र निज निष्टंकें ॥ राज्यासनीं युवराजा ॥ ७६ ॥ हें माझें मतिज्ञावचन ॥ भंगूं न शके चतुरानन ॥ तें परिसोनि आग्रहवचन ॥ त्यागूनि भावें अनुसरली ॥ ७७ ॥ रायें मानिला दिव्य लाभ ॥ परि

उठावला ऋषिभयाचा कोंभ ॥ इंद्रापराधें गौतमक्षोभ ॥ तैसाचि घडेल ये ठायीं ॥ ७८ ॥ आतां येथूनि शीघ्रगती ॥ गमन करणें हेचि युक्ती ॥ ऐसें विचारूनि नृपती ॥ भार्येप्रती अनुवादे ॥ ७९ ॥ म्हणे आतां तुज-लागून ॥ मूळ धाडीन नगराहून ॥ छत्र चामरें शिबिका यान ॥ दासदा-सींसमवेत ॥ ८० ॥ ऐसें बोलोनि जाता झाला ॥ दळेशीं नगरा प्रवेश-ला ॥ मागें मुहूर्तानंतरें आला ॥ कण्वऋषी आश्रमा ॥ ८१ ॥ पुरुषसं-गें शंकायुक्त ॥ बाहेर न ये लज्जाभरित ॥ हें देखोनि सर्वज्ञनाथ ॥जाण-ता झाला मानसीं ॥ ८२ ॥ म्हणे माझिये निजात्मजे ॥ बाहेर येईं सांडूनि लज्जे ॥ कर्तव्य होतें तें सहजें ॥ सिद्धीस नेलें प्रारब्धें ॥ ८३ ॥ ऐकोनि पित्याची अभयवाणी ॥ कन्या येऊनि लागे चरणीं ॥ म्हणे म्यां व-रिला भूपाळ गुणी ॥ तो त्वां मान्य करावा ॥ ८४ ॥ कृपानुग्रह वर-प्रसादें ॥ गौरवी आशीर्वचनशब्दें ॥ ऋषि बोले परमाल्हादें ॥ चिरंजीव तव भर्ता ॥ ८५ ॥ शचीसुरेशांसारिखें ॥ दोघें असा अक्षय्य सुखें ॥ विष्णु-शक्तिसुतांशीं तुके ॥ ऐसा पुत्र लाधसी ॥ ८६ ॥ असो तोचि धरूनि दिवस ॥ चढतां वाढतां मासोमास ॥ शुक्लपक्षीं ताराधीश ॥ वृ-द्धि पावे पैं जैसा ॥ ८७ ॥ काळ होतां संपूर्ण ॥ पावता झाला पुण्य जनन ॥ धरामंडळीं देदीप्यमान ॥ अपर भानु पैं जैसा ॥ ८८ ॥ कुमार सुकुमार देवगर्भ ॥ कीर्ति-प्रासादीं विजयस्तंभ ॥ नानासौंदर्यतरूचा कोंभ ॥ धरामंडळीं उगवला ॥ ८९ ॥ क्रूर श्वापदांचे गण ॥ बळें करी त्यांचें दमन ॥ यालागीं ठेविलें अभिधान ॥ सर्वदमन तयाचें ॥ ९० ॥ होका उत्तमाची कुमारी ॥ बहुकाळ वर्ततां माहेरीं ॥ उद्धता होय वि-हिताचारीं ॥ लोक निंदा करिताती ॥ ९१ ॥ शिखा स्वस्थानीं साजिरी ॥ भर्तृगृहीं पवित्र नारी ॥ शोभा श्लाघ्य मान्यता थोरी ॥ उभयलोकीं ते पावे ॥ ९२ ॥ यालागीं कण्व म्हणे शिष्यांशी ॥ शकुंतला सुपुत्रासर-शी ॥ नेऊनि निवेदा रायासी ॥ हस्तिनापुरीं अविलंबें ॥ ९३ ॥ ऋषि-आज्ञेनें तापस-मेळा ॥ सवें भरत आणि शकुंतला ॥ गजपुरा पातला डोळां ॥ लोक देखती कौतुकें ॥ ९४ ॥ सभामंडपीं असतां नृपती ॥ मुनि-वरांसह राजयुवती ॥ राजकुमार धरूनि हातीं ॥ उभी ठेली सन्मुख ॥ ९५ ॥ अशीर्वाद जयजयकार ॥ करूनि बसला ऋषींचा संभार ॥ शकुं-तला आत्म-कुमार ॥ करीं धरूनि होय पुढें ॥ ९६ ॥ बलौदार्य-लाव-

ण्य-खाणी ॥ तनुज लाविला जनक-चरणीं ॥ म्हणे राजया अंकासनीं ॥ ठाव देईं बैसावया ॥ ९७ ॥ बहुत दिवस पाहिली वाट ॥ निष्ठुर नव्हे-सि कीं लोभिष्ट ॥ मी तव गृहस्वामिणी श्रेष्ठ ॥ गृहा पातलें आपुल्या ॥ ९८॥ सत्यप्रतिज्ञा नरेंद्रोत्तमा ॥ आठवूनि आपल्या नेमा ॥ युवराज्यीं भरतनामा ॥ पुत्र आपला अभिषेकीं ॥ ९९ ॥ विश्रमूनि कण्वाश्रमीं ॥ जो अर्थ कथिला वाङ्मियर्मीं[1] ॥ तो या काळीं क्रियाधर्मीं[2] ॥ करूनि दावीं यथार्थ ॥ १०० ॥ ऐकूनि शकुंतलेचें वचन ॥ केल्या कर्मांची आठवण ॥ मनें जाणतांही आपण ॥ जाला नेणता ते काळीं ॥ १ ॥ म्हणे तूं कैंची दुष्ट तापसी ॥ कोण कोठील कोणे देशीं ॥ कोणे ठायां एकांतवासीं ॥ संग झाला मी नेणें ॥ २ ॥ माझेनि वयें वय समान ॥ ताल—स्कंध बळ समान ॥ स्वल्पकाळें हा नंदन ॥ झाला कैसा नवल हें ॥ ॥३॥ पाहतां साक्षी न मिळे कांहीं ॥ मज तो अणुमात्र आठव नाहीं ॥ आतां आले पंथें जाईं ॥ शीघ्र येथूनि निर्लज्जे ॥ ४ ॥ आतां सांडोनि माझी गोष्टी ॥ संबंधवार्ता न वदें ओठीं ॥ स्वाश्रमा जाऊनि राहटी ॥ आवडे तैसी वर्ते कां ॥५॥ ऐसें बोलतां मेदिनीपाळा ॥ क्रोधें संतापली शकुंतळा ॥ जैशी प्रळयाग्नीची ज्वाळा ॥ स्पर्शों धांवे गगनातें ॥ ६ ॥ आरक्तता लेऊनि नयनें ॥ अंजन क्षाळिलें अश्रुजीवनें ॥ अधरस्फूर्ती जेंवि पवनें ॥ पद्मपत्रें थरकती ॥ ७ ॥ म्हणे धन्य गा पुरुषोत्तमा ॥ उत्तम ऐसेंचि रक्षिती नेमा ॥ कर्मसाक्षी अंतरात्मा ॥ तृप्त झाला या वचनीं ॥ ८ ॥ यथार्थ जाणतां अंतःकरणीं ॥ अन्यथा प्रतिपादी जो वचनीं ॥ तेणें कोणती पापकरणी ॥ केली नाहीं सांग पां ॥ ९ ॥ मी एक जाणता सर्वसृष्टी ॥ ऐसा अभिमान वाहसी पोटीं ॥ सकळ मूर्खांच्या शेवटीं ॥ कर्म करिशी त्यांतुल्य ॥ ११० ॥ ज्याचा असत्याचार कुकर्मा ॥ देखोनि मळपे अंतरात्मा ॥ त्यासि वोपोनिया यमधामा ॥ दंड करवी सुबद्ध ॥ ११ ॥ आतां असत्य-पर्वततळा ॥ उभा न राहें कुंभिनी-पाळा ॥ वरि पडेल वज्रशिळा ॥ परम अकीर्ति दोषाची॥१२॥ मस्तक होईल सहस्र भाग ॥ या बोलास न म्हणे वाउग ॥ न्यायें बोलतां उद्वेग ॥ विवेकीया न पवेचि ॥१३॥ सकळ ऐश्वर्य घेऊनि भेटी ॥ पद्मा पातली पायें लोटी ॥ तो सभाग्य कीं अभाग्य सृष्टी ॥ काय म्ह-

[1] प्रतिज्ञेनें. [2] आचरणानें.

णिजे सांग पां ॥ १४ ॥ अचल श्री अरोग काया ॥ सुगुण पुत्र पवित्र जाया ॥ बहुत जन्म हरिहरांच्या पायां ॥ भजतां हें फळ पाविजे ॥ ॥१५॥ आतां शेवटील या वचना ॥ साच ऐक गा नरभूषणा ॥ मी जातसें कश्यपारण्या ॥ कण्वाश्रमा सखेद ॥ १६ ॥ या आत्मजा आपुलिया ॥ आदरें अंगीकारावें राया ॥ योग्य न होसी त्यागावया ॥ सत्य सत्य त्रिवाचा ॥ १७ ॥ ब्रह्मवीर्यें माझें जनन ॥ वंचूनि पिता सुहृज्जन॥ तुज वोपिलें देहदान ॥ त्यास तूं उत्तीर्ण झालासी ॥ १८ ॥ ऐशीं प्रियेचीं पवित्र भाषणें ॥ दुष्यंत दूषी आपुल्या वचनें ॥ म्हणे बहु-भाषणी कवणें ॥ जिंकिली वचनें बोलतां ॥ १९ ॥ हीनजातीच्या त्या खुणा ॥ आतां जाणवल्या मना ॥ मेनका ते पण्यांगना ॥ धर्म-नष्टा बंधकी ॥१२०॥ तिचे उदरीं तव उत्पत्ती ॥ तिची निवडिली ऐशी रीती ॥ म्हणोनि खाण तैशी माती ॥ हेंचि लोकीं प्रसिद्ध ॥ २१ ॥ गळां पडोनि विषयस्वार्थी ॥ संबंध लाविशी मज समर्था ॥ अविचारबुद्धि सांडोनि आतां ॥ जाई स्थळा आपुल्या ॥ २२ ॥ क्षोभोनि बोले शकुंतला ॥ पवित्र विश्वामित्रबाळा ॥ राया भूमंडळपाळा॥तूंचि अविचारें जल्पसी ॥ २३ ॥ मेनका त्रिदशपंक्तिपावन ॥ लोकमस्तकीं जिचें गमन ॥ मी ही जाण तिजसमान ॥ देवतादेही दिव्य स्त्री ॥ २४ ॥ नरसिंहा सांडोनि कपट ॥ मांडिये बैसवीं कुमारश्रेष्ठ ॥ सत्य धर्म करीं प्रकट ॥ सर्वां वडिलां देखतां ॥ २५ ॥ सत्यापरतां नाहीं धर्म ॥ सत्य तेंचि परब्रह्म ॥ सत्यापाशीं पुरुषोत्तम ॥ सर्वकाळीं तिष्ठत ॥ २६ ॥ असत्य तेंचि पै पातक ॥ असत्य तोचि महानरक ॥ असत्याचेनि संगें दुःख ॥ अनंत जन्म भोगिती ॥ २७ ॥ सत्यामृताची कनकवाटी ॥ जोडिली न सांडें भूतटीं ॥ असत्यविषाची नरोटी ॥ पवित्रहातें नातळे ॥ २८ ॥ ते अवसरीं अशरीर वाणी ॥ गंभीर मेघाचिये ध्वनी ॥ होतां सकळ सभास्थानीं ॥ ऐकती मंत्री आचार्य ॥ २९ ॥ रे रे दुष्यंतराज नृपती ॥ झणी अवमानिशी हे सती ॥ जी क्षोभल्या सर्व जगती ॥ जाळूं सके क्षणार्धें ॥ १३० ॥ यालागिं पुत्र आपुला घेणें ॥ मानिनी मानें सदना नेणें ॥ आतां प्रतारणेचीं वचनें ॥ न बोलेंचि बहुसाळ ॥ ३१ ॥ ऐशी ऐकतां आकाशवाणी ॥ टाळी पिटली सभास्थानीं ॥ जयजयकाराचिये ध्वनी ॥ परम आल्हाद समस्तां ॥ ३२ ॥ राजा म्हणे वृद्ध हो ऐका ॥

हा सर्व अर्थ मज ठाउका ॥ परि शंकोनिया लौकिका ॥ कृत्रिम वाक्यें बोलिलों ॥ ३३ ॥ पहिलेंचि करितों अंगीकारू ॥ तरी लोक भाविते अनाचारू ॥ कामबुद्धीनें राजेश्वरू ॥ निषिद्धमार्गी राहाटला ॥ ३४ ॥ मग उठोनि लवलाहें ॥ पुत्र कडिये घेतला मोहें ॥ आवडी चुंबूनिया पाहे ॥ वारंवार वदनातें ॥ ३५ ॥ करूनि मूर्द्धाअवघ्राण ॥ आवडी देऊनि आलिंगन ॥ युवराज्यीं अभिषेचन ॥ करिता झाला तात्काळीं॥३६॥ आदरें प्रिया धरूनि हातीं ॥ नेली अंतरगृहाप्रती ॥ आलिंगूनि म्हणे चित्तीं ॥ विषाद कांहीं न मानावा ॥ ३७ ॥ सत्य वाटावया साचारें ॥

## नारदनीति[1].

वाक्य बोलिलों लोकाचारें ॥ तें तूं न मानूनिया चतुरे ॥क्षमा करणें मजलागीं ॥ ३८ ॥ म्हणोनि वस्त्रें दिव्याभरणें ॥ वोपिलीं जैशीं शचीरमणें ॥ राजसंपत्ति निज ठेवणें ॥ निवेदिली तिजहातीं ॥ ३९ ॥ पट्टमहिषींमाजी मुख्य ॥ पावली अनेक भोगसुख ॥ पूर्वीच्या नेमाहूनि अधिक ॥ ऐसें आलें प्रतीती ॥१४०॥ दुष्यंतानंतर भरत ॥ वीर प्रतापी ख्यात बहुत ॥ दुसरा राजा ब्रह्मांडांत ॥ नाहीं झाला पुरुषार्थी ॥ १४१ ॥

---

## ओंव्या—सभापर्व अध्याय ३.

धर्मराज मयासुरानें निर्मिलेल्या सभेंत बसला असतां नारदानें प्रश्नरूपानें जी त्यास राजनीति सुचविली ती येथें वर्णिली आहे.

नारद म्हणे महाराजा ॥ धर्म-स्वरूप धर्मात्मजा ॥ नामासारखी सुतेजा ॥ करणी निर्मळ असे कीं ॥ १ ॥ ऐश्वर्य लाधल्या संपूर्ण ॥ धर्मी वर्तत असे कीं मन ॥ राज्य-मदें दुरभिमान ॥ तुज संचरला नाहीं कीं ॥२॥ न्यायें अर्जिला जो अर्थु ॥ व्यय करिसी कीं धर्मार्थु ॥ विषय-काम-लोभानें तुझें चित्तु ॥ विटाळलें नाहीं कीं ॥ ३ ॥ वडील आचरले जो धर्म ॥ तोच चालविसी कीं नेम ॥ विहित-भंगाचा कर्दम ॥ तुज लेप-

---

[1] हीस किंचित्प्रश्न असेंही म्हणतात, पण मूळ शब्द कच्चित्प्रश्न असा आहे. भारतांत नारदानें प्रत्येक प्रश्न कच्चित् ह्या प्रश्नार्थक संस्कृत अव्ययानें केला आहे. त्यावरून कच्चित्प्रश्न असें नांव पडून पुढें त्याचा किंचित्प्रश्न असा अपभ्रंश झाला आहे.

ला नाहीं कीं ॥ ४ ॥ धर्मे अर्थ अर्थे धर्म ॥ धर्ममात्रीं पुरुषोत्तम ॥ चढता वाढता सुखोद्यम ॥ नित्यानित्य करिसी कीं ॥५॥ धर्मासी अविरोधी जो काम ॥ तोचि सेविसी कीं सुगम ॥ इंद्रिय-लोलुपतेचा भ्रम ॥ भ्राम झाला नाहीं कीं ॥ ६ ॥ नित्यनैमित्तिकीं कर्मीं ॥ वर्तत आहेसि कीं निष्कामी ॥ काम्य-निषिद्धांची ऊर्मी ॥ लोटिसी कीं आलिया ॥ ७ ॥ अनायासीं हो कीं सायासीं ॥ भाग्यें जोडिल्या संपत्तीसी ॥ विभागूनि समस्तांसी ॥ सेविसी कीं सुजाणा ॥ ८ ॥ अनुकूळ अथवा प्रतिकूळ ॥ अदृष्ट झालिया ही विकळ[1] ॥ धर्मापासूनि बुद्धी अचळ ॥ भ्रंश कांहीं न पवे कीं ॥ ९ ॥ अहोरात्रीं साठ घडी ॥ लोटितां पाप-पुण्याची जोडी ॥ किती झाली हें घडी घडी ॥ विचारीत अससी कीं ॥ ॥ १० ॥ अखंडैक-नाम-स्मरणीं ॥ देव केला असे कीं ऋणी ॥ जो पावोनि देह-मरणीं ॥ दास्य करी निजांगें ॥ ११ ॥ मोक्ष-द्वारींच्या द्वारपाळां ॥ आर्जवें भजसी कीं नृपाळा ॥ जे कां हात धरूनि डोळां ॥ सायुज्य-धाम दाविती ॥ १२ ॥ समता संतोष सद्विवेक ॥ चौथा साधुसंग देख ॥ यासीं करूनिया सख्य ॥ मित्र-भावें अससी कीं ॥ १३ ॥ काम-क्रोध-लोभ-त्रया ॥ मोह मद मत्सर यया ॥ वर्जिल्या नियोजिल्या ठायां ॥ जाणसी कीं जाणत्या ॥ १४ ॥ काम नसावा परस्त्रियेचा ॥ क्रोध नसावा सत्पुरुषाचा ॥ लोभ नसावा शरीराचा ॥ मोह पुत्राचा बाधक ॥ १५ ॥ मद नसावा सुहृद-जातीं ॥ मत्सर नसावा सर्वांभूतीं ॥ तुझी वर्तणुकीची शक्ति ॥ सांग ऐसी आहे कीं ॥ १६ ॥ काम असावा ईश्वर-भजनीं ॥ क्रोध असावा इंद्रिय-दमनीं ॥ तीर्थ[2]-प्रसाद-शेष-ग्रहणीं ॥ लोभ अपार असावा ॥ १७ ॥ मोह असावा सज्जनासीं ॥ मद असावा दुर्जनासीं ॥ मत्सर सदा संसारासीं॥असावा तो असे कीं॥१८॥ राज-चिन्हीं षड्विध[3] गुण॥सर्व[4] उपाय परम गहन ॥ बळाबळांचें[5] लक्षण ॥ जाणसी कीं चौदाही ॥ १९ ॥ आज्ञा कीर्ती द्विज-पाळण ॥ दान भोग मित्र-संरक्षण ॥ साही गुणीं तव प्रधान ॥ सालंकार असती कीं ॥ ॥२०॥ जाणती नाना व्यूहरचना ॥ थोडेनि जिंकिती बहुत सेना ॥ ऐसे तुझे विचक्षणा ॥ सेनापती असती कीं ॥ २१ ॥ निर्लोभिये विश्वा-

१ अभिष्ट. २ पूज्य. ३ हे पुढें ४१ व्या ओंवींत सांगितलें आहेत. ४ हे पुढें ४२ व्या ओंवींत. सांगितले आहेत. ५ हें पुढें ४३ व्या ओंवींत सांगितलें आहे.

सीक ॥ वंशज असती कीं सेवक ॥ जे स्वामिकाजीं देख ॥ देह देती सोडून ॥ २२ ॥ वेतन भक्षिती पवित्र ॥ राजद्रव्य ज्यां अपवित्र ॥ ऐसेनि योगें स्वतंत्र ॥ स्वव्यापारीं असती कीं ॥ २३॥ उत्तम-मध्यम-कनिष्ठ-पदीं ॥ योग्यायोग्यविचारनिधी ॥ परीक्षूनि विशाळ-बुद्धी ॥ योजिशी कीं नरेंद्रा ॥ २४ ॥ अमात्यपदीं दासीपुत्र ॥ अधम-स्थळीं परम-पवित्र ॥ अपूज्या पुजोनि सत्पात्र ॥ अवमानीत नाहींस कीं ॥ २५ ॥ अचाट कार्य साधी भृत्य ॥ वेतनाहूनि कोटि-गुणित॥ द्रव्य देऊनि त्याचें चित्त ॥ तोषवीत आहेस कीं ॥ २६ ॥ आपुले काजीं पावले मरण ॥ त्यांचीं कुटुंबें आश्वासून॥ आपुल्या कुटुंबासमान ॥ पाळिसी कीं दयाळा ॥ २७ ॥ दरिद्र-काळींचीं बाळमित्रें ॥ भेटों आलिया स्नेह-पात्रें ॥ वोळखी देऊनि दर्शनमात्रें ॥ श्रियावंत करिसी कीं ॥ २८ ॥ परगुण-परीक्षा जाणणें ॥ चित्त कळवळे पर-वेदने ॥ हीं मुख्य प्रभूंचीं लक्षणें ॥ तुझ्या ठायीं असती कीं ॥ २९ ॥ मंत्रियांच्या राहटी कैशा ॥ देती यशा कीं अपेशा ॥ चार-मुखें नित्य नरेशा ॥ विचारीत अससी कीं॥३०॥ नेमाहूनि आगळें धन ॥ घेऊन प्रजांतें पीडण ॥ करिती जे अयोग्य प्रधान ॥ ते पदा-तीत करिसी कीं ॥ ३१ ॥ राज-द्रव्य देऊनि भाग ॥ भूमिसेवा करिती सांग ॥ न करिती राजा-ज्ञेचा भंग ॥ प्रजा नेमें असती कीं ॥ ३२ ॥ वन-चर-दूतांचिया गोष्टी ॥ राष्ट्र अवलोकिशी कीं दृष्टी ॥ नष्टां-तस्करांचिया राहटी॥ भंगिसी कीं ऐकतां॥३३॥ तीर्थ-यात्रे जाती जन ॥ त्यांतें कोंडूनि घेती धन ॥ त्यांचें करूनिया हनन ॥ मार्ग मुक्त करिसी कीं ॥ ३४ ॥ सांगावया क्लेश-गोष्टी ॥ दुर्बळ येऊं इच्छिती भेटी ॥ तयां येतयां आड-काठी॥तुझ्या द्वारीं नाहीं कीं ॥३५॥ पर-राष्ट्र घ्यावया धाडिसी सैन्य ॥ जुंझती त्यांचें करूनि कंदन ॥ त्यांवांचून प्रजातें नागवण ॥ तुझेनें होत नाहीं कीं ॥ ३६ ॥ पिपीलिका लागे जेथें ॥ तात्काळ हात पावे तेथें ॥ दीनां पावतां दुःखातें ॥ क्लेशा-तीत करिसी कीं ॥ ३७ ॥ अंगींचें एक रोम उपडे ॥ तें जैसें त्दृदयांत ठाऊकें पडे ॥ तेवीं प्रजा पावतां पोडे ॥ जाणसी कीं तात्काळ ॥ ३८ ॥ तुझिया राज्यामाजी आज्ञा ॥ पुत्र पाळिती पितृ-आज्ञा ॥ न करितां पुरुषांची अवज्ञा ॥ स्त्रिया स्वधर्में असती कीं ॥ ३९ ॥ शरीरसंपत्ती मनो-भावा ॥ अर्पून करिती सद्गुरु- सेवा ॥ ऐसे शिष्य नर-पार्थिवा ॥

शिष्य-धर्में असती कीं ॥ ४० ॥ संधी विग्रह[1] यान आसन[3] ॥ द्वैधी-भाव[5] आश्रय[6] जाण ॥ हेचि साही राज-गुण ॥ विचक्षण बोलती ॥ ४१ ॥ साम दान भेद दंड ॥ इंद्र-जाळ मंत्रौषध[7] ॥ सप्तोपाय ऐसे सुबुद्ध ॥ पंडितवर्य बोलती ॥ ४२ ॥ आप-पराचें बळा-बळ[8] ॥ इहींसी चौदा[9] भेद कुशळ ॥ बोलती हें गूढ प्रांजळ ॥ करूनि तूतें दाविलें ॥ ४३ ॥ अथवा आणीक एक प्रकार ॥ चौदा भेद ग्रंथ-प्रकार ॥ बोलती ते सविस्तर॥मागुतेनि परियेसीं ॥ ४४ ॥ अंग-बळ सेना-बळ ॥ कोश-बळ दुर्ग-बळ ॥ शस्त्र-बळ मंत्र-प्रधान-बळ ॥ सुहृद-बळ आठवें ॥ ४५ ॥ वेदत्रय[10]-बुद्धि-बळ॥ब्राह्मण-शिष्य-सुकृत-बळ ॥ अन्यरायाचें साह्य-बळ॥ ऐसीं चौदा जाणावीं ॥ ४६ ॥ भृगु विशाळ अंगिरा मुनी ॥ ऐसे प्रगट वदले वाणी ॥ यावेगळे काय ते गुणी ॥ द्वैपायन स्वयें जाणे ॥ ४७ ॥ वर्ष-कार्य एक मास ॥ मासाचें तें एक दिवस ॥ दिवस-कार्य एक निमिष ॥ संपादीत असती कीं ॥ ४८ ॥ व्यास बोलिला गूढार्थु ॥ त्यांही न बोलतां प्रगटार्थु ॥ चतुर श्रोतियांचें चित्तु ॥ संतोषेल केसेंनीं ॥ ४९ ॥ श्रोत्रियें[11] कुटुंबी निर्धन ॥ साधु सात्विक-वृत्ति क्षीण ॥ त्याचें परिहरूनि दैन्य ॥ सदा पाळण करिसी कीं ॥ ५० ॥ दरिद्र ब्राह्मणाची जाया ॥ तारुण्य—काळीं अंतरे राया ॥ ऐकोनि त्याचिया विवाह—कार्या ॥ साह्य संपूर्ण करिसी कीं ॥ ५१ ॥ रोगें प्रवासीं पडिले ॥ कारागृहीं जे कां आटकले ॥ ते ते सांभाळूनि भले ॥ क्लेशातीत करिसी कीं ॥ ५२ ॥ गृहा पावलिया क्षुधा-पीडितें[12] ॥

---

१ तह. २ वैर. ३ शत्रुवर स्वारी करणें. ४ अनुकूल काल येई तोंपर्यंत किल्ला वगैरे सुरक्षित ठिकाणीं राहणें. ५ फितूर. ६ बलिष्ठाचा आश्रय. ७ मंत्रोपाय आणि औषधोपाय. ८ शत्रूची आणि आपली बराबरी आहे किंवा कांहीं न्यूनाधिक्य आहे हें बळाबळ पहाणें. ९ बळाबळ पहाण्याचे चौदा विषय म्ह० स्थानें आहेत, तीं हीं. १ देश, २ किल्ला, ३ रथ, ४ हत्ती, ५ घोडे, ६ योद्धे, ७ अधिकारी, ८ अंतःपुर, ९ अन्नाचा पुरवठा १० अश्वरथादिकांची संख्या, ११ नीति, १२ जमाखर्चाचा हिशेब, १३ द्रव्याचा पुरवठा, आणि १४ गुप्त शत्रु. १० आयुर्वेद, धनुर्वेद आणि गांधर्ववेद. ११ वैदिक. १२ क्षुधापीडित. पीडितें हें पीडित ह्या अर्थी पुढील प्रासासाठीं घातलें आहे. प्राकृत कवितेंत प्रासासाठीं पुष्कळ शब्द फिरविलेसे आढळतात.

ते तृप्त होऊनि पंचा-मृतें ॥ आशी-र्वचनीं स्व-स्थळातें ॥ तुजपासूनि जाती कीं ॥ ५३ ॥ लोक-लाजे त्यजितो प्राण ॥ अधनां धन-लुब्धाचें ऋण ॥ त्या उत्तमांचें ऋण-मोचन ॥ अतिसाक्षेपें करिसी कीं ॥ ५४ ॥ आवडीचे निज आप्त ॥ गुणी जामात श्रियावंतु ॥ तया ऐसे परम आर्तु ॥ याचकातें करिसी कीं ॥ ५५ ॥ तुझे ऋत्विज श्रुति-पारग ॥ सांग संपादिती याग ॥ तूं तें नेणतां कर्म व्यंग ॥ कदां होत नाहीं कीं ॥ ५६ ॥ वाजपेयादि[1] पुंडरीक ॥ अनेक ऋतुक्रिया याज्ञिक ॥ घृता-वदानीं यज्ञ-पुरुष ॥ सदा तृप्त करिती कीं ॥ ५७ ॥ ब्राह्मण स्थापिले वृत्ति-क्षेत्रीं ॥ ते ते अक्षयीं राजपत्रीं[2] ॥ भातें भक्षूनि पुत्रपौत्रीं ॥ विहित-धर्में असती कीं ॥ ५८ ॥ दुष्ट-ग्रहीं उघडितां मुख ॥ शांतिक करिसी कीं तात्काळिक ॥त्रिकाळ-ज्ञानी ज्योतिषी गणक॥शुभ-सूचक असती कीं ॥ ५९ ॥ नि-रापेक्ष असती कीं भांडारीं ॥ क्लीब रक्षक अंतःपुरीं ॥ शुची आप्त[3] तृप्त जठरीं ॥ पाक-कर्ते असती कीं ॥ ६० ॥ विषम देशाचिया संधीं ॥ अविचार शूर ठेविले युद्धीं ॥ दुर्गपर्वतीं स्थिर-बुद्धी ॥ धैर्यवंत असती कीं ॥ ६१ ॥ बोलों जाणती समयोचित ॥ चतुर जे कां शास्त्र-पंडित ॥ ते ते इष्टसाधनार्थ ॥ योजिसी कीं नरेंद्रा ॥ ॥ ६२ ॥ जितें-द्रिय ज्ञानवंत ॥ परमपवित्र साधु संत ॥ सभा-चारी सभे आंत ॥ निकट-वर्ती असती कीं ॥ ६३ ॥ दुष्ट दुर्जन क्षुद्र कोपी ॥ वाक्-निष्ठुर परमसंतापी ॥ पैशुन्य-वादी महा-पापी ॥ सभा-स्थानीं त्यजिले कीं ॥ ६४ ॥ अपमानिती संत साधू ॥ द्विजां देवां दोष-शब्दु ॥ बोलती त्यांचा जिह्वा-छेदु ॥ तात्काळिक करिसी कीं ॥ ६५ ॥ नरक-मोक्ष-पाप-चिन्ह ॥ जितांचि जाणशी सज्ञान ॥ जनाचे मुखीं निंदा स्तवन ॥ हें तंव जाणत अससी कीं ॥६६॥ जागा होवोनि अपररातीं ॥ सारासारविचार नीती ॥ मोक्षउपायें भवनिवृत्ती ॥ विचारीत अससी कीं ॥ ६७ ॥ अजिंक्य-शत्रूतें जिंकावें ॥ जिंकिल्यातें प्रतिपाळावें ॥ शरणा-गतांतें रक्षावें ॥ ऐसें करीत असती कीं ॥ ६८ ॥ वर्ष पालटूनिया जीर्ण ॥ दुर्ग-पर्वतीं नूतन धान्य ॥ यंत्रें[4] औषधी अक्षयीं जीवन ॥ संग्रहीत असती कीं ॥ ६९ ॥ पडलें खचलें जेथें जेथें ॥ तात्काळ स-

---

१ वाजपेय आणि पुंडरीक हे यज्ञाचे भेद आहेत. २ सनदांप्रमाणें. ३ विश्वासू. ४ लढण्याच्या प्रसंगीं उपयोगी पडणारीं यंत्रें.

रिसें करिती तेथें ॥ ऐसे शिल्पकार भृत्य ॥ वेतन-भोक्ते असती कीं ॥ ७० ॥ पशु पीडती पर्जन्यें ॥ गळती गाईचीं गोठणें ॥ वोढाळ चरती शाली-वनें ॥ ऐसें होत नाहीं कीं ॥ ७१ ॥ मठ वापिका देवा-गार ॥ भंगल्या जाणोन जीर्णोद्धार ॥ दीप नैवेद्य निरंतर ॥ चालवीत अससी कीं ॥ ७२ ॥ क्षुधित-वृद्ध-दरिद्र-मेळीं ॥ पीडोनि रोड दीन दुर्बळीं ॥ कर्दम-पंथें वर्षा-काळीं ॥ मार्ग चालत नाहीं कीं ॥७३॥ आपलें महत्व होईल शून्य ॥ म्हणोनि पुरोहित प्रधान ॥ श्रेष्ठ पातलिया दर्शना विघ्न ॥ करिती ऐसें नाहीं कीं ॥ ७४ ॥ आप्तसुव्हदां देती त्रास ॥ संत साधू पावती क्लेश ॥ ऐसिया दुर्गुणीयाचा त्रास ॥ तुज तंव झाला नाहीं कीं ॥ ७५ ॥ पर्व-काळीं स्त्री-संलग्न ॥ सूर्योदयीं निद्रासंपन्न ॥ एकल्या पंक्ती मिष्टान्न ॥ भक्षण घडत नाहीं कीं ॥ ७६ ॥ चहूंवर्णी आपुले पुत्र ॥ विहितविद्ये अति-पवित्र ॥ अनालस अहोरात्र ॥ अभ्यासवीत अससी कीं ॥ ७७ ॥ उग्र-कामी स्त्री-धन-हर्ता ॥ कुळवंताही[1] त्यागिती भर्ता ॥ तैसे तूतें धरत्री-नाथा ॥ प्रजाहीं त्यागिलें नाहीं कीं ॥ ७८ ॥ याचक त्यागिती पतितातें ॥ कुळें वाळिती[2] जातिभ्रष्टातें ॥ तेवीं सर्व लोकीं तूतें ॥ उपेक्षिलें नाहीं कीं ॥ ७९ ॥ सहस्र मूर्खांतें दवडून ॥ एक पंडित ज्ञान-संपन्न ॥ संग्रहूनि त्याचें मन ॥ स्वस्थ ऐसें करिसी कीं ॥ ८० ॥ एका दुष्टाची संगती ॥ यश-लाभ सुख-संपत्ती ॥ नासूनि भोगवी अपकीर्ती ॥ ऐसें जाणत अससी कीं ॥ ८१ ॥ आढ्य व्यसनी अनुरक्त ॥ मित्र उदासीन शत्रु अमात्य ॥ या सातांचें चित्ताकर्षित[3] ॥ जाणसी कीं सुजाणा ॥ ८२ ॥ तुवां अथवा तव प्रधानीं ॥ रहस्य बोलिजे एकांत स्थानीं ॥ तें बाहेर लोकांचे कर्णी ॥ प्रगट होत नाहीं कीं ॥ ८३ ॥ दुष्ट बळिष्ठ आज्ञारहित ॥ तदर्थी अपायविचार गुप्त ॥ प्रगटल्या नाश करिती बहुत ॥ हें तंव जाणत अससी कीं ॥ ८४ ॥ एक उघड बोलिजे जनीं ॥ एक मेरिजे महंत-कर्णी ॥ एक ठेविजे मनींचे मनीं ॥ हें जाणत आहेस कीं ॥ ८५ ॥ वैरिवर्गाचें वर्तन ॥ क्षणक्षणा व्हावया ज्ञान ॥ गुप्त ठेवून चार-गण ॥ विचारीत अससी कीं ॥ ८६ ॥ तुजसी दाऊनि आप्तता ॥ शत्रुसी पाववितो वार्ता ॥ ऐसे कोण ते तत्वतां वोळखोनि अससी कीं ॥ ८७ ॥ वार्ता आणिती वार्तिक ॥ ते नेणती

१ कुलीन स्त्रियाही. २ वाळींत टाकतात. ३ चित्तांत आणलेलें.

एका एक ॥ नित्यनित्य अनोळख ॥ प्रेरिसी कीं सुजाणा ॥ ८८ ॥ बहुत लाधे स्वल्पयत्नीं ॥ तेथें आलस्य नसे कीं मनीं ॥ स्वल्प लाभ बहुत हानी ॥ तेथें उद्योग नसे कीं ॥८९॥ राज्य रक्षिती झुंझार बळी ॥ संपूर्ण अथवा नियमकाळीं ॥ वेतन पावोनि तुझ्या दळीं ॥ एक चित्तें असती कीं ॥ ९० ॥ ज्याचेनि कार्य-साधन पुढें ॥ ते पावतां वेतन-पीडे ॥ समयीं महाअनर्थ घडे ॥ हें जाणसी कीं नरेंद्रा ॥ ९१ ॥ अर्थ-संग्रह पाहोनि जोडीं ॥ चतुर्थांश वेतनें दवडीं ॥ सकळ वेंचूनि हस्त झाडी ॥ हे तुज खोडी नाहीं कीं ॥ ९२ ॥ अर्थ-व्ययाचे अधिकारी ॥ गणक लेखक प्रथम-प्रहरीं ॥ सिद्ध-पत्रें धरूनि करीं ॥ उभे सन्मुख असती कीं ॥ ९३ ॥ आरूढलीया भद्रासनीं ॥ राज-दर्शना येईजे जनीं ॥ टिळा-माळा-वस्त्रा-भरणीं ॥ देखसी कीं साजिरें ॥ ९४ ॥ रक्तां-बरी खड्ग-धार ॥ किरीट-कुंडलीं साळंकार ॥ सुहृद-क्षत्रियांचे भार ॥ उभय-भागीं असती कीं ॥ ९५ ॥ श्रेष्ठ-सत्पात्रीं वोपितां दान॥ योगियां विशेष अर्पितां धन ॥ दुष्ट पुरोहित प्रधान ॥ विघ्न-कर्ते नसती कीं ॥९६॥ नगर रक्षावयाकारणें ॥ कीजेत ग्रामार्चीं पट्टणें ॥ घोष घोष ग्राम-तुल्य करणें ॥ ऐसें करीत अससी कीं ॥ ९७ ॥ पर्वतसंधी घांट बेटा ॥ वोस रानें पाहोनि चोखटा ॥ तेथें वसवूनिया पेटा ॥ मार्ग मुक्त करिसी कीं ९८ ॥ नापेक्षितां मेघजळें ॥ सर्वदां पिकें पिकती सकळें ॥ अभंग तडागें पाटस्थळें ॥ पैं निर्मळ असतीं कीं ॥ ९९ ॥ कृषीवळें खंगलीं भणंगें ॥ धन-धान्य ओपूनि अंगें ॥ शेतानिशीं राजभागें ॥ पाळिशी कीं नरेंद्रा ॥१००॥ लुब्ध तस्कर लेखन-कारी ॥ राजस्त्रिया राजकुमरी ॥ प्रजालागीं बळात्कारीं ॥ पीडित नाहींत कीं ॥ १ ॥ हिंसक आततायी[1] सिंध ॥ त्यांचा श्रवणीं पडतां शब्द ॥ आधीं करूनिया वध॥ मग विचार करिसी कीं ॥ २ ॥ उदर-पीडेचिया महा-मारीं ॥ उत्तमें ही करितां चोरी ॥ धरूनि आणितां राज-हेरीं[2] ॥ मानें मुक्त करिसी कीं ॥ ॥ ३ ॥ उगाणितां[3] पर-राजातें ॥ जे जे वस्तु लाधली ज्यातें ॥ ते ते मुक्त[4] करोनि त्यातें ॥ तोषवोत अससी कीं ॥ ४ ॥ औषधनेम शरीरातें ॥ वृद्धसेवन मानसातें ॥ दो प्रकारें आपणातें ॥ रक्षिसी कीं सुजाणा ॥५ ॥

---

१ अविचारानें दुसऱ्याचा प्राण घेण्यास तयार किंवा प्राण घेणारा. २ चेटकी.
३ जिंकितां. ४ बक्षीस; माफ.

पराच्या पक्षीं अष्टादश ॥ आपुले पक्षीं पंचदश ॥ गुण बोलिले ते विशेष ॥ जाणसी कीं नरेंद्रा ॥ ६ ॥ द्यूत निद्रा अन्न पान ॥ स्त्रीसंयोग व्यय व्यसन ॥ काळ पाहोनि विचक्षण ॥ करिती तैसें करिसी कीं ॥ ७ ॥ अष्टांग चतुर्विध बळें ॥ शत्रु जिंकिजे बुद्धिकुशळें ॥ व्यसनीं क्षीणले आगळे ॥ आदरें वश्य करिसी कीं ॥ ८ ॥ परहितार्थ संत साधु ॥ जे सांगतो बुद्धिवादु ॥ ते मानूनि परम बंधु ॥ वर्तसी कीं तदाज्ञा ॥ ९ ॥ अंतःकरण आणि शरीर ॥ नियमीं न पावे विकार ॥ शब्द तो सजीव गिरिवर ॥ न चळे न ढळे नुखळे कीं ॥ १० ॥ ज्ञातो गुरु देवप्रतिमा ॥ यज्ञमंडप चैत्यद्रुमा ॥ देखताक्षणीं राजोत्तमा ॥ नमस्कार करिसी कीं ॥ ११ ॥ वृद्ध तापस ब्राह्मणपंक्ती ॥ अश्व भांडार भद्रजाती ॥ ध्वजा प्रासाद पवित्रक्षिती ॥ देखतां वंदन करिसी कीं ॥ १२ ॥ दंडित्यातें प्रत्यक्ष यमु ॥ पूज्याप्रती परम सौम्यु ॥ परीक्षोनि अधमोत्तमु ॥ वर्तसी कीं शाहाणिया ॥ १३ ॥ कार्यसाधनीं अति ने-

---

१ शत्रूकडील अठरा अधिकारी आणि आपणाकडील पंधरा अधिकारी ह्यांच्या वर्तनाची बातमी राजानें नेहेमीं ठेवावी, असें राजनीतीमध्यें सांगितलें आहे. ह्यास येथें गुण म्हटलें आहे, परंतु नीतिशास्त्रांत ह्यांस तीर्थ असें म्हणतात. असें म्हणण्याचें कारण हे राज्यांत सर्व अधिकाऱ्यांमध्यें मोठे मान्य अथवा उपयुक्त असतात. त्यांचीं नावें–१ मंत्री. २ पुरोहित. ३ युवराज. ४ सेनापति. ५ द्वारपाल. ६ अंतर्वेशिक (राजाची भेट करून देणारे), ७ कारागाराधिकारी (तुरुंगावरचा अधिकारी) ८ द्रव्यसंचयकृत् (जामदार). ९ योग्यायोग्य पाहून द्रव्य खरचणारा, १० प्रदेष्टा (मसलत देणारा), ११ नगराध्यक्ष (कोतवाल), १२ कार्यनिर्माणकृत् (घरें, रस्ते वगैरे बांधणारे) १३ धर्माध्यक्ष, १४ सभाध्यक्ष, १५ दंडपाल. (न्यायाधीश), १६ दुर्गपाल (किल्लेदार), १७ राष्ट्रांतपालक (हद्दीवरचा संरक्षक) आणि १८ अटवीपालक (अरण्यसंरक्षक). ह्या अठरांमध्यें आपणाकडील मंत्री, युवराज आणि पुरोहित हे तीन कमी करून आपणाकडे १५ सांगितले आहेत. २ रथ, हत्ती, घोडे, योद्धे, पायदळ, कर्मकार (रस्ता साफ करणें वगैरे काम करणारे), चार, आणि दैशिकमुख्य (राज्यांतील ठिकठिकाणचे मुख्य मुख्य लोक). ही सैन्याचीं आठ अंगें. ३ मौल (मुळापासूनचे म्हणजे पिढीजादे शिपाई), मैत्र (स्नेहामुळें शिपाइगिरी पतकरलेले), भृत्य (दरमहा देऊन नवे ठेवलेले) आणि आटविक (रानटी) हे सैन्याचे चार प्रकार. ४ पवित्र स्थलीं उगवलेला किंवा पार बांधलेला उंबर. ५ हत्तीमध्यें ही एक जात आहे.

टके ॥ त्यांचें स्तवन करिसी मुखें ॥ सभामंडपीं नानाधिक्यें ॥ गौरवीत असती कीं ॥ १४ ॥ अग्नि सर्प चोर व्याघ्र ॥ रोग राक्षस कां परचक्र ॥ यांपासाव आपुलें राष्ट्र ॥ रक्षिसी कीं बळिष्ठा ॥ १५ ॥ अंध मुके पंगु व्यंग ॥ आतुर संन्यासी अव्यंग ॥ पितयाऐसें सांगोपांग ॥ पाळण त्यांचें करिसी कीं ॥ १६ ॥ नास्तिक्य अनृत सक्रोधता ॥ प्रमाद आणि दीर्घसूत्रता॥कार्यीं आलस्य क्षिप्रवत्ता ॥ निश्चिताचा नारंभु॥१७॥ ज्ञानीयाचें अदर्शन ॥ अज्ञानाचें दृढ चिंतन ॥ अनर्थीं एकनिष्ठ मन ॥ अरक्षण मंत्राचें ॥ १८ ॥ मंगळाचा अप्रयोग ॥ विषयाचा अति प्रयोग ॥ चौदा दोषीं तुझें अंग ॥ सांग स्पर्शलें नाहीं कीं ॥ १९ ॥ निद्रा आलस्य भय क्रोधता ॥ अमार्दव आणि दीर्घसूत्रता ॥ साही अनर्थां चिया माथां ॥ पाय देऊनि असती कीं ॥ २० ॥ सफळ दारा सफळ वित्त॥सफळ वेद सफळ श्रुत॥तुझें असे कीं निश्चित॥हें प्रगटार्थ परिसे पां ॥२१॥ सफळ दारा रती पुत्र॥सफळ वेद अग्निहोत्र ॥दत्तभुक्तीनें पवित्र॥ सफळ वित्तें जाणसी कीं ॥ २२ ॥ श्रुत्यर्थ बोधला जो अर्थ ॥ त्या नांव श्रुतज्ञान म्हणत ॥ याचें फळ शीळ-वृत्त ॥ त्या आचारें असती कीं ॥ २३ ॥ परद्वीपींच्या अमोल्य वस्त ॥ वणिक आणीत इच्छूनि अर्थु ॥ त्यांचा पुरवूनि मनोरथु ॥ लाभ चौगुणीं देसी कीं ॥ २४ ॥ देशावरा पातले अर्थी ॥ द्रव्य देऊनि त्यांचे आर्ती ॥ जगीं जोडावी सत्कीर्ति ॥ हे तुज इच्छा असे कीं ॥ २५ ॥ विषमकाळास्तव पातले ॥ कलत्र-पुत्र वंशज भले ॥ ते ते मानूनि आपुले ॥ आपणा ऐसे करिसी कीं ॥ २६ ॥ शत्रुनाशालागीं आघवे ॥ विषप्रयोग जाणसी बरवे ॥ वास-पुष्प-फळांसवें ॥ प्राण घेसी पराचे कीं ॥ २७ ॥ निर्दोषियां दोषारोपु ॥ निर्धनियां धनसंकल्पु ॥ दुर्गुणी यांचा दुर्गुणलोपु ॥ तुझ्या नगरीं नाहीं कीं ॥ २८ ॥ आचार दाऊनि लोक-दृष्टी ॥ अंतरीं अनाचार राहटी ॥ ऐसे दांभिक तुझ्या निकटीं ॥ वर्तणारे नसती कीं ॥ २९ ॥ तोंडें बोलोनिया ब्रह्म ॥ भंगिती सदाचार धर्म ॥ प्रशंसिती अविचारकर्म ॥ ते संसर्गी त्यजिले कीं ॥ ३० ॥ दाऊनि योगियाचें

---

१ अंगानें विकल किंवा हीन. २ दुर्लक्ष्य. ३ चेंगटपणा. ४ घाई, त्वरा. ५ एकाग्र अथवा तल्लीन. ६ जो मंत्र म्ह० युक्ति सांगितली त्याप्रमाणें न करणें. ७ देवाचा उत्सव वगैरे मंगलकार्य न करणें. ८ दान व भोग ह्यांनीं. ९ इच्छेप्रमाणें.

चिन्ह ॥ पोसिती उदर आणि मन ॥ त्यांच्या ठायीं तुझें मन॥ विश्वासत नाहीं कीं ॥३१॥ धनिक वेची धनातें ॥ दरिद्री नाचरे तपातें ॥ शास्त्र चालतां कुपंथें॥दंडिसी कीं निजाज्ञे॥३२॥माता पिता दवडूनि दुरीं॥श्वशुर-वर्ग सांठवी घरीं॥ऐसा कुश्चिताचार परी॥तुझे देशीं नाहीं कीं॥३३॥सुना छळिती सासुवांतें॥पुत्र आव्हेरिती पित्यातें॥ सेवक अवगणिती स्वामीतें ॥ऐसें होत नाहीं कीं॥३४॥एवं सर्वांपरी जाण॥राजा असावा सावधान॥ हेंचि विस्तारें निरोपण ॥ पुण्यश्लोकीं बोधिलें ॥ ३५ ॥ जो कां राजा ऐसियापरी ॥ चहूं वर्णांचें पालन करी ॥ पृथ्वी भोगूनि लोकांतरीं ॥ शक्रसायुज्य स्वयें पावे ॥ ३६ ॥ ऐसे परीचे उत्तम गुण ॥ तुझे ठायीं असावे पूर्ण ॥ ऐसें आमुचें इच्छी मन ॥ किंचित्-प्रश्न या नांवें ॥ ३७॥ किंचित् कामपरवेदने[1] ॥ ऐसें बोलती पंडित शहाणे ॥ तेंचि विस्तारूनि मनें ॥ तुज कारणें बोलिलों ॥ ३८ ॥ ऐकोनि नारदाचें वचन ॥ आश्चर्य करी कुरुनंदन ॥ म्हणे येवढा विचक्षण ॥ होय सर्वज्ञ देवऋषी ॥ ३९ ॥ पुढती पार्थिवाचेनि प्रश्नें ॥ लोकपाळसभासदनें ॥ व्यास गुरु वर्णील वदनें ॥ तें सज्जनीं परिसावें ॥ ४० ॥ सभापर्वीं नारद-नीती ॥ उद्योग-पर्वीं विदुर-नीती ॥ भीष्मपर्वीं कृष्ण-नीती ॥ भगवद्गीता ज्या नांव ॥ ४१ ॥ भारत-कथा-संक्रमणीं ॥ निरोपण-रूपें तीळवेणीं ॥ वाटितां म्हणतसे अवदानीं ॥ ल्हाणें असो श्रोतयां ॥ ४२ ॥ लीळा विश्वंभर-पादाब्जीं ॥ मुक्तेश्वर षट्पद सहजीं ॥ गुंजारव करितां रुंझी ॥ भारत-कथा प्रगटली ॥ ४३ ॥ इति श्रीसभापर्व भारतीं ॥ पुढें अवधान द्यावें श्रोतीं ॥ किंचित्-प्रश्नाची समाप्ती ॥ तृतीयाध्यायीं बोलिलों ॥ १४४ ॥

---

# मोरोपंत.

पुण्याहून सुमारें ३० कोसांवर बारामती म्हणून गांव आहे. तेथें बापूजी नाईक जोशी म्हणून कोणी जहागीरदार गृहस्थ राहत असे.

---

१ हें वाक्य मूळच्या संस्कृत 'कच्चित् कामप्रवेदने' ह्या वाक्याचा अपभ्रंश होऊन झालें आहे. ह्याचा अर्थ "अमुक गोष्ट अशा प्रकारची असावी अशी आपली इच्छा असून ती तशी आहेना असा दुसऱ्यास प्रश्न करावयाचा असतां 'कच्चित्' ह्या प्रश्नार्थक अव्ययाची योजना करावी" असा आहे. कवीनें ही हा अर्थ मागच्या ओंवींत सांगून त्यास आधार अमरसिंहाचें वाक्य दिलें आहे, असें दिसतें. २तीळकूट.

त्याच्या पदरीं बापूजोपंत ऊर्फ रामचंद्रपंत पराडकर म्हणून कारकून होता, हा जातीचा कऱ्हाडा ब्राह्मण, त्याचा पुत्र मोरोपंत. हा कोल्हापुरानजीक पन्हाळा म्हणून गांव आहे तेथील राहणारा.

कारकुनाचा मुलगा असतां मोरोपंत संस्कृत शिकून मोठा विद्वान् झाला. तो पुराण सांगत असे. असें सांगतात कीं, बापूजी नाईक मोरोपंताचें पुराण ऐकून खुष झाला व त्यानें त्यास सालीना ५०० रुपये वेतन देऊन आपणाजवळ पुराण सांगण्यास ठेविलें.

मोरोपंत जसा संस्कृतभाषेंत निपुण होता, तसा देशभाषेंतही निपुण होता. त्याला लहानपणापासून कविता करण्याचा छंद असे. त्यानें पुष्कळ कविता केली; कांहीं संस्कृत व बाकी सर्व प्राकृत. त्याच्या आर्या फार आहेत. श्लोक थोडे आहेत. त्यानें कांहीं साक्या आणि कांहीं पदेंही केलीं आहेत.

मोरोपंताची वाणी प्रौढ, शुद्ध, सरळ आणि स्थळविशेषीं फारच रसाळ आहे. त्याच्या कवितेंत प्रासयमकादि शब्दालंकार आणि उपमा, रूपक, उत्प्रेक्षादि अर्थालंकार फार आहेत. ह्याचे कवितेंत संस्कृत शब्द फार आहेत आणि रचनाही कित्येकठिकाणीं कठिण आहे.

मोरोपंत शके १७१० त काशीस गेला, तेव्हां त्यानें आपली कविता बरोबर नेली होती. ती काशींतल्या पंडितांनीं पसंत केली असें म्हणतात.

मोरोपंत आपल्या वयाच्या ६५ वे वर्षी वारला. त्याचे वंशज हल्लीं पंढरपुरास आहेत.

| | | |
|---|---|---|
| जन्म शके १६५१ | | इ०स० १७२९. |
| मरण शके १७१६ | चैत्र शुद्ध १५. | इ०स० १७९४. |

## त्यानें केलेले ग्रंथ.

भारत ( १८ ही पर्वें ), भागवत ( दशमस्कंध व इतर स्कंधांतील फुटकळ आख्यानें ), रामायणें ( हीं १०८ आहेत असें म्हणतात ). ह्यांवर व इतर पुराणांतील कांहीं आख्यानांवर ( मुख्यत्वें करून ) आर्या व क्वचित् श्लोक असे आहेत. ह्यांशिवाय ह्यानें केलेलीं पदें, साक्या हींही प्रसिद्ध आहेत.

## स्फुट आर्या. गीतिछंद.

आर्या[1] आर्यांसि रुचे ईच्या ठायीं जशी असे गोडी ॥
आहे इतरां छंदीं गोडी परि यापरीस ती थोडी ॥ १ ॥
काव्य करावें म्यां नच वचकावें दूषितो परि लघूस ॥
कां न सदन बांधावें कीं त्यांत पुढें बिळें करिल घूस ॥ २ ॥
आर्यकथांछंदानें[2] आर्याछंदेंचि जन्मलीं सरलें[3] ॥
यांहीं माझें तनुवाक्कर्ममनःपाप[4] सर्वथा सरलें ॥ ३ ॥
गीर्वाणशब्द[5] पुष्कळ जनपद[6]भाषाचि देखतां थोडी ॥
यास्तव गुणज्ञ लोकीं याची घ्यावी हळू हळू गोडी ॥ ४ ॥
प्राकृतसंस्कृतमिश्रित यास्तव कोणी म्हणेल ही कंथा ॥
भवशीतभीतिभीतस्वांताला[7] दाविला बरा पंथा ॥ ५ ॥
भगवद्भक्तानुज्ञा कीं गाव्या सत्कथा यथामति तें ॥
स्वीकारिलें स्वहित म्यां नमुनि स्वसुरद्रुमा[8] रमापतितें ॥ ६ ॥
नमिला गजमुख ज्याचे सेवुनि मृदु मधुर बोल कानांहीं ॥
चुंबुनि शंभु म्हणे बा तुजसम आम्नाय बोलका नाहीं ॥ ७ ॥
ज्यांच्या त्द्दत्कासारीं[9] होय गुणस्नेहबिंदु[10]ही फार ॥
सारज्ञ[11] असूयोज्झित[12] त्यांला माझा असो नमस्कार ॥ ८ ॥
श्रीकृष्णाचें चित्तीं चिंतावें सुचिर चारु पदकमळ ॥
प्रक्षाळी त्द्दयींचा जें श्रीवक्षस्थळैकपदक[13] मळ ॥ ९ ॥
सेवुनि संतत पाला संत तपाला यदर्थ[14] करितात ॥
तो प्रिय या स्तवना कीं यास्तव नाकीं हि तेंचि[15] वरितात ॥ १० ॥

१ आर्याछंद. २ श्रेष्ठ लोकांच्या कथांचा (लिहिण्यावाचण्याचा) छंद असल्यामुळें. ३ सोपीं–सरळ (हें आर्या छंदांचें विशेषण). ४ शरीर व वाणी ह्यांचें कर्म आणि मन ह्यांपासून झालेलें पाप. ५ संस्कृत शब्द. ६ देशभाषा. ७ संसार हीच थंडी तीपासून उत्पन्न होणाऱ्या भीतीनें भ्यालेल्या अशा अंतःकरणाच्या पुरुषास. ८ आपल्या भक्तांस कल्पवृक्षासमान. ९ त्द्दयरूप सरोवरांत. १० गुण हाच स्नेह (तेल) त्याचा बिंदु (थेंब) दुसऱ्याचा अत्यल्पही गुण ज्यांस मोठा वाटतो, असें तात्पर्य. ११ कोणत्याही गोष्टीचें मर्मज्ञ–मार्मिक–तत्व समजणारे. १२ ज्यानीं मत्सर सोडिला आहे असें; म्ह० ज्यांच्या मनांत हेवा नाहीं. १३ लक्ष्मीच्या वक्षस्थळींचें अद्वितीय पदकच. (भगवान् शेषावर शयन करीत असतां लक्ष्मी त्याचा एक पाय आपल्या वक्षस्थळीं धरून सेवा करीत असते, म्हणून तो पाय कवीनें पदक कल्पिला आहे. १४ ज्या परमेश्वरासाठीं. १५ स्तवन.

भक्तीनें मन ज्याच्या पदपद्मीं मधुप करुनिया योगी ॥
ज्याचें गातां नाम त्यजुनि तनु-भ्रमहि[1] मुक्तिपद भोगी[2] ॥ ११ ॥
जरि बोबडें पित्याचें मोहावें मन तथापि तोकानें ॥
प्रभु साळ्या-भोळ्यांची बहु वात्सल्यें कथा पितो कानें ॥ १२ ॥
दूर असो दीन असो दासाची विठ्ठलासि आठवण ॥
नामचि पुरे, न घ्यावे अष्टांगीं नमन करुनि आठ वण ॥ १३ ॥
भ्रष्ट अजामिळ[3], गजवर[4] पशु, बाळ[5] ध्रुवहि, पिंगळा[6] गणिका ॥

---

१ 'देह हाच मी' असा भ्रम. २ ह्याचा कर्ता "योगी". ३ हा एका विद्वान् व अग्निहोत्री अशा ब्राह्मणाचा मुलगा होता. तो एकदा बनांतून समिधा, दर्भ घेऊन परत येत असतां त्यानें वाटेंत एक शूद्रस्त्री पाहिली; ती फार सुरूप असल्या मुळें तिला पाहून अजामिळ भुलला. त्याच्याप्रमाणेंच तीही त्याला पाहून भुलली व तिलाही त्याच्या संगतीनें काळ घालवावा असें वाटलें. मग त्यानें घरच्या सर्व कुटुंबाचा त्याग करून तिचा स्वीकार केला, आणि अशा रीतीनें भ्रष्ट होऊन तिच्या समागमानें सर्व आयुष्य घालविलें. त्या शूद्रस्त्रीपासून त्यास १० मुलें झालीं; त्यांत सर्वांहून धाकटा नारायण नांवाचा मुलगा त्याचा फार आवडता होता. अजामिळाचा अंतकाळ समीप आला, तेव्हां त्यानें पुत्रस्नेहानें 'नारायणा इकडे ये' अशी आपल्या मुलास हाक मारिली. अंतकाळीं ईश्वराचें नांव, पुत्राच्या मिषानें कां होईना, त्याचे तोंडीं आलें म्हणून विष्णूचे दूत त्यास वैकुंठीं नेण्यासाठीं आले; तों यमदूत हा महापातकी असें समजून अगोदरच त्यास बांधून घेऊन चालले होते; त्यांजपासून विष्णुदूतांनीं त्यास सोडविलें आणि त्याचा उद्धार केला, अशी कथा आहे. ४ गजेंद्र—इंद्रद्युम्न नांवाचा द्रविडदेशाचा राजा होता; तो मलयाचलावर आश्रम करून तपश्चर्येसाठीं राहिला असतां एक वेळ अगस्तिऋषि त्याचे आश्रमांत शिष्यमंडळीसह आला. त्या वेळेस इंद्रद्युम्न ध्यानस्थ होता म्हणून त्याकडून ऋषीचा अभ्युत्थानादि आदरसत्कार झाला नाहीं. तेव्हां आळसानें ह्यानें आपला अनादर केला, असें वाटून ऋषीस फार राग आला आणि 'तूं हत्ती हो' म्हणून त्यानें त्यास शाप दिला, परंतु त्यानें प्रार्थना केल्याबर 'विष्णु तुझा उद्धार करील' असें आश्वासनही दिलें. पुढें तो राजा हत्ती होऊन वनांत फिरत असतां पाणी प्यावयास एका सरोवरांत उतरला, तों त्यांतील नक्रानें त्याचा पाय धरिला. (तोही देवलऋषीच्या शापानें गंधर्वाचा नक्र झाला होता). तेव्हां पुष्कळ वेळपर्यंत गजेंद्रानें आपण सुटण्याकरितां यत्न केला, परंतु नक्रापुढें त्याचें कांहीं चालेना. शेवटीं निरुपाय होऊन त्यानें ईश्वराचा धावा केला आणि सोंडेनें एक कमळ उपडून भक्तीनें त्यास उद्देशून आकाशांत फेंकिलें. तेव्हां विष्णूनें संतुष्ट होऊन चक्रानें नक्राला मारून गजेंद्रास सोडविलें, अशी कथा आहे. ५ ध्रुवाख्यान पहावें. ६ पिंगला—जनकाच्या राजधानींत पिंगला नांवाची एक अतिरूपवती वेश्या होती. वेश्याजनांच्या रीतीप्रमाणें जो अधिक पैसा देईल त्याच्या संगतीनें रात्र घालवावी असा तिचा क्रम होता. एके दिवशीं

हे किति शिळेसि तारी श्रीशा त्वत्पादधूळिची कणिका ॥ १४ ॥
गुरुभक्ति ते स्वमाता भाऊ सत्संग विषय ते बाऊ ॥
भोऊ माझें मानस—बाळ श्रीरामकीर्तितें खाऊ ॥ १५ ॥
मन हें ओढाळ गुरूं परधनपरकामिनीकडे धांवे ॥
यास्तव विवेक-पाशें कंठीं वैराग्यकाष्ठ बांधावें ॥ १६ ॥
मातेतें त्यजुनि पळहि जाय न भलतीकडे जसें बाळ ॥
सत्संगति सोडुनि मन नच जाउ तसेंच घेउ हें आळ ॥ १७ ॥
हळु हळु झडो अहंता सन्नमनीं वार्धकीं जशी शेंडी ॥
केंडू विवेक विषया निस्पृहजन वस्तुतें जसा केंडी ॥ १८ ॥
भगवन्नामा अपयश होऊं देऊं नको, पतित सारे ॥
तरले, एकचि उरतां कोपेना काय तो पति तसा रे ॥ १९ ॥
श्रीहरिहरनामें हो जरि बहु दोषी असा ध्रुवां दास ॥
दीनीं एकींच अदय-पण तें पोषी असाधु-वादास ॥ २० ॥
चिंतामणिच्या धामा विसरविसी स्वर्गतरु-कुसुम-दामा ॥
आम्हां बाळा आंता रामाचा प्रतिनिधीच तूं नामा ॥ २१ ॥

---

तिनें आधीं आलेल्या पुष्कळ धनवंत तरुण पुरुषांस, अधिक द्रव्य देणारा कोणी आणखी दुसरा पुरुष येईल ह्या आशेनें, परत लाविलें; मग तिनें मध्यरात्र होईपर्यंत पुष्कळ वाट पाहिली, परंतु कोणी पुरुष त्या दिवशीं मिळाला नाहीं. तेव्हां, परम पुरुष जो परमेश्वर त्याचा त्याग करून ह्या लौकिक पुरुषांची मी इच्छा करितें ही किती अयोग्य गोष्ट आहे ! असा तिला पश्चात्ताप होऊन ती विरक्त झाली आणि परमेश्वरास शरण गेली. मग तिला ईश्वरानें उत्तम गति दिली अशी कथा आहे.

१ अहल्येस—एकदा गौतमऋषि आश्रमांत नसतां त्याचें स्वरूप घेऊन इंद्रानें त्याच्या आश्रमांत येऊन कपटानें अहल्येच्या पातिव्रत्याचा भंग केला. इतक्यांत गौतमऋषि आश्रमांत परत आला आणि इंद्रास पाहून त्यास फार क्रोध आला. मग विचार न करितां त्यानें अहल्येस 'तूं शिळा हो' असा शाप दिला, परंतु तिनें मी जाणून ही गोष्ट केली नाहीं असें म्हणून प्रार्थना केली असतां रामाच्या पायाच्या स्पर्शानें तूं पूर्वरूप पावून शुद्ध होशील; मग मी तुझा स्वीकार करीन, असें अभयही तीस दिलें. पुढें रामावतारीं रामाची पायधूळ लागून ती उद्धरली; अशी कथा आहे. २ मानो. ३ भगवान्. ४ शुद्ध करा. ५ निंदेला. ६ कल्पवृक्षाच्या फुलांच्या माळेला, एथें 'कुसुमदामा' हा शब्द केवळ प्रासाकरितां योजिला आहे. अद्भुत औदार्याच्या संबंधानें नामास कल्पतरूची उपमा द्यावयाची आहे, म्हणून ह्या शब्दाचें स्वारस्य येथें दिसत नाहीं. ७ धाम.

नामा बा माता तों वात्सल्यें त्वां उदंड लाजविली ॥
उद्धरुनि पतित राम-प्रभुकीर्तिहुनी स्वकीर्ति साजविली ॥ २२ ॥
वसलेंसि पिंगलेच्या जैसें श्रीनारदादिधीरांच्या ॥
राम-सुत-मयूर-मुखीं वस नामा वससि जेंवि कीरांच्या ॥ २३ ॥

---

## आदिपर्वांतील कचोपाख्यान.

पूर्वी देव आणि दैत्य ह्यांच्या लढाया होत असतां युद्धांत मरण पावलेल्या दैत्यांस त्यांचा गुरु शुक्राचार्य हा संजीविनी-विद्येच्या योगानें पुन्हा सजिवंत करी; पण ती विद्या देवांचा गुरु बृहस्पति ह्यास येत नव्हती, म्हणून देवांकडील योद्धे मरत. मग सर्व देवांनीं बृहस्पतीचा मुलगा कच हा शुक्राकडे गुरुसेवेच्या मिषानें ती विद्या शिकण्याकरितां पाठविला; आणि त्याला ती विद्या त्यापासून प्राप्त झाली. हें ह्या आख्यानांत वर्णिलें आहे.

जनमेजय-नृपति पुसे वैशंपायन कथी स-विस्तर, तें ॥
बहु, मी लेशचि गातों जग लेशें ही महद्यशें तरतें ॥ १ ॥
झाला ययाति कविचा जामाता, तीच सत्कथा परिसा ॥
या चरितामृत-पानें या लोकीं सर्व रसिक हो हरिसा ॥ २ ॥
देवांच्यां ही जेजे भट होती संगरांत असु-रहित ॥
संजीविनी-बळें त्या उठवि करी काव्य नित्य असुर-हित ॥ ३ ॥
ती विद्या सुर-गुरुला अवगत नव्हती म्हणूनि समरांत ॥
बहु मरती, तें पाहुनि न टिके उत्साह धैर्य अमरांत ॥ ४ ॥
ती विद्या साधाया देवांनीं सद्विचार आठविला ॥
शुक्राकडे स्व-गुरु-सुत कच विनवुनि कथुनि युक्ति पाठविला॥५॥
शिष्यत्वें जाउनि कच सांगे गुरु-दास्य-काम पद नमुनी ॥
प्रणतीं शत्रु-सुतीं ही द्रवला तो सु-प्रसन्न-वदन मुनी ॥ ६ ॥
आराधिला कचें गुरु गुरुची कन्या हि देवयानी ती ॥

---

१ रामाजीपंताचा मुलगा मोरोपंत त्याच्या तोंडांत. २ परिक्षिति राजाचा मुलगा. ३ व्यासाचा शिष्य. ह्यानें जन्मेजयास सर्व भारतांतील कथा सांगितल्या. ४ धीरांच्या कीर्तीनें. ५ शुक्राचा. ६ इंद्रासारिखा. ७ गुरुची सेवा करण्याची इच्छा.

झाली प्रसन्न स-त्वर शिकविति तैशीच देव या नीती ॥ ७ ॥
अ-सुर म्हणति विद्येनें प्रबळ करायास देव या नीचें ॥
मन मोहिलें गुरूचें गुरु-चित्ताहूनि देवयानीचें ॥ ८ ॥
गुरु-गोरक्षण करितां देव-द्वेषें हरुनि असु रानीं ॥
कच-मांस मृगांसि दिलें वांटुनि भक्षावयासि असुरांनां ॥ ९ ॥
गाई गृहासि आल्या मावळला रविहि कच न आढळला ॥
तेव्हां सोडुनि धृति-नग शुक्र-सुता-बुद्धि-भूमिला ढळला ॥१०॥
शुक्र-सुता गहिवरली न्हाणी तदुरस्थळासि अश्रु तिचें ॥
कवणाला न प्रिय तें गुण-मणिमय केलि-मंदिर श्रुतिचें ॥ ११ ॥
तातासि म्हणे आला नाहीं अद्यापि कच, नसे अवधी ॥
लव धीर बुद्धि न धरी माझी, ताता सु-निष्ठुरा तव धी ॥ १२ ॥
येता प्रघाच असता जरि कुशळी, करिति खळ अघा, बरवी ॥
गति न दिसेचि कचाची कुशलि-जन-विरह असा न घाबरवी॥१३
कच आजि न येतां मी प्राण त्यागीन न भरतां घटिका ॥
आण तुझी जाण खरें केला निश्चय नव्हेचि हा लटिका ॥ १४ ॥
काव्य म्हणे धीर धरीं आहे संजीविनी सुधा-धारा ॥
उठवूनि आणितों कच चिंतुनि विश्वं-भरा बुधाधारा ॥ १५ ॥
मंत्र-जप करुनि तो कवि ये रे वत्सा कचा असें बाहे ॥
भेदुनि वृकोदरें पल सर्व निघे त्यांत लेशहि न राहे ॥ १६ ॥
होता तसाचि झाला उठला आचार्य-देव तारी, तो ॥
शक्ति तशीच निरुपमा भिन्ना गुर्वन्य-देवता-रीती ॥ १७ ॥
कच येतां बहु हर्षे धन्य म्हणे मीच कन्यका मातें ॥
वांचविला त्वांचि दिला हा, देइल कोण अन्य कामातें ॥ १८ ॥
पुसतां वध-वृत्त कच स्व-गुरु-सुतेला समस्त आयकवी ॥
प्रार्थुनि म्हणे उगी, हा स्वस्ति असो सर्व-विप्र-राय कवी ॥ १९॥

---

१ कचाला. २ संजीविनी-विद्येनें. ३ गुरुच्या गाईची राखण. ४ वन्य पशूंस. ५ धैर्य हाच पर्वत. ६ देवयानीची बुद्धि हीच पृथ्वी तिला सोडून ढळला म्ह० देवयानीचें धैर्य सुटलें. ७ तिच्या उराला. ८ कचरूप. ९ सद्गुण हींच रत्नें त्यानीं खचित असें श्रुतीचें (वेदाचें) केलिमंदिर म्ह० क्रीडास्थान. १० अमृताची धार. ११ ज्ञात्यांस आश्रयभूत. १२ कच. १३ सुखरूप.

त्यावरि गुरु-कन्योक्तें पुष्पें आणावयासि जाय वना ॥
सांपडला त्या असुरां कच जैसा वत्स एकला यवना ॥ २० ॥
पुनरपि त्या पापांनीं सद्विप्र-कुमार चरचरा चिरिला ॥
भय न धरिलें तिळहि त्या पापाच्या जोडितां महा-गिरिला ॥२१॥
खंड तिळमाय करुनि नेउनि केले निमग्न जळधींत ॥
नाहींच धर्म करुणा पाप-भय विचार-लेश खळे-धींत[1] ॥ २२ ॥
जो मुनि तयासि कन्या-प्रियेंकाम[2] दयाळु काव्य तो तारी ॥
रज गोळा करुनि घडी शिष्याची मूर्ति जेविं वोतारी ॥ २३ ॥
पुनरपि तो कच वधिला केला तद्देह दग्ध दुष्टांनीं ॥
शुक्रासि पाजिलें हो तद्भस्म सुरा-रसांत[3] दुष्टांनीं ॥ २४ ॥
कच न दिसतां रडे सुर-यानी[4] तीतें पिता म्हणे कांगे ॥
वत्से रडसी ऐसें पुसतां तैसेंच ती पुन्हा सांगे ॥ २५ ॥
शुक्र म्हणे वत्से मी वांचवितों परि पुनः पुन्हा मरतो ॥
आग्रह धरुनि म्हणसी भेत-गति-गतहि[5] कच पुन्हा परंतो ॥२६॥
त्यज शोक मत्पसादें तुज काय उणें मुली नकोचि रडों ॥
दाटुनि माथां वाहुनि दुर्वह दुःखाद्रिला नको चिरडों ॥ २७ ॥
ती तातासि म्हणे कच गुरु-भक्त कुलीन साधु-कार्य-कर ॥
जरि त्यासि सोडिलें जल तरि जल सोडू मलाहि आर्य-कर[6] ॥२८॥
ब्रह्म-घ्ना शिष्यांची भीड धरुनि साधु शिष्य मोकलिला ॥
म्हणतिल न ऐकवे तें न स्व-हित कचीं असें गमो कलिला[7] ॥२९॥
स्व-मनि म्हणे कवि-सत्तम[8] मळवावें पंडितें न यश, हाणी ॥
प्राणाचीहि बरी परि न-यशाची, सांगती नय शहाणी ॥ ३० ॥
मग मेळवी महात्मा एकत्र समस्त अ-सुर कोपानें ॥
खवळे प्रिय-पुत्र-भसितें मिश्रित-मधुच्याहि[9] तज्ज्ञ तो पानें ॥३१॥
असुरांसि म्हणे कांरे नेणा अद्यापि मत्तपा[10], मरतो ॥

---

१ दुष्टाच्या मनांत. २ मुलींची आवड पुरविण्याची ज्याची इच्छा आहे असा. ३ मद्यांत. ४ देवयानी. ५ प्रेताच्या अवस्थेस गेलेला-म्ह० मेलेला. ६ आर्य म्ह० थोर जो तूं त्याचा हात. ७ कचापासून आपलें हित नाहीं असें दुष्टाला वाटेल तर वाटो, परंतु आपणाला तसें न वाटावें. ८ पंडितश्रेष्ठ. ९ आवडत्या पुत्रवत् मानलेल्या कचाची राख मिसळली आहे ज्यांत अशा मद्याच्या प्राशनानें. १० माझ्या तपश्चर्येस.

कीं वांचतो पतंग न भी जो ज्वलनासि मत्त पामर तो ॥ ३२ ॥
विप्र अ-वध्य म्हणे श्रुति हाणोनि तिच्याहि लात हा केला ॥
कच-हननें सुर-गुरुचा न तुम्हीं माझाचि घात हा केला ॥ ३३ ॥
ब्राह्मण कणसा खुपतो तुमच्या नेत्रीं नसो सवे काढा[1] ॥
युक्तचि मरणाराला हित-परिणामहि न सोसवे काढा ॥ ३४ ॥
धिक्कारुनि अ-सुरांतें धर्मचि तो अमृतमय[2]-वचा शिकवी ॥
बाहे करुणा-विद्या-दिव्य-तपस्या-बळें कचाशि कवी ॥ ३५ ॥
जों गुरु वत्स कच म्हणुनि ऐहि[3] असें तो म्हणावया योजी ॥
तों विद्या-सामर्थ्यें उपजूनि गुरूदरीं[4] म्हणे वो[5] जी ॥ ३६ ॥
उदर-प्रवेश पुसता झाला[6] तो पुण्य-राशि शुक्र-मुनी ॥
सांगुनि खळ-कपट म्हणे येथ वसो काळ हा शिशु क्रमुनी ॥ ३७ ॥
निर्भय वसेन काळ क्रमुनि पवित्रोदरीं असाचि सुखें ॥
न हित गुरूदर-दारण[7] निघतां मज निंदितील साधुमुखें ॥ ३८ ॥
शुक्र म्हणे वत्से कच कुक्षि विदारुनि निघेल बाहेर ॥
हा तरलाचि परि तुझें या कु-व्यसनीं बुडेल माहेर[8] ॥ ३९ ॥
सुरयानी त्यासि म्हणे वदनां हें अशुभ काय हो तात ॥
व्हावे दोघेहि मला चिंता-मणि हेंचि पाय होतात ॥ ४० ॥
तारुनि शिष्यासि तरो गुरु म्हणत्यें पात्र कन्यकान्या[9] या ॥
नोहे वरासि वर-दा जाणसि तूं सुज्ञ-नायका न्याया ॥ ४१ ॥
भीड सुतेची भारी विद्या संजीविनी कचा शिकवी ॥
गुरुला हि वांचवाया योग्य करी सज्जना कचाशि कवी ॥ ४२ ॥
गुरु-कुक्षि विदारुनि कच बाहेर निघे परंतु बहु तो भी ॥
उठवुनि गुरु संकोचें नमुनि रडे कुलज-कीर्तिचा लोभी[10] ॥ ४३ ॥
कच-घातकासुरांतें[11] सुरयानीचा स्वयें जनक दापी ॥
कीं जो ब्रह्म-द्वेष्टा कुशल न पावेल तो जन कदापी ॥ ४४ ॥

---

१ लागलींच काढतां. अथवा सर्वे म्ह० ही सवय काढा म्ह० टाकून द्या. २ अमृतासारख्या गोडवाणीचा. ३ ये. ४ शुक्राच्या पोटांत. ५ ओ. ६ कच म्हणाला. ७ गुरुचें पोट फोडणें. ८ ह्या तुझ्या दुष्ट नादानें मी मरेन, असा भाव. ९ कन्येहून इतर. १० कच कुलीनाच्या कीर्तीचा लोभी होता म्हणून गुरूचें पोट फोडून निघाला ह्याची त्यास शरम वाटली असा भावार्थ. ११ कचाला मारणाऱ्या दैत्यांतें.

समजा बरें जसा मी विप्र गुरु तसाचि हा कच, पळाला ॥
ब्रह्मांडांतुनि जरि रिपु, वधिन न देतांचि हाक चपळाला ॥ ४५ ॥
अ-सुरांसि करुनि शिक्षा बाहु उभारुनि म्हणे अहो कानीं ॥
घ्यावें माझें हित-कर मर्यादा[1]-वचन साधु-लोकांनीं ॥ ४६ ॥
जो विप्र आजपासुनि मद्य-प्राशन करील तो पापी ॥
ब्रह्म-घ्नासम निश्चित असि मर्यादा स्वयें कवि स्थापी ॥ ४७ ॥
वर्षं सहस्र होता कच गुरु-सेवेंत, मग तया प्राज्ञा ॥
शुक्रें बहु संतोषें दिधली जाया पित्याकडे आज्ञा ॥ ४८ ॥
कच सिद्ध होय जों तों शुक्र-सुता त्या मनो-हरा उचिता
स्व-करे-ग्रहा-र्थ[2] विनवी बहु आवडली सु-विद्यता शुचिता[3] ॥४९॥
जें गुरुचें तेंच तिसीं पूज्यत्वाचें धरुनि कच नातें ॥
ठेवूनि दृष्टि धर्मी तो न तिच्या मान्य होय वचनातें ॥ ५० ॥
पडतां गळां म्हणे कच भगिनीला वरुनिया न भाउ तरे ॥
करितां अ-धर्म सद्यः स्व-पितृ-सुहृज्जन[4]-मुख-प्रभा उतरे ॥५१॥
सुख व्हावें तरि धर्मा-प्रति म्हण माथां वसें नसें दूर ॥
पूजा कैंची लोकीं जरि दगड शिरीं धरी न सेंदूर ॥ ५२ ॥
धर्म अनंत असो परि तो करितां कीर्तन स्वसे वेचे ॥
सांग प्रकार याहुनि दुसरे कांहीं मज स्व-सेवेचे ॥ ५३ ॥
ज्या उदरीं वास तुझा तेथें माझाहि हें असे नातें ॥
केविं कर-ग्रहण करूं सं-मत धर्मासि जें असेना तें ॥ ५४ ॥
बहु दिवसांची आशा तत्काळ च्छेदितां कचें रुष्टा ॥
शुक्र-सुता त्यासि म्हणे रे कपट-पटो भलाभला दुष्टा ॥ ५५ ॥
ऐक कृत-घ्ना जरि मी उठवाचि मदर्थ या हता शतदा ॥
ऐसें गुरुस न म्हणतें कैसा उठतास तूं हतांश[5] तदा ॥ ५६ ॥
तूं मलिन[6] कुटिल[7] नीरस[8] जडहि[9] पुनर्भवपणें[10] हि कचसा[11] च ॥
धरिला शिरीं हि न स्व प्रकृति-गुण[12] त्यजिसि नाम-कच साच ॥५७॥

---

१ नियमाचें भाषण. २आपल्या पाणिग्रहणाकरितां म्ह० लग्न आपणाशीं लावण्यासाठीं. ३ कचाची विद्वत्ता व शुद्ध आचरण हीं तिला फार आवडलीं. ४आपले वडील व इष्टमित्र ह्यांचें तोंड उतरतें. ५नष्ट. ६मळकट, पक्षीं पातकी. ७कुरळे, पक्षीं कपटी. ८शुष्क, पक्षीं प्रीतिरहित. ९अचेतन पक्षीं मूर्ख. १०वारंवार उत्पन्न होण्यानें, पक्षीं वारंवार मरून जीवंत होण्यानें. ११केसासारिखा. १२आपला स्वाभाविक गुण.

न करीं वि-फळ मदाशा आशा भंगूं नयेचि साधूंनीं ॥
जरि भंगिसील, विद्या-सिद्धि नसो जीस नेसि साधूनी ॥ ५८ ॥
कचहि म्हणे गुरु-वेदानुज्ञा नाहीं म्हणोनि या कर्मा ॥
मान्य नसें, हूं शापीं कीर्ति-करचि शाप न चुकतां धर्मा ॥ ५९ ॥
पढवीन ज्यासि विद्या ही त्यासि फळेल तूंहि घे शाप ॥
तुज कोणी ही ऋषि-सुत न वरील फळो तुझें तुला पाप ॥ ६० ॥
जातां स्वर्गीं मिरविति निज-गुरु-सुतें-रत्न देव यानीं तें ॥
वर्णिति दैत्यांतें किति किति कवितें कितिक देवयानीतें ॥ ६१ ॥

---

## आदिपर्वांतील ययातीचें आख्यान.

कचानें, शुक्रकन्या देवयानी हिला 'तुला कोणी ऋषीचा मुलगा वरणार नाहीं'. असा शाप दिला होता, त्या प्रमाणें सोमवंशांतील नहुष-राजाचा मुलगा ययाति ह्यानें तिला वरिलें; हें ह्यांत सांगितलें आहे.

विद्या-लाभ[3]-मुदित सुर हरिसि[4] म्हणति विक्रमासि[5] यासम या ॥
पूर्वीं न पावलोंचि प्रभुजी टाळूं नकाचि या समया ॥ १ ॥
आम्हां न दिसेचि दुजा सुख-दायक शत्रु-नाशसम[6] यज्ञ ॥
समयीं पराक्रमातें करिति शुभ-यशोधनाश[7] समर्थ-ज्ञ[8] ॥ २ ॥
वृषपर्व-तडागाचा[9] होऊं नेदी विनाश कवि[10]-रोध ॥
पाडावा यांत यशः[11]-संपज्जीवन-विनाशक विरोध[12] ॥ ३ ॥
करुनि विचार असा हरि जेथें वृषपर्व-दैत्य-पति-राज्य ॥
त्या देशीं जाय; म्हणे जरि मिळतें[13] रंध्र लघुहि तें प्राज्य ॥ ४ ॥
तों रम्य वनीं शक्रें जळ[14]-केलि-रता सखी-युता[15] धन्या ॥
अवलोकिल्या कवि-सुता एक दुजी सर्व-दैत्य[16]-पति-कन्या ॥५॥

---

१ ब्राह्मणाचा मुलगा. २ आपल्या गुरुचा उत्तम पुत्र (कच). ३ संजीविनी-विद्या प्राप्त झाल्यानें हर्ष पावलेले. ४ इंद्राला. ५ शक्रोला (संजीविनीच्या योगानें आलेल्या). ६ वैऱ्यांच्या घातासारिखा. ७ सत्कीर्तिरूप धनाची आशा करणारे. ८ काळवेळ जाणणारे. ९ वृषपर्व नांवाचा दैत्यांचा राजा हाच तलाव याचा. १० शुक्राचार्य हाच बांध. ११ कीर्ति व संपत्ति हेंच पाणी ह्याचा नाश करणारा. १२ द्वेष. १३ यत्किंचित् जरी छिद्र दृष्टीस पडतें तरी तें (आपलें काम साधण्यास) पुष्कळ होतें. १४ जलक्रीडेमध्यें निमग्न झालेल्या. १५ सख्यांसहित. १६ दैत्यांचा राजा वृषपर्वा त्याची मुलगी शर्मिष्ठा

विप्रासुरवर-कन्या पाहुनि हर्षे मनीं म्हणे बल-हा ॥
भगवंत पावला या दोघींत प्रथम लावितों कलहा ॥ ६ ॥
उदकीं क्रीडत होत्या त्यांचीं वस्त्रें सरस्तटीं होतीं ॥
मारुत-रूपें शक्रें मिश्रित केलीं परस्परें हो तीं ॥ ७ ॥
राज-सुता शर्मिष्ठा जल-केलि करूनि त्या तटीं आली ॥
होती जलाशयींच श्रीमत्कवि-कन्यका तिची आली ॥ ८ ॥
शर्मिष्ठा कविजांबर नेसे झडकरि कळों न वासव दे ॥
तों तीस देवयानी ओढुनि तत्परिहितात्म-वास वदे ॥ ९ ॥
असुर-सुते मच्छिष्या होउनि मद्वस्त्र नेससी कां गे ॥
बहु मातलीस ऐसें मज समुदाचारलोप हा सांगे ॥ १० ॥
मर्यादा पाळावी, निज शिव गुरुचेचि पाय, रीतीतें ॥
सांडूं नये, म्हणति कवि साधु-पदाचीच पायरी तीतें ॥ ११ ॥
शर्मिष्ठा तीस म्हणे बैसावें जें सभेंत मत्तातें ॥
त्वत्तातें व्हावें तें बंदी, तूं विसरलीस मत्ता तें ॥ १२ ॥
सिंहासनीं विराजे मद्गुरु न सहस्र-कर हि परि सविता ॥
बैसे खालें त्वद्गुरु कवि कविता करुनि त्यासि परिसवितीं ॥ १३ ॥
माझी न पाविजे त्वां मत्ताताची तुझ्या न सरि तातें ॥
जें जन्हु-कन्यकेचें भाग्य न पावेल अल्प सरिता तें ॥ १४ ॥
होतीं महेंद्र-नयनें पाहुनि राजेश्वरा जया चकितें ॥
मत्तात -भाग्य कैचें त्वत्ताता भिक्षुकासि यांचकि तें ॥ १५ ॥
मत्ताताची जी श्री कीर्ति कवीला नयेचि भिक्षुकि ती ॥
अमृत-रसासीं व्हाया सम माधुर्यें समर्थ इक्षु किती ॥ १६ ॥

---

१ विप्रवर ब्राह्मणश्रेष्ठ (शुक्र) व असुरवर (दैत्यांमध्यें श्रेष्ठ) वृषपर्वा, ह्यांच्या कन्या म्ह० मुली. २ तळ्याच्या कांठीं. ३ कवीपासून झालेली देवयानी तिचें अंबर म्ह० वस्त्र. ४ तत्+परिहित+आत्म+वास—तिनें (शर्मिष्ठेनें) नेसलेलें आपलें वस्त्र ओढूनि तीस वदे असा अन्वय. ५ शर्मिष्ठेच्या बापाचा गुरु शुक्र त्याची देवयानी कन्या आहे म्हणून तिनें शर्मिष्ठेला मच्छिष्या, माझी शिष्या, असें म्हटलें आहे. ६ सं+उत्+आचार+लोप—सभ्यसंप्रदायाचा भंग. ७ रीतीतें. ८ उन्मत्त, हें स्त्री-लिंगी तूं ह्याचें विशेषण. ९ खालीं. १० ऐकविणारा. ११ पावधातूचें कर्मणिरूप १२ जन्हुराजाची मुलगी भागीरथी तिचें. १३ अगे भिकारणी.

राज-सुतेचें यश जें तुज येइल काय गे दरिद्रे तें ॥
पाहसि विकावया तूं केशर-मौल्यें कसें हरिद्रे तें ॥ १७ ॥
निर्भत्सना करी बहु, संपादी द्वेष, पाप गाढ केली ॥
करुनि कविजेसि कूपीं ती कोपाची महापगा ढकली ॥ १८ ॥
मेलीच असें मानुनि शर्मिष्ठा आपुल्या घरा गेली ॥
कूपीं कवि-जा होती जैसी नागी मनांत रागेली ॥ १९ ॥
तों मृगाया-श्रांत तृषित तोयार्थ ययाति तेथ एकाकी ॥
आला, शर्मिष्ठा ज्या कूपीं त्या देवयानिला टाकी ॥ २० ॥
कूपीं पाहे सहसा सत्कन्या-रत्न तो ययाती तें ॥
कोणाची कोण असें मंजु पुसे करुनिया दया तीतें ॥ २१ ॥
सांगे तज्जा मी कवि म्हणति द्विज- नायका ययाते जा ॥
नर- वर म्हणे प्रसवला तो भगवान् काव्य काय या तेजा ॥ २२ ॥
कवि-जा म्हणे नरेंद्रा स्व-तपें तुझिया यशेंहि तुज जाणें ॥
मज दक्ष करें धरुनी वर घेउनि करुनि धन्य भुज जाणें ॥ २३ ॥
क्षुधितापुढें सुधेची पात्री दैवेंचि वाढिली, वरिती ॥
झाली मनें, गुरु-भुजें दक्षिण कर धरुनि काढिली वरि ती २४ ॥
भूप म्हणे धिक् चित्तीं क्षत्रीं विप्रात्मजा न सेव्या ही ॥
तीहि म्हणे नहुषे-तर कविला आतां जनीं नसे व्याही ॥ २५ ॥
नृप गेला, मग आली शोधाया घूर्णिका तिला आंगें ॥
जा सांग पित्याला म्यां त्यजिलें वृषपर्व- पुर असें सांगे ॥ २६ ॥
वृत्त कथुनि कविसि म्हणे ती निष्ठुरता पहा निरोपाची ॥
छाया कराचि न करो अति निष्ठुर- ताप हानि रोपांची ॥ २७ ॥
भेटोनि तितिक्षेचे गुण सांगे साधु बाप तनयेतें ॥
कीं कोपाच्या संगें स्व- विभोगा सर्वथा पतन येतें ॥ २८ ॥
शर्मिष्ठोक्त पित्यातें कथुनि म्हणे तूं असाचि असशील ॥
सोसुनि अप-मान सुखें वाटे या दुर्जनांत वससील ॥ २९ ॥

---

१ मोठा कज्जा. २ महा+आपगा—मोठी नदी. ३ तनू+जा ( त्यापासून झालेली ). ४ तेजःपुंज जी तूं त्या तुला. ५ जाणतें. ६ जावें. ७ क्षत्रियाला. ८ उपभोगाला योग्य. ९ नहुष+इतर—नहुषराजाहून दुसरा. नहुष हा ययातीचा बाप. १० येथें देवयानी हेंच रोपडें समजावें. ११ आपल्या बाट्यास.

शुक्र म्हणे विधि वदला मजला तूं विश्व-सृष्टि-पति[१] तनये ॥
स्व-मुखें काय वदों, मज पाहों तो शरण केवि पतित न ये ॥३०॥
अ-ज्ञ मुलें कलह करिति न वदावें तेंचि बोलती स्वैर ॥
तें चित्तांत धरुनिया प्राज्ञें पुरुषें करूं नये वैर ॥ ३१ ॥
सुरयानी गुरुसि म्हणे बा नेणति थोर थोर कवि जातें ॥
धर्माचें तत्त्व बरें जाणतसे हे सुबुद्धि कवि-जा तें ॥ ३२ ॥
धर्माधर्म-बळाबळ-वार्ता तों दुर्लभाचि अन्या या ॥
कन्या या पायांचो जाणे न्याया तथैव अ-न्याया ॥ ३३ ॥
त्यांत पळहि न वसावें ज्यांत दुरित-भीति, धर्म, नय, नाहीं ॥
तृणें-चर-मुखें[२] सुखें अवलोकावीं खळ-मुखें न नयनाहीं ॥ ३४ ॥
दुर्जन-सहवास सदा ताप-द हा काय नरक सामान्य ॥
होईल यासि दाटुनि मान-धन[३] प्राज्ञ नर कसा मान्य ॥ ३५ ॥
वृषपर्व्यास म्हणे कवि मी विप्रचि कीं अ-विप्र मत्तनया ॥
पीडावी, हरिसि हंसति वाटे सोडुनि अवि प्र-मत्त नय ॥ ३६ ॥
त्यजितों तुला, अतिक्रम साहे ऐसा नव्हें पुरोधा मी ॥
वृत्त्यर्थ[४] तापसा मज शाक पुरो वा न वा पुरो धामीं ॥ ३७ ॥
अ-सुर-पति म्हणे स्वामी आहें मी सर्वथैव अपराधी ॥
पहिली[५] एकोचि असो या दास-जनीं नसोचि अपरा धी ॥ ३८ ॥
जरि सिंधु जीवनाचीं क्षणहि न दे करुनिया दया दानें ॥
तरि वांचावें कैसें रक्षावे वा स्व-याद यादानें ॥ ३९ ॥
त्यजितां मरेल हा जन न प्रभु-वर लाविला मळा सुकवी ॥
स्व-यशा अ-कृपत्वाच्या सहसा लागों न दे मळा सु-कवी ॥४०॥
काव्य म्हणे मी जातों व्यसनांत तुम्ही तरा बुडा लोल[६] ॥
आतां सुर येतील क्षिप्र पळा हो मला नसे बोल ॥ ४१ ॥
तुमचें प्रिय कन्येचें अ-प्रिय मज हा न दोष करवेल ॥
लावाल शत सुरांचे अजिरीं परि ते न तोष-कर वेल[७] ॥ ४२ ॥
वृषपर्वा नमुनि म्हणे श्रीचा माझाहि नाथ तूं देवा ॥

---

१ संपूर्ण सृष्टीचा स्वामी. २ पशूंचीं तोंडें. ३ थोरवी अथवा प्रतिष्ठा हेंच ज्याचें धन आहे तो. ४ उपजीविकेसाठीं. ५ पूर्वीं होती तशीच. ६ चंचल-मनाचे. ७ कल्पवृक्ष.

हो सुप्रसन्न आम्हां दासांपासून घे सदा सेवा ॥ ४३ ॥
शुक्र म्हणे जरि म्हणसी स्व-श्रीचा आपुलाहि नाथ मला ॥
तरि कन्याचि मदात्मा प्रार्थूनि करा प्रसन्न जो अमला ॥ ४४ ॥
राजा म्हणे बहु बरें मग सुरयानीकडे तयासहित ॥
जाय, कवि तदुक्त कथी जें तीस तया कृताश्रयास हित ॥ ४५ ॥
परिसुनि तातोक्ति म्हणे म्हणतो तुज आत्मे-वित्त-नाथ मुखें ॥
राजा मज माग म्हणो मग मी मागेन इष्ट काम सुखें ॥ ४६ ॥
राजा म्हणे गुरु-सुते देतों जें मागशील तें नमुनी ॥
आम्हां तूं तसि पूज्या पूज्य जसा हा तपोनिधान मुनी ॥ ४७ ॥
कवि-दुहिता त्यासि म्हणे दश-शत-कन्या-युता तुझी तनया ॥
शर्मिष्ठा मद्दासी व्हावी, कामासि इच्छितें मन या ॥ ४८ ॥
यावें मजसह मत्पतिसदनासि त्यजुनि भीड दासीनें ॥
दास्य करावें भावें न असावें मानसें उदासीनें ॥ ४९ ॥
राजा धात्रीस म्हणे हेंचि शिव तुझीच आण, जागे हा ॥
श्री-गुरु अस्मत्-त्राणीं, कन्येला शीघ्र आण जा गेहा ॥ ५० ॥
धात्रीनें समजावुनि कथितां कन्येसि पितृ-मुखाज्ञा ती ॥
शिबिकेंत बसोनि निघे कीं पात्र असोत जय-सुखा ज्ञाती ॥ ५१ ॥
गुरु-तनयेसि म्हणे तुज देईल तुझा जयासि बो धामीं ॥
त्याच्या हि तुझी दासी येतें न गणूनि दास्य-बाधा मी ॥ ५२ ॥
स्मित करुनि देवयानी राज-वधू-गल्ल व्हावया वोले ॥
टोले शर्मिष्ठेच्या माथां हाणावया असें बोले ॥ ५३ ॥
मज्जनक तव पित्याचा बंदो स्थितिरीति हे असी, गाई ॥
घेतो याचक, माझी दासी होसील तूं कसी गाई ॥ ५४ ॥
शर्मिष्ठा उत्तर दे जी बहु आग्रह करील अ-ज्ञा ती ॥
कुल-जेनें व्यसन-करीं प्राणहि द्यावे परंतु न ज्ञाती ॥ ५५ ॥
सुरयानी गुरुसि म्हणे विद्या-तेजें विवेक-विज्ञानें ॥
बापा सत्य निवालें निववूनि जना निवे कवि ज्ञानें ॥ ५६ ॥
चाला आला चित्ता आतां मुनि-नायका पुरावास ॥

१ केला आहे आश्रय ज्याणें अशा वृषपर्व्यास. २ आपला व संपत्तीचा स्वामी. ३ हजार कन्यानीं युक्त. ४ भाऊबंद. ५बाप. ६अगाई. ७पुर+आवास—नगरांत राहणें.

वास तुझ्याचि यशाचा मधुर असा काय कापुरा वास ॥ ५७ ॥
जाय पुरीं उत्सव दे मुनि शिष्या जेंवि अर्क राजीवा ॥
वांटी मधुरा आशी कवि वृषापर्वाहि शर्करा जीवा ॥ ५८ ॥
त्यावरि एका समयीं त्याच वनीं शुक्र-कन्यका गेली ॥
संगीं सहस्र दासी शर्मिष्ठा काननीं करी केली ॥ ५९ ॥
तेथें मृगानुसारी[1] आला राजा ययाति हि तसाच ॥ ॥
पूर्वी जेणें केलें कूपोद्धारें करूनि हित साच ॥ ६० ॥
दासी-सहस्र-मध्य-स्थित कन्या-द्वय विलोकुनी रुचिर ॥
नर-पति निववी नयनें तल्लावण्यामृत-ऱ्हदीं[2] सुचिर ॥ ६१ ॥
पुसतां नृपें हराया निज-मधुरोक्तें[3] तदीय खेदासी ॥
सांगे मी शुक्र सुता माझी अ-सुरेंद्र-जा हि हे दासी ॥ ६२ ॥
राज-सुता त्वद्दासी हें कैसें नृप पुसे, म्हणे कवि-जा ॥
पुससी काय? जग असे वश कर्मा[4] हस्त जोडिती कवि जा ॥ ६३॥
त्वांहि कथावें मज निज कुल-नाम असें सती अ-कुत्सें[5] वदे ॥
नृप आपणहि तिला तें स्व-मुखें सांगोनि फार उत्सव दे ॥ ६४ ॥
शशि-कुल-[6]ज-नहुष-सुत जन हा, नाम ययाति येथ तोया मी ॥
आलों मृगानुसारें आपृच्छे त्वां तदहमितो यामि[7] ॥ ६५ ॥
त्यासि म्हणे सुरयानी परम मनोहर तुझें जगीं यश गा ॥
सत्य सखा भर्ता हो झालें तुज मी मनो-रमा वशगा[8] ॥ ६६ ॥
हे शर्मिष्ठा दासी दासी विंशति-शतेंहि[9] कन्या या ॥
अंगीकारावें मज जाणसि तूं धर्म-पाळक न्याया ॥ ६७ ॥

---

१ मृगाच्या पाठीस लागलेला. २ त्यांच्या सौंदर्यरूप अमृताच्या डोहांत. ३ आपल्या गोड भाषणानें. ४जन्मांतरीं केलेल्या कर्मास. ५ निर्दोष. ६चंद्रकुलांत झालेला नहुष त्याचा मुलगा 'हा जन, म्ह० मी. ७ तत् (तर) त्वां (तुला) आपृच्छे (पुसतों) अहं (मी) इतः (एथून) यामि (जातों) तर तुझा निरोप घेऊन मी आतां जातों. ८ स्वाधीन झालेली. ९ विंशति शतें या कन्याही दासी आहेत असा अन्वय. 'द्वाभ्यां कन्यासहस्राभ्यां द्वे कन्ये परिवारिते ॥ गोत्रेच नामनी चैव द्वयोः पृच्छाम्यहंशुभे ॥' (भारत- आदिप० अ० ८१- श्लो० ८) ह्या ययातीच्या प्रश्नावरून पूर्वी जरी एक सहस्रच दासी सांगीतल्या आहेत, तरी वृषपर्व्यानें दिलेल्या प्रत्येकीच्या हजार हजार दासी होत्या, असें स्पष्ट दिसतें.

नृपति म्हणे सिंधूसि त्यजुनि दया करुनि ही नदी नातें ॥
लावील सरासीं तरि तें हित त्या शक्ति-हीन दीनातें ॥ ६८ ॥
तुज व्हावें पात्र अशीं कैचीं पुण्यें सहाय या तितुकीं ॥
विप्र-वर-सुते क्षत्रिय उतरेल तुझ्या न हा ययाति तुकीं॥ ६९ ॥
ब्रह्म-क्षत्रें-विमिश्रित तत्वें तूंही ऋषीच सन्महित ॥
वर्णाश्रम-धर्माच्या अवनें लोकीं तुझेंचि जन्म हित ॥ ७० ॥
त्यांतहि मीच असें तुज म्हणतें नाहींच तुजकडे दोष ॥
मजवरि गुरुचा प्रेमा बहुतचि न करील लेश तो रोष ॥ ७१ ॥
शिवलाशि मत्करा तूं शिवतां अ-न्याय या तिजा, माता॥
स्त्री, गुरु कीं तूं; साजे कैंविसि न अन्या ययाति जामाता ॥ ७२ ॥
धरिला करीं कुलीनें जो तो त्या होय योग्य अ-त्यागा॥
कर सोडिसी कसा हा धर्म-ज्ञा न करितांहि अत्यागा ॥ ७३ ॥
नृ-पति म्हणे मज तुजही मान्य तुझा गुरु करील आज्ञा ते ॥
वृष्टीप्रति चातकसे करितात गुरूक्तिलाचि आ ज्ञाते ॥ ७४ ॥
जेव्हां असा निजाशय नृप-रत्नानें वधूसि जाणविला ॥
धात्री धाडुनि कळवुनि वृत्त पिता त्या वनांत आणविला ॥ ७५ ॥
कविनें येतांचि दिल्ही पाद-प्रणता नृ-पासि रुचिराशी ॥
धर्मालोपवरासह मग विधिनें निज सुताहि रुचि-राशी ॥ ७६ ॥
बहु सत्कारुनि मुनिनें वृषपर्व्यानेंहि भूप बोळविला ॥

१ नृपति म्हणे—नदी सिंधूसि त्यजूनि दया करुनि सरासि नातें लावील तरी त्या शक्तिहीन दीनातें तें हित—नदी समुद्राला मिळायाचें टाकून एकाद्या भिकार सरोवराची तिला दया येऊन त्याला मिळेल, तर त्यांत त्या सेरावराचेंच कल्याण आहे—तूं उत्तम ब्राह्मणकुलांतील पुरुष वरायाचें टाकून जर मजसारिख्या क्षत्रियास रुपा करून वरशील तर त्यांत माझेंच कल्याण आहे असा भावार्थ. २ इतकीं पुष्कळ. ३ चंद्राचा मुलगा बुध हा ब्राह्मण होता त्यापासून क्षत्रियाची कन्या 'इला', हिला पुरूरवा झाला; त्यापासून आयु, त्यापासून नहुष आणि त्यापासून ययाति. ब्राह्मणास क्षत्रियकन्येपासून झालेला मुलगा ब्राह्मण होय, असें शास्त्र आहे; म्हणून 'ब्रह्मक्षत्रविमिश्रित ऋषि' असें ययातीस म्हटलें आहे. ४ कुलीनानें. ५ स्वीकाराला. ६ अति+आग—मोठा अपराध. ७ शुभ आशीर्वाद. ८ क्षत्रियानें ब्राह्मणकन्या वरली असतां जो धर्मलोप होणार त्याचा दोष तुला (लागणार) नाहीं अशा वरासह.

अ-सकन्नृपें भयार्णी गुरु-पाद-रजांत मुकुट लोळविला ॥ ७७ ॥
गेला पुरासि घेउनि बसवूनि मनुष्य-देवें यानीं, तें ॥
श्रीतें पद्म, तसें वर-सद्म सुख-द होय देवयानीतें ॥ ७८ ॥
बहु पुण्यवंत रमतो जैसा सानंद देव-लोक-वनीं ॥
स्त्री-रत्नीं बहु रमला नृप, स-रसीं रसिक काय तो कवनीं ॥७९॥
सदनीं करी ययाती जे कांहीं सुख-विलास तीस हितें ॥
रायें स्वात्मा तैसा जेंवि हरें सुखविला सतीसहित ॥ ८० ॥
कवि-जा-सुत यदु पहिला त्याचें गुरु-लोचना मना तुंड ॥
निववी शशि-बिंब जसें, करि कविचें मुदित धाम नातुंड ॥ ८१ ॥
होय ऋतु-मती जेव्हां शर्मिष्ठा व्याकुळा वराधीनें ॥
चित्तीं म्हणे सहावें किति दुःख कलेवरें पराधीनें ॥ ८२ ॥
प्रियतम सहाय नसतां यौवन-हननें करोनि जो शीण ॥
तद्वणनीं कुंठित-मति होईल सरस्वतीहि जोशीण ॥ ८३ ॥
शिशु पाळण्यांत घालुनि हालवितां निजवितां सुखें जो जो ॥
धात्री म्हणति सखीला अमृत-रसचि तो निघे मुखें जोजो ॥८४ ॥
काय करूं एकांतीं जरि होती भेट वाटतें मतिला ॥
विनवुनि वरितें पुत्र-प्राप्त्यर्थ तरी स्वयें सखी-पतिला ॥ ८५॥
न उपेक्षील कदापि क्षिति-पति धर्म-ज्ञ शरण आलीला ॥
मज ही व्हावे, झाले काम-द ते जेविं चरण आलीला ॥ ८६ ॥
नृ-पहि उप-वनीं गेला एकांतीं तोहि दृष्टिला पडली ॥
न घडावीच कधीं परि दोघांची गांठि वि धि-बळें घडली ॥ ८७ ॥
देतां दुर्लभ दर्शन एकांतीं करुनिया दया तीतें ॥
कळला प्रसाद, मग ती विनवी मंजु स्वयें ययातीतें ॥ ८८ ॥

---

१ राजा. २ ह्याचा संबंध वरसद्म ह्या शब्दाकडे. ३ नवऱ्याचें घर. ४ नंदनवनांत. ५ सुरस काव्यांत सहृदय पुरुष जसा रमतो तसा. ६ आवडणारे. ७ पार्वती-सहवर्तमान. ८ पतीच्या अभावामुळें होणाऱ्या दुःखानें. ९ येथून पुढें चार आर्यांतील भाषण शर्मिष्ठेचें आहे. १० तारुण्याच्या व्यर्थ जाण्यानें. ११ धात्री मुखें जो जो 'जोजो, म्हणति तो सखीला (देवयानीला) अमृतरसचि निघे (असें वाटे). १२ ययातीला. १३ आलेली तिला. १४ इच्छा पूर्ण करणारे. १५ माझी सखी देवयानी तिला. १६ दैवयोगानें. १७ राजा आपणावर प्रसन्न झाला आहे असें समजल्यावर ती मंजुळ शब्दांनीं त्याची विनवणी करूं लागली.

द्वारीं मृग-पति-हस्तांतूनि अहो वीर-रायजी मुक्ता ॥
ती सेविजेल इतरें सिंहावांचूनि काय जी मुक्ता ॥ ८९ ॥
नृ-पति म्हणे जे वदसी जाणतसें मी यथार्थ सुंदरि तें ॥
स-रस असेचि मधु-प बहु मनिं जरिहि रसेंकरूनि कुंद रितें ॥९०
तुज शयनीं न बहावें वदला कवि मज अलंघ्य आज्ञा ती ॥
माझे तुझेहि न पुन्हा मुनिच्या क्षोभें म्हणोत 'हा' ज्ञाती ॥ ९१ ॥
शर्मिष्ठा त्यासि म्हणे गम्य-स्त्री-विषयकानृतें पाप ॥
न शिवे धर्म-ज्ञाला आर्त जनाचा निवारिजे ताप ॥ ९२ ॥
वरिलासि मत्सखीनें म्यांही वरिलासि तूं मनें, मातें ॥
तापा पासुनि रक्षी या माझ्या चालवूनि नेमातें ॥ ९३ ॥
भू-प म्हणे व्रत माझें कोणी जन जें अभीष्ट मागेल ॥
तें द्यावें त्यासि असें मज तत्त्यागेंहि दोष लागेल ॥ ९४ ॥
शर्मिष्ठेला झाला सुत नाम द्रुह्यु ठेविलें आहे ॥
ऐसें कळतां चित्तीं चिंतेला काव्य-कन्यका वाहे ॥ ९५ ॥
भेटुनि तिला म्हणे हें कर्म उचित सु-भ्रु काय गे, हातें ॥
विमळ कुळ मळविलें कीं लावियला अग्नि काय गेहातें ॥ ९६ ॥
धवलांबरासि कज्जल तैसें जें शुचि-कुळासि पाप डसे ॥
तें धूतां श्रम बहु, गुरु भाजति दुःखाग्निमाजि पापडसे ॥९७ ॥
येरु म्हणे ऋषि आला श्रुति-पार-ग धर्म-शील वर-दा त्या ॥
प्रार्थूनि याचिला म्यां ऋतु-काळीं पुत्र- काम-वर दात्या ॥ ९८ ॥
देवी म्हणे खरें हें जरि तरि शोभनचि मानलें मजला ॥

---

१ अहो वीरराय द्वारीं मृगपतिहस्तांतूनि जी मुक्ता मुक्ता (मोतीं) ती सिंहावांचूनि इतरें सेविजेल काय! सर्व पशूंचा राजा जो सिंह त्याच्या दारांत पडलेलें मोतीं त्यावांचून दुसऱ्या कोणाची उचलून घेण्याला छाती होणार आहे! तसें वीरश्रेष्ठ जे तुम्ही त्या तुमच्या पाशीं असणारी जी मी तिचा स्वीकार तुमच्याशिवाय कोणास करवणार आहे! तात्पर्य मी अनन्यगतिक आहें म्हणून तुम्हीच माझे पति व्हा. २ जरि रसेंकरून कुंद रितें तरि मधुप मनीं सरस (रसग्राहक) असेचि असा अन्वय. तात्पर्य–मी जरी तुजविषयीं कामुक आहें तरी शुक्राच्या आज्ञेमुळें मला तुझा स्वीकार करितां येत नाहीं. ३ उपभोग्य स्त्रीच्या संबंधानें खोटें बोललें असतां. ४ चांगल्या आहेत भिवया जीच्या. (संबोधनार्थीं हें रूप). ५ वडील. ६ पुत्रप्राप्तीची इच्छा पूर्ण होण्याचा वर. ७ पट्टराणी (देवयानी).

मज नाम सांग त्याचें सुंदरि जो वर-द ऋषि तुला भजला ॥ ९९ ॥
दैत्य-पति[1]-जा म्हणे ऋषि गमला रविसाचि, नाम-गोत्रास ॥
कैची शक्ति पुसाया सांगों मी देवि काय तो त्रास ॥१००॥
राज्ञी म्हणे बरें मज नाहीं कोप त्वदीय सुत-लाभें ॥
जन न उतला जगीं जो तो पावे नित्य भद्र; उतलों[2] भें ॥१०१॥
वदल्या दोघी प्रेमें झाल्या सानंद हांसल्या आली ॥
आलिंगिलें परस्पर मग निज सदनासि भार्गवी[3] आली ॥ १०२ ॥
त्यावरि दुसरा झाला तो तुर्वसु शुक्र-कन्यका-तनय ॥
अनु, पूरु, पुत्र दोघे शर्मिष्ठेला; करी न घात नय ॥ १०३ ॥
कवि-कन्येचे दोघे शर्मिष्ठेचे तिघे सुत, नुरविते ॥
पितृ-चिंता[4]-तिमिर सुहृन्नयनाब्जें सुखविते सु-तनु रवि ते ॥१०४॥
एका समयीं देवी पतिसह गेली अशोकवनिकेला ॥
क्रीडावें तेथ सुखें संकल्प असा तिणें स्व-मनिं केला ॥ १०५ ॥
शोभे सती उपवनीं पतिसह जशि शंभुची उमा रमणी ॥
तों देखिले तिनें सुर-गर्भ[5]-सम-प्रभ तिघे कुमार-मणी ॥ १०६ ॥
देवी राजासि पुसे सुर-कलभांची[6] हिरोनि गति घेते[7] ॥
कोणाचे शिशु जैसे देवांचे चालते नग तिघे ते ॥ १०७ ॥
दिसति तुम्हांसम रूपें श्रीचे संकेत[8]-कुंज ते जांचे ॥
काय रुचिर काय सुचिर झाले हे प्रकट पुंज तेजांचे ॥ १०८ ॥
पाचारुनि त्यांसि म्हणे कोणाचे बाळ हो तुम्ही, धाम ॥
कोठें तुमचें सांगा कुळ तुमचें कोण, काय हो नाम ॥ १०९ ॥
अंकीं तुम्हांसि घेउनि आलिंगुनि त्दृष्ट कोण होतात ॥
कोणासि माय म्हणतां तुमचा कृत-सुकृत[9] कोण हो तात ॥११०॥
माता सांगुनि, पुसतां तात, ययातीस दाविती बोटें ॥
खोटें कर्म नृपाचें जाणुनि ती दुःख धरि मनीं मोटें ॥ १११ ॥

---

१ शर्मिष्ठा. २ माजलेला मनुष्य भय पावतो. ३ देवयानी. ४ ते सुतनु रवि पितृचिंता-तिमिर नुरविते (आणि) सुहृन्नयनाब्जें सुखविते (झाले) असा अन्वय. सूर्यासारिखे तेजस्वी ते मुलगे बापाची काळजी हेंच तिमिर म्ह० अंधकार त्याला घालविणारे व मित्रांच्या नेत्रकमलांस सुखदायक असे झाले. ५ देवांच्या गर्भाप्रमाणें (संततीप्रमाणें) तेजस्वी. ६ देवांच्या हत्तींच्या छाव्यांची. ७ घेणारे. ८ ठरविलेलें क्रीडेचें स्थान. ९ पुण्यवान्.

गेले शिशु जवळि परि न त्यांतें करुणा-सुधा-नदी-पति[1] घे ॥
ते त्या क्षणींच रुचले स्व-कुलाचे त्या बुधा न दीप तिघे ॥ ११२ ॥
उत्सुक झाले होते अंकारोहार्थ[2] पुत्र परं[3] तो न ॥
प्रभु घे, मग मातेप्रति गेले रोदन करीत परतोन ॥ ११३ ॥
पति-कृत कपटें पावे आणुनि नेत्रांसि वारि खेदासी ॥
तीस[4] म्हणे कांगे हे ऋषि-सुत तरि नृ-पतिसारिखे दासी ॥ ११४ ॥
त्वां हा भूप भुलविला केला माझा दहांत अपमान ॥
बटिक कुटिल तूं दुष्टे वद लंघ्य तुला मदीय तप मान ॥ ११५ ॥
राज-सुताहि म्हणे तूं कमळाला मधुकरी जशी तृषिता ॥
ज्या भाळलीस ऋषि-जा[5] त्या सत्पुरुषीं कशी नसे ऋषिता ॥ ११६ ॥
जो त्वत्पति तो मत्पति देवि पहा धर्में मी तुझी आली ॥
त्वां म्यांहि मनें वरितां ऋषिता पतिता प्रभूकडे आली ॥ ११७ ॥
तूं ज्येष्ठा विप्र-सुता राज-सुता मी सये कनिष्ठा हो ॥
जैसी तुझी नृप-पदीं माझीहि तशीच एक-निष्ठा हो ॥ ११८ ॥
वदलें सत्यचि पूर्वीं देवि पहातां ऋषीच पति तत्वें ॥
क्षोभों नको वृथा तूं हा जन दूषूं नको चि पतितत्वें[6] ॥ ११९ ॥
जी स्मर-हता[7] पदनता त्यजिल न शशि-वंश-सदनें-दीप[9] तितें ॥
भेटेल नदी जी जी ती अनुकंप्यांचि[10] नद-नदी-पतितें[11] ॥ १२० ॥
शुक्र-सुता पतिस म्हणे हें वि-प्रिय काय उचित महिम्यातें ॥
त्यजिलें आजि तुझें जें श्री-पद्म हि सद्म शुचि-तम हि म्यां तें ॥ १२१ ॥
आरोपूनि स्व-शिरीं दासी-संगें करुनि विटें-लीला ॥
पंडित-वर परि न शके समजावाया ययाति विटलीला[12] ॥ १२२ ॥
गुणें[13] वावडीस सु-दृढ प्रेमाचि स्त्रीस आवरायाचा ॥
तो तुटतां यत्न नसे कांहीं गेलाचि आव रायाचा ॥ १२३ ॥
जाय पित्याच्या सदना करुनि परित्याग बायको पतिचा ॥
पुत्रांतें हि न पाहे सांगावा उग्र काय कोप तिचा ॥ १२४ ॥
नाहींच कांत-वचना त्द्दयांत धरूनि ती अ-सुख वळली ॥

---

१ दयारूप अमृताचा समुद्र. २ मांडीवर बसण्यास. ३ परंतु. ४ शर्मिष्ठेस ५ ऋषिकन्या ( तूं ). ६ भ्रष्टपणानें. ७ कामानें पीडलेली. ८ पायां पडणारी. ९ चंद्रकुलरूप घरांतील दिवा. १० दयेला पात्र. ११ समुद्रानें. १२ जारकर्म. १३ पतंगाला जशी बळकट दोरी तसें अतिशय प्रेम हेंच स्त्रीला आवरतें.

वाटे नृपासि धरितां सोडीलचि आपुले असु खवळली ॥ १२५ ॥
भूप म्हणे तीस परिस माझें सुख-संपदे विनिवर्णे हो ॥
चित्त सु-वृत्त[1] न पावो विश्लेषें कंप, देवि निवर्णे हो ॥ १२६ ॥
दावार्ता[2] जेंवि मृगी कासारीं जाय ती स्व माहेरीं ॥
पावे नृपहि; म्हणे तों नमुनि गुरुसि तापसोत्तमा[3] हेरीं ॥ १२७ ॥
ताप दिल्हा जेणें तो हा कामी तापसा हतांस दया ॥
उठवि तुझी कीर्ति मारूं हाका मी ताप साहतां स-दया ॥ १२८ ॥
माझी दासी मजहुनि बहु मान्या यासि बा दया तीची ॥
तीन तिला सुत दिधले दोघे मज ती प्रिया ययातीची ॥ १२९ ॥
स्व-तपाच्या तीव्रत्वें लाजविता योगि-राज जो पविला ॥
तो स्वातिक्रम कळवुनि सुरयानीनें क्षणांत कोपविला ॥ १३० ॥
वृंदावनासि मानिति आम्हेरिति मूर्ख मत्त पनसा हो ॥
तीच गति;अतिक्रम पर-तप साहो, लवहि मत्तप न साहो ॥१३१॥
जेणें अ-धर्म घडला नाशो बळवीर्य आजि राया तें ॥
वपुला आतांचि जरा ग्रासो, हा दंड साजिरा यातें ॥ १३२ ॥
भूप म्हणे शाप दिला उग्र विपत्पात-हेतु,[5] म्हातारा ॥
झालों, पहा अहाजी जोडितसें हात हे तुम्हां तारा ॥ १३३ ॥
म्हणतां सत्यचि देवा जें[6] हें न विचारिलें तुम्हां चुकलों ॥
परि शापें तुमच्या प्रिय दुहितेच्या मी समागमा मुकलों ॥ १३४ ॥
करुणा करा सुते-वरि गुरुजी प्रभुजी स्वशाप हा फिरवा ॥
मिरवा प्रसाद लोकीं जिरवा मनिं रोष मज इला निरवा ॥ १३५ ॥
मी यौवनीं अ-तृप्तचि हीच्या आतांचि भर विलासाचा ॥
शाप-मिषें त्वां तापचि आम्हां दोघांसि भरविला साचा ॥ १३६ ॥
शुक्र म्हणे नरनाथा नाहीं होणार शाप हा लटिका ॥
तेज पहा वचनाचें ज्यासि फळाया न लागली घटिका ॥ १३७ ॥
परि मद्वरें तयाप्रति जाइल देशील हे जरा ज्यातें ॥

---

१ चांगल्या वर्तनाचें, पक्षीं वाटोळें, वाटोळा पदार्थ जसा निवण्यावांचून स्थिर राहत नाहीं, तसें तुझ्या समागमावांचून माझें चित्त स्थिर राहणार नाहीं. असें तात्पर्य. २ वणव्यानें पीडित. ३ शापाचा कर्ता देवयानी. ४ ऋषींमध्यें श्रेष्ठा. ५ भयंकर दुःखदायीला कारणभूत. ६ शर्मिष्ठा स्वीकाराची क्रिया नाहीं हें.

येईल तुजमति जें त्याचें तारुण्य-तेज राजा तें ॥ १३८ ॥
भूप म्हणे दोघींला दिधले म्या पांच तनय निज रेतें ॥
तो राजा होऊ जो देइल यौवनहि घेउनि जरेतें ॥ १३९ ॥
काव्य म्हणे हेंहि दिलें जा परि होवोनि वीर्य-मत्त नया ॥
न उलंघीं धर्मातें रक्षीं दुखवीं पुन्हा न मत्तनया ॥ १४० ॥
गुरुची आज्ञा कन्या घेउनि जाउनि गृहासि तो जीन ॥
आणी मनीं असें कीं यदुच्या देहीं जरेसि योजीन ॥ १४१ ॥
त्यासि म्हणे स्व जरा घे यौवन दे अ-यश अ-नृत न यदो घे ॥
तो तें न करी तुर्वसु हो तेहि द्रुह्य अनु तनय दोघे ॥ १४२ ॥
पूरूनें आज्ञेचा केला स्वीकार, ते जरा याला ॥
स्पर्शे काव्य-बळानें याचें तारुण्य-तेज रायाला ॥ १४३ ॥
करितां आज्ञा-भंग क्षोभाचें पात्र जाहले चवघे ॥
पूरु प्रसाद गुरुचा पावे, सत्कीर्तिची सदा चव घे ॥ १४४ ॥
पूरुप्रति भूप म्हणे वत्सा मत्सार्वभौम-पदवीतें ॥
तूंचि सुपात्र, मज तुझें साधुत्व तव स्तवासि वदवीतें ॥ १४५ ॥
तूं धन्य अन्य न असा कैंची सर्वत्र साधु सुत-रीती ॥
बापा मजा असी जी पितरांसि भवार्णवांत सु-तरी ती ॥ १४६ ॥
धर्मार्थ-काम सेवी पुत्र-वयें नृप सहस्र वत्सर तो ॥
मग मनिं म्हणे पुरें हें या स्त्री-संगीं मदीय वत्स रतो ॥ १४७ ॥
स्वल्पचि एकाहि स्रक्-चंदन-वनिता-दिसर्वविषयमही ॥
कळलें मज हे भोगचि मारक, न व्याळ, शस्त्र, विष, यम, ही १४८
श्री-सेव्या सदलि-मता वस राज्य-सरीं निमज्ज राजीवा ॥
वत्सा, बहु कष्टविलें त्वां स्वीकारुनि मज्जरा जीवा ॥ १४९ ॥
जाय नृप श्रीकरवीं धरवुनिया पूरु-हस्त वन-वासा ॥
न गमे प्रजांसि पति तो गुण-जित-सुरे-भू-रुह-स्तव नवासा १५०

---

१ माझी मुलगी. २ हें यौवनाचें विशेषण. ३ स्तुत नव्हे तें म्हणून निंद्य. ४ माझ्या सर्व पृथ्वीच्या राज्याच्या अधिकाराला. ५ संसारसागरांत. ६ चांगली नाव. ७ माला, चंदन, स्त्री आदिकरून सर्व उपभोग्य वस्तूंनीं पूर्ण अशी सारी पृथ्वी देखील एकाची-ही तृप्ति होण्यास फार थोडी आहे. ८ ऐश्वर्य ( पक्षीं ) शोभा ह्यानीं सेव्य, साधूंच्या समुदायास मान्य, पक्षीं भ्रमरांस प्रिय अशा हे पुत्ररूप कमळा राज्यरूप सरोवरामध्यें बुडून रहा. इ० ९ आपल्या गुणानीं जिंकिली आहे कल्पवृक्षाची स्तुति ज्यानें, म्हणजे कल्पवृक्षाच्या पेक्षांही ज्याचें औदार्य मोठें आहे असा.

जाउनि तपो-वनातें सेवी राजा महातपा पवना ॥
जाळी ज्ञान-दवें तो चित्त-गजाचों महातें पाप-वना ॥ १५१ ॥
गेला स्वर्गासि अमित सुकृतें जोडोनि राय, तें नाकीं ॥
होय सु-दुःसह शक्रा जैसें बाळासि रायतें नाकीं ॥ १५२ ॥
तरला ययाति राजा दर्शन होतांचि संत-रायांचें ॥
त-द्दर्शनचि सु-दर्शन करि गट चट कटक अंतरायाचें ॥ १५३ ॥

---

## आदिपर्वांतील दुष्यंतशकुंतलाख्यान.

विश्वामित्रऋषीच्या तपश्चर्येचा भंग करावा म्हणून इंद्रानें त्याजकडे मेनका ह्या नांवाची अप्सरा पाठविली. तिनें त्यास मोहित केलें. मग विश्वामित्रापासून तिचे पोटीं कन्या झाली, तिचें नांव शकुंतला ठेवून कण्वऋषीनें तिचें पालन केलें. पुढें सोमवंशांतील दुष्यंत राजानें तिला गांधर्वविधीनें वरिलें, इत्यादि गोष्टी ह्या आख्यानांत आहेत.

श्रीमद्ययाति-नंदन-पूरु-कुळीं भूप जन्मले शतशा ॥
श्रवणें तत्कीर्ति हरिति ताप सुधांच्या नद्या न लेश तशा ॥ १ ॥
त्या पौरवांत जाला राजा दुष्यंत धर्म-पर महित ॥
स्व-गुणें करि प्रजांचें अनु-दिन तो मूर्त धर्म परम हित ॥ २ ॥
तो एकदा वनाला जाय कराया यथेष्ट मृगयेतें ॥
बल-कोलाहल परिसुनि कुल-नाश-व्यसन म्हणति मृग येतें ॥३॥
वधिले व्याघ्र वृक खळ श्वापद, धरिले प्र-मत्त गज रानीं ॥
चिरिले किरि, लेशहि धृति मृग-यूथीं नुरविलीच गजरांनीं ॥ ४ ॥

---

१ तपश्चर्येचें अरण्यांतील पवित्र स्थान. २ प्रखर ऊन व वारा. ३ मनोनिग्रह करणारा. ४ अष्टकादिराजर्षींचें. ययाति राजा स्वर्गीं गेल्यावर त्यास इंद्रानें तुझ्यासारखें तप कोणाचें आहे असें विचारलें असतां, ययातीनें माझ्यासारखें तप कोणाचें ही नाहीं अशी आपली मोठी आपले तोंडानें वर्णिली. तेव्हां तूं क्षीणपुण्य झालास असें म्हणून इंद्र त्यास मृत्युलोकीं ढकलूं लागला असतां ययातीनें मला साधुजनांत टाक अशी प्रार्थना केली. ती इंद्रानें मान्य केली. मग तो खालीं पडूं लागला, त्या वेळेस अष्टकादि राजर्षींनीं त्यास पाहिलें. पुढें परस्परांचा संवाद होऊन त्यांनीं आपलें पुण्य ययातीस देऊन त्यास स्वर्गप्राप्ति करून दिली, अशी कथा आहे. ५ विघ्नांचा समुदाय त्याचें. ६ पूरुकुलोत्पन्न राजांत. ७ सैन्याची गडबड.

एका हरिणामार्गें एकाकी भू-प धांवतां श्रमला ॥
जातां दूर श्रीमत्-कण्वाश्रम रम्य पाहतां रमला ॥ ५ ॥
तें सत्य-लोक-तुल्यचि आश्रम-पद ज्यांत अण्वघ[1] न साचें ॥
तेथील तापस शिखी चातकसे त्यांत कण्व घन साचे ॥ ६ ॥
श्री-मालिनी[2]-तटीं तो त्या सिद्धाश्रम-पदांत शिरला हो ॥
चित्तांत म्हणे काश्यप-पदे-पद्म-रजः-प्रसाद[3] शिर लाहो ॥ ७ ॥
मुनि आश्रमांत नव्हता त्याची कन्या शकुंतला होती ॥
पूजी नर-देवातें करि तेव्हां स्व-वपु दीपक-ज्योती ॥ ८ ॥
अवलोकितांचि आधीं भुलला लावण्य-कल्पलतिकेला ॥
त्यांत तिणें उचितादर स-स्मित-मधुरो-दितें[4]हि अति केला ॥ ९ ॥
मग तीस पुसे सुंदरि चतुरे तूं कोण सत्य सांग मला ॥
तुज या वयांत हित हा उग्र तपो-नियम-ताप कां गमला ॥१०॥
कण्व-सुता मी म्हणसी परि न गमे सत्य सत्य वद नातें ॥
दे मत्कर्ण[5]-तृषा-हर-वृत्त-सुधा-चषकता स्व-वदनातें ॥ ११॥
त्वत्तात ऊर्ध्व-रेता कण्व तयाची सुता कसी बोल ॥
हा पौरव दुष्यंत त्वद्वृत्ताकर्णनीं असे लोल ॥ १२ ॥
ती त्यासि म्हणे पूर्वी एके मुनिनें विचारिलें होतें ॥
जें त्यातें मत्तातें कथिलें मज्जन्म[6] सांगतें हो तें ॥ १३ ॥
विश्वामित्र तप करी केलें कोणीं हि तेंवि तप नाहीं ॥
तापे मुनि-तेजें जग जैसें कल्पांत-काळ-तपनां[7]हीं ॥ १४ ॥
उग्र-तपः-सामर्थ्यें विश्वामित्र प्रभु स्व पद हरितो ॥
ऐसें शंकूनि[8] म्हणे धरुनि करें मेनका-करा हरि तो ॥ १५ ॥
स्वः[9]-श्री-भोग बहुत जरि केला परि तो गमे न केला हो॥

---

१ ( अणु+अघ )–अल्प ही पातक. २ नदीविशेष. ३ कण्वाच्या पदकमलाचा रजःकणरूप प्रसाद. ४ किंचित् हास्ययुक्त मधुर भाषणानें. ५ ( तूं ) स्ववदनानें मत्कर्णतृषाहरवृत्तसुधाचषकता दे; ह्याचा अर्थ—तूं आपल्या मुखाला माझ्या कर्णांची तृषा हरण करणारी अशी ( तुझें वृत्त ( कथा ) हींच सुधा ( अमृत ) तिची चषकता ( पात्रता ) दे; म्हणजे–अमृतासारखा गोड तूं आपला वृत्तांत स्वमुखानें मला सांगितला असतां माझे कान तृप्त होतील. ६ माझ्या जन्माची हकीकत. ७ कल्पांतकाळीं बारा ही सूर्य उगवतात म्हणून बहुवचन घातलें आहे. ८ इंद्र. ९ स्वर्गांतील ऐश्वर्याचा उपभोग.

म्हणुनि इचा हो कौशिक मुनि हि तुझा भोग मेनके लाहो ॥१६॥
स्व-पद-हर गमे सकळां मजलाचि प्रियतमे न केवळ तो ॥
न वळेल उपाय-शतें तुजचि मुनी नियत मेनके वळतो ॥ १७ ॥
तूं पात्र गाधि-जाला सदुपायन करुनि देह नुतितें हो ॥
हरि वारंवार असें स्व-करेंचि धरुनि वदे हनु तितें हो ॥ १८ ॥
भ्रू-धनु वोढुनि कज्जल-विष-दिग्ध कटाक्ष-शर वरारोहे ॥
सोडुनि लुटी तपो-धन सौभाग्य- श्री तुझी भरारो हे ॥ १९ ॥
ती अप्सरा म्हणे तो भस्म करिल मज महा-तपा शापें ॥
जाइल कवण यमाच्या जोडुनि बळेंचि हात पाशापें ॥ २० ॥
मी अबला भोरु कसी साहों त्या गाधि- तनय- तेजातें ॥
भ्यालासि असा दुः-सह मानुनिया तूंहि सुर- पते जातें ॥ २१ ॥
गातात कीर्ति ज्याची मुनि-सुत-हननें-त्रिशंकु-रक्षण-जा ॥

---

१ ह्या स्वःश्रीचा. २ हा मी इंद्र. ३ निश्चयेंकरून. ४ तूं गाधिजाला ( विश्वामित्राला ) देह ( आपलें शरीर ) सदुपायन ( उत्तम भेट ) करुनि नुतितें ( स्तुतीस ) पात्र हो. ५ भिवई हेंच धनुष्य. ६ काजळ हेंच विष ह्यानें दिग्ध म्ह० माखलेला जो कटाक्ष हाच बाण. ७ वर म्ह० श्रेष्ठ आहे आरोह म्ह० नितंब अथवा कंबर जीची. ८ तप हेंच आहे धन ज्याचें—ऋषि. ९ उत्कर्ष पावो. १० मोठें आहे तप ज्याचें असा. ११ पाशाजवळ. १२ वसिष्ठपुत्रांचें हनन आणि त्रिशंकु राजाचें रक्षण ह्यांपासून उत्पन्न झालेली. हें कीर्तीचें विशेषण—त्रिशंकु हा सूर्यवंशांतील राजा होता. त्यानें आपणास सशरीर स्वर्गप्राप्ति व्हावी म्हणून यजन करण्याविषयीं आपला कुलगुरु वसिष्ठ ह्याजकडे जाऊन विनंती केली. पण असें होणें अशक्य असें म्हणून वसिष्ठानें नाकारल्यावर त्रिशंकु हा, वसिष्ठाचे शंभर पुत्र तपश्चर्या करीत होते, त्यांजकडे गेला आणि त्यानें त्यांचीही तशीच विनवणी केली. तेव्हां त्यांनीं ही यजन करण्याचें नाकारून तूं गुरूचें ( वसिष्ठाचें ) वचन उल्लंघण्यास पाहतोस, म्हणून तूं चांडाळ हो असा शाप त्यास दिला. मग राजानें विश्वामित्रास शरण जाऊन आपली झालेली हकीकत त्यास सांगीतली. ती ऐकून विश्वामित्रास दया आली. आणि त्यानें त्रिशंकूचें म्हणणें स्वीकारिलें. नंतर यजन करण्याकरितां मोठमोठे ऋषि विश्वामित्रानें बोलावून आणिले व त्या यज्ञास प्रतिकूळ जे वसिष्ठाचे शंभर पुत्र त्यांस शाप देऊन भस्म केलें; आणि यजनास आरंभ केला. परंतु इंद्रादि देव त्या यज्ञांत हविर्भाग घेण्यास येईनात; तेव्हां विश्वामित्रानें आपल्या तपश्चर्येच्या पुण्यानें त्या राजास स्वर्गीं पाठविलें. परंतु तूं सशरीर स्वर्गीं येण्यास योग्य नाहींस असें म्हणून इंद्रानें त्रिशंकूस तेथून खालीं लोटलें. तेव्हां विश्वामित्रास मोठा क्रोध येऊन त्यानें नवीं नक्षत्रें उत्पन्न केलीं; आणि तो नवा इंद्र व स्वर्ग उत्पन्न करूं लागला. त्या वेळेस देवांनीं त्याची प्रार्थना करून त्याचा कोप शांत केला; आणि त्रिशंकूस नक्षत्रमंडळांत राहूं दिलें, अशी कथा आहे.

ब्रह्म-समत्वचि दे नव सृष्टीचा दिव्य अंकुर क्षण जा ॥ २२ ॥
जें दुष्कर पुरुष-वरा तुजहि कसें करिल काज रामा तें ॥
सदमृततरु तो मुनि परि कपटें होईल काजरा मातें ॥ २३ ॥
करिल कसें मांजर जें दुष्कर हरि-हनन काज वाघास ॥
न शकति अग्नि-विधु कसा दिन-मणिचा करिल काजवा घास॥२४
त्या मुनितें मोहाया हा जन काय प्रभु प्रभो परि तें ॥
तेज पहाया जातें परिजन-गतें-नाथ-तेज जय करितें ॥ २५ ॥
जातें तव आज्ञेचा कोण सु-धी जन करील अवमान ॥
परि मन्निकट असावे मज साह्य वसंत-काम-पवमान ॥ २६ ॥
शक्र म्हणे सर्व हि सुर आहों तुजला सहाय कार्य करीं ॥
आज्ञा दे, मग गेली आणाया तूर्ण तोहि आर्य करीं ॥ २७ ॥
जेथें करीत होता दारुण तप तो तपो-नदीन मुनी ॥
तेथें जाउनि खेळे तन्निकट प्रथम तत्पदीं नमुनी ॥ २८ ॥
होती करीत कंदुक-केलि मधुर-गान-मोहिनी, तीतें ॥
स्पर्शे प्रथम वसन-हर पवन मग त्यजुनि तोहि नीतीतें ॥ २९ ॥
झाली गाधि-ज-संगें हे कन्या मालिनी-तटीं ठेवी ॥
स्वर्गासि जाय तेथुनि बहु निष्ठुर चित्त करुनि ते देवी ॥ ३० ॥
संरक्षिली वनीं मधु पाजुनि मातेविना शकुंतांनीं ॥
असतां विधि-कवच नव्हे कालाच्या ही विनाश कुंतांनीं ॥ ३१ ॥
स्नानार्थ मालिनीतें गेलों तों कळविलें हिच्या रुदितें ॥
आणुनि उटजीं केलें म्यां लालन पालन स्वयें मुदितें ॥ ३२ ॥
झालें शकुंत पालक म्हणुनि असें इज शकुंतला नाम ॥
ठेवुनि वागविलें हें रत्न गळां जेंवि मालती-दाम ॥ ३३ ॥
ऐसी तात-मुखेंश्रुत निज-जन्म-कथा शकुंतला कळवी ॥
पळ वि-स्मित करुनि नृ-पति-मनिंची स्वालभ्यतो-व्यथा पळवी॥३४

---

१ सज्जनास कल्पवृक्षासारखा. २ चाकराच्या ठिकाणीं प्राप्त झालेलें (त्याच्या) धन्याचें तेज. धनी सामर्थ्यवान् असला म्हणजे त्याच्या बळावर चाकर मोठमोठीं कामें करितात. ३ हा शब्द सहाय ह्या विशेषणाबद्दल योजिला आहे. ४ श्रेष्ठ--विश्वामित्र. ५ तपाचा केवळ समुद्रच. ६ वस्त्र उडवून नेणारा. ७ विश्वामित्र ही. ८ मेनका. ९ आपल्या अप्राप्यतेचें दुःख-ही ऋषिकन्या असेल तर आपणांस वरणार नाहीं अशी चिंता राजाच्या मनांत होती; ती चिंता, ही विश्वामित्रराजाची कन्या आहे असें समजतांच, दूर झाली.

नृ-पति म्हणे तरि सुंदरि सु-दति मुदतिशय[1] तुला मला हि घडो ॥
सत्कृतिशीं[2] रसिकाची तुजसीं माझी तशीच गांठि पडो ॥ ३५ ॥
कुळ-शीळ-गुणांहीं तूं योग्या नृप-कन्यका महोदारा ॥
घे राज्य सर्व, नाहीं त्वदधिक मज अन्य काम, हो दारा ॥ ३६ ॥
हांसुनि तीहि म्हणे हो मार्थावें प्रणत-पारिजाता[3]तें ॥
देवा स्वयें वहावें या निज-कारुण्य-वारि-जा[4] तातें ॥ ३७ ॥
मजकरवीं न तुम्ही बुध गुरु-मर्यादातिपात[5] करवा हो ॥
सत्पात्रीं स्व-धनातें चिंतामणि-कण्व-तात-कर वाहो ॥ ३८ ॥
अन्बा धन्या कन्या अन्याय न्याय जाणत्या मागें ॥
गांधर्वींच वरातें भजल्या, तद्गुरु हि न भरले रागें ॥ ३९ ॥
गुरु-देवता-प्रसादा हो भाजन, आपुल्याचि देहातें ॥
सत्कीर्ति जगीं व्हाया सत्पात्रीं आपुल्याचि दे हातें ॥ ४० ॥
सुत युव-राज असो हा वरुनि वर निका शकुंतला आली ॥
झाली, करांत याच्या मधुप-वर-निकाश-कुंतला[6] आली ॥ ४१ ॥
तेव्हां तदैव म्हणे योग्य तुला न नर अन्य केलीला ॥
श्री विष्णुसीं तसी तूं यासिं करी कण्व-कन्यके लीला ॥ ४२ ॥
राजा दुष्यंत म्हणे लब्ध-मनोरथ प्रियंवदे विरहा ॥
मी ही प्याडचि, सेना पाठवितों तों असीच देवि रहा ॥ ४३ ॥
दे मज निरोप; हंसें वद विस्मरिजेल काय देवि सर ॥
भिन्न दिसो एकचि वपु हें कोणासहि न काय दे विसर ॥ ४४ ॥
गेला निरोप घेउनि पार मनिं कण्वासि भूप तो भ्याला ॥
चित्तीं म्हणे अहा मुनि शापिल मज परम विषय-लोभ्याला ॥४५॥
आला कण्व मुहूर्तें फळ-पुष्प-समित्कुशांसि आणूनी ॥
झाला प्रसन्न भगवान् दिव्य-ज्ञानेंकरूनि जाणूनी ॥ ४६ ॥
कण्व म्हणे वत्से त्वां केला निश्चित आजि तात-कर ॥

---

१ आनंदाचा अतिशय म्ह० भर. २ उत्तम काव्याशीं. ३ नम्र झालेल्यास कल्पवृक्षासारखा ( जो कण्व ) त्यातें. ४ आपलें ( कण्वाचें ) कारुण्य हेंच वारि म्ह. उदक, त्यापासून झालेलें—कमल, तद्रूप जी मी तिला. 'बापानें आपण स्वतः मला आपणास अर्पावें असा भावार्थ'. ५ वडिलांच्या मर्यादेचें उल्लंघन. ६ भ्रमरश्रेष्ठासारखे ( कृष्णवर्ण ) आहेत केश जीचे अशी.

न धरीं संकोच, नव्हे गांधर्व विधि स्व-धर्म-घात-कर ॥ ४७ ॥
तुज सुत होईल भला निववील यशोमृतें कुलीन-मनें ॥
त्यासि मदाशीर्वादें करितील समस्त नृप मुली नमनें ॥ ४८ ॥
तातातें नमुनि म्हणे म्यां दुष्यंतासि वाहिलें काय ॥
भवदा-श्रमीं अतिथिचें नव्हतां प्रिय उचित राहिलें काय ॥ ४९ ॥
त्यावरि कृपा करावी द्या[1] हा वर योग्य होय कन्या या ॥
कण्व म्हणे हेंहि दिल्हें कां भीसी न करुनीहि अ-न्याया ॥ ५० ॥
झाला शकुंतलेला सुत सु-तपा त्यासि कण्व परिपाळी ॥
गृह-धर्मांची[2] कुतुकें दे तो भगवान् विरक्त परि पाळी ॥ ५१ ॥
भरवी मृगार्भकां मग तो[3] भरवी कां न नातवा घांस ॥
झाला असा शिशुपणीं बद्ध करी काननांत वाघांस ॥ ५२ ॥
तो आश्रम-वृक्षांसी शार्दूल-वराह-हस्ति-हरि-सेना ॥
बांधी सा वर्षांचा, शिकवी कण्वोक्त[4] युक्त[5] परिसेना ॥ ५३ ॥
सर्वदमन त्यासि म्हणति करिति सदा सु-वर-वृष्टि जलद मुनी ॥
निरुपम-यश प्रजांला हा सुख देईल सर्व खल दमुनी ॥ ५४ ॥
कण्व म्हणे मुलि झाला राज्योचित सुत मलाहि लाभ वनीं ॥
जा पति-गृहासि, शोभे स्त्री-जन पतिच्याचि राहिला भवनीं ॥ ५५ ॥
राज्य-सुख पहा, पतिची सेवा करिं, मज उदास मुलि[6] न मनीं ॥
पतिसह वृद्धपणीं ये जरि हें वन-सिंधु-नीर-पुलिन मनीं ॥ ५६ ॥
आज्ञापिले स्व-शिष्य स्व-सुता नेत्रें पुसोनि पाठविली ॥
साश्रु मुनि-जनीं कण्वें शतवार तदीय[7] भक्ति आठविली ॥ ५७ ॥
दुष्यंत-सद्म-पद्मीं ते स्त्री श्री कण्व-भानु-शिष्य-करीं ॥
नेली पुत्र-सुगंधासह धर्म-नयांबु-पूर्ण-नगर-सरीं ॥ ५८ ॥

---

१ द्या वराला. २ प्रपंचांतील कृत्याची. ३ मुलीच्या मुलाला. ४ कण्वाचें वचन. ५ बरें—योग्य. ६ अन्वय—मुलि ( आपणाविषयीं ) मज उदास न मनीं—तुजविषयीं माझें प्रेम कमी झालें आहे असें समजूं नको. ७ शकुंतलेची. ८ " कण्व हाच भानु (सूर्य) त्याचे शिष्य हेच कर (किरण त्यांनीं ते स्त्री (शकुंतला) हीच श्री (शोभा), पुत्र हाच सुगंध त्यासह, धर्म आणि नय (नीति) हेंच अंबु (उदक) त्यानें पूर्ण (भरलेलें) तें नगर हेंच सर (सरोवर) त्यामध्यें, दुष्यंताचें सद्म (घर) हेंच पद्म त्यावर नेली "—सूर्याचे किरण जसे शोभेला सुगंधासह सरोवरातील कमळावर नेतात, त्याप्रमाणें कण्वशिष्यांनीं ती शकुंतला पुत्रासह, नगरांत दुष्यंत—गृहास नेली.

पतिला म्हणे मुनि-सुता द्यावें पुत्रासि यौवराज्य[1] नृपा ॥
स्मृति आहे कीं केली पूर्वीं जी काश्यपाश्रमांत कृपा ॥ ५९ ॥
राजा म्हणे कवण तूं कोणाचा पुत्र काय गे वदसी ॥
काच स्मृतिरपि तापसि मैवं[2] प्रलपात्र भूभुजः सदसि ॥ ६० ॥
साध्वी म्हणे अहो नय-धर्म-ज्ञ तुम्ही नरेंद्र पौरव कीं ॥
वदतां असें कसें हो करितां विश्वास-घात रौरव कीं ॥ ६१ ॥
मृगयेचिये प्रसंगीं हरिणामागें वनांत लागोनी ॥
आलासि मालिनीच्या तीरीं कण्वाश्रमासि भागोनी ॥ ६२ ॥
सिद्धाश्रमांत नव्हता तात, तुला म्यांच पूजिलें वन्यें ॥
जागें काय करावें निपट कपट[3]-निद्रिता जना अन्यें ॥ ६३ ॥
मज्जन्म-वृत्त पुसिलें त्वां, मग म्यां मेनकाप्सरा माय ॥
कौशिक बाप असें तुज कथिलें तें विसरलासि तूं काय ॥ ६४ ॥
सुत-यौवराज्य-वर मज देउनि गांधर्व विधि करोनि मला ॥
वरुनि न जाणें म्हणसी पूरु-कुळीं तूंचि सु-ज्ञ साधु भला ॥ ६५ ॥
स्त्रीस म्हणति जाया[4], सुत-रूपें पति तदुदरांत जन्मति, तें ॥
श्रुति-वचन[5] असावें तुज ठावें, परि मान्य होय सन्मतितें ॥६६॥
मी जाया सत्कार्या[6] आत्माचि तुझा कुमार हा राया ॥
झाला प्राप्त, परि गळां न धरिशि अद्यापि रत्न-हारा या ॥६७॥
भूप म्हणे भग्न[7]-व्रत तात तुझा माय ही तुझी अ-सती ॥
नसतीस तत्सुता तूं लज्जा कांहीं तरी तुला असती ॥ ६८ ॥
सा वर्षांचा म्हणसी इतुक्यांतचि एवढा कसा गे हा ॥
स्वीकारुनि तुज लावूं डाग कसा मूढलोकसा गेहा ॥ ६९ ॥
साध्वी म्हणे मिळविलें ज्ञान-तपः-कीर्ति-भाग्य[8] मत्तातें[9] ॥
कैचें तुझ्या कपाळीं नीचा अति-तुच्छ-भाग्य-मत्ता तें ॥ ७० ॥

---

१ युवराजाचा अधिकार. २ (का च स्मृतिः अपि तापसि मा एवं प्रलप अत्र भुभूजः सदसि) = हे ऋषिकन्ये, स्मरण कसलें! ह्या राजाच्या सभेंत (तूं) अशी बडबड करूं नकोस. ३ केवळ निद्रेचें ज्यानें सोंग घेतलें आहे अशास. ४ पति सुतरूपानें जिचे ठायीं उत्पन्न होतो ती 'जाया'. ५ वेदवाक्य. ६ सत्कार करण्यास योग्य. ७ मोडलें आहे व्रत ज्याचें असा. ८ ज्ञान, तप, आणि कीर्ति हेंच ऐश्वर्य. ९ माझ्या बापानें.

जी ब्रह्म[1]-योनि देवी मन्माता मेनका सुरांस मता ॥
नीचा तुझीच माता करिल सुधेची कसी सुरा समता ॥ ७१
जरि मुख्य-सत्य-धर्म-च्युत आपण विश्व निंद्य जन नी
निंदिसि कसें पदातें मत्तातांच्या मदीय-जननीच्या ॥ ७२ ॥
पौरव-रौरव-गौरव-कर्ता[2] भर्ता भला मला गमसी ॥
सम-शील[3]-बुद्धि होउनि नीतीनें आजि बोलुं लाग मसीं ॥ ७
बहुधा तुझें कपाळ न साहे सुत-रत्न-सन्निधानातें ॥
हत-भाग्य न घे देतां दारुनि आणूनि सन्निधानातें ॥ ७४ ॥
क्षिति[4]-पति मत्सुतचि असो तेजाचा मूर्ति-मंत हा निकर ॥
हा निकर मांडिला तूं देशील कर स्व-कीर्ति-हानि-कर ॥ ७
ऐसें वदोनि उठली जाया तों जाहली नभो-वाणी ॥
दुष्यंता काय करिसि समजावीं आपुली सती राणी ॥ ७६ ॥
त्वां हे विधिनें वरिली, या साध्वीचें विशुद्ध जनु, रागें ॥
पुर-राष्ट्र भस्म न करो, समजावीं सुतवतीस अनुरागें ॥ ७७ ॥
पुत्राचें भरण[5] करीं भाग्यें तुज लाधला भर तयातें ॥
म्हणतील आजपासुनि भुवनीं जन सर्वही भरत यातें ॥ ७८ ॥
स्व-कुळ-पुरोहित ऋत्विक् मंत्री आचार्य साधु जे होते ॥
राजा म्हणे परिसिलें म्हणती सारेचि एकदा 'हो' ते ॥ ७९ ॥
मत्सुत मद्वनिता हे मी जाणें परि जनासि कळवाया ॥
ऐसें निष्ठुर वदलों तुमची शंका अ-शेष पळवाया ॥ ८० ॥
कळवुनि असें समस्तां त्द्दयीं स-प्रेम-बाष्प[6]-भर तातें ॥

---

१ ब्रह्मदेवापासून उत्पन्न झालेली. २ आपल्या पूर्वुच्या कुळाला रौरव नांवाच नरकांत घालण्याचा मान देणारा, म्ह० असल्या घोर नरकांत घालणारा. ३ ( सव विषयीं ) समान आहे वर्तन आणि बुद्धि ज्याची असा. ४ अन्वय—हा तेजा मूर्तिमंत निकर मत्सुतचि क्षितिपति असो. तूं हा निकर मांडिला ( तूं ) ( ह भरतास ) स्वकीर्तिहानिकर कर देशील. अर्थ पराक्रमाचा मूर्तिमंत ( देहधारी राशी ( च ) असा हा माझा मुलगा संपूर्ण पृथ्वीचा राजा ( सार्वभौम ) खचीत होई ल. तूं आमचा स्वीकार करीत नाहींस हा मोठा अनर्थ मांडिला आहेस; तर ( पद्मं समज कीं ) तुला माझ्या मुलाला करभार द्यावा लागेल; तेणेंकरून तुझी अपकीर्ति होईल. (भार० आदिप० अ० १४ श्लो० ८). ५ पोषण कर. ६ आनंदाश्रूंच्या पुरा-

ऽगिलें गुरु-सुह्रत्-सचिवानुमतेंकरूनि भरतातें ॥ ८१ ॥
व-सुतेसि म्हणे नृप दयिते साध्वि क्षमा करीं भीरु ॥
क्षोभा भ्याला सति हा जन बहु पावका जसा भी रू ॥ ८२ ॥
-सकृद्विरह-द ताप-द परि मित्रीं सु-मुखि काय भीरु सती ॥
यंते नलिनी न धरुनि चित्तीं स्वं-प्रेम-भंग-भी रुसती? ॥ ८३ ॥
ाझी कीर्ति श्री तूं बोलाया वद न कोरडें जा ये ॥
कंठ कां न दाटे येऊं देऊं नको रडें जाये ॥ ८४ ॥
ग्लों शुद्ध्यर्थ असें भीतों बहु मानसांत डागातें ॥
ादिल हंस-वर कसा मधु-रस सेवूनिया तडागातें ॥ ८५ ॥
श्री सुखवुनि दुष्यंतें गुरु-सेवा-पुण्य-कीर्ति-लाभ-रत ॥
ुव-राज पुत्र केला कविनीं तो सु-बहु कीर्तिला भरत ॥ ८६ ॥
अमृत-प्रतिम चरित्र प्राशावें श्रवण करुनि आर्यांनीं ॥
गाईल राम-करुणा-घन-भक्त-मयूर तेंचि आर्यांनीं ॥ ८७ ॥

---

## आर्या-आदिपर्वांतील सुभद्राहरणप्रकरण.

धर्म व द्रौपदी हीं उभयतां एकांतीं असतां कांहीं कारणानें त्यांस ण्याचा दोष अर्जुनाचे हातून घडला; त्याच्या निवृत्तीकरितां तो ाटनास गेला. तेव्हां फिरत फिरत पश्चिमदिशेस द्वारकेजवळ ासतीर्थी आल्यावर, त्यानें, कृष्णाची धाकटी बहीण सुभद्रा ही ऽरामानें दुर्योधनास देण्याचा निश्चय केला आहे, हें वर्तमान ऐकिलें. हां ती आपणास प्राप्त व्हावी म्हणून कृष्णाच्या अनुमतानें त्यानें ःटसंन्यास घेतला, आणि संधि पाहून सुभद्रेचें हरण केलें. मग हा र्जुन असें समजल्यावर बळरामानें त्यास मोठ्या आदरानें बोलावून ाणून सुभद्रा दिली. ही कथा ह्यांत आहे.

---

१ वारंवार वियोग-दुःख देणारा. २ सूर्याविषयीं. ३ आपणावरील प्रीति ून जाण्याचें भय. असकृद्विरहद तापद (आहे) परि मित्रीं, हे दयिते, सुमुखि, रु, सति, नलिनी, चित्तीं स्वप्रेमभंगभी न धरुनि रुसती काय? असा अन्वय. माझी कीर्ति, श्री तूं (आहेस); जा (ज्याला) कोरडें (परकरणीं) बोलाया न ये त्कंठ कां न दाटे! वद (सांग); (हे) जाये (मला) रडें येऊं देऊं नको. (हा-न्य). ५ शुद्धीकरितां—' ह्यानें भलत्याचीच स्त्री वरिली,' असा अपवाद ावा म्हणून. ६ वालाणिला.

तीर्थें हिंडत गेला धर्मानुज अर्जुन प्रभासाला ॥
आप्त-मुखें निज-मातुळ-कुळ-वृत्तांतासि ऐकता झाला ॥ १ ॥
कृष्णानुजा सुभद्रा लग्नाला योग्य जाहली आहे ॥
तीतें स्वमतें हलधर धृतराष्ट्र-सुतासि द्यावया पाहे ॥ २ ॥
तातादिक म्हणति मनीं सुमति खळाला अ-चक्षुला रत्न ॥
शूद्रास श्रुति देतो राम, न चालेचि यापुढें यत्न ॥ ॥ ३ ॥
ऐकुनि मनीं म्हणे मज तीर्थ-स्नायीस जाहली शुद्धि ॥
या सुकृतें ते व्हावी प्राप्त विरक्तास जेविं सद्बुद्धि ॥ ४ ॥
निज-सुख-सिद्धि सुभद्रा साधाया होइन त्रिदंडि यति ॥
प्रिय तीहूनि नसे मज; ती कीं ही रीत गति, अहो नियति ॥५॥
पार्थ त्रिदंडि-वेष स्वीकारी हलधरासि वंचाया ॥
युक्तीनें स्व-पर-विहित-हित करितां कपट-दोष कंचा या ॥६ ॥
द्वारवतींत वसे तो यति वार्षिक चार मास-पर्यंत ॥
हर्यंतः करणासचि ठावा तद्योग जो सपर्यंत ॥ ७ ॥
मौन, सदा एकांत-स्थिति, साधु समाधि-योग, सु-विरक्ती ॥
सक्ति न लोक-समाजीं; लागे पौरांसि पार्थ-यति-भक्ती ॥ ८ ॥
मोठे मोठे हि मठ-द्वारांतुनि भेटि घेति पायांची ॥
असम-शर-ज्वर-भर खर करपवि, परि वरि समाधि वायांची॥९॥
रामासहि कळलें कीं योगी मोठा असे, म्हणे पाहूं ॥
आहों ब्रह्मण्य तया आणूं भिक्षेसि शिर पदीं वाहूं ॥ १० ॥

---

१ द्वारकेजवळील एका तीर्थाला. २ आपल्या मामाचें (वसुदेवाचें) कुल, म्ह० यादवकुल, त्याच्या वृत्तांतास. ३ दुर्योधनाला. ४ वसुदेव आदिकरून. ५ ह्याचा कर्ता अर्जुन. ६ तीर्थांचीं स्नानें करणारा जो मी त्यास. ७ आपल्या सुखाची साक्षात् सिद्धिच. ८ तीन दंड धारण करणारा संन्यासी. ९ अन्वय-ती (सुभद्रा) कीं ही रीति (सन्यासी राहणें) (हीच) गति (परिणाम). अहो नियति ! सुभद्रा प्राप्त होईल तर बरें; नाहीं तर सन्यासीच राहणें बरें. काय प्रारब्धीं असेल कोण जाणे. १० फसवावयास. ११ आपलें व दुसऱ्याचें योग्य मार्गास अनुसरून केलेलें हित. १२ कशाचा-कोणता. १३ चातुर्मास्यभर. १४ फक्त कृष्णाच्या अंतःकरणासच. १५ त्याची संन्यासाची युक्ति. १६ संपूर्ण. १७ तीव्र वैराग्य. १८ असम (विषमसंख्याक) म्ह० पांच आहेत शर (बाण) ज्याचे असा म्हणजे मदन, त्याच्या ज्वराचा भर. ह्या करपवि ह्याचा कर्ता.

तो यति एके दिवशीं बळदेवें आणिला स्व-गेहास ॥
पूजुनि सु-श्रद्धेनें जेववितां माधवास ये हास ॥ ११ ॥
यति-दर्शना सुभद्रा येउनि बैसे निजाग्रजाजवळ ॥
न बळ प्रेक्षी, परि यति-हस्तींचा पाहतां गळे कवळ ॥ १२ ॥
घाली घृतांत सैंधव दुग्धीं जंबीर पायसीं कथिका ॥
मथि काम-शर जया त्या राम म्हणे साधु मोक्ष-सत्पथिका ॥१३॥
आर्यासि निजसुरी ती उत्तरदानांत कन्यका यतिला ॥
पाहूनि भुले, स्मर तो रति ती, दृष्टांत अन्य काय तिला ॥ १४ ॥
जीच्या प्रवृत्तिनें वश केला आधींच सर्व-वीर-मणी ॥
त्यास कटाक्ष-प्रेक्षण-बाणीं मोहील कां न ती रमणी ॥ १५ ॥
कन्या-रत्न हराया अवसर पाहे जसा खरा चोर ॥
घोर-प्रताप परि भी भीमानुज, कीं अनंत-बळ थोर ॥ १६ ॥
दामोदर दासा दे अनुमोदन ती हरावया नवरी ॥
दादास देव दावी दारकं-रीति स्वयें सदैव वैरि ॥ १७ ॥
ताताला मातेला एकांतीं गुह्य वृत्त हें कळवी ॥
बळवीर- भीति कोपोपशमोपायासि सांगुनी पळवी ॥ १८ ॥
अनुकूळ ब्रह्म तसें तों झालें तन्मनो-रथा पर्व ॥
तीर्थ-स्नान कराया पुरवासी लोक चालिले सर्व ॥ १९ ॥

१ ह्याचें कर्म सुभद्रा. २ जया ( अर्जुनास ) कामशर मथी, तया राम (बळराम) म्हणे, साधु ( शाबास ) मोक्षसत्पथिका ( हे मोक्षमार्गांतील पांथस्था. ) ३ अन्वय- कन्यका यतिला पाहूनि भुले, (तथापि) उत्तरदानांत आर्यासि ( बलरामास ) निजसुरी ( वाटे )-सुभद्रा यतिला पाहून भुलली होती, म्हणून उत्तरें विलग देऊं लागली. तथापि ती झोपेनें गुंगली असल्यामुळें अशीं उत्तरें देत आहे, असें बळरामास वाटलें; हें तात्पर्य-अथवा निज सुरीती अशीं पदें काढलीं असतां-कन्यका यतिला पाहूनि भुले ( तथापि ) आर्यासि उत्तरदानांत निज सुरीती ( आपली उत्तम रीती- कुलस्त्रियांची मर्यादा ) (राखी ) म्ह० वडिलांची मर्यादा तिनें सोडिली नाहीं. ४ वार्तेनें. ५ अनंत ( शेष )-बळराम, त्याचें बळ. बळराम हा शेषावतार होता म्हणून त्यास कवीनें अनंत म्हटलें आहे. ६ लहान मुलाची रीत. ७ बाह्यात्कारीं. ८ राग शांत करण्याची युक्ति. ९ परब्रह्म-कृष्ण. १०ज्याप्रमाणें कृष्ण त्याच्या मनोरथास अनुकूळ ( साह्यकारी ) होता, त्याप्रमाणेंच एक पर्वही त्याला अनुकूल झालें. पर्व आल्यामुळें आपला हेतु सिद्धीस न्यावयास त्यास संधि सांपडली, हें तात्पर्य.

नर-हय-रथ-गज-शिबिकारूढ सकळ वृष्णि-दार[1]-जन चाले ॥
झाले सिद्ध वऱ्हाडी तैसे यदुभट; धरा बळें हाले ॥ २० ॥
दिव्य-रथांत सुभद्रा बैसुनि सेनेंत तेधवां शोभे ॥
यन्मुख-सुधाकरें[2] नर-वर-पार्थाशय-पयोनिधि[3] क्षोभे ॥ २१ ॥
तेव्हां धांवुनि बैसे पार्थ सुभद्रा-रथीं जसा पाटीं ॥
सु-चिर-क्षुधित ब्राह्मण हां हां म्हणतांहि वाढिल्या ताटीं ॥ २२ ॥
समय-ज्ञ चतुर सेवक धनु तूण तशांत देति आणोनी ॥
धांवति रक्षक सैनिक कपट-यति-कृतात्यनर्थ[4] जाणोनी ॥ २३ ॥
त्यांतें म्हणे सुभद्रा-मुक्ता-हर वीर अर्जुन मराल[5] ॥
समरा लक्षहि या परि काक तुम्ही गति विसर्जुन[6] मराल ॥ २४ ॥
धर्मानुज मी अर्जुन सिंह, तुम्ही शश-किशोर, आटोपा ॥
या टोपा कवचाच्या भीमा वल्गा[7] उगेचि आटोपा ॥ २५ ॥
ऐसें नीट दटावुनि जाय सुभद्रा हरूनि तो पार्थ ॥
मारिति हाका केवळ नागविला वनिं जसा वणिक्-सार्थ[8] ॥२६॥
सार्थक पार्थ करी, ती कैरविणी तो सुधांशु गौरविता ॥
सविता बिसिनीसि वरी कीं भेटे तो गुणज्ञ ती कविता ॥ २७ ॥
श्रुति सत्क्रियें[9] धर्म-पथा शोभविती दंपती तसे स्वरथा ॥
अन्योन्य-प्रिय संगम तो प्रेमळ भक्त ती मुकुंद-कथा ॥ २८ ॥
झटिति भट-कटक बहु करि कन्या नेली म्हणोनि बोभाट ॥
वाटे बळासि[10] सांगे जो जो त्या दस्युचाचि तो भाट ॥ २९ ॥
प्रस्फुरदधर[11]-दल प्रभु बलभद्र म्हणे खरेंचि सांगा रे ॥
कोठें तो कपट-पटू गांठितसे जो पटांत आंगारे ॥ ३० ॥

---

१ यादवांच्या स्त्रिया. २ जिच्या मुखचंद्राच्या योगानें. ३ नरवर (पुरुषश्रेष्ठ) असा पार्थ (अर्जुन) त्याचा आशय (मन) हाच पयोनिधि (समुद्र). ४ खोट्या संन्याशानें केलेला मोठा अनर्थ. ५ सुभद्रा हीच मुक्ता (मोती) तिचें हरण करणारा वीर अर्जुन हाच हंस. ६ थकून. ७ घोड्यांचे लगाम. ८ वाण्यांचा तांडा. ९ सत्कर्मानें वागणारा. *१० जो जो बळासि (बळरामास) (हें वर्तमान) सांगे (तो तो) त्या दस्युचा (अर्जुनाचा) भाटच (स्तुतिपाठकच) वाटे-प्रत्येक मनुष्य अर्जुनाच्याच पराक्रमाचें वर्णन करूं लागला; हा भाव. ११ रागानें कांपत आहे अधरोष्ठ ज्याचा.

कोठें रथ, मुसळ पुरे, कवच कशाला, धनुष्य राहों द्या ॥
वत्सेला निज-धर्षण[1]-कर-खळ-दंडोत्सवासि पाहों द्या ॥ ३१ ॥
पर्वीं[2] अर्णव तैसा भगवान् बळभद्र पुष्कळ क्षोभे ॥
संध्या-राग-सु-रंजित[3]-शरदभ्राहूनि फार तो शोभे ॥ ३२ ॥
कोप-ज्वर-भर[4]-कंपित-काय प्रभु[5] लोचनें करी शोणें ॥
होणें पुढें सु-दुर्घट[6] वारावें त्या महेश्वरा कोणें ॥ ३३ ॥
जाय हळूच विनय-नत-काय चतुर वृष्णि-राय देव हरी ॥
माय सुतार्थ पतीचे काय गुरूचे नमूनि पाय धरी ॥ ३४ ॥
नमनीं प्रकटवि सहभव[7] सद्गुण शांति-क्षमानुकंपादी ॥
कंपा दीन-सख नुरवि अधरीं, प्रणतींहि भव्य संपादी ॥ ३५ ॥
हांसे बळभद्र म्हणे कृष्णाक्रूरोद्धवा अहो कळलें ॥
वळलें मन, मत्पर्द भय सोडा, आदींन बंधुचें टळलें ॥ ३६ ॥
जा जा उठा मुलीला पाहूं वाहूं वरा घरा आणा ॥
प्राणाधिक तो येना तरि घालाव्या मदंघ्रिच्या[11] आणा ॥ ३७ ॥
अथवा कशास शासन-भय धरुनि मनीं पळेल तो दूर ॥
शूर ख्यात पळेना नेऊं द्या पारिबर्ह अक्रूर ॥ ३८ ॥
धाडा भूषा वसनें दासी-दासाश्व-हस्ति-रथ-रत्नें ॥
झाला भगीरथाचा पार्थ सखा आजि या महायत्नें ॥ ३९ ॥
हें रसिक-कर्ण तर्णक-शत तर्पायासि[12] कामधेनु कथा ॥
करिती प्रभुवर अनुचर-पर-सुख-कर अनुसरोनि लोक-पथा॥४०॥

---

१ आपलें बलात्कारानें हरण करणाऱ्या दुष्टाला जो दंड हाच उत्साह, त्यास. २ अमावास्या व पूर्णिमा ह्यां दिवशीं. ३ सायंकालच्या तांबडेपणानें रंगविलेल्या शरत्कालच्या मेघांपेक्षां अधिक शोभे, म्हणजे रागानें फार लाल झाला. ४ अत्यंत कोपानें ज्याचें शरीर कांपत आहे असा. ५ बळराम. ६ अन्वय-(त्याच्या) पुढें होणें (देखील) सुदुर्घट (मग) त्या महेश्वरा कोणें वारावें ?-त्यावेळीं बळरामाच्या पुढें जाणें देखील कठीण; मग त्याचें निवारण करण्यास कोण समर्थ ? ७ जन्मतः असणारे-स्वाभाविक. ८ मत्पद सोडा व भय सोडा. ९ मोठें भय. १० अर्पण करूं. ११ मत्+अंघ्रि-माझे पाय त्यांच्या. १२ अन्वय-प्रभुवर (बलराम-व कृष्ण) लोकपथा अनुसरोनि रसिककर्ण हें (च) तर्णकशत तर्पायासि अनुचर-पर-सुखकर-(भक्ताना अत्यंत सुख देणाऱ्या) कथा (लीला) कामधेनु करिती.

## सभापर्वांतील द्रौपदीवस्त्रहरण.

पांडवांचें ऐश्वर्य फार वाढलें, हें दुर्योधनास सहन न होऊन, त्यानें धृतराष्ट्राच्या अनुमतानें कपटद्यूतांत त्यांचें सर्वस्व हरण्याचा संकेत करून त्यांस हस्तिनापुरांत आणविलें, आणि कपटानें त्यांस पणांत द्रौपदी व राज्य ह्यांसह जिंकिलें. मग तो द्रौपदीस सभेंत आणवून तिला नग्न करून तिची विटंबना करविणार, इतक्यांत गुप्तरूपें परमेश्वर जो कृष्ण त्यानें तिला वस्त्रें पुरवून तिची लाज राखिली, हें ह्या आख्यानांत आहे.

दुसरे दिवशीं नेले पांडु-सुत नव्या सभेंत बाहून ॥
शकुनि म्हणे खेळों या धर्म म्हणे अधिक काय याहून[1] ॥ १ ॥
भीष्म द्रोण विदुर कृप धृतराष्ट्र स-कर्ण जे शत भ्राते ॥
खळ होते साधूंचा करणार बळें सभेंत बभ्रा ते[2] ॥ २ ॥
कपट-द्यूतीं लावी प्रथमचि तो साधु-गीत-कथ[3] रथ रे ॥
तो शकुनि म्हणे जितला तैं थोडयांचेंचि चित्त न थरथरे ॥ ३ ॥
मग धर्म लक्ष-दासी-पण मांडी जिंकिला म्हणे शकुनी ॥
कपटें जिंकूं पाहे हंसाला जेंविं दुष्ट बक-शकुनी ॥ ४ ॥
धर्म म्हणे छळ करिशी मर्यादा त्यजुनि ढाळिशी फांसे ॥
शकुने, त्यजितां धर्म-व्यवहार-पथासि स-त्सभा हांसे ॥ ५ ॥
मणि-हार दास दासी रथ हय गज कनक-निधिहि तो लावी ॥
जिंकी कपटी जो श्री श्री-द-शीर्षी वि-शंक तो लावी ॥ ६ ॥
कपट-द्यूत विलोकुनि विदुर म्हणे काय हें अगा राया[4] ॥
कां भ्रमलासि स्व-करें अग्नि कसा लाविशी अगारा या ॥ ७ ॥

---

१ हा गांधार-देशाचा राजा, दुर्योधनाचा मामा व कपट-द्यूतांत फार निपुण होता. २ ह्या आर्येंत 'खळ' व 'साधूंचा बळें सभेंत बभ्रा करणार' ह्यांचा संबंध भीष्म, द्रोण, विदुर व कृप ह्यांकडे लावावयाचा नाहीं; कारण कीं ते सज्जन असून त्या सभेंत धृतराष्ट्राबरोबर निरुपायास्तव आले होते. असें, खालीं लीहिलेला सभापर्व, अ. ६० श्लोक २ ह्यावरून स्पष्ट होतें.

"भीष्मो द्रोणः कृपश्चैव विदुरश्च महामतिः ॥
नातिप्रीतेन मनसा तेऽन्ववर्तंत भारत" ॥

३ साधूंनी गाइल्या आहेत कथा ज्याच्या, असा (धर्मराज). ४ हे धृतराष्ट्रा.

मद्वाक्य तुला न रुचे मरणारा अगदसें अगा बापा ॥
पुत्र कसें म्हणसी या नरकीं नेत्या स-विग्रहा[1] पापा ॥ ८ ॥
देऊनि काक घ्यावे पांच तुवां चित्र-बर्ह शिति-कंठ ॥
घे पंचानन पांच, क्रोष्टा[2] दे; मानवेल शिति-कंठ[3] ॥ ९ ॥
राया कुलार्थ पुरुष, ग्रामार्थ कुळहि समस्त, सोडावें ॥
ग्रामहि देशार्थ, मही आत्मार्थ, बुधें भलेंचि जोडावें ॥ १० ॥
शकुनि कु-नीति-ज्ञ कु-मति येथुनि आतांचि या खळा दवडा ॥
हा न भला, बुडवाया शिरला या राज-मंदिरीं कवडा ॥ ११ ॥
इत्यादि विदुर बोले हें ऐकुनिही अचक्षु तो न वळे ॥
दुर्योधन-पंचाक्षरि-मंत्रें परमोग्र भूतसा खवळे ॥ १२ ॥
जनकाहूनि परम हित, पर मंहित[4], ज्ञान-सिंधु, जो त्यातें ॥
धिक्कारी उडवी त्या स्व-शिवें-गृहाधारभूत[5] जोत्यातें ॥ १३ ॥
अस्मदहित[6]-हित इच्छिसि लाविसि आम्हां दहांत बालिशता ॥
वाचाळ कृत-घ्न कुटिल भरत-कुळीं तूंचि पात्र गालि-शता॥१४॥
तुज काय राज-नीति-ज्ञान अरे साप दुखविला साचा ॥
मृत्यु तसाचि सपत्नहि कैसा मग लाभ सुख-विलासाचा ॥ १५ ॥
जो मृदु लागे तों तों दडपी शिशु फार ऊन भातातें ॥
तैसें न करावें त्वां न बसावें हारवून भा तातें ॥ १६ ॥
हित-शत्रु[7] निकट न बरा जा त्यांमति दयित जे तुला असती ॥
टाकुनि जातीच बहु प्रेमें जरि सतत सांत्विली अ-सती[8] ॥ १७ ॥
शकुनि म्हणे धर्मा त्वां हारविलें धन समस्त कीं आहे ॥
या वचनासि न पुच्छीं दत्त-पदाला भुजंगसा साहे ॥ १८ ॥
सुत बंधुहि हारविले उरलें धन काय गा पणास हित ॥
धर्म म्हणे मी द्यूतीं बुडविन सर्व-स्व आपणासहित ॥ १९ ॥
धर्मासहि जिंकी खळ कपट-जयें परम अक्षमहि मातें[9] ॥
जे व्यसन टाकणारे बुध हा ऐकोत अक्ष-महिमा[10] ते ॥ २० ॥

---

१ मूर्तिमंत पापच, अशा. २ दुर्योधन हाच कोल्हा. ३ ही गोष्ट देवाला, आवडेल हें तात्पर्य. ४ अत्यंत पूज्य. ५ आपलें कल्याण हेंच गृह त्याला आधारभूत. ६ आमच्या शत्रूंचें कल्याण. ७ हित होऊं न देणारा. ८ जारिणी स्त्री. ९ माजे. १० फाशांचा महिमा ( फांसे खेळण्याचा परिणाम ).

शकुनि म्हणे चुकलासि ग्लह-योग्य हि संग्रहीं असोनि धन ॥
जिंकूनि घेतलें कां; समयीं चुकणें नसो, असो निधन ॥ २१ ॥
घे आपणासि राया सोडवुनी, द्रौपदीस लाव कसा ॥
श्रीचा कैवारी नृप धन्य, स्त्रीचा सदैव लावकसा[1] ॥ २२ ॥
धर्म म्हणे शकुने जी रूपें श्रीला क्षमा-गुणें महिला ॥
साजे सखी, अखिन्ना कृत्य-भरें, सुमति आमुची महिला ॥ २३ ॥
शरदुत्पल-पत्राक्षी[2] शरदुत्पल-पुण्य-गंध-सम-गंधा ॥
अ-स्खलित चालवी गृह-धर्मा मज यष्टि पथि जसी अंधा ॥२४॥
आधीं जिणें उठावें पाहुनि निजलों असें मग निजावें ॥
रागें जणें[3] सु-दुर्मिळ तेंह जिचें ज्वाळसे गगनि जावें ॥ २५ ॥
धौम्यापासुनि गोपांपर्यंत जिणें स्वयें समाचार ॥
घ्यावा, श्रित-ताप-हर[4] श्री-गंगेचा जिचा समाचार ॥ २६ ॥
ती देवी आतां म्यां या द्यूतीं लाविली अहाहारे ॥
छळिशी द्यूतींच कसा हा[5] रे अन्यत्र कां न हा हारे ॥ २७ ॥
धर्म नय-ज्ञोत्तम जो द्यूतीं स्व-कलत्र-रत्न तो लावी ॥
हांसे जितं[6] म्हणे खळ कविहो ती गोष्ट काय बोलावी ॥ २८ ॥
धिग् धिग् सभ्य-जन म्हणे, विदुर अधो-वदन बैसला उगला, ॥
भीष्म-द्रोण म्हणति हा[7], भाच्यांसह शकुनि जय-सुखें फुगला॥२९॥
किंजितमिह[8] किंजितमिह ऐसें अ-सकृत् पुसे अ-चक्षु रसें[9] ॥
रडले सभ्य तयांच्या त्हदयीं तें लागलें वच क्षुरसें ॥ ३० ॥

---

१ स्त्रीचा (कैवारी नृप) लावकसा—लावा-पक्ष्यासारखा (होय), हा पक्षी आपल्या मादीविषयीं फार लंपट असतो, असा समज आहे. तात्पर्य—तूं आपला व संपत्तीचा नाश करून स्त्रीचें रक्षण केलें म्हणून तूं स्त्रीलंपट आहेस. २ शरत्काळच्या कमलपत्राप्रमाणें जीचे डोळे आहेत अशी. ३ ती आधीं कधीं रागावयाची नाहीं, रागावलीच तर तिचा राग अग्निज्वालेप्रमाणें आकाशांत (वरल्यावर) तत्काळ निघून जातो; म्ह० त्यापासून कोणास पीडा होत नाहीं; हें तात्पर्य. ४ आश्रितांचें दुःख घालविणारा, हें समाचार (सारखें आचरण) ह्याचें विशेषण. ५ हा (मी धर्म) अन्यत्र दुसऱ्या कोणत्याही गोष्टींत कां न हारे (पराभव पावत नाहीं) (आणि) द्यूतींच (द्यूतांतच) कसा हारे (पराभव पावतो)! ह्यावरून तूं कपटानें मला छळतो आहेस हें तात्पर्य. ६ जिंकिलें. ७ हाय हाय. ८ किं (काय), जितं (जिंकिलें), इह (ह्या डावांत). ह्या डावांत काय जिंकिलें! ९ आवडीनें.

सखि-हस्तीं[1] हस्त न वृष पांडव-हृदयांत सायका मारी ॥
क्रोधार्ते भीम गिळी गरळातें जेविं काय कामारी ॥ ३१ ॥
अंध-सुत म्हणे विदुरा कृष्णा दासी सभेसि आणावी ॥
गृह-सं-मार्जन करणें ही सेवा तोस योग्य जाणावी ॥ ३२ ॥
विदुर म्हणे शस्त्र वधी गिळितां तत्काळ बोकडाला, हें ॥
तैसेंच कर्म करिशी रे मंदा मृत्यु रोकडा लाहें ॥ ३३ ॥
हरिच्या पुनः पुन्हा कां काड्या नाकांत घालिशी शशका ॥
यश काय पक्षि-पतिचें येइल हे चार करुनि तुज मशका ॥३४ ॥
ब्रूयात् क्षमी गभीरोसीति[2] बत युधि-ष्ठिरं प्रभुं को न ॥
निज नीचपण प्रकटिशि तूं श्वान भल्लवरीहि भुंकोन ॥ ३५ ॥
पांडव किमपि न वदती तूं वदसि सभेंत शब्द घाणेरे ॥
हे सकळ खळ-तिळांचें रगडुनि करणार पिष्ट घाणे रे ॥ ३६ ॥
दुर्योधन हित कथितां धिक्कार तुला असो असेंच वदे ॥
ज्वरिता जसें स-सित पय, सद्वचन न दुर्जना तसें चव दे ॥ ३७ ॥
कल्यंश[3], खळ-शिरोमणि, कपट-पटु, कटु-स्वभाव, सद्वेषी ॥
तो प्रातिकामि-नामक सूतातें द्रौपदीप्रति प्रेषी ॥ ३८ ॥
सूता जा कृष्णेला घेउनि ये भय नसे तुला लेश ॥
सर्व-ज्ञ न[4] किंचिज्ज्ञ क्षत्ता, ब्रह्मा नव्हे कुलालेश ॥ ३९ ॥
बहु कातर विदुर सदा वटवट करितो असीच हा नीच ॥
या खोट्याला गमते जी अस्मद्वृद्धि[5] ती स्व-हानीच ॥ ४० ॥
जाउनि तो सूत म्हणे कृष्णे द्यूतांत तूं स्वयें धर्मे ॥
हारविलीस, सुयोधन-सदनाप्रति ये करावया कर्मे[6] ॥ ४१ ॥
हें वाक्य त्या सतीतें बहु दुःसह जेविं वज्र कदलीतें ॥
परि परिसावें धैर्ये त्याशीं जें ती सु-बुद्धि वदली तें ॥ ४२ ॥
सूता काय वदसि हें द्यूतीं हारविति संपदेतें गा ॥

---

१ मित्र जो दुर्योधन त्याच्या हातावर. २ क्षमी गभीरः असि इति युधिष्ठिरं प्रभुं कः बत न ब्रूयात्—म्ह० तूं क्षमाशील व गंभीर आहेस असें कोण बरें धर्मराजास म्हणणार नाहीं! ३ कलीचा अवतार. (दुर्योधन) ४ कुंभारांतला श्रेष्ठ हावीं तशीं मडकीं घडतो, म्हणून तो सृष्टिकर्त्या ब्रह्मदेवाची सर पावेल काय! तसा अल्पस्वल्प जाणतो म्हणून विदुर सर्वज्ञ समजूं नये. ५ आमचा उत्कर्ष. ६ कामधंदा.

श्री म्हण, न[1] स्त्री म्हण, हें त्वद्वचन मनासि कंप देतें गा ॥ ४३ ॥
सूत म्हणे आधीं श्री मग सात्मज बंधु-मंडळी धर्मे ॥
हारविली निज मूर्ति द्यूतीं स्त्री शेवटीं अ-सत्कर्मे ॥ ४४ ॥
राज्ञी म्हणे तरि अगा जा पूस सभेंत तूं असें आर्या ॥
राजेंद्रा हारविली प्रथम द्यूतीं स्व-मूर्ति कीं भार्या ॥ ४५ ॥
सूत सभेंत विचारी धर्मातें कीं असें पुसे आर्या ॥
राजेंद्रा हारविली प्रथम द्यूतीं स्व-मूर्ति कीं भार्या ॥ ४६ ॥
धर्म न कांहींच वदे तों दुर्योधन म्हणे सभेस तिनें ॥
यावें स्वयें पुसावें जें पुसणें योजिलें तिच्या मतिनें ॥ ४७
कृष्णेप्रति सूत म्हणे देवि न कांहींच धर्म वदला गे ॥
जाणों, सभासदांसहि कठिन त्वत्प्रश्न-वाक्यें[2]-पद लागे ॥ ४८ ॥
भरत-कुल-धर्म न बुडो सभ्यांला पूस एकदा जा गा ॥
तन्मत मान्य मला कीं नय तच्चित्तीं असे सदा जागा ॥ ४९ ॥
पुनरपि सभेंत जाउनि सूत म्हणे सभ्यहो तुम्हांस सती ॥
द्यूतांत मी जिता कीं अजिता ऐसें[3] मदाननें पुसती ॥ ५० ॥
दुर्जन-दुराग्रहाचे[4] ज्ञाते सभ्यहि न पहाती च वर ॥
तेथें उत्तर कैचें ? न चलेसें न वदती कवि-प्रवर ॥ ५१ ॥
कोपें म्हणे सुयोधन भीतो भीमासि सूत हा भितरा ॥
दुःशासना स्वयें जा आण तिला कर्म हें नव्हे इतरा ॥ ५२ ॥
तो हरिणी-हरणार्थी अत्युग्र-प्रकृति लांडगासा च ॥
गेला तेंचि कराया दुःशासन दुष्ट दांडगा साच ॥ ५३ ॥
कृष्णेसि म्हणे चाल द्यूतीं तुज जिंकिलें भज कुरुंतें ॥
कुरु-पतिस पहा, लज्जा त्यज, सेवावें सुखें शत-गुरुंतें[5] ॥ ५४ ॥
त्या दुष्टोक्ति-श्रवणें धर्माची संकटीं पडे जाया ॥
सं-रक्षणार्थ धांवे धृतराष्ट्राच्या स्त्रियांकडे जाया ॥ ५५ ॥
पळतां धांवोनि तिला त्या केशांतें धरुनि आकर्षी ॥
ज्यां राजसूय-यज्ञीं अभिषेचिति बहु महर्षि नाकर्षी ॥ ५६ ॥
कृष्णा म्हणे सभेंत न न्यावें मज, मी रजस्वला, आंगा ॥

---

१ श्री ( संपत्ति ) हारविली असें म्हण, स्त्री हारविली असें म्हणूं नको. २ तुझ्या प्रश्नाच्या वाक्यांतील शब्द. ३ माझ्या तोंडानें. ४ दुर्जन जो दुर्योधन त्याच्या ( द्रौपदीला आणण्याबद्दल ) दुराग्रहाला जाणणारे भीष्मादिक सभासद. ५ शंभर भावांहून वडील जो दुर्योधन त्यातें.

आच्छादन एकांबर, नेतोसि अशीस आग्रहें कां गा ॥ ५७ ॥
दुष्ट म्हणे स्व-सभेला तुजला नेतोंचि दूरशी अस कीं ॥
एकांबरा अस तुझीं अंगें नग्नें असोत हीं असकीं ॥ ५८ ॥
देवी म्हणे अनार्या नाहींच तुझ्या मनांत पाप-दर ॥
ओढूं नको फरफरा घेऊं दे सांवरोनि हा पदर ॥ ५९ ॥
अधम म्हणे द्यूत-जिता दासी तूं लाजसी कशाला गे ॥
चाल उगीच प्रभुशीं हट करितां पाठिला कशा लागे ॥ ६० ॥
कृष्णा म्हणे पति कसे पाहूनि हें कर्म साहतील, न द्या ॥
पद सर्प-शिरीं, तुमच्या रक्ताच्या स्पष्ट वाहतील नद्या ॥ ६१ ॥
गुरु-जन-सभेंत केसा नेसी ओढूनि कार्य हा, नीचा ॥
करितोसि कर्म दुष्ट प्रास्पर्थ बळेंचि काय हानीचा ॥ ६२ ॥
धर्म परम सूक्ष्म असे धर्मात्मा धर्म-नृप नसे चुकला ॥
सावध व्हा कंठीं यम-पाश कसे घालितां अहा उकला ॥ ६३ ॥
ओढुनि सभेंत नेली तेव्हां ती द्रौपदी म्हणे कुरुची ॥
कीर्ति बुडाली, हा धिक् कुरु-वृद्धांलाहि मानली कु-रुची ॥ ६४ ॥
अ-न्यायाचल-भिदुरें विदुरें अनवरत शुद्ध-सत्व-रतें ॥
जाऊं दिलें कसें जें गेलें सोडूनि सख्य स-त्वर तें ॥ ६५ ॥
प्रेरियले भेदाया पति-धैर्य-द्विरद-कट कटाक्ष तिनें ॥
प्रथम न म्हणति श्रीच्या म्हणति स्त्रीच्याचि कटकटा क्षतिनें ॥ ६६ ॥
पेटे पांडव-कोपानळ कृष्णा-दृष्टि होय तद्धमनी ॥
काय करितील, होते निज मर्यादा-गुणेंचि बद्ध मनीं ॥ ६७ ॥
दुःशासनासि म्हणती भीमादिक निज-मनांत हे बाळें ॥
हूं सुप्त सर्पिणीतें मेली मानूनि ओढ हेबाळें ॥ ६८ ॥
केश धरुनि दुःशासन तीस बळें फिरफिरोनि दे हिसके ॥
भावि-तमः-प्रशमीं न क्षमही होऊन तेज देहिं सके ॥ ६९ ॥

---

१ हा (माझा) देह. २ वाईट गोष्टीची आवड. ३ अन्यायरूप पर्वतास केवळ वज्रासारख्या. ४ निरंतर शुद्ध सत्वगुणामध्यें रममाण म्ह० अखंड शांतवृत्तीचा, अशा. ५ आपले पति जे पांडव त्यांचें धैर्य हाच हत्ती त्याचें गंडस्थल. ६ मर्यादारूप दोरीनें. ७ हे पोरा. ८ हिसका हिसक कर. ९ (द्रौपदीच्या) देहीं क्षम तेज होऊन ही भावितमःप्रशमीं न शके, असा अन्वय–द्रौपदीच्या आंगीं योग्य पातिव्रत्यतेज होतें, तरी अवश्य पुढें होणाऱ्या दुःखाचा उपशम करण्याविषयीं तें समर्थ झालें नाहीं. म्ह० पातिव्रत्यतेजानें दुःशासनादिकांचें निवारण करण्याविषयीं द्रौपदीला बुद्धि झाली नाहीं.

दासी दासी ऐसें अ-सकृत् तो खळ म्हणे स-हांस[1] तितें ॥
जाणो क्षमालि[2] शिकवी जें जें अरि करिल तूं सहा सति तें ॥ ७० ॥
दासी दासी म्हणतां दुर्योधन शकुनि कर्ण मानवती[3] ॥
हांसति खळ, सभ्य रडति दुष्टें छळितां सभेंत मानवती[4] ॥ ७१ ॥
गांगेय म्हणे सु-भगे धर्म परम सूक्ष्म यास्तव स्पष्ट ॥
ऐसेंचि असें मजला वदवेना हा विचार बहु कष्ट ॥ ७२ ॥
वदला जितोस्मि[5] ऐसें धर्म, शकुनिनें तयावरि स्व-मतें ॥
पण करविला तुझा, यावरुनि तरि न तूं जिता[6] असें गमतें ॥७३॥
द्यूतांत पर-स्वँ[7]-पण स्थापाया[8] निःस्व[9] जन नव्हे शक्त ॥
स्त्रीचें भर्तृ-वशत्वहि[10] पाहोनि न मी वदों शके व्यक्त ॥ ७४ ॥
कुरु-वृद्ध[11] असें बोले, उपहासें ताप ते कितव देती ॥
सभ्यांसि निर्णयार्थ प्रार्थुनि पुनरपि अशंकितें[12] वदे ती ॥ ७५ ॥
द्यूतीं अनतिनिपुण[13] नृप कितवांनीं आणिला बळेंचि कसा ॥
दाबुनि कर्पूर जसा घालावा लोचनीं बळें चिकसा ॥ ७६ ॥
केलें तसेंचि हरिलें कपटें सर्वस्व शेवटील पणें ॥
नृप जिंकिला शकुनिनें याला नरकीं च शेवटीं लपणें ॥ ७७ ॥
केलें स्व-परिभवांत[14] द्यूत, पुन्हा भूप लाउं[15] दार-पणें ॥
या बुद्धिनें शकुनिनें दाखविलें आपुलें उदार-पण ॥ ७८ ॥
ऐसें असतां द्यूतीं अ-जिता मी कीं जिता, करा सवदा ॥
पुण्याचा, पुशिलें हें सत्य[16] पहा जोडितें करास वदा[16] ॥ ७९ ॥

---

१ हांसत हांसत. २ क्षमारूप सखी. ३ हर्ष पावती. ४ पूज्य द्रौपदी. ५ (जितः अस्मि) मी जिंकलों गेलों आहें. ६ जिंकिलेली. ७ दुसऱ्याच्या धनाचा पण. ८ लावण्यास. ९ निर्धन. १० पतीच्या स्वाधीन असणें. धर्म स्वतः जिंकला गेला यास्तव स्त्रीच्या संबंधानें निःस्वच झाला; म्हणून द्रौपदी हें दुसऱ्याचे धन पणास लावण्यास त्याला अधिकार राहिला नाहीं; ह्यावरून पाहतां, तूं जिंकली गेली नाहींस असें वाटतें; परंतु स्त्री ही सर्वदा भर्त्याच्या स्वाधीन, तस्मात् भर्त्याची जी गति तीच तिचीही असावयाची, म्हणून धर्म जिंकला गेला तेव्हां तूंही जिंकली गेलीस, असें वाटतें; ह्यासाठीं अमुकच गोष्ट खरी असें मला स्पष्टपणें सांगतां येत नाहीं; हें तात्पर्य. ११ भीष्म. १२ शंका न धरितां. १३ फार निष्णात नव्हे असा राजा (धर्म). १४ आपला पराजय अंतीं आहे ज्याच्या असें; हें द्यूताचें विशेषण. १५ बायकोचा पण लाऊ (लावो). १६ सत्य वदा असा अन्वय.

कुरु-गुरु वचन तसें जरि संदिग्ध वदाल तरि न भागावें ॥
अजि सभ्य हो जरि गुरुहि न हरी संदेह तरि नभा गावें ॥ ८० ॥
न वदे कोणी हि किमपि दुःशासन घाबरी करी तीतें ॥
तद्रीति-सम कवि म्हणो ग्राम-हरीच्या बरीक रोतीतें ॥ ८१ ॥
तें पाहुनि भीम म्हणे राया आम्हां-समक्ष कृष्णेची ॥
हे दुर्दशा बरी कां पूर्ति असे कीं न अक्ष-तृष्णेची ॥ ८२ ॥
आहेत कितव पुष्कळ पुष्कळ त्यांच्या घरांत बटकी ही ॥
खेळें ते हि न त्यांतें पण करिति मदुक्ति काय लटकी ही ॥ ८३ ॥
श्री बुडविली महेंद्र-श्री-तुल्या मज तिची नसे परवा ॥
पर वाम-लोचनेच्या ऐकों न शकेंचि या विलाप-रवा ॥ ८४ ॥
या साध्वीस न दुःख-द पर-करचि तुम्हां स्व-कीर्ति-हानि-कर॥
हा निकर पातकांचा कैसा केला खळें महा निकर ॥ ८५ ॥
रे सहदेवा स-त्वर पुष्कळसा अग्नि आण जाच कसा ॥
जाळूं याचे हे कर आम्हां हा सोसवेल जाच कसा ॥ ८६ ॥
श्वेताश्व म्हणे बापा भीमा जीमाजि वास अ-शिवाचा ॥
केवळ बाळपणीं ही वदलासि न तूं कधींहि अशि वाचा ॥ ८७ ॥
सद्गुणं सु-सेव्य हा गुरु देव-प्रिय यास जेंवि हार उनीं ॥
घालिसि तापांत कसा गति कोण पुढें स्व-सत्व हारउनी ॥ ८८ ॥
आम्हां व्यसनार्तांची धर्म-स्थिति हेचि बाज, पावें गा ॥
त्वां मोडावें न इला स्व-स्वास्थ्य-सुखार्थ बा जपावें गा ॥ ८९ ॥
हें काय बरें या गुरु-घातें रिपु परम मुदित होतील ॥
स्व-मुखीं विष अमृत-रस व्याळ-मुखीं कोण सु-ज्ञ ओतील॥ ९० ॥
निववी अ-सुरांत जसा साधु प्रऱ्हादराय कवि-कर्ण ॥
धृतराष्ट्र-सुतांत तसा एकचि नय-निपुण-नायक विकर्ण ॥ ९१ ॥
भीष्म-धृतराष्ट्र-विदुर-द्रोण-कृप-नृपांसि बोल तो लावी ॥
कीं समयीं न वदावी तरि मग केव्हां सदुक्ति बोलावी ॥ ९२ ॥

---

१ तर शून्यास गावें म्ह० दुसऱ्या कोणाचीही अशा राहिली नाहीं हें तात्पर्य. २ फांशांनीं खेळण्याच्या हव्यासाची. ३ इंद्राच्या संपत्तीसारखी. ४ परंतु. ५ गुण इत्यादि विशेषणें गुरूकडे आणि हाराकडे श्लिष्ट आहेत. ६ नीतीला अनुसरून वागणूक. ७ हा हिरण्यकशिपूचा मुलगा. ८ कवींचे कान; हें निववी ह्याचे कर्म. ९ उत्तम नीतिज्ञांत श्रेष्ठ. १० शब्द-दोष.

बोला हो बोला हो बोला हो सर्व सभ्य बोला हो ॥
अ-समय-मौनें तुमच्या सु-ज्ञपणाच्या न हानि मोला हो ॥ ९३ ॥
चार व्यसनें मृगया स्त्री पानें[1] द्यूत यांत जो सक्त ॥
तो धर्म-च्युत, तत्कृत सत्कृत[2] न महा-जनांत हें व्यक्त ॥ ९४ ॥
धर्म जयाच्या नादीं लावुनि जिंकूनि शकुनिनें आर्या ॥
पण आपणचि करविला पांचांची आपुली[3] सती भार्या ॥ ९५ ॥
द्युतीं साधारण धन पण करुनि नव्हेचि एक हारविता ॥
गिळिल[4] दुराग्रह-राहू त्यजिना परि मद्विचार हा रविता ॥ ९६ ॥
सभ्यांमाजि वदाया विहित असें बोलतोंचि अजि तत्त्व ॥
हरि-कीर्ति सती हेही तुल्या यांचें समान अ-जितत्व[5] ॥ ९७ ॥
तैं साधु साधु साधु ध्वनि करिती म्हणति बोल कानांहीं ॥
प्यावे असेचि, तूं कीं विदुर तिजा स्पष्ट बोलका नाहीं ॥ ९८ ॥
न्याय-मृकंडु[6]-सुताच्या दुस्तर-धृतराष्ट्रजांब्धि[7]-साधु-वटा ॥
सभ्या भला भला विधु लाजेल तुझ्याचि मानसा धुवटा ॥ ९९ ॥
कर्ण म्हणे वाचाळा रे सर्व-स्व-ग्लहांत हे आली ॥
अ-जिता कशी? तुझी मति मति-मंदा विदुर-बुद्धिची आली ॥ १०० ॥
वरकड हे काय मुके वक्ता धर्म-ज्ञ तूंच? बैस उगा ॥
न भला स्वभाव हा तुज बालिश-जन-पंक्तिला न बैसउ गा ॥ १०१ ॥
न वदति सभ्य, न पांडव, जरि हे कृष्णा म्हणे अहो सांगा ॥
अ-जिता असती तरि हे तैसेंचि स्पष्ट न वदते कां गा ॥ २ ॥
म्हणसील सभेंत सती नाणावी तरि सती न हे असती ॥
असतो एक सतीचा उपभोक्ता, पांच हे[8] हिला असती ॥ ३ ॥

---

१ मद्यपान. २ मान्य केलेलें. ३ स्वतःची (पांचांची मिळून). ४ 'दुराग्रह राहू गिळील परि मद्विचार हा रविता त्यजिना'=माझें भाषण ह्यांच्या (दुर्योधनादिकांच्या) दुराग्रहामुळें व्यर्थ होईल, तरी माझे विचार मला प्रकट केल्याशिवाय राहवत नाहीं; हा भाव. ५ अजिंक्यपणा. ६ न्याय हाच मृकंडुसुत (मार्कंडेयऋषि) त्याच्या. ७ तरण्यास कठिण जो धृतराष्ट्रपुत्र हाच समुद्र, त्यामधल्या उत्तम वटवृक्षा. प्रलयकाळीं समुद्रानें दश दिशा व्यापून टाकिल्या असतां त्यांत मार्कंडेय-ऋषि बुडूं लागला, त्या वेळीं ज्याप्रमाणें त्याला एक वटवृक्ष आधार झाला (अशी कथा आहे); त्याप्रमाणें धृतराष्ट्रसुत, न्याय बुडूं लागले असतां त्याला तारण्यास तूंच एकटा आधार झाला आहेस. ८ हे (पांडव) उपभोक्ते.

आमयेन[1] सभेंत इचें कीं हें एकांबरत्व न विचित्र ॥
नग्नत्व हि नवल नव्हे, न चुना बहु नासिकेसि ज्या श्वित्र ॥ ४ ॥
दुःशासना न याचे ऐकावे फोल बोल, हा बाळ ॥
गीष्पतिपुढें मिरवितो साक्षरता दाखवूनि गाबाळ ॥ ५ ॥
वदतो बुधांत भलतें बोलाया न स्त्रियांतहि सकोनी ॥
हूं, घे पांडव-वस्त्रें या दासीचें हि वस्त्र हिसकोनी ॥ ६ ॥
तें ऐकतांचि वस्त्रें टाकुनि उघडेचि पांच ही बसले ॥
भीष्म म्हणे हें दुःसह त्द्दयांत असें न शर-कदंब सले ॥ ७ ॥
दुःशासन सोडाया झोंबे स्व-कुळाहितोदया[2] लुगड्या ॥
तेव्हां स्मरली कृष्णा कृष्णा दीनाचियी दयालु गड्या ॥ ८ ॥
तो दुर्जन आधीं ही साधूच्या करुनि हानि रीतीची ॥
नग्न सभेंत कराया पाहे खळ धरुनि हा निरी तीची ॥ ९ ॥
जैं दुर्दशा कराया दुर्दैवें सिद्ध नीच हा केला ॥
तैं दीन-बंधुला ती कृष्णा मारी मनींच हाकेला ॥ ११० ॥
हे नाथ रमा-नाथ व्रज-नाथ हरे मुकुंद कंसारे ॥
गोविंद कृष्ण केशव दीनार्ति-हरस्त्वमेव[3] संसारे ॥ ११ ॥
काळें हि सख्या न तुझ्या दासीस पहावयासहि सकावें ॥
त्वद्भगिनी-वस्त्र खळें नग्न करायास काय हिसकावें ॥ १२ ॥
जीहुनि नसे सुभद्रा तुज बहु मान्या अ-कीर्ति हे तीची[4] ॥
धांव दयाब्धे होते विश्वांत तुझ्या अ-कीर्ति हेतीची ॥ १३ ॥
भगिनी ऐसें वदलें परि फारचि लाजलें न हें लटिक ॥
प्रभुजी रक्षा तुमच्या दासांची मी लहानशी बटिक ॥ १४ ॥
जिंकिल काय खळा तो जिंकी द्यूतीं न धर्म जो डावा ॥
सु-ज्ञें पंक-पतित-परे-धेनूद्धरणेंहि[5] धर्म[6] जोडावा ॥ १५ ॥
कीर्त्यर्थ उद्धरीं मज उद्धरिलें जेविं सागरीं महिला ॥
त्वद्दासांची होती त्या अभृतीं[7] आजि या गरीं महिला ॥ १६ ॥

---

१ आणणें. २ स्वकुळाचा नाश होण्याकरितां. ३ (दीनार्तिहरः त्वं एव संसारे)=संसारांत तूंच दीनाचें दुःख हरण करणारा (आहेस). ४ त्या तुझ्या बहिणीची (माझी). ५ चिखलांत पडलेली दुसऱ्याची जरी गाय असली तरी तिला वर काढण्याच्या योगानें. ६ पुण्य संपादावें. ७ तशा विलक्षण सुखांत.

वा ढळतां तिळहि पदर भावी व्यजनासि राग रामा जी ॥
ती खळ-सभेंत उघडी पडते न पडून सागरामाजी ॥ १६ ॥
भो भगवन् भो वत्सल भो हत-चाणूर-मल्ल भागावें ॥
विश्वें तुझेंचि दुसरें न यश श्री-प्राण-वल्लभा गावें ॥ १७ ॥
आजि अ-सत्पर-पुरुष-स्पर्श न अपराध अन्य केला हो
झांका प्रसाद-पदरें न कु-जन-दृक्-स्पर्श कन्यकेला हो ॥ १८ ॥
अवतरला उतराया जो दुःसह दुष्ट-भार महिवरला ॥
अहि-वर-लास्य-पटु प्रभु करुणोक्तें द्वारकेंत गहिंवरला ॥ १९ ॥
परमेश्वर रूप धरी स्व-पर-जन-हितोदया लुगडियांचें ॥
निववाया सभ्यांसह मन नयनहि तो दयालु गडियांचें ॥ १२० ॥
हा अंबरावतार श्रित-लज्जा-रक्षणार्थ अकरावा ॥
प्रभु-मत असें सद्वनीं आग्रह वेषीं कदापि न करावा ॥ २१ ॥
शेले शालु साड्या क्षीरोदक लांब रुंद पाटावे ॥
झाला अनंत वस्त्रें कीं तीस अनाथसें न वाटावें ॥ २२ ॥
पद-सेवार्थचि भजती अनवरत महा-विभूति जो निपट ॥
तो कृष्णा-वपु झांकी होऊनि महा-विभूति-जानि पट ॥ २३ ॥
पहिलें वसन व्यसन-प्रतिपादन-पटु करें कु-मति सोडी ॥
तों दुसरें आहेचि प्रथमाधिक वस्त्र त्यासही ओढी ॥ २४ ॥
कृष्णा-देह-सदंबर-रत्नाकर त्यासि खळ-भुजा टिटवी ॥
उपसी परि गांभीर्यें आपण न उहूं म्हणोनि त्या विटवी ॥ २५ ॥

---

१ पंख्याच्या वाऱ्यानें पदर किंचितही ढळला असतां जिला त्याचा ( पंख्याचा ) राग येई; ती ( मी ) आज दुष्टांच्या सभेंत अगदीं उघडी पडत आहे; ह्यापेक्षां समुद्रांत बुडती तरी चांगलें होतें, हा भाव. २ मारला आहे चाणूर नांवाचा मल्ल ज्यानें. ३ धावून येण्याचे श्रम घ्यावे. ४ दुष्ट परकी मनुष्याचा स्पर्श. ५ दुष्टांच्या दृष्टीचा स्पर्श. ६ दुष्टांचा भार. ७ सर्प-श्रेष्ठ जो कालिया त्यावर ( त्याच्या फणांवर ) नृत्य करण्याविषयीं चतुर. ८ द्रौपदीच्या दीन भाषणानें. ९ आपल्या भक्तांचें हित व्हावें म्हणून. १० मित्रांचें ( पांडवांचें ) ह्याचा संबंध 'मन, नयन' ह्यांकडे. ११ मोठे ऐश्वर्यवंत. १२ ज्या ( कृष्णास ). १३ लक्ष्मी आहे जाया ज्याची तो. १४ दुःख देण्यांत कुशल. १५ द्रौपदीच्या अंगावरील जीं उत्तम वस्त्रें तोच समुद्र. १६ दुःशासनाचा हात हाच टिटवी. १७ नको. १८ त्या टिटवीस.

१५

मानिति माया केवळ अल्प सभेंतील भूमि-तळ पट हो ॥
म्हणति अदित्यादि सत्या या मेल्यांचें स-मूळ तळपट हो ॥ २६॥
जें झाकिलें अनंतें दिव्यें भव्यें सदंबरें सुघडें ॥
तें साधु--कांय काय क्षुद्र-मति करील नागवें उघडें ॥ २७ ॥
तो शतशः पट झट झट फेडुनि भागे सभेंत वेडावे ॥
किति खळ-बळ, जळ-निधिचे कीं दुस्तर-तर तरंग फेंडावे॥२८॥
होय सभेंत हलहला स्वन, कृष्णेसि प्रशंसिती राजे ॥
छी ते खळांसि म्हणती गेले भव-नद-पर-प्रतीरा जे ॥२९ ॥
भीम म्हणे राजे हो तरि पूर्व-ज-गति न हो मला परिसा ॥
जरि दुःशासन-वक्षःक्षत-ज न सेवीन मी स्वयें हरिसा ॥ १३० ॥

---

## वनपर्वांतील नलोपाख्यान

सोमवंशांतील वीरसेनाचा मुलगा नळराजा ह्यास स्वयंवरांत विदर्भ देशाच्या भीम नामक राजाची कन्या ( दमयंती नांवाची ) हिनें वरिलें. ही कथा ह्या आख्यानांत आहे.

श्री-वीरसेन-सुत नळ निषधेश्वर सु-गुण-मणि-करंडक हो ॥
ब्रह्मण्य-प्रभु दुर्गत-दारिद्र्य-समुद्र-वर-तरंडक हो ॥ १ ॥
तो पुण्य-श्लोक रणीं करितां रिपु-वीर-हानि वासवसा ॥
तत्कीर्ति म्हणे गा श्री-धी हो या योग्य हा निवास वसा ॥ २ ॥
वैदर्भ भीम-राजा होता बहु खिन्न हीन संतानें ॥

---

१ पट माया ( मावण्यास ) सभेंतील भूमितळ केवळ अल्प, ( असें लोक ) मानिति; असा अन्वय. २ कश्यपाची वायको अदिति आदिकरून महापतिव्रता स्त्रिया. ३ द्रौपदीचें पवित्र शरीर. ४ दुष्टबुद्धीचा ( दुःशासन). ५ फोडावे. ६ संसाररूप नदीच्या पलीकडील तीराला. ७दुःशासनाच्या उरांतील रक्त. ८ सिंहासारखा. ९ निषधदेशाचा राजा. १० ( सु+गुण+मणि+करंडक )-चांगले गुण हेच मणि ( रत्नें ) ह्यांचा करंडा, म्ह० उत्तम गुण ज्याच्यामध्यें परमेश्वरानें एकत्र सांठविले आहेत असा. ११ दरिद्रीलोकांचें दारिद्र्य हाच समुद्र त्यांतील (तो तरण्यास) उत्तम नौकारूप. मोठा दानशूर हें तात्पर्य. १२ शत्रुभूत वीरांचा नाश. १३ संपत्ति व विद्या ह्या दोघींचा बहुधा एकत्र वास नसतो; परंतु नलापाशीं त्या दोन्ही होत्या हें तात्पर्य. १४ विदर्भ-देशाचा. १५ संततीनें रहित.

तो भेटोनि सुखविला दमनानें स्वपद-लीन संतानें ॥ ३ ॥
नृप-दास्य-तुष्ट मुनिचें मन त्या मुनिला म्हणे सखे दमना ॥
झाला शुद्ध, करावा संतति-सुख-पात्र हा स-खेद-मना ॥ ४ ॥
ब्रह्मर्षि-वरें दमनें वर दिधला त्या नृपासि संततिचा ॥
झाले तीन सुत, सुता चवथी गातो गुणौघ संत तिचा ॥ ५ ॥
ठेवी दम, दांत, दमन, दमयंती, हीं अशीं तयां नावें ॥
ज्या मुनि-वर-प्रसाद-प्रभवातें त्रि-भुवनेंहि मानावें ॥ ६ ॥
भीम-नृ-पति दुग्धोदधि दमयंती श्रीच वपु सु-रुचिर तिचें ॥
पाहूनि देह दिवसोंदिवस दिसे दीन जरि सुरुचि रतिचें ॥ ७ ॥
जाणो कळे भविष्यद्दमयंतीची स्मरा रुचिरतरता ॥
हर-दृगनळीं जळाला रतिच्या विटलाचि तो शुचि-रतें रता ॥ ८ ॥
ती पाहिल्यावरि गमे कोणासहि न स्व-रूप सुंदरसें ॥
श्री-वनमाळेंहि पुढें मिरवील स्व-मंद काय कुंद रसें ॥ ९ ॥
श्री-कृष्ण रुक्मिणीला श्री-कृष्णा रुक्मिणी जशी आतां ॥
दमयंतीस नळ नळा दमयंती आयकों जनें गातां ॥ १० ॥
नळ नृ-प म्हणे शिवा ती नवरी हो मन दुजीस न वरी हो ॥
भैमी म्हणे शिवे तो नवरा हो प्रेम नित्य नव राहो ॥ ११ ॥
एका समयीं धरिला हंस नळें तो म्हणे कृपा कर गा ॥
सोड मला जरि व्हावी ती दमयंती वधू नृ-पा कर-गा ॥ १२ ॥
करिन तुझें गुण-वर्णन जेणें होइल तुझीच नवरी ती ॥
सत्य प्रिय हित वदती शुद्धात्मे न धरितीच नव रीती ॥ १३ ॥

---

१ ऋषिविशेष ह्यानें. २ आपणाला शरण आलेला. ३ राजाच्या सेवेनें संतुष्ट झालेल्या. ४ खेदयुक्त आहे मन ज्याचें असा. ५ ब्रह्मर्षीमध्यें श्रेष्ठ. ६ गुणांचा समुदाय. ७ मुनिश्रेष्ठाच्या वराच्या प्रभावास. ८ उत्तम आहे कांति ज्याची असें. ९ पुढें होणारी. १० अधिक सौंदर्य. ११ शिवाच्या तृतीय नेत्रांतील अग्नीमध्यें. १२ शृंगार रसांत निमग्न; अथवा शुक्र याची सप्तमी शुचि म्ह० शोकांत निमग्न; असे दोन्ही अर्थ एथें संभवतात. १३ आपला गर्व. १४ आतां म्ह० सांप्रत कृष्ण व रुक्मिणी हीं दोघें जशीं एकमेकास शोभतात असें लोक म्हणतात; तशीं पूर्वी नल व दमयंती हीं परस्परांस अनुरूप होतीं असें लोक गात होते; हें आम्ही ऐकतों असें कवि म्हणतो. १५ हे पार्वति. १६ होवो. १७ हस्तगत. १८ निर्मळ अंतःकरणाचे.

नळ-मुक्त[1] राजहंसासह हंसांची नभःपथें[2] आली ॥
आली प्रमद-वनीं[3] तों भैमी ही घेउनि प्रिया आली ॥ १४ ॥
भैमी[4] म्हणे मराळ-ग्रहणेच्छा[5] मन्मनांत आली हो ॥
एकासि तरि धरूं या विखरा मुक्ता वनांत आली हो ॥ १५ ॥
इतरा हंसांनीं त्या नेल्या बहु लोभवूनि दूरवर ॥
भैमी त्यास धरू ये ज्या दे असु-दान दान-शूर-वर ॥ १६ ॥
एकांतीं तीपाशीं स्तविला निषधेंद्र तो खगानें हो ॥
जाणो राधेला दे खग-भगवद्वेणु[6] तोख गानें हो ॥ १७ ॥
पुण्य-श्लोक निषध-पति नळ खळ-बळ-जलधि[7]-वाडवानल गे ॥
लोकां महोत्सर्व[8]-प्रद तोचि सदा, त्यांसि पाडवा[9] नलगे ॥ १८ ॥
स्मर[10]-बुध-दस्र-रुचिरतर ऐसें म्हणणार जे न ते लटिके ॥
हय्यंगवीन जैसें सु-रसिक-रसनेपुढें[11] न तेल टिके ॥ १९ ॥
अनुपमे[12] अनु-रूपें[13] अनघें[14] जरि वरिला त्वां नृपात्म-जे न नळ ॥
होईल केवळ तापें-द कीं जो नर नळ न होय तो अनळ[15] ॥ २० ॥
नळ-कस्तुरीस टाकुनि कां तूं घेतीस अन्य नर माती ॥
जरि वरिती न हरीप्रति घेती म्हणवूनि धन्य न रमा ती ॥ २१ ॥
नर-रत्न तोचि तूंचि स्त्री-रत्न उदंड आडनांवांचीं[16] ॥
न बुडविति न वा तारिति चित्रें बरवीं हि आड-नांवांचीं[17] ॥ २२ ॥
ती सु-मति म्हणे आर्या त्वां तिकडे ही असेंचि कळवावें ॥

---

१ नळानें सोडलेला. २ आकाशमार्गानें. ३ क्रीडेच्या बागेंत. ४ भीमराजाची मुलगी दमयंती. ५ हंस धरण्याची इच्छा. ६ हंसरूपी-कृष्णाचा वेणु. ७ दुष्टांचें सैन्य हाच समुद्र त्याला वाडवाग्नीसारखा. ८ मोठा आनंद देणारा. ९ पाडवा लोकांस एक दिवस मात्र आनंद देतो, परंतु नळ सर्वकाळ आनंद देणारा होता; असा भावार्थ. १० मदन, बुध व अश्विनी-कुमार (हे तिघेही रूपाविषयीं प्रसिद्ध आहेत) ह्यांपेक्षांही हा सुंदर. ११ रुचि घेण्यांत मार्मिक अशा लोकांच्या जिभेपुढें. १२ ज्याला उपमा नाहीं असा. १३ योग्य. १४ निष्पाप. १५ उत्तरार्ध-नळास टाकून तूं जर इतर पुरुष (अनळ) वरशील तर तो तुला संताप देणारा होईल; कारण, जो नळ नव्हे तो अनळ म्ह० अग्नि होय. १६ नररत्न, स्त्रीरत्न अशा नांवांचीं मनुष्यें पुष्कळ आहेत, परंतु त्या नांवांच्या अर्थास अनुसरून तुम्हां दोघांवांचून कोणी सांपडावयाचीं नाहींत असा भाव. १७ विहिरी आणि नावा ह्यांचीं.

साधो हळुहळु मृदु मधु[1] हित मित बोलोनि चित्त वळवावें ॥ २३ ॥
आज्ञा म्हणोनि येथुनि कळवुनि हे प्रेम तेथुनि उडाला ॥
हंस-प्रत्युपकारीं हर्षीं काम-ज्वरीं* नळ बुडाला ॥ २४
झाली स्मर-ज्वरार्ता[2] ध्याया ही योग्य हें पिता समजे ॥
जाणति न सांगतां सुख अ-सुख पराचें जगीं सदा सम[3] जे ॥ २५ ॥
योजी स्वयं-वरोत्सव[4] रायांसि सुखं प्रकाम दे वार्ता ॥
आले नाहूतहि[5], मति कोणाची तें न काम-देवार्ता[6] ॥ २६ ॥
देवर्षि[7]-मुखें परिसुनि शक्र करी धरुनि हरिख गमनातें ॥
त्याच्या विमान येइल काय न येतांचि हरि-खग[8] मनातें ॥ २७ ॥
जों निकट कुंडिनाच्या[9] आले यम-वरुण-भू-भृदर्यनळ[10] ॥
तों तोहि सकळ-सद्गुण-निधि[11] पुण्य-श्लोक वीर-वर्य[12] नळ[13] ॥२८॥
ते सुर म्हणति अहाहा नळचि सकळ-पुरुष-वर्य वीर-मणी ॥
नवरी न वरील कशी याला पाहोनि सु-मति ही रमणी ॥ २९ ॥
आम्हांलाचि न केवळ लावितसे व्यक्त लाज हा रविला ॥
आम्हीं निज-तेजो-मद याचिपुढें सर्व आज हारविला ॥ ३० ॥
भेटोनि त्यासि म्हणती कार्य-परें सर्वथा न लाजावें ॥
हो अस्मद्दूत वि-मुख[14] न असें सत्य-व्रता नला जावें ॥ ३१ ॥
होतों दूत नळ म्हणे कार्य वदा कोण हो तुम्ही चवघे ॥
ओळख देउनि म्हणती आम्ही भैम्यर्थ पातलों अवघे ॥ ३२ ॥
भैमी स्वयें वरु या आम्हां चौघां जणांत अन्यतमा[16] ॥
हें कार्य, दूत होगा जा गा बा तिजकडेचि धन्यतमा ॥ ३३ ॥

---

१ मधासारखें गोड. * नळाकडून. २ कामव्यथेनें पीडित. ३ प्राणिमात्रावर सारखी दृष्टि ठेवणारे. ४ मुलीनें आपल्या इच्छेप्रमाणें वरास वरण्याचा समारंभ. ५ ( न+आहूत )=न बोलाविलेले. ६ (कामदेव+आर्ता)—मदनानें पीडित. ७ नारद. ८ विष्णूचा गरुड. उत्तरार्ध—दमयंतीकडे येण्याची इंद्राला इतकी उत्कंठा झाली कीं, अतिवेगवान् जो गरुड तोही त्याला वाहनार्थ आवडेना, मग विमानाची कथा कशाला? ९ कुंडिन हें भीमक-राजाच्या राजधानीचें नांव. १०( यम+वरुण+भू-भृदरि+अनळ )— यम, वरुण, ( पर्वतांचा शत्रु ) इंद्र आणि अग्नि. ११ साऱ्या सद्गुणांचा ठेवा. १२ वीरांमध्यें श्रेष्ठ. १३ हा 'आला' ह्या अध्याहृत क्रियापदाचा कर्ता. १४ प्रतिकूल, पराङ्मुख. १ होऊं नको. १६ कोणाल्यातरी एकाला.

स-स्मित-वदन नळ म्हणे प्रभुजी जो हेतु सुर-वरागमनीं[1] ॥
माझ्याहि तोचि सर्वा हि मृगांच्या तुल्य सु-रवे-राग[2] मनीं ॥ ३४ ॥
दूत करुनि मज तिकडे कार्यास्तव पाठवूं नको पावा[3] ॥
कोणावरिहि सुनय[4] न स्वातिक्रम आठवून कोपावा ॥ ३५ ॥
शक्र म्हणे वदलासि प्रथम तसें वचन मग असें वदसी ॥
अचळ करींच असावा व्यवहारीं शब्द संगरीं सदसी[5] ॥ ३६ ॥
भू-प म्हणे या कर्मीं[6] पवन हि होईल मज न सांगाती ॥
अंतःपुर-प्रवेशीं जी प्रभुचो साधु युक्ति सांगा ती ॥ ३७ ॥
शक्र म्हणे जा गा तूं चिंता आधींच करिशि कां गा ती ॥
आम्हांसि हें कठिण जरि तरि सु-ज्ञ प्रभु म्हणोनि कां गाती ? ॥ ३८ ॥
शक्र-वरें नळ गेला शिरला अंतःपुरीं सुखें सुर-सा ॥
भैमीच्या हा याच्या ती सेवी रूप-संपदा सुरसा ॥ ३९ ॥
भैमी हर्षे त्याच्या[7] विधुच्या तशि कुमुदिनी न आगमनीं ॥
सत्कारुनि म्हणे जी यावें मद्भाषणें न आगमनीं[8] ॥ ४१ ॥
सुंदर-वर कोण तुम्ही गुरु*च्या वाटे न हें[9] परागं[10] मना ॥
कीं जें जें अंतःपुर तें तें हि विषय[11] नव्हे परागमना[12] ॥ ४१ ॥
आलां कसे अ-वारित[13] कार्यार्थ प्रकट आयकों, दावा[14] ॥
वाटे कर्णीं तुमचा वाङ्मय[15] सौवर्ण[16] काय कोंदावा[17] ॥ ४२ ॥

---

१ देवश्रेष्ठांच्या आगमनांत. २ मधुरध्वनींविषयीं आवड. ३ रूपाकरा. ४ (सुनय स्वातिक्रम आठवून कोणावरीहि न कोपावा, असा अन्वय.) तात्पर्य--तुम्ही व मी एकाच कार्याकरितां आलों आहों, म्हणून त्याच कामासाठीं तुम्ही मला तिकडे दूत करून पाठवितां; परंतु तसें न कराल तर कोणाच्याही हातून नीतीचें उल्लंघन होणार नाहीं. ५ उत्तम सद्गुण. उत्तरार्ध—व्यवहारीं शब्द अचळ असावा; व संगरीं करीं सदसी अचळ असावा, असा अन्वय. ६ ह्या अंतःपुरप्रवेशरूप कार्यांत वायु ही मजबरोबर यावयास भिईल म्ह० वारा देखील जेथें शिरूं शकत नाहीं. ७ नलाच्या, ह्याचा संबंध आगमनाकडे. ८ अपराध. मी जें पुढें बोलतें त्याची माफी असावी हें तात्पर्य. ९ तुमचें अंतःपुरांत येणें. १० मोठा अपराध. ११ योग्य—पात्र. १२ परक्याच्या येण्याला. १३ कोणीं आटकाव न केलेले असे. १४ (कार्यार्थ प्रकट दावा, आयकों)—कोणत्या कामाकरितां आपण आलां हें स्पष्ट सांगां, तें मला ऐकूं द्या. १५ ह्याचें कर्म सौवर्ण काय. १६ वाणीरूप. १७ सोन्याचा, पक्षीं, उत्तम (अकारादि) वर्णांनीं युक्त. * पित्याच्या.

वाहों लागे गुरु-घन-रस[1]-पूरित वीरसेन-भू-मनळ ॥
सुंदरि मी पाशि-पितृपे-पावक-पुरुहूत-दूत[2] भूप नळ ॥ ४३ ॥
सु-मुखि प्रार्थिति बहु तुज ऐसें प्रभु लोक-पाळ ते चवघे ॥
अवघे उणेचि रस, तूं दिव्य रसाचीच सर्वदा चव घे ॥ ४४ ॥
सुज्ञे तुवां वरावा आम्हां चवघां जणांत अन्यतम ॥
धन्यतमत्व[3] तुला यो[4] न शिवो पळ दयित-विरह-जन्य तम[5]॥४६॥
हांसोनि म्हणे भैमी प्रणति- प्रिय देव गुरु असें म्हणती ॥
त्यांहीं क्षमा करावी स्वीकारावी यशोर्थ मत्प्रणती ॥ ४६ ॥
वरिले हेचि चरण म्यां त्यजितां ज्वलनांत काय होमीन ॥
यज्जीवन जीवन[6] तो दुग्धा वांचेल काय हो मीन ॥ ४७ ॥
नळ-नृप म्हणे सु-बुद्धे[7] या दासावरि तिहीं न कोपावें ॥
मदधिक कोटि-गुणें ते आग्रह कांहीं धरूं नको पावें ॥ ॥ ४८ ॥
मृत्यु असो, पर-वंचन करुनि सुधेच्या जिणें नको पानें ॥
त्वत्पाणि-ग्रहणें मी देवांच्या बहु शिणेन कोपानें ॥ ४९ ॥
विदुषी म्हणे म्हणा जा कीं म्यां कथिलें परोपरी पण ती ॥
प्रणति प्रभूंस करिती अनुकंप्या मी स्वयं-वरा[8] म्हणती ॥ ५० ॥
सत्संमत स्वयं-वर-विधिनें वरितां तुम्ही न अपराधी ॥
काय करूं त्यजुनि तुम्हां माझी पळ अनुसरे न अपरा[9] धी ॥५१॥
होईल देह रंगीं सुर-पति-नर-पति-समक्ष नल-गामी[10] ॥
हा जन तुमच्याचि असे इतरा कोणाचियाहि न लगामीं ॥ ५२ ॥
होय अ-कृत-कार्य[11]हि नळ सुर-वर-संमत खरें निवेदून ॥
सत्यें जसा तसा न प्राज्येंहि सुधा-रसें निवे[12] दून ॥ ५३ ॥
रंगीं सर्व मिळाले तेव्हां आली तयांत दमयंती ॥

---

१ मांठा आणि पाण्यानें गच्च भरलेला; हें पनळाचें विशेषण. तात्पर्य कीं, गंभीर व अत्यंत रसाल असें भाषण करण्यास नलानें आरंभ केला. २ वरुण, यम, अग्नि व इंद्र यांचा दूत. ३ अतिशय कृतार्थता. ४ येवो. ५ पतीच्या वियोगापासून उत्पन्न होणारें दुःख. तात्पर्य तूं मनुष्यास वरिलें तर तुला पतिवियोगाचें दुःख सोसावें लागेल, ह्याकरितां आम्हां देवांपैकीं एकास वर. ६ ज्याचें वांचण्याचें साधन. ७ शाहणी. ८ स्वतः पति पाहून त्यास वरणारी. ९ दुसऱ्याकडे. १० नलाकडे जाणारा. ११ केलें नाहीं कार्य ज्याणें. १२ दुःखित.

जाणो चकोर ते ती मूर्त ज्योत्स्नाचि ताप-दमयंती[1] ॥ ५४ ॥
साहे न परोत्कर्षा ज्याची मति सच्छळीं[2] सदाऽनळसा[3] ॥
बैसे तिघां जणांसह हरिहि अधिष्ठूनि त्या सदा[4] नळसा ॥ ५५ ॥
रंगीं पाहों जातां दिसले चौघेहि ते धवासम जे ॥
भैमी देव-कृत-च्छळ ऐसें चित्तांत तेधवां समजे ॥ ५६ ॥
पांचा नळांत जेव्हां काय दिसेनाचि भेद लव[6] तीस ॥
बुद्धि म्हणे कां भीसी गुरु-चरणीं त्यजुनि खेद लवतीस[7] ॥ ५७ ॥
कर जोडूनि म्हणे ती नळ भर्ता भीम-कन्यकेला हो ॥
प्रभुजी स्वमांतहि जरि संकल्प नसेल अन्य केला हो ॥ ५८ ॥
नळ पति इतर पुरुष पितृ-बंधु जरि मनांत मानिले असती ॥
तरि ताराल इला हो प्रभुजी कैसी तरेल जी अ-सती ॥ ५९ ॥
तीचा बलवान् निश्चय सुर-धृत[8] नळ-रूप घे हिराऊनी ॥
बहु तेज प्रकट करी शुचि सत्व-गुण[9] च्छळीं हिरा ऊर्नी ॥ ६० ॥
शुद्ध सवांग[10] कुश नलदे[11] परि उपभोगोचितत्व[12] नलदासी ॥
ऐसें मनांत आणुनि दमयंती सु-मति होय नल-दासी ॥ ६१ ॥
पति-रूप सोडवुनि ती लोकेशांचा[13] प्रसाद साधूनि ॥
घाली नळासि माळा स्तविली प्रेम-प्रसन्न साधूंनीं ॥ ६२ ॥
नल तीस म्हणे कुलजे त्वां जरि[14] देवांसमक्ष मज वरिलें ॥
जों सा-सु[15] तों तुझा मी होतांहि प्रेम ऊन मजवरिलें ॥ ६३ ॥
झाला विवाह गेला स्व-पुरा नळ मग तिशीं सदा रमला ॥
भूमि म्हणे ताराया अवतरला विष्णु हा स-दार[16] मला ॥ ६४ ॥

---

१ शमविणारी. २ साधूंचा छळ करण्याविषयीं. ३ सर्वदा आलस्य-रहित. ४ सभेला. ५ पति जो नळ त्यासारखे. ६ लेशमात्र. ७ नम्र होत आहेस. म्ह० गुरुचरणीं (श्रेष्ठ इंद्रादिदेव त्यांच्या चरणीं) खेद त्यजुनि (जर) लवतीस म्ह० शरण जाण्यास सिद्ध आहेस (तर) तूं कां भीसी–भितेस.) ८ देवांनीं घेतलेलें. ९ हिरा उन्हांत जसा (जास्ती) तेज प्रकट करितो तसा शुद्ध जो सत्वगुण तो (त्याचा छळ केला असतां) जास्त सामर्थ्य प्रकट करितो. १० (सव+अंग)–यज्ञाचे अंगभूत. ११ बाळा. १२ उपभोगाला योग्य असणें. तात्पर्य कीं, जसे देव पवित्र तसा नल हीं पवित्र, ते जसे प्रेमार्ह, तसा हाही प्रेमार्ह; पण ते गुरु म्हणून प्रेमार्ह, व हा संगमार्ह म्हणून प्रेमार्ह असें समजून तिनें नलालाच वरिलें. १३ इंद्रादि लोकपालांचा. १४ ज्यापक्षीं. १५ (स+असु)–जिवंत. १६ स्त्रीसहित.

## वनपर्वांतील सावित्रीचें आख्यान.

मद्रदेशच्या अश्वपतिराजाची कन्या सावित्री (सावित्रीदेवीचा अवतार) हिनें शाल्वदेशच्या द्युमत्सेनराजाचा मुलगा सत्यवान् ह्यास वरिलें. सत्यवान् अल्पायुषी होता. त्याच्या मरणाच्या वेळीं यम जातीनें त्याचा प्राण घेऊन चालला असतां सावित्रीनें त्याचे मागून जाऊन यमास आपल्या भाषणानें संतुष्ट केलें आणि आपल्या बापास शत-पुत्रप्राप्ति, सासरा आंधळा व राज्यरहित होता त्यास डोळ्यांची व राज्याची प्राप्ति, व आपणाला शंभर पुत्रांची प्राप्ति, असे वर त्यापासून संपादिले; व शेवटीं सत्यवानाचा प्राणही परत आणिला; हें ह्या आख्यानांत सांगितलें आहे.

धर्म पुन्हा त्यासि म्हणे मार्कंडेया मुनीश्वरा आर्या ॥
आढळली तुज लोकीं सत्वाढ्या आमुची जशी भार्या ॥ १ ॥
मुनि त्यासि म्हणे होती सावित्री नाम अश्वपति-तनया ॥
तच्चरित श्रवण करीं ऐकाया योग्य साधु पतित न या ॥ २ ॥
होय प्राप्त विधि-स्त्री-सावित्रीच्या वरेंचि ती राया ॥
यत्कीर्ति जना म्हणती कर देत्यें रे अघाब्धि-तीरा या ॥ ३ ॥
झाली भक्त-सुता ती श्रीसावित्रीच उद्धरायाला ॥
श्री क्षीरधिला जन्मुनि जें दे यश तेंच शुद्ध रायाला ॥ ४ ॥
अश्वपति म्हणे वत्से चिंता मज हेंचि एक परमा गे ॥
झालीस दान-योग्या परि कोण्हीही तुला न वर मागे ॥ ५ ॥
जा शोधुनि ये वत्से वरुनि मनें मानल्या कुलीनातें ॥
कीं तुजकडेचि आहे शत-पुत्रांचेंहि गे मुली नातें ॥ ६ ॥
स्व-वर पहा जा ऐसें योग्य जनीं तोचि तीसचि वदाया ॥
गुरुच्या वचनें गेली आपण घेऊनि ती सचिव दाया. ॥ ७ ॥
अनुरूप वर विलोकुनि आली तों त्या नृपा परम हर्षी ॥
सांगत होता सुकथा श्रीनारद जो कृपा-पर महर्षी ॥ ८ ॥

---

१ सत्व-गुणानें युक्त म्ह० कसाही प्रसंग गुदरला तरी जी आपलें सद्वर्तन सोडीत नाहीं अशी. २ नांवानें प्रसिद्ध. ३ अश्वपतिनामक राजाची मुलगी. ४ ह्या चरित्रास. ५ ब्रह्मदेवाची बायको. ६ पातकसमुद्राच्या तीरास. ७ लक्ष्मी. ८ देण्यास योग्य. ९ शंभर पुत्रांच्या ठिकाणीं तूं आहेस हें तात्पर्य. १० मंत्री आणि उपमाता ह्यांस. ११ ब्रह्मानंदांत निमग्न.

ती दोघांतें वंदी तों तीस ब्रह्म-काय-भू[1] पाहे ॥
स-स्मित असें पुसे कीं त्वत्तनया होय काय भूपा हे[2] ॥ ९ ॥
कोठें गेली होती श्वशुर-गृहाहूनि काय आणविली ॥
हो सचिवांनीं असुनी दानोचितता इची न जाणविली ॥ १० ॥
भूप म्हणे परिसावें तेंचि तुवां सर्व साधु-कुल-गीतें[3] ॥
म्यां पाठविलें होतें स्व-वर पहाया स्वयें स्व मुलगीतें ॥ ११ ॥
वद वत्से काय कसें वर बरवा पाहिला ? न लाजावें ॥
ह्या गुरुनें धन्य असें म्हणुनि स्व-मुखें तुला मला जावें ॥ १२ ॥
सांगे ती सावित्री नृप द्युमत्सेन[4] शाल्व-पति[5] आहे ॥
जरि वृद्ध अंध रिपु-हृत-राज्य[6] वन-स्थ[7]हि न काळजी वाहे ॥१३॥
कुल-शील-सत्त्व-गुण-निधि तो पुत्र-कलत्रमात्र-परिवार[8] ॥
परिवार[9] सर्व सम त्या कीं मथिला स्वांतरस्थ[10] अरि-वार[11] ॥ १४ ॥
तो श्वशुर मानला मज चित्तें त्याचा कुमार म्यां वरिला ॥
जरि लाजविति सख्या अनुसरली गौरी हरा न त्या हरिला ॥१५॥
नारद म्हणे नृपा हे चुकली योजुनि सत्यवान् नवरा ॥
न वरावा जरि गुणवान्, योजू अन्या, असे उणें न वरा ॥ १६ ॥
भूप म्हणे सर्व-ज्ञा देवा उमजे असेंचि सांग मला ॥
गुणवान् युवा कुलज-वर जरि तरिहि तुला अयोग्य कां गमला॥१७॥
काय इणें न धरावें अधनत्वें भूप-जनें-वरा[12] जीवीं ॥
कां न भाशावें मधु मधुपानें कूप-ज-नव-राजीवीं[13] ॥ १८ ॥
मुनि सांगे वर्षांतीं येइल त्या भूप-पुत्रका व्यसुता[14] ॥
अन्य वरू, वृतहि कच त्यजुनि वरी भूप-पुत्र काव्य-सुता[15] ॥१९॥
भूप म्हणे न वरावा वत्से जरि सु-गुण-सागर ल्वायु[16] ॥

---

१ ब्रम्हदेवाच्या शरीरापासून झालेला–नारद. २ खेदसूचक अव्यय. ३ सर्व साधूंच्या समुदायानें स्तविलेला. ४ द्युमत्सेननांवाचा. ५ शाल्व–देशाचा राजा. ६ शत्रूंनीं हरण केलें आहे राज्य ज्याचें असा. ७ अरण्यांत राहणारा. ८ पुत्र आणि कलत्र (स्त्री) एवढेंच आहे परिवार ज्याचें. ९परि ( तथापि ) त्या ( द्युमत्सेनाला ) सर्व वार ( दिवस) सम. १० आपल्या अंतःकरणांत राहणारा. ११ काम–क्रोधादिक शत्रूंचा समुदाय. १२ राजश्रेष्ठास. १३ विहिरींत उत्पन्न झालेल्या नव्या कमलांत. १४ ( वि+असु+ता ) गतप्राणता ( मरण ). १५ शुक्राचार्यांची मुलगी (देवयानी). १६ अल्पायुषी.

शीतल मंद सुगंधहि वद सेवावा कसा गरल-वायु ॥ २० ॥
ती सुमति म्हणे ताता न त्यजुनि पयोधिला नदी परते ॥
न पतंग-चित्त-वृत्ति क्षणही रत्नीं त्यजुनि दीप रते ॥ २१ ॥
वरिला तो वरिलाचि स्पर्शावा या न अन्य कायातें ॥
हा दृढ निश्चय माझा स्तवितील कुलीन कन्यका यातें ॥ २२ ॥
आयुष्य असो किति तरि मज तदितर[1] पुरुष तुजसमचि राया ॥
मन न चळेलचि येइल जरि चरचर हा गळा यम चिराया ॥२३॥
देवर्षि म्हणे त्यासचि दे साध्वी-व्रत-परा[2] सुता राया ॥
शुचि निश्चयाहुनि अधिक अमृत-रस नसे परासु[3] ताराया ॥२४॥
हातें सद्धर्माच्या कासेला लागतां सदा शिव हो ॥
येतो, बसा, प्रसन्न प्रभु मृत्युंजय तुम्हां सदाशिव हो ॥ २५ ॥
गेला मुनि जो भगवत-कीर्ति-महा-काम-धेनुचा दुहिता[4] ॥
नेउनि दिली नृपें ती सद्विधिनें सत्यवत-करीं दुहिता ॥ २६ ॥
झाली तपोवनांत स्वीकारुनि वल्क तापसी ते[5], तें ॥
अद्भुत सत्त्व तिचें बा तितका नव्हताचि ताप सीतेतें ॥ २७ ॥
वेद श्वशुर श्वश्रू स्मृति ती स्वाचार[6]-पद्धतीच सती ॥
मुनि म्हणति या नृपाच्या उटजीं सिद्धि स्नुषा-मिषें[7] वसती ॥२८॥
तो सत्यवान् म्हणे हे पितृ-राज्य-श्री[8] तपोवनांत पती ॥
हो आपन्मुक्त[9] म्हणुनि बहुधा आपणहि या[10] मिषें तपती[11] ॥२९॥
तत्सद्गुणें प्रमुदितें झालीं केवळ मनांत न तिघें तीं ॥
सकळें स-देव-तापस[12]-वृंदेंहि तपोवनांत नति घेती ॥ ६० ॥
तो स्व-मनांत म्हणे तुज तनु रडविल सर्व काळ जीवा हे ॥
सोड इला वेड्या बुध न कु-संगति धरुनि काळजी वाहे ॥ ३१ ॥
ऐसें चित्तीं बोले मोजी उर्वरित दिवस महिने ती ॥
नसतें तसें तरि सुखें वय भोगुनि तदधिक श्रमहि नेती ॥ ३२ ॥

---

१ सत्यवानाहून निराळा. २ पतिव्रतेच्या आचरणाविषयीं तत्पर. ३ गेले आहेत प्राण ज्याचे असा. ४ भगवंताची कीर्ति हीच कामधेनु तिचें दोहन करणारा ( धार काढणारा. ) ५ ती सावित्री. ६ सदाचाराचा क्रम. ७ सुनेच्या रूपानें. ८ बापाची राज्यलक्ष्मी. ९ विपत्तीपासून मोकळा झालेला. १० ह्या सावित्रीच्या रूपानें. ११ तप करिते. १२ देवासहित ऋषींचे समुदाय.

उरतां चार दिवस ती करि वांचाया पति व्रतारंभा ॥
तन्नियमीं प्रियवाक् ती शुकीं विलोकी न तीव्रता रंभा ॥ ३३ ॥
श्वशुर म्हणे त्रि-दिन-व्रत झालें कीं ! वंश धन्य केला गे ॥
कर पारणा, क्षुधा बहु पूर्व-वयामाजि कन्यके लागे ॥ ३४ ॥
ती संकल्पीं आहे सूर्याऽस्तीं पारणा करायाची ॥
ऐसें श्वशुर-श्वश्रू-चरणातें जोडुनी करा यांची ॥ ३५ ॥
फल-मूलार्थ निघे पति त्यासि म्हणे मजहि सत्तमा न्या हो ॥
वन पाहेन तुम्हां हे न प्रथम-प्रार्थना अमान्या हो ॥ ३६ ॥
चित्राश्व म्हणे दयिते गमली वन-सरणि काय कोमळ ती ॥
श्रमशिल शिबिकास्थांही दुर्ग-वन-पंथांत बायको मळती ॥३७॥
उपवास ती दिसांचा तूं आधींच प्रिये सु-मृदुला गे ॥
न्यावें कसें चरण-युग नवनीतापरिसही सु-मृदु लागे ॥ ३८ ॥
मज सोसेल कशी जी न पहावे स्त्री-व्यथा नरा नीचा
श्रमदा प्रमदा-त्द्दया कथितीहि कवी कथा न रानींच्या ॥ ३९ ॥
येणारचि तरि साध्वी श्वश्रू-श्वशुरांसि पूस मग ये, तें ॥
योग्य तुज मजहि, मानिति गुर्वाज्ञाधिक सुबुद्धि न गयेतें ॥४०॥
सावित्री त्यांच्याही आज्ञेतें तत्प्रसाद साधुनि घे ॥
उटजांतूनि सतीसह वंदुनि तो स्व-पितृ-पादें साधु निघे ॥ ४१ ॥
ती न स्त्री रक्षाया त्यांस निघे आत्त-मूर्ति जनकाशी ॥
परम शिव जींत नांदे म्हणुनि जिला म्हणति सुज्ञ-जन काशी॥४२॥
जे पक्षी जे श्वापद-संघ अधिष्ठूनि कानना वसती ॥
त्यांचें तद्वचनाऽमृत-पानार्थ पुसेल कां न नांव सती ४३ ॥
पात्र भरूनि फळांनीं काष्ठें फोडी वनांत, सत्वें-रतें ॥

---

१ सावित्रीच्या नियमांत. २ मधुर भाषण करणारी–हें रंभचें विशेषण. उत्तराधांचा अन्वय–तन्नियमीं ( जी ) तीव्रता ( होती ) ती प्रियवाक् रंभा शुकीं (ही ) न विलोकी. ३ विनंती करी. ४ सत्यवान्. ५ वनांतला मार्ग. ६ पालखींत बसलेली. ७ रानांतील खडतर मार्गांत. ८ दुःख पावेल. ९ फार नाजूक. १० गया–क्षेत्रास. ११ आपल्या बापाचे पाय. १२ बापाचा आशीर्वाद. १३ ज्या आशीमध्यें. १४ ज्या आशीला. १५ आश्रय करून. १६ त्या सत्यवानाचें वचन हेंच अमृत घ्यावें म्हणून. १७ धैर्यशील–हें तत्कलत्रें ह्याचें विशेषण.

पाहूनि तत्कलत्रें स्मरलें मुनि-वच मनांत सत्वर तें ॥ ४४ ॥
जों साध्वी हळुच म्हणे हा नाथा नियत[1]- मानदा रुचिरा
मूर्ति श्रमत्ये भ्रमत्ये मति कीं जी प्रियतमा न दारु चिरा ॥ ४५ ॥
तोंचि म्हणे तो उठल्या करित्या स्मृति[2]-हानि वेदना, लागे ॥
शूल-शत शिरीं जाणों सखि अ-क्षम हा[3] निवेदनाला गे ॥ ४६ ॥
तुझिया मृदु-शीतांऽकीं[4] शिर ठेवुनि वाटतें निजावें गे ॥
त्वत्स्पर्श अमृत म्हणवुनि या मत्तापें पळोनि जावें गे ॥ ४७ ॥
मांडी देउनि पतिचें मस्तक हस्त-कमळें सुधी रगडी ॥
दे धैर्य सतीस तिचा निज-निश्चय जो खरा सु-धीर गडी ॥ ४८ ॥
सीता दश-कंठा जसि तशि सत्वें भी न तीव्र-तापा हे ॥
तों पाश-पाणि[5]-पुरुषा-प्रति पति-पार्श्वीं पतिव्रता पाहे ॥ ४९ ॥
क्षितिवरि पति-शिर उतरुनि स-विनय झडकरि उठोनि कर जोडी॥
नमुनि म्हणे देव तुम्ही अशि कैंची अन्य-दर्शनीं गोडी ॥ ५० ॥
केलेंचि धन्य दर्शन-दानें येऊनि कानना मातें ॥
अजि देवेश निवावे बहु हे सेवूनि कान नामातें ॥ ५१ ॥
देव म्हणे सति यम मी; कां आलां ? न्यावया तुझ्या पतितें ॥
हें दूत-कार्य कीं जी; जें सेवक-कृत्य वेगळें सति तें ॥ ५२ ॥
हा सत्यवान् सुकृतवान् गुणवान् न्यावा न सेवकांनीं कीं ॥
ज्या कर्मीं योग्यत्व स्वामीचें तें न सेवकांनीकीं[6] ॥ ५३ ॥
अंगुष्ठ-मात्र पुरुषा-प्रति यम पाशेंकरुनि आकर्षी ॥
तें हाय हाय म्हणती बहु सद्गद-कंठ साश्रु नाकर्षी ॥ ५४ ॥
त्यातें बांधुनि घेउनि यम-धर्म प्रभु निघे आवाचीतें[7] ॥
भ्याला सतीस बहुधा जें ब्रह्म-लिखित बरें न वाची तें ॥ ५५ ॥
त्यामागें तीहि निघे धर्म म्हणे भागलीस जा परत ॥
स्नेह-ऋण फेडिलें त्वां करुनि स्वपति-क्रिया[8] रहा स्मरत ॥ ५६ ॥
साध्वी म्हणे प्रभो पति जिकडे जावीच मूर्ति हे तिकडे ॥

---

१ निश्चयें करून मान देणाऱ्या म्ह० माझें वचन कधीं न मोडणाऱ्या. २ स्मरण नाहींसें करणाऱ्या—अशा वेदना. ३ मी. ४ मृदु आणि शीतळ अशा मांडीवर. ५ पाश आहे हातीं ज्याच्या अशा पुरुषाला. ६ चाकरांच्या मंडळींत. ७ दक्षिण दिशेस. ८ उत्तर-कार्य.

स्व-गुरु[1]-व्रत-प्रसादें मद्गतिसि[2] न रोधितील हेति कडे[3] ॥ ५७ ॥
संत म्हणति सम-पदें सहवासें सख्य साधुशीं घडतें ॥
सन्मित्राचे न व्यसनीं अन्या[4]ऽखिल-मित्र संकटीं पडतें ॥ ५८ ॥
तुज संत म्हणति पितृ-पति समवर्ती[5] धर्मराज बापा हें ॥
सत्य यश म्हणुनि याही कन्येसि दया करुनि बा पाहें ॥ ५९ ॥
ऐसें सती वदे तो बोल शशी देव तोहि सागरसा[6] ॥
प्रेमें उचंबळे हो धरि कारुण्यें द्रवासि साग रसा[7] ॥ ६० ॥
धर्म म्हणे साध्वि बहु श्रमलीस स्वाश्रमासि जा मागें ॥
जो मागशील तो वर देतों, घे, इष्ट तें मला मागें ॥ ६१ ॥
देवा व्हावे चक्षुस्तेजस्संपन्न[8] आश्रमा-माजी ॥
मामाजी ऐसें द्या मति साहेनाचि त्या श्रमा माजी ॥ ६२ ॥
दिधलें धर्म म्हणे परि जातचि होती तशीच मागूनी ॥
देव म्हणे पुनरपि जा वत्से घे वर दुजाहि मागूनी ॥ ६३ ॥
ती सुमति म्हणे राज्य-भ्रंशें बहु खिन्न सासुरा होतो ॥
पावुनि भवत्प्रसादें निज-पद बहु काळ सासु[9] राहो तो ॥ ६४ ॥
होइल जा धर्म म्हणे परि करि अनु-गमन स-बहु-मान सती ॥
कीं जी हंसी हंसावांचुनि मानील न बहु मानस[10] ती ॥ ६५ ॥
पुनरपि मार्गीं काढी जें धर्म-रहस्य जेंवि नव पसती[11] ॥
तें होय वशीकरणचि कीं भासों दे तयाशि न वपु[12] सती ॥ ६६ ॥
धर्म म्हणे गे बाई करिसी कां व्यर्थ या श्रमास तिजा ॥
वर घे नकोचि भागों आलीस सुदूर, आश्रमा सति जा ॥ ६७ ॥
त्यासि म्हणे सावित्री संपन्न असो पिता सुतनय[13]-शतें ॥
हा लक्ष्मी-सुत[14]-कवि किति लिहिल सतीचें उमा[15]-सुत न यश तें॥६८

---

१ माझ्या वडिलांच्या आणि व्रताच्या सामर्थ्यानें. २ माझ्या गमनाला. ३ शस्त्रें व डोंगराचे कडे. ४ साधु ज्याचा मित्र आहे असें कोणी ही दुःखांत पडत नाहीं; त्यावांचून इतर सर्व जरी मित्र असले, तरी तें मनुष्य संकटांत पडतें. ५ सर्वांशीं सम-दृष्टीनें वागणारा. ६ पर्वतांसहित. ७ पृथ्वी. भूतमात्राला करुणा आली हें चवथ्या चरणाचें तात्पर्य. ८ डोळ्यांच्या ( पाहण्याच्या ) शक्तीनें युक्त. ९ जिवंत. १० मानससरोवर. ११ नवीन काढलेली पुस्ती. १२ "तयासि वपु न भासों दे" "त्याचें देहभान नाहींसें करी." १३ उत्तम शंभर पुत्रांनीं. १४ लक्ष्मी हें मोरोपंताच्या आईचें नांव. १५ गणपति.

उडुपा उडुसें [1]धर्मौदार्या लाजोनि अभ्र मुरडे हो ॥
सावित्रीच्या सु-यशीं न दिसे पति म्हणुनि अभ्रमु रडे हो ॥ ६९ ॥
ऐसें शिरोनि चित्तीं घेउनि भारीहि तीन वर देवा ॥
सोडीना सोडविल्यावांचुनिया ती सती नवर-देवा ॥ ७० ॥
देव [2]म्हणे तूं स्वच्छा स्वच्छायाशीच मागती सति घे ॥
वर घेउनि जा चवथा देतों मागोनि मागतीस तिघे ॥ ७१ ॥
व्हा सु-प्रसन्न, वत्से तुज हो सुत-शत असें वदा, न्या हो ॥
सु-यशोराशि स्वर्गीं लज्जा-प्रद सुर-नगा वदान्या हो ॥ ७२ ॥
भुलला धर्म द्युतिला धृतिला मतिला तिच्या तथा स्तुतिला ॥
न करुनि विचार जावीं मागें म्हणवुनि म्हणे तथाऽस्तु तिला॥७३॥
हळुचि म्हणे सावित्री पावेन वरें करूनि संततिला ॥
तुमचा प्रसाद म्हणुनि प्रेमें गातील सर्व संत तिला ॥ ७४ ॥
तरि मत्पति मज द्या कीं तुमची पावेल मान सत्या गी ॥
यश रक्षाया प्राणहि सत्य-गुणा[3]सक्त-मानस त्यागी ॥ ७५ ॥
रोमांचित धर्म म्हणे बाई गातिल तुझा प्रभाव सती ॥
पतिशीं अविना-[5]भावें वसशिल रविशीं जसी प्रभा व[6]सती ॥ ७६ ॥
राज्य चतुःशत वत्सर करिल तुझा कांत [4]सोडिला जा गे ॥
हा त्वन्महिमा जागो सीतेनें जेविं जोडिला जागे ॥ ७७ ॥
तें वृत्त [7]वर्तमान स्वल्पहि न कळे तिच्या वरा पाशीं ॥
जातां यम सावित्री धांवत आली कळे-वरापाशीं ॥ ७८ ॥
पुनरपि तशीच बसली अंकीं घेऊनिया स्व-पति-शिर ती ॥

---

१ यमाच्या औदार्यास. उत्तरार्द्ध—सावित्रीचें अतिशुभ्र यशानें विश्व इतकें भरून गेलें होतें, कीं, अभ्रमूचा पति ऐरावत हा अत्यंत शुभ्र असल्यमुळें त्या यशांत बुडून कोठें दिसेनासा झाला, तेव्हां ती रडूं लागली. तात्पर्य, सावित्रीचें यश अगदीं निर्मळ असून साऱ्या त्रैलोक्यांत भरलें होतें. यशाचा वर्ण शुभ्र आहे असें कवि मानितात. २ देव म्हणे तूं स्वच्छा (व) स्वच्छायाशीच (माझ्या सावलीप्रमाणेंच) मागती (मागें) (येत आहेस) (म्हणून) (हे; सति तिघे (तीन) वर मागोनि (ही) चवथा मागतीस (तर) देतों घे, घेऊनि जा. ३ सत्याविषयीं तत्पर आहे मन ज्याचें तो. ४ सोडितो. ५ वियोग न होतां. ६ राहते. ७ झालें काय व होत आहे काय. ८ पाशांत असतां.

जशि चेतना धवांगीं होय इची जीवितांतें मति शिरती ॥ ७९ ॥
वन-देवता म्हणति त्या बा गा मूर्च्छोत्थिता चकोरा हो ॥
स्वस्थ, ज्योत्स्ना कीं हे द्रुत उठेचि नमावया नको राहो ॥ ८० ॥
नेत्रें उघडुनि पाहे तो दयितेच्या मुखासचि वनीं तो ॥
दे त्यासि जसि नृपासि व्यसनीं देती सुखा सचिवें-नीती ॥ ८१ ॥
स्त्रीस म्हणे सु-भगे त्वां मृदु मांडी मांडिली उशी, रमला ॥
आत्मा निद्रेशीं रवि मावळला लागला उशीर मला ॥ ८२ ॥
पुरुष श्याम महौजा ओढित होता बळेंचि मजला जो ॥
तो कोण, पुसेन तया नसतां स्वप्नोत्तमर्णे मज लाजो ॥ ८३ ॥
कथिन उद्यां, झाली बहु रात्रि, बळ असेल तरि उठा राया ॥
देतें हात, चला जी घेत्यें फळ-भाजना कुठारा या ॥ ८४ ॥
नेत्रें पुसोनि पदरें पतिस म्हणे भेटतील मामाजी ॥
आई म्हणतां रडतां पडतां दाटून कां श्रमामाजी ॥ ८५ ॥
भेटवित्यें ताताला मातेला, या उठा, असें वदली ॥
आली घेउनि, अद्भुत वाटे कलभाशि सांवरी कदली ॥ ८६ ॥
आला प्रकाश नेत्रीं अंधत्वाचा वरें नुरे गंध ॥
परि भूप पुत्र-मोहें केला पहिल्यापरीसही अंध ॥ ८७ ॥
त्याला म्हणती गौतम दाल्भ्य भरद्वाज धौम्य तापस हा ॥
बा गा उगा मुहूर्तोपस्थित दुर्दैव-दत्त ताप सहा ॥ ८८ ॥
सावित्री शुभ-लक्षण गुण-संपन्ना महासती बा हे ॥
जी जी साध्वी स्व-धवाऽनुमतें द्वास्था महास ती बाहे ॥ ८९ ॥
वाखाणिति बहु पाहति मुनि-दारेंहि भासुर-व्रतें तिला जे ॥
साध्वीच देवता ही साध्वीला बा सुर-व्रतति लाजे ॥ ९० ॥
शोकें रडतां डोळे जावे, गेले कधीं न यावे गा ॥

१ तिच्या जिवांत जीव आला. २ मूर्छा जाऊन सावध झालेला अशा. ३ मंत्र्यांनीं सांगितलेली चांगली मसलत. ४ हे सुंदरि-प्रिये. ५ मोठा तेजस्वी. ६ स्वप्नांतलाही सावकार. ७ पुत्रशोकानें. ८ क्षणभर प्राप्त झालेलें दुर्दैवानें दिलेलें दुःख. ९ सहन कर. १० दारांत उभा राहिलेल्या. ११ बोलाविते.–उत्तरार्द्ध–आनंद हा पतिव्रतेच्या नेहमीं दारीं उभा असतो, म्हणजे तिला अति सुलभ असतो, हें तात्पर्य. १२ ऋषिपत्नी. १३ उत्कृष्ट आचारयुक्त. १४ कल्पवल्ली.

दिसतें कल्याण पुढें होऊंचि नको अधीन या वेगा ॥ ९१ ॥
ऐसें समजाविति त्या राजाला जों दया-पर महर्षी ॥
तों झाले अवलोकुनि सावित्रीसह तया परम हर्षी ॥ ९२ ॥
मुनि म्हणती हा आला नेत्रें उघडुनि पहा सदारा या ॥
मोठा भाग्याचा तूं प्र-मुदित यांसह रहा सदा राया ॥ ९३ ॥
दे आलिंगन अंकीं घे, मस्तक-पद्म हुंग, वागाया ॥
आत्माऽऽत्मज-तापातें[1] दे आशी राज-सत्तमा राया ॥ ९४ ॥
पुसतां विलंब-कारण चित्राश्व[2] म्हणे शिरोव्यथा[3]-शयन ॥
मुनि म्हणति हें नव्हे, वद वत्से, हो तूंचि आमुचें नयन ॥ ९५ ॥
सावित्रीनें कथिलें तें वृत्त अशेष साधु-सद[4] नमुनी ॥
तेव्हां झाले अतुल प्रीति-क्रीडेशि केलि-सदन[5] मुनी ॥ ९६ ॥
मार्कंडेय म्हणे बहु वर्णावें काय जेविं शिव-सेवा ॥
मज्ज काळापासुनि तशि मुक्त करी त्यांशि[6] ती[7] मनु-ज-देवा[8]॥९७॥
दुसरे दिवशीं प्रकृति[9] प्रार्थिति येऊनि आपुल्या पतितें ॥
या राज्य करा, सचिवें वधिला हरिली स्व-भूमि ज्या पतितें॥९८॥
मुनि म्हणति अनुभवावें स्वस्थ-मनें राज्य-पद नता राया ॥
न तपोवन वर तुज बहु सावित्री-युक्त सदन ताराया ॥ ९९ ॥
सिंहासनीं बसविला सावित्रीच्या व्रतेंचि, हा नियम[10] ॥
वर-सामर्थ्य म्हणा परि गेला होता करूनि हानि यम ॥ १०० ॥
सावित्रीनें केला उभय-कुलोद्धार हा असा राजा[11] ॥
कृष्णाहि[12] अशीच, स्तुति येती न मुखाशि या असारा[13] जा ॥ १ ॥
राम-घन-मयूर[14] म्हणे निववालीच सु-रसिकांशि केका[15] हो ॥

---

१ आपणाला व आपल्या मुलाला झालेलें जें (वियोग) दुःख त्यातें. २ सत्यवान्. ३ मस्तक-व्यथेमुळें निजणें. ४ साधूंचा समुदाय. ५ क्रीडेचें स्थान. ६ सत्यवानाला. ७ सावित्री ८ हे धर्मराजा. ९ प्रजा. १० हेंच खरें समजावें. ११ हे धर्मराजा. १२ द्रौपदी. १३ निरर्थक. १४ राम हाच मेघ त्याला मोरासारिखा मोरोपंत कवि. १५ मयूरवाणीहो.

शंभुहि म्हणे न सेविति मंद म्हणुनि झुरसि काशिके कां हो ॥१०२॥

---

## वन-पर्वांतील जयद्रथ-कृत द्रौपदी-हरण.

धर्मादि पांडव वनवासांत असतां एके दिवशीं मृगया करण्याकरितां सर्व वनांत गेले होते. आश्रमांत द्रौपदी एकटीच होती. त्याच दिवशीं जयद्रथ ह्या नांवाचा राजा विवाह करण्याचे उद्देशानें सैन्यासह चालला असतां त्या आश्रमाजवळ उतरला होता. तेथें द्रौपदी त्याचे दृष्टीस पडली. तेव्हां तो तिच्या सौंदर्यानें मोहित झाला, आणि तिला आपले रथावर टाकून घेऊन चालला. पुढें लागलींच पांडवांनीं त्यास गांठून त्याचा पराभव करून द्रौपदीस परत आणिलें. हें ह्या आख्यानांत वर्णिलें आहे.

रायां धृतराष्ट्राचा प्रिय जामाता विवाह-काम वनीं ॥
आला जयद्रथाख्य स्व-बळ-भरें कांपवीत ती अवनी ॥ १ ॥
मृगयार्थ पांडु-नंदन गेले असतां निजाश्रम-द्वारीं ॥
होती उभी द्रुपद-जा, जैसी शंपा नवांबु-भृद्वारीं ॥ २ ॥
तीतें पाहुनि झाला तो रावणसाचि पात्र अन्याया ॥
मित्रासि म्हणे चित्ता हेचि बहु-मता नकोचि अन्या या ॥ ३ ॥
जा कोटिका सख्या तूं पूस तिचें वृत्त होय मत्कर-गा ॥
ऐसें आधीं चतुरा सामें निज-कार्य सिद्धमंत कर गा ॥ ४ ॥
सांगुनि निज वृत्त तिचें वृत्त पुसे तीस कोटिक विहितसें ॥
स्वल्पांत तीहि सांगे बोलो शकती न कोटि-कवि-हि तसें ॥ ५॥

---

१ अन्वय-शंभु हि ( काशिकेला ) म्हणे ( हे ) काशिके मंद (अज्ञान ) ( तुज) न सेविति, म्हणुनि कां हो झुरसि—अज्ञान जन तुजमध्यें येऊन वास करीत नाहींत, म्हणून तुला खिन्न होण्याचें काय कारण आहे? असें साक्षात् शंभु ही काशीला म्हणतो. तस्मात् हे केकाहो अज्ञान जनांनीं तुमचा अनादर केला तरी तुम्हीं खेद करूं नये. जे रसज्ञ आहेत त्यांना तुम्हांपासून आनंद खचीत होईल. २ हे बाराणसि. ३ जनमेजया. ४ धृतराष्ट्राची दुःशला नांवाची मुलगी जयद्रथास ( सिंधुदेशाच्या राजास ) दिली होती. ५ लग्न करण्याची ज्यास इच्छा आहे असा. ६ आपल्या सैन्याच्या भारानें. ७ ( नव—अंबु-भृत्-वारीं ) नव्या मेघसमुदायांत. ८ ह्या मला. ९ माझ्या हस्तगत. १० सामोपचारानें. ११ घडून येईल असें. १२ मुरवतीनें.

कळलें कोटिक-वदनें ती कृष्णा स्व[1]-भगिनी असें नातें ॥
तऱ्हि भय न धरी लज्जेसह पळ कामातुरीं असेना तें ॥ ६ ॥
कृष्णेसि म्हणे माझी राणी हो, लाजतीस कां, बस ये, ॥
अंकावर घेऊं दे आइक सुख-कर मदुक्त, थांब सये ॥ ७ ॥
राज्यें-च्युत-संगें श्रम-पात्र करिसि दिव्य देह कां गे हें ॥
श्रीमद्देह मिळाल्या सेवावीं निर्धनें चि कां गेहें ॥ ८ ॥
त्वां फेडिलेंचि त्यांचें तत्संगें कृश करूनि देह रिण ॥
हो मद्दयिता, देइन मनं तुज, गानासि जेविं दे हरिण ॥ ९ ॥
कृष्णा म्हणे कु-बुद्धे खद्योतीं कीटकाधमीं मलिनीं ॥
द्यु-मणिमति सोडूनि प्रिय-भाव धरील काय रे नलिनी ॥ १० ॥
क्षणमात्र स्वर्गींही वरिली कुशलेच्छुनें न विट-लीला ॥
हे आवडली बहुधा त्वन्मतिला जीवनासि विटलीला ॥ ११ ॥
स्पर्शींच मृति-मद हा वीर-परिग्रह महाहिर्चा मणि कीं ॥
अंड-घटीं द्यु-मणि-द्युति योग्या नांदावयासि कीं मणिकीं ॥१२॥
त्यजितिल भट तुज समयीं त्यजिति हरि जसे नगासि नग-द्रोहें॥
भीम-प्रिया प्रिय-सखी लवहि न साहेल लंघन गदा हें ॥ १३ ॥
कामांध खळ करीना अन्य करी लेश तरि विवेक पिसा ॥
धांवोनि बळात्कारें हां हां म्हणतांहि तो शिवे कपिसा ॥ १४ ॥
पावे व्यसन अ-नाथा जाणो वि-जनांत तापसी ते तें ॥
खळ दे तिला जसा तो पाप-मति दशास्य ताप सीतेतें ॥ १५ ॥
कृष्णेनें भावि नरक-पाताच्या प्रत्ययासि जड लाहो ॥

---

१ जयद्रथाची बायको दुःशला ही धृतराष्ट्राची कन्या व पांडवांची चुलत बहीण ह्यामुळें जयद्रथाच्या मेहुण्यांची बायको जी द्रौपदी ती त्याला बहिणीसारखीच 'अशा लोकव्यवहारास अनुसरून' कवीनें येथें भगिनी हा शब्द योजिला आहे. २ राज्यभ्रष्ट ( पांडव ) ह्यांच्या संगतीनें. ३ तुझा होऊन राहीन. ४ काजव्या-विषयीं आपला आवडता पति अशी बुद्धि. ५ आपलें कल्याण करून घेण्याची ज्यास इच्छा आहे त्यानें. ६ तुला आपल्या जिवाचा कंटाळा आला आहे, म्हणून तुला अशी बुद्धि झाली; हा भाव. ७ ही ( मी ) वीरपत्नी. ८ मोठ्या विषारी सर्पाचा मणिच केवळ. ९ ब्रह्मांडोदरांत. १० सिंह. ११ वणव्यानें पर्वत पेटला असतां. १२ माझी प्रियसखी. १३ मजशीं दुर्वृत्तपणानें वागणें. १४ माकडासारखा.

म्हणउनि कृष्ट-निजोत्तर-पट आसुडितांचि दुष्ट पडला हो ॥ १६ ॥
धौम्यासि म्हणे धांवा मजला हें मूर्त पातक विटाळी ॥
रक्षा मज कीर्तीसहि कीं स्व-पर-व्यसन-पात कवि टाळी ॥१७॥
पुनरपि कपिसाचि पिसा क्षिप्र धरायास तीवर उगारे ॥
तों धांउनि धौम्य म्हणे न उठ धराया सतीवर उगा रे ॥ १८ ॥
ती नमुनि म्हणे मुनिला न वदावें व्यर्थ, दुष्ट हा निपट ॥
वोढिल तरि जीवनही पावेल न एक मात्र हानि पट ॥ १९ ॥
भवदाज्ञेनें बैसो हे दुष्ट-रथीं वृकोदर-गदासी ॥
न हरि-प्रसाद-कविची आपन्ना खळ-वृंकोदर-ग दासी ॥ २० ॥
बसतां स्व-रथीं हर्षे तो, जेविं दशास्य जानकी-लाभें ॥
धरि पर-रथासि ती कीं स्पर्शाया अंत्यजा न कीला भें ॥ २१ ॥
तो बहु त्यासि दटावो कार्पासा काय दापिना कीला ॥
काय बधेल पराला त्यजुनि सती कार्यँ-दा पिनाँकीला ॥ २२ ॥
जरि तूळ-राशि-मध्य-स्व-बिळीं नेईल आखु वातीतें ॥
तरि वाति आखुतें बा सहसा भक्षील आखु वा तीतें ? ॥ २३ ॥
रे तत्काळचि साध्वी-धर्षणे-कर जड्डि महातपा मरतो ॥
धौम्य मुनि असें सांगे हित, परि जोडी न हात पामर तो ॥२४॥
कृष्णाहि म्हणे काय न कांपिल गिळितां वृकानना शस्त्री ॥
वधि दश-मुखा मग करिल एक-मुखाचाहि कां न नाश स्त्री॥२५॥
अप-शकुन-ज्ञ युधिष्ठिर समजोनि अनिष्ट सानुज परतला ॥
जो मृगयेंत न चित्तें त्यजुनि दया राम-नाम-जप रतला ॥२६॥
तों मार्गीं भृत्याची भार्या धात्रेयिकाँचि आढळली ॥
धांवे पडेहि असक्तन्नग-शिखराहुनि जशी शिळा ढळली ॥ २७ ॥
वृत्त कथुनि कोपानल दीप्त कराग्रासि पांडु-योध-मनीं ॥

---

१ ( जयद्रथानें ) ओढलेलें आपलें अंगावरील वस्त्र ( द्रौपदीनें ) जोरानें ओढतांच. २ जयद्रथ हेंच मूर्तिमंत पातक. ३ आपलें व दुसऱ्याचें संकटांत पडणें शाहणा टाळतो. ४ उठून धरावयास धांवला. ५ शुक्राचार्यांची. ६ खळ+वृक+उदर+ग(जयद्रथ) रूप लांडग्याच्या पोटांत गेलेली. ७ आपलें अर्धांग देणाऱ्या महादेवास. ८ ( हें धौम्याचें भाषण ) कापसाच्या ढिगामधील आपल्या बिळांत. ९ पतिव्रतेची अब्रू घेणारा जरी मोठा तपस्वी असला तरी तो मरतो. १० ह्या गांवाची.

सरला सु-वंशे-जा ती झाली धात्रेयिकाचि हो धमनी ॥ २८ ॥
रिपुला गांठाया ते पांडव देती भरों न घटिकेतें ॥
खळ-बळ बहु भी, जाणों न पळहि साधूपुढें अघ टिके तें ॥२९॥
गांठिति रिपु-कटकातें हरिणाच्या सिंह जेविं कळपातें ॥
रक्षील काय पतिला तें व्यसनीं होय जें विकळ पातें ॥ ३० ॥
स्व-रथावरुनि भूवरि उतरुनि देवीस, जरिहि नाक-द न ॥
वरिलें पलायन खळें कीं न पहावेंचि लोचना कदन ॥ ३१ ॥
धर्म स्व-रथीं स्त्रीतें मुनितें घेउनि म्हणे पुरोध्यातें ॥
व्हां शांत असेंचि प्रिय राज्य-श्री- मोचनें पुरो ध्या तें ॥ ३२ ॥
अर्जुन भीमासि म्हणे न करावें व्यर्थ भीत-भट-कदन ॥
गेला पळोनि बहुधा दुष्ट जयद्रथ न दाखवी वदन ॥ ३३ ॥
भीम म्हणे स-पुरोहित राया तूं आश्रमांत जायेतें ॥
निववी, तेंचि करावें तेणें, जें स्वच्छ कर्म जों येतें ॥ ३४ ॥
जा सहदेवा नकुळा तूं ही जा या तिघांसि सांभाळा ॥
लावावा गेलें धन येतां हातासि बोल कां भाळा ॥ ३५ ॥
येतों आतांचि नको साधाया शत्रु-वध मला उशिर ॥
कृष्णा असो, जा आर्या, त्वच्चरणा तो न अधम लोंउ शिर ॥३६॥
धर्म म्हणे रे बा त्यां निज भगिनीच्या न उग्र हो तिलकीं ॥
नित्य सुता सौभाग्य-क्षय-शोकें पितरें साश्रु होतिल कीं ॥ ३७ ॥
कृष्णा म्हणे अहो जरि मत्प्रिय करणें वधाचि तरि त्यातें ॥
मारावेंचि नय-ज्ञें श्रीतें स्त्रीतें बळेंचि हरित्यातें ॥ ३८ ॥

---

१ सरळ, पक्षीं, निष्कपट. २ चांगल्या वेळूची केलेली, पक्षीं, चांगल्या कुळांत झालेली. ३ जें कटक. ४ पडण्यानें. ५ स्वर्ग देणारें. ( पलायनाचें विशेषण ). ६ शांत व्हां, राज्यश्रीमोचनें ( आपलें राज्य सोडविल्याच्या योगानें ) असें-चि प्रिय ( इष्ट ) पुरो ( मिळो ) तें ध्या ( असें चिंता. ) ७ ज्याला जें कर्म उत्तम येतें तें त्यानें करावें. ८ अर्जुन-मात्र मजबरोबर असूं द्या. ९ हे धर्मा. १० तो अधम ( जयद्रथ ) तुला शरण न येवो; तसें झाल्यानें त्याची तुला दया येईल, हा भाव. ११ आपल्या बहिणीच्या ( दुःशलेच्या ) तिलकाविषयीं म्ह० कुंकाविषयीं कठोर होऊं नको, म्हणजे जयद्रथास मारून तिला वैधव्य देऊं नको. १२ कन्येच्या वैधव्याच्या दुःखानें. १३ गांधारी व धृतराष्ट्र.

क्रोश-मितांतर[1] असतां बीभत्सु म्हणे शरांस कळवा जी ॥
आलों असें अरिसें[2] तो दूर न जावा वधा सकळ वाजी ॥ ३९ ॥
अर्जुन-नामांकित-शर-हत हय पाहून फार तो भ्याला ॥
बहु पाप-जीवितें[3] हि त्या प्रिय, जैसें पाप-वित्त लोभ्याला ॥४०॥
धांवोनि त्यासि सार्जुन भीम महा-बळ पळांत आटोपी ॥
ज्याचें चित्त म्हणे स्व-क्रोधा[4] और्वा खलाब्धि आटो पी ॥ ४१ ॥
अर्जुन म्हणे उभारे सिंहत्व त्यजुनिया न कुतरा हो ॥
उतराहो, क्षण पाहों, जा यम-भट हो तळीं न उतरा हो ॥ ४२ ॥
रे रे जयद्रथा हें योग्य नव्हे तुज पलायन परत रे ॥
अभिमुख मरोनि जरि पळ पळतां न महा-बलायन[6] पर तरे॥ ४३ ॥
भीम रथावरुनि उडी टाकुनि धावुनि धरी तया अरितें ॥
वाटे प्रभुचें भीमाकृति खल-बल-दलन-लब्ध-यश अरि तें ॥४४॥
व्यसनीं न पडेल कसा व्याघ्र-बिळीं जो मदांध ओतु निघे ॥
कीं पद्मराग मानुनि जो पदरीं विंगळांश ओतुनि घे ॥ ४५ ॥
बुकली भीम, बुकलिती जैसें यज्ञांत बोकडाला हो ॥
कीं तो साध्वी-धर्षण-दोष-फलानुभव रोकडा लाहो ॥ ४६ ॥
विकळ जयद्रथ होतां वारी धर्मानुजा गुडाकेश ॥
कीं तत्सत्सेव्य-गुणा[8] कोपें न दूषू जसा गुडा केश ॥ ४७ ॥
भीम म्हणे गुरु-दुःख-द तो स्त्री-जितसाचि हा दया-जित कीं ॥
चालों न देचि कर्में मी करितों तीं हितोदया जितकीं ॥ ४८ ॥
हा धर्म दया-जित तुज योग्य सखा स्त्री-जिता दश-रथा रे ॥

---

१ कोसभर अंतर. २ जयद्रथास. ३ दुष्टाचारामध्यें घालविलेलें आयुष्य. ४ हे क्रोधरूप वडवानला, हा खल ( जयद्रथ ) हाच समुद्र पी, हा आटूं दे. ५ उत्तरार्ध–( अर्जुन ) उतराहो ( असें यमभटांस म्हणून जयद्रथास माराबयास तयार झाला; परंतु युद्धांत मरून उत्तम गतीस जाण्याची त्याची इच्छा आहे किंवा नाहीं हे पाहावें म्हणून तो पुनः त्यांस म्हणतो ) क्षण पाहों–क्षणभर वाट पाहूं द्या इ०. ६ पर ( शत्रु ) जरि महाबलायन ( महाबलिष्ठ ) ( तरी ) पळ पळतां न तरे, अभिमुख मरोनि तरे. ७ भीमाचें स्वरूप घेणारें, दुष्टांच्या सैन्याच्या नाशापासून मिळविली आहे कीर्ति ज्यानें असें प्रभूचें ( विष्णूचें ) तें अरि ( चक्र—सुदर्शन ) च वाटे. ८ त्याच्या ( धर्माच्या ) सज्जनांनीं सेव्य अशा ( दयारूप ) गुणास. ९ तुझा राग. १० तो दशरथ. बायको ( कैकयी ) म्हणेल तसें वागणारा.

शर सह्य पार जातां त्वद्दयींच जनापवाद-शर थारे[1] ॥ ४९ ॥
वत्सा जैसा तो गुरु होतोसि तसाचि तूंहि कां पावें ॥
या पापातें पाहुनि सन्नयनें न नरकें हि कांपावें ॥ ५० ॥
देवूं दे प्राणांत प्रायश्चित्त स्वकीय हा नर कीं ॥
मूर्खहि सुत्त्वद्वसावा स्वर्गीं चिरकाळ कीं महानरकीं ॥ ५१ ॥
वधसम विडंबन असें समयींच स्मरण शास्त्र-पाटव दे ॥
अर्धेंदु-शरें त्याच्या माथां काढूनि पांच पाट वदे ॥ ५२ ॥
मी पांडव-दास असें स्व-मुखें सर्वत्र बोलशील तरी ॥
देईन जीवित तुला तारी विपदब्धि-माजि शील-तरी ॥ ५३ ॥
वंदुनि म्हणे जयद्रथ ऐसेंच म्हणेन मी सदा साचें ॥
मारूं नका बुक्यांनीं रक्षावें जीवित स्व-दासाचें ॥ ५४ ॥
ज्यापासुनी धरावी प्रबळतरारा[3]तिच्याहि भी मानें ॥
बांधुनि केतु-स्तंभीं खळ नेला स्वाश्रमासि भीमानें ॥ ५५ ॥
प्रेषूनि[4] कोटरेतें प्रेम्यानें जेविं बाण राखविला ॥
तैसाचि निजाज्ञेनें जेणें तो त्या प्रभूसि दाखविला[5] ॥ ५६ ॥
धर्म तशासि विलोकुनि भीमासि म्हणे अगा महाबाहो ॥
सोड न विलोकवें मज द्या या असु मृत्युला न हा बाहो ॥५७॥
भीम म्हणे देवीला सांगा ती जरि म्हणेल सोडीन ॥
नाहीं तरि मी याचा सत्यंचलें[6]-कर्ष पाणि तोडीन ॥ ५८ ॥
कां सोडितां असों द्या हा निज दासांत दास राबावा ॥
या काम-हता रक्षा पायांचा द्याचि आसरा बावा ॥ ५९ ॥
कृष्णा धर्मासि म्हणे देवा सोडावयासि सांगा जी ॥
मज देखवे न शिवती निर्दयते-सह अ-कीर्ति आंगा जी ॥ ६० ॥

---

१ बाण शरीरांतून पार निघून जातो ( म्हणून ) तो सह्य ( होय ); ( परंतु ) लोक-निंदारूप बाण त्द्दयांत रुतून राहतो ( म्हणून तो असह्य ) असा भाव. २ धर्म. ३ ज्या भीमापुढें पराकाष्ठेचा बळकट शत्रुही गर्वहीन होतो; हा भाव. ४ पुत्र-प्रेम्यानें कोटरेला पाठवून जसें बाणासुराचें रक्षण केलें;—बाणासुर व कृष्ण ह्यांचें युद्ध चाललें असतां रेवतीं आपल्या पुत्राचा नाश होतो असें पाहून बाणासुराची आई कोटरा नग्न होऊन रणांगणांत कृष्णापुढें येऊन उभी राहिली, तेव्हां कृष्णानें खालीं मान घातली, नंतर बाणासुर युद्धांतून परतला, अशी कथा आहे. जेणें ( धर्मानें ) प्रभूसि ( धर्मास ). ५ (भीमानें) पुढें उभा केला. ६ सतीचा पदर ओढणारा हात.

धर्म म्हणे रे साधो जाऊं दे सोड दे मला बा हें ॥
जातें त्यजुनि भलेपण न विटावें सु-यश तें तया वाहें ॥ ६१ ॥
भीम म्हणे मी पांडव-दास असें तीन वेळ मोल्यानें ॥
हा खळ म्हणो, भल्याला विनवावें धरुनि पाय खोल्यानें ॥६२॥
धर्म म्हणे गा भीमा तुज जरि आम्ही प्रमाण तरि सोडीं ॥
न वदें निष्ठुर कांहीं अ-भय-वितरणें सदीड्य यश जोडीं ॥ ६३ ॥
भीमें गुरु-मंत्र-वश-व्याघ्रें मृगसाचि सोडितां नमनें ॥
धर्मासि करि, वरि लवे मात्र शिरें, दुष्ट अंतरीं न मनें ॥ ६४ ॥
नृप त्यासि म्हणे घ्याया भुजगीच्या झोंबतां नर मणीतें ॥
वांचेल परि पराच्या चित्तेंहि स्पर्शतां न रमणीतें ॥ ६५ ॥
जा, यावरि न करावें पाप असें मागतों, मला वे हें ॥
जें कर्म धर्म-शर्म-द त्यासचि संपादितो भला देहें ॥ ६६ ॥
खल न खलत्व त्यागी जरि सामें गौरवूनि बोळविला ॥
लकुच-कटुचि अमृत-करा-करवींही शर्करेंत घोळविला ॥६७ ॥
हर-दर्शनार्थ गंगा-द्वारीं तपतां तया कृपा-पैर तो ॥
भेटोनि म्हणे घे वर कष्टापासोनि मति नृपा परतो ॥ ६८ ॥
युद्धांत पंच-पांडव-परिभव हो मत्करें असेंच वदे ॥
प्रभु-कर्णीं तें बहु कटु वच जाणो गर मुखीं रसें चव दे ॥ ६९ ॥
शंभु म्हणे नारायण-सख नर अर्जुन पुराण ऋषि, तातें ॥
धनसें पाशुपतहि म्यां त्यासि दिलें जेंवि अमृत तृषितातें ॥ ७० ॥
मजपासीं तुज द्याया तद्भंगावह असा नसेच वर ॥
हो मशक-मक्षिका-हर गरुडा नाशी असें नसे चवर ॥ ७१ ॥
यश एकदांचि अर्जुन-रहितहि चवघां रणांत भंगुनि घे ॥
मेरु असो, बहु हें ही जरि लंघुनि कुळ-गिरींशि पंगु निघे ॥७२॥
झाला गुप्त महेश्वर तो बालिश मनुज-देव वेदां त्या ॥

---

१ (अशा कर्मानें आपणापासून जाणाऱ्या) सुयशास वाहें (बोलाव) म्ह० रास. २ साधूनीं स्तुत्य. ३ पुण्यकारक व सुखकारक. ४ दयाशील शिव. ५ हें जयद्रथा. ६ या नांवाचें अस्त्र. ७ अर्जुनाचा पराजय करण्यासारखा. ८ हें चवराचें विशेषण. ९ कुलपर्वतास–हे सात आहेत त्यांचीं नांवें–महेंद्र, मलय, सह्य, शुक्तिमान्, ऋक्ष (गंधमादन), विंध्य, आणि पारिपुत्र (पारियात्र). येथें याचा अर्थ (मेरूच्या संबंधानें) लहानसा डोंगर असा इष्ट दिसतो. १० ज्ञानस्वरूप.

प्रभुसहि विटवी मागुनि जें तेशाही न देववें दात्या ॥ ७३ ॥
मागावा कामाद्यरि-परिभव-वर वर-द-नायका परि तो ॥
सत्परिभव-वर मागे, खळ न पराहित निजाहितहि करितो ॥७४ ॥
स्व-गृहा जाय जयद्रथ विसरुनिया दुःख तें परिभवाचें ॥
दासासमंजसत्वें क्षोभे मन शांतही परि भवाचें ॥ ७५ ॥

---

## विराट-पर्वांतील उत्तर-गोग्रहण.

पांडव अज्ञातवास करण्याकरितां विराटनगरीं राहिले होते. तेव्हां विराटाचा सेनापति कीचक ह्यानें द्रौपदीविषयीं दुर्वासना दर्शविल्यामुळें भीमानें त्यास ठार मारिलें. हें ऐकून विराटापासून फार त्रास पावलेला त्रिगर्तदेशाचा राजा सुशर्मा ह्यानें दुर्योधनास सुचविलें,कीं हीसंधी विराट-नगरावर स्वारी करण्यास बरी आहे. तो विचार दुर्योधनास पटून त्यानें त्या नगराच्या दक्षिणेच्या बाजूस सैन्यासह सुशर्म्यास पाठविलें आणि आपण स्वतः मोठें सैन्य घेऊन त्याच्या उत्तरेच्या बाजूस आला. ह्या प्रकरणांत उत्तरेकडील सैन्यानें विराटाच्या गाई हरण केल्या, हा प्रकार वर्णिला आहे ह्यासाठीं ह्यास उत्तरगोग्रहण म्हणतात.

मत्स्य-पुरोत्तर-भागीं प्रातःकाळींच ये सु-योधन हो ॥
ज्यासि जय-प्राप्ति मनीं म्हणती भीष्मादिही सु-योध न हो ॥१॥
सहसा व्रजांत गांठुनि बहु ताडुनि करुनि बद्ध-भुज गवळी ॥
षष्टि सहस्र सु-गोधन तो कुरु-कुळ-चंदन-द्रु-भुजग वळी ॥ २ ॥
गोपाध्यक्ष रथावरि बैसुनि धांवे नृपासि सांगाया ॥
चित्तीं म्हणे बुडाया कुरुवंधमा हरिसि धेनु कां गा या ॥ ३ ॥
तो राज-गृहीं जाउनि रायाच्या उत्तराख्य तनयातें ॥
नमुनि म्हणे हो नेतो दुर्योधन धेनु करुनि अ-नयातें ॥ ४ ॥
कवची खड्गी धन्वी व्हा, चित्तीं रामचंद्रहि असा ध्या ॥

---

१जयद्रथाच्या मूर्खपणामुळें. २ मत्स्यदेशाच्या राजधानीच्या उत्तरेच्या बाजूस. ३ ज्यासि (दुर्योधनास) जयप्राप्ति (अर्जुनाची गांठ किंवा जय मिळणें) न हो (असें) भीष्मादि सुयोधही मनीं म्हणती, असा अन्वय. ४ कौरवांचें कुळ हाच चंदनवृक्ष ह्याजवरचा सर्पच; (दुर्योधन). ५ कुरुकुलांतील नीचा. ६ कवची, खड्गी व धन्वी असा.

बैसा रथा, जय-श्री गो-विप्रावनें-परासि न अ-साध्या ॥ ५ ॥
उत्तर म्हणे असें जरि मी एकाकी लहान परि सवतें ॥
यश जोडितोंचि असता सारथि तरि कथन मज न परिसवतें ॥६॥
कर्णादिकांसि देता समरीं वैराटि-केसरी करिता ॥
जिष्णुपुढें अ-सुर-जनीं कोणी वैरा टिके सरी करिता ॥ ७ ॥
मिळवा कोण्ही तरि हो धैर्याचा मात्र उदधि सारथि जो ॥
कुरु-भट-समूह पाहुनि मज जेविं हिमासि सु-दधि-सार थिजो ॥८॥
ऐसे बहुतचि बोले तो बालिश बोल बायकांमाजी ॥
चित्र-पट-कटकसें शिशु-भाषण येईल काय कामा जी ॥ ९ ॥
तें परिसुनि एकांतीं पार्थ म्हणे देवि कृष्ण-सखि जावें ॥
उत्तर-सारथि होउनि म्यां, त्वां मजवरि कदापि न खिजावें॥१०॥
कृष्णा म्हणे बहु बरें व्हा मारुत हो पलाल खळ-बळ तें ॥
मद्धृदय न अरि-सैन्यें तुमच्या दैन्येंचि फार खळबळतें ॥११॥
त्या उत्तरासि सांगे सारथ्य बृहन्नडा करिल यातें ॥
सूत करुनि विजयानें नेले बहु खांडवीं अरि लयातें ॥ १२ ॥
सारथ्य-गीत-नृत्य-प्राप्तीचा हेतु जिष्णु-सहवास ॥
पूर्णत्वाचा लागे पशु-पां भ्रमतांहि विष्णुसह वास ॥ १३ ॥
भगिनी-मुखेंचि विनवा तन्मतिला उत्तराचि वळवील ॥
अतिसहवासि वच मना कतक कलुषिता वना निवळवील ॥१४ ॥
उत्तर म्हणे कुरु-कटक न पशूंस यशासहि स्वसे नेतें ॥
अवकाश पळहि नाहीं कळवाया वृत्त हें स्व-सेनेतें ॥ १५ ॥
माझें सारथ्य करू तुझिया वचनें बृहन्नडा, गमला ॥
हाचि सदुपाय वत्से लागो अपकीर्तिचा न डाग मला ॥ १६ ॥
ती धांवत जाय म्हणे गानादिक हें बृहन्नडे राहो ॥
समयीं सारथ्य-गुणा नुघडुनि कदर्युचा न डेरा हो ॥ १७ ॥

---

१ गाई आणि ब्राह्मण ह्यांचे रक्षणीं जो तत्पर त्यास. २ देणारा झाला असता. ३ विराटपुत्र हाच सिंह. ४ हत्तीपणा. ५ इंद्रापुढें. ६ तूप. ७ चित्रपटावरील सैन्याप्रमाणें. ८ कृष्णाच्या सहवासानें गोपाळांस ( अज्ञान गुराख्यांस) परमेश्वर जो कृष्ण त्याचे सर्व गुण प्राप्त झाले. ९ निवळीचें बीं. १० गढूळ पाण्यास. ११ "कृपणानें डेन्यांत पुरून ठेविलेलें द्रव्य कधींच कोणाच्या उपयोगीं न पडल्यामुळें व्यर्थ होय; तसा तुझा सारथ्यगुण समयीं प्रकट न होईल तर व्यर्थ होय." असें तात्पर्य.

उठल्या उत्साहाच्या त्या शांत श्रीमदुदधिवरि लहरी ॥
धरितां हनु न-नु म्हणतां मणताचें कां न सुदधि वरिल हरी ॥ १८ ॥
वाद्य असो नृत्य असो हो अभिनय किमंपि गीत अथवा हो ॥
जाणोनि कसें म्हणतां समरांत बृहन्नडाचि रथ वाहो ॥ १९ ॥
वैराटि म्हणे नर्तक हो कीं वादक तथैव गायन हो ॥
सारथि हो या समयीं एकहि वश कौरवासि गाय न हो ॥ २० ॥
ऐसें वदे कवच दे त्या श्रित-कुशलावहास त्यायाला ॥
तद्धारणीं चुके तो कन्या पाहूनि हांसल्या याला ॥ २१ ॥
स-त्वर बृहन्नडा नृप-सुत-रथ घेऊनि जाय बाहेर ॥
त्यासि म्हणे हेरावें म्हणसी कुरु-कटक काय बा हेर ॥ २२ ॥
कुरु-कटकासि पहातां तो उत्तर बाळ फार गडबडला ॥
स्व-पर-बळाबळ नेणुनि बालिश बहु बायकांत बडबडला ॥ २३॥
बोले बृहन्नडे हें कुरु-बळ कल्पांत-सिंधुसें गमतें ॥
ने रथ पुरांत, माझें मन नयन हि पाहतां बहु भ्रमतें ॥ २४ ॥
दुर्योधन दुःशासन कर्ण कृप द्रोण भीष्म ज्या कटकीं ॥
त्यांत मरेनचि शिरतां कांट्यावरि घालितां चिरे पटं कीं ॥ २५ ॥
पार्थ म्हणे राज-सुता आतां वदतोसि हें अहा काय ॥
शय्येवरि न पडाया योग्य रण-क्षितिवरीच हा काय ॥ २६ ॥
तेव्हां स्त्रियांत तैसें बोलुनि आतां असें कसें वदसी ॥
एकहि बाण न सुटला नाहीं अद्यापि झळकला सदसी ॥ २७ ॥
निज-वृत्ति-रसीं लोभी हो, साधो बुद्धि अन्यथा न करीं ॥
निज-हित-लोभें धरितो शिशुहि मुखीं एक अन्य थान करीं॥२८॥
मरतीच न दाखविती पाउलहि पळोनि तोंड लेंक वित्यां ॥

---

१ प्रेमळ भक्तानें आर्जवानें दिलेलें सुदधि ( उत्तम दहीं ) हरी नु ( नको न म्हणतां कां न स्वीकारील ! तसें युद्धप्रिय अर्जुनास दुर्योधनाबरोबर युद्ध करण्याची प्रार्थना कशी न रुचेल ! २ ( किं+अपि )=कोणतें ही; हें गीताचें विशेषण. ३ ( श्रित+कुशल+आवहास ) आश्रितांचें कल्याण करणाऱ्या ( अर्जुनाला ). ४ बा, कुरुकटक हेरावें म्हणसी काय ! हेर ( पहा ) असा अन्वय. ५ आपलें तसेंच शत्रुचें बळ व अबळ. ६ प्रलयकालच्या समुद्रासारखें. ७ वस्त्र. ८ क्षत्रियाच्या कर्मांची ( युद्धाची ) आवड धर. ९ वापाला.

म्हणती सद्यः कीर्ति-प्रज्ञा-प्र-स्पर्श तोंडलें कवि त्या ॥२९ ॥
ऐसें पार्थ वदे तों भिउनि कटक-बागुलासि पोर पळे ॥
शत्रु-प्र-ताप-दाव-ज्वालांनीं तो कुरंग होरपळे ॥ ३० ॥
वाटे पुढें पळे तो स्त्री-संगे-विरक्त-धी कुमार-मणी ॥
पुत्र-स्नेहें धांवे त्यामागें शंभुची उमा रमणी ॥ ३१ ॥
उत्तर म्हणे नको गे पायां पडतों बृहन्नडे सोड ॥
जोडूँ दिली, दुखवुं नको केवळ पितृ-कर-तळस्थ हा फोड॥ ३२॥
कुरवाळोनि म्हणे गा राज-सुता योग्य तूं न कांपाला ॥
मृदुलत्व म्लानत्व स्वीकारुनि जाहलासि कां पाला ॥ ३३ ॥
तुज उत्साह नसे तरि करितों घेउनि धनूस मी रण हो ॥
मज मेघासि कराया शर-वृष्टि सहाय तूं समीरण हो ॥ ३४ ॥
बैस रथीं तूं माझ्या सारथि हो तरणिचा जसा अरुण ॥
न्यावा चमूवरि तुवां रथ तरुणीमति जसा स्मरें तरुण ॥ ३५ ॥
आतां सोडवितों पशु खल-बल पल न लगतांचि पळवीतों ॥
मी विजय असें तुजचि न सकळां ही कौरवांसि कळवीतों ॥३६॥
धृत-रश्मि कुमार म्हणे दारुक कीं आज मातली लाजो ॥
दंड करावा या कुरु-सेनेला योग्य मातलीला जो ॥ ३७ ॥
काढूनि शंख-वलयें ल्याला पुं-भूषणें सितें वस्त्रें ॥
बांधूनि केश माथां प्राङ्मुख होऊनि आठवी अस्त्रें ॥ ३८ ॥
जातां कुरु-कटकावरि वाजविला दिव्य देवदत्त दर ॥
तो होय जना जैसा कल्पांतीं रुद्र-देव दत्त-दर ॥ ३९ ॥

---

१ कीर्तिरूप प्रज्ञा ( बुद्धि ) हिचा नाश करणारा आहे स्पर्श ज्याचा; हें तोंडल्याचें विशेषण. २ स्त्रीसंगाविषयीं विरक्त आहे बुद्धि ज्याची, हें कुमारमणी ह्याचें वि० ३ कुमारश्रेष्ठ कार्त्तिकस्वामी. ४ तुला हवी ती देणगी देतों. ह्यास आधार–महाभारत–विराटपर्व अ० ३८

शातकुंभस्य शुद्धस्य शतं निष्कान् ददामि ते ॥
मणीनष्टौ च वैदूर्यान् हेमबद्धान् महाप्रभान् ॥ ४३ ॥
हेमदंडप्रतिच्छन्नं रथं युक्तंच सुव्रतैः ॥
मत्तांश्च दश मातंगान् मुंच मां त्वं बृहन्नले ॥ ४४ ॥

५ बापाच्या करतळावर असणारा. ६ हा मी, ( करतळावरील फोडाप्रमाणें बाप मला जपतो ) हें तात्पर्य. ७ बाणांची वृष्टि पक्षीं, जलवृष्टि. ८ शंखाची केलेलीं. वलयें ( चुडे ). ९ पूर्वाभिमुख. ११ महादेव. ११ दिलें आहे भय ज्यानें असा.

भ्याला उत्तर त्यातें जिष्णु म्हणे पावलासि कांप दरें ॥
अद्यापि बांधलेंसे तुझिया मतिनें अ-धैर्य कां पदरें ॥ ४० ॥
हांसोनि म्हणे हरि-सख हो गाढासन[1] वि-कंप[2]-धी धीट ॥
न धरीं बा दरें[3] हा दरें[4] सादर दे वाजवूं पुन्हा नीट ॥ ४१ ॥
द्रोण म्हणे न दिसे जय कां करितां आननें नत पहा रे ॥
आला विजय जयाचें[6] श्री-शंभु-तपापुढें न तप हारे ॥ ४२ ॥
गांधारि[7] म्हणे गुरुजी पण न करुनि पूर्ण हा प्रकटला हो ॥
पुनरपि वन-वास करू गुरु-घातर्क-पातक[8] प्रकट लाहो ॥ ४३ ॥
कर्णाद्याप्रांसि म्हणे तुमचे विजयी असोत हात रणीं ॥
शर-पटलांच्छादित[9] हो अर्जुन-शस्त्र-प्रताप हा तरणी ॥ ४४ ॥
गुरुजींस काय पुसतां चापीं गुण सद्र्चेंचि चढवा हो ॥
यांला हेंचि म्हणावें कीं आम्हां धर्म-शास्त्र पढवा हो ॥ ४५ ॥
पढवावें मात्र इहीं भेदावें पर-त्द्दर्दब्ज[10] कटुक वचें ॥
कीं द्रूरुनि दिसावे प्रेक्षक-दृष्टीस युद्ध-पटु कवचें ॥ ४६ ॥
मार्थुनि पुढें करावे हे यज्ञीं [illegible] सु-[illegible]योजनावसरीं ॥
सिंधूंत तरेल कशी जी केली के[illegible]-हेतु[11] नाव सरीं ॥ ४७ ॥
खळ-कृत गुरु-निंदेतें[12] वर्णील [illegible]धीं न विस्तरें सु-कवी ॥
कीं तो[13] श्री-गुरु-भक्ति-प्रेमामर-पादपांकुरा सुकवी ॥ ४८ ॥
त्यासि कृप म्हणे कर्णा सु-ज्ञांहीं ऐकतांचि डोलावें ॥

---

१ दृढ आहे आसन ज्याचें असा ( हो )–बळकट बैस. २ निर्भय. ३ भय. ४ शंख. ५ मनापासून. ६ जयाचें तप श्रीशंभुतपापुढें न हारे असा अन्वय. ह्याची कथा अशी आहे कीं, पाशुपतास्त्र मिळावें म्हणून अर्जुन हिमालयावर शिव-प्रसादार्थ उग्र तप करीत असतां त्याच्या बलाची परीक्षा पाहाण्याकरितां शिवानें भिल्लाचें रूप घेतलें आणि एक रानडुकर उत्पन्न केला. तो रानडुकर अर्जुन तप करीत होता तेथून कांहीं अंतरावरून जातांना त्यावर दोघांनीं एकदम बाण सोडून त्याचा प्राण घेतला, तेव्हां तो मीं मारिला मीं मारिला असें म्हणून दोघे ही त्याविषयीं भांडूं लागले आणि हातघाईवर आले. त्या प्रसंगीं अर्जुनानें महान् पराक्रम करून शिवाला जेर केलें; तेणेंकरून शिव प्रसन्न होऊन त्यानें अर्जुनास पाशुपतास्त्र दिलें; ह्या कथेस लक्षून हें लिहिलें आहे. ७ दुर्योधन. ८ गुरुहत्या करणाराचें पातक. ९ बाणांच्या समुदायानें, पक्षीं, मेघांनीं झांकलेला. १० दुसऱ्याचें त्द्दयकमळ. ११ क्रीडा हाच आहे उद्देश जीचा अशी. १२ गुरुनिंदा. १३ श्रीगुरुभक्तीचें प्रेम हाच कल्पवृक्षाचा अंकुर, त्यास. * ४५, ४६, व ४७ ह्या आर्यांतील बोलणें कर्णाचें आहे.

ऐसेंचि बोलणें जरि तरि पुरुषानें दृष्टांत बोलावें ॥ ४९ ॥
तूं नीति-विरुद्ध वदसि साहस हें फळ न दे वचन-यज्ञ ॥
अद्भुत कर्म करूनिहि बा न वदति एकही वच नय-ज्ञ ॥ ५० ॥
घालूं पाहसि दंष्ट्रा उपडाया अहि-मुखांत आंगोळी ॥
ऐसें साहस करितां होइल तनची क्षणांत रांगोळी ॥ ५१ ॥
कंठीं बांधूनि शिळा बाहु-बळें सागराशि तरशील ॥
परि साहसें न विजया हें शील नसो, असो इतर शील ॥ ५२ ॥
सर्वांहि मिळोनि भांडूं कर्णा व्हावें न साहसा मान्य ॥
यत्नें नृप-यश रक्षूं आजि नव्हे श्वेत-वाह सामान्य ॥ ५३ ॥
द्रौणि म्हणे एकाकी तूंचि क्षम जिष्णु-वारणा सूत ॥
बहुधा बद्ध करीलचि लूतेचें जिष्णु-वारणा सूत ॥ ५४ ॥
करिसि वि-कथ्थन जिंकुनि नेलें नसतां हि गोधन शिवेतें ॥
सत्प्रिय शुचि यश कर्णा भलत्या न करूनि शोध न शिवे तें ॥५५॥
पावोनि सर्व महितें वि-गुणांहि गुरूसि जे कुल-ज नर ते ॥
सत्कारिति, अलि कमलीं तेविं गुरु-पदीं महा-कुलें-जन रते॥५६॥
राधेयां उद्धत तूं हा दुर्योधन हि फार उद्धत रे ॥
गुरु-निंदक हो स्पष्ट व्यसनांत बुडे अ-शुद्ध, शुद्ध तरे ॥ ५७ ॥
सिंहासीं द्वेष करुनि कोण बळी वारणांत उरणारे ॥
कां भ्रमलासि कसा त्वां जय पावावा रणांत उरणा रे ॥ ५८ ॥
दुर्योधन नमुनि म्हणे गुरुजी मज अरि-करीं न सोपावें ॥
तेजो-जननार्थ असें वदलों, त्वन्मत्सरीं नसो, पावें ॥ [illegible] ॥
हांसोनि द्रोण म्हणे आम्हां कोपो न देचि वत्सलता ॥
नसतें क्षमा-कवच तरि त्वद्‌यीं त्वच्छब्द अशनिवत् सलता ॥६० ॥
भीष्मासि मग म्हणे नृप पुसतों अ-ज्ञात-वास-पण पुरला ॥
कीं कांहीं मास तरी पक्ष तरी दिन तरी असे उरला ॥ ६१ ॥

---

१ शुष्क तोंडचा यज्ञ. २ हा साहसाचा स्वभाव. ३ अर्जुनाचा पराभव करण्यास. ४ सारथी कर्ण; हा सारथ्याच्या राधानांवाच्या बायकोस लहानपणीं सापडला व तिनें त्यास वाढविलें म्हणून त्याचीं सूत, सूतपुत्र, राधेय अशीं नांवें आहेत. ५ ऐरावताला. ६ मोठ्या कुलांत झालेला जन. ७ राधापुत्रा कर्णा. ८ हे मेंढ्या. ९ ईर्षा उत्पन्न व्हावी म्हणून. १० क्षमारूप चिलखत.

भीष्म म्हणे गांधारे[1] पांडव पंडित खरे न दभ्रे[2]-मती ॥
न भ्रमले जे प्राकृत तेचि मनीं धरुनिया मद भ्रमती ॥ ६२ ॥
कामी कोपी लोभी जे संसारांत पावति भ्रम ते ॥
प्राकृत पंडित पांडव असते तरि हे हि केविं न भ्रमते ॥ ६३ ॥
शास्त्र[3]-मतें मास-द्वय पांचां वर्षांत अधिक लेखावें ॥
अ-ज्ञात-वास यास्तव सरलाचि असेंचि तत्व देखावें ॥ ६४ ॥
तेरा वर्षांत अधिक दश पक्ष द्वादश क्षपा पडती ॥
चांद्र-शरन्मानें[4] हे संख्या संख्यावदादृता[5] घडती ॥ ६५ ॥
एवंच[6] चांद्र-मानें तेरा ही स्पष्ट सारिले अब्द ॥
सत्य-प्रतिज्ञ पांडव लागीं देतिल न आपणा शब्द ॥ ६६ ॥
येतां अ-न्याय-लवें अल्पायासेंहि इंद्र-पद पदरा ॥
हूं[7] न म्हणतील काळापासुनिही पावतील हे न दरा ॥ ६७ ॥
युद्धें करूनि पाक्षिक जय, त्यांतहि विजय पातला समरा ॥
सम[8] रामाशीं व्हा, हो शम राज्य-समर्पणें, हटें न मरा ॥ ६८ ॥
कुर्वधम म्हणे युद्धचि हो, सख्य न हो पितामहा यासीं ॥
शक्रहि बुडेल यातें मद्धृतें पद ओपितां महायासीं ॥ ६९ ॥
पार्थ म्हणे वैराटे रथ कुरु-कटकासमीप राहूं दे ॥
गोधन हरावयास्तव भट आले कोण कोण पाहूं दे ॥ ७० ॥
तो गुरु[10], तो गुरु-नंदन, तो कृप, तो कर्ण, तो पितामह, रे ॥
यांहीं धेनु वळाव्या शिव शिव गोपाळ राम कृष्ण हरे ॥ ७१ ॥
रे उ[illegible]रा शकुनिचा या व्यूहांत न दिसे मला भाचा[11] ॥

---

१ दुर्योधना. २ अल्पबुद्धीचे. ३ शास्त्रमानानें. ४ चांद्रवर्षाच्या मानानें—चांद्रमानानें वर्षाचे दिवस सुमारें ३५४ व सौरमानानें सुमारें ३६५ $\frac{1}{4}$ असतात. चांद्रमानाचा सौरमानाशीं मेळ घालण्यासाठीं चांद्रमानाच्या पांच वर्षांत सुमारें २ महिने अधिक धरितात. ह्या मानानें १३ वर्षांत चांद्रमानाचे ५ महिनें व १२ दिवस जास्त धरिले जातात. ५ ( संख्यावत्+आदृता) ज्योतिःशास्त्र जाणणाऱ्या पंडितांस मान्य. ६ ह्याप्रमाणें पाहिलें असतां. ७ हें स्वीकारार्थक अव्यय. ८ रामचंद्र जसा नीतीस्तव राज्यत्याग करून वनवासास गेला, तसे तुम्ही न्यायास अनुसरून पांडवांस राज्य द्या; असा भाव. ९ मद्धृत पद ( मी घेतलेलें राज्य ) यातें ( अर्जुनानें ) ओपितां शक्रहि महायासीं ( मोठ्या संकटांत ) बुडेल—असा अन्वय. १० कौरव पांडवांचा गुरु, द्रोणाचार्य. ११ शकुनीचा भाचा—दुर्योधन.

त्यावांचुनि यांसीं जो करणें संग्राम तो न लाभाचा ॥ ७२ ॥
हें कटक सोड तिकडे चाल तुझ्या हरुनि गोधना खळ तो ॥
प्राण-त्राणें-परायण जिकडे निरपत्रपाग्रणी पळतो ॥ ७३ ॥
उत्तर निज तुरगांतें द्याया अरुणासि कौतुक पिटाळी ॥
तों गर्जोनि कुरु-कटक-कर्णीं बसवी ध्वजें-स्थ कपि टाळी ॥७४॥
कोठें जाल उभे रे मत्स्येश्वर-धेनु-पश्यतो-हर हो ॥
सोडा गोधन नाहीं तरि वधिन तुम्हांसि वश्य तो हर ही ॥ ७५ ॥
खल-बल-जलधि-नि-मग्ना धेनु उसळल्या अलाबु जाल्या हो ॥
हांसुनि विजय मनिं म्हणे कां गोप-सख्या मला बुजाल्या हो॥७६॥
गेल्या पळोनि गाई पृष्ठावरि पुच्छ-भीर वाहोनी ॥
राहूनि निश्चल क्षण विजय निवे त्यांकडेंचि पाहोनी ॥ ७७ ॥
येतांचि वि-क्रम-लवें श्री-हरिचा दयित दास वीर गडी ॥
हरि करि-घटेसि जैसा त्या कुरु-सेनेसि वासवी रगडी ॥ ७८ ॥
तत्काळ उत्तरें तो नेला कर्णाकडेचि रथ, वातें ॥
घन गिरिकडे, सु-वैद्यें स्वौषध रुग्णाकडेचि अथवा तें ॥ ७९ ॥
दव जेविं तृणावरणा वृष भस्म करी महा शरावरणा ॥
पार्थ म्हणे करितो गिरिशं-कमंडलुशीं पहा शराव रणा ॥ ८० ॥
होते यदंश-शेषं-श्वास-ज्वलनांत हे समिद् धरणी ॥

१ प्राण रक्षण्याविषयीं तत्पर. २ ( निर्+अपत्रपा+अग्रणी ) निर्लज्जांमध्यें श्रेष्ठ. ( दुर्योधन ). ३ सूर्याचा सारथी अरुण हा सूर्याच्या घोड्यांना जो वेग देतो, त्यापेक्षांही उत्तर आपल्या घोड्यांस ज्यास्त वेग देता झाला, असा भाव. ४ एका समयीं अर्जुन व मारुति ह्यांचा एकमेकाच्या बळाविषयीं कांहीं पण पडला असतां अर्जुनास कृष्णाचें साहाय्य असल्यामुळें त्यांत मारुति हरला; तेव्हां कृष्णमतें असा नियम ठरला कीं, "मारुतीनें प्रत्येक युद्धप्रसंगीं अर्जुनाच्या ध्वजावर बसून आपल्या गर्जनेनें शत्रूंस भयभीत करावें." ह्यावरूनच अर्जुनास कपिध्वज हें नांव पडलें आहे. ५ विराटराजाच्या गायी पाहतां पाहतां नेणारे. ६ गवळ्याच्या ( कृष्णाच्या ) मित्रास. जो गोपसख त्यास गायींनीं बुजूं नये हें तात्पर्य. ७ गवताच्या आच्छादनास. ८ महादेवाच्या कमंडलूबरोबर. ९ ज्या कृष्णाचा अंश जो शेष त्याच्या श्वासाच्या अग्नीमध्यें. प्रळय-काळीं प्रखर सूर्यकिरणांनीं पृथ्वी तापून ती आग शेषाच्या मस्तकास पोचली असतां तो फूत्कार करितो, व त्या योगानें सर्व पृथ्वी जळून जाते; अशी कथा आहे.

त्याचा सखा धनंजय होय खल-शलभ-लया समिद्ध रणीं ॥ ८१ ॥
मग गगन-ग-नग-भिन्मुख-सुर-मत-गुरुसींहि अ-नवं मुनि नर तो॥
कलह करी कीं इतरीं गुरु-कलहीं यासि जन वमुनि न रतो॥८२॥
गुरुला विविध शरांची वाहे तो राग-राशि लाखोली ॥
भेटे अस्त्र-तति तया जशि पाहे सागरा शिला खोली ॥ ८३ ॥
करिती सूर्यास्तोदय एक मुहूर्तांत एक शतदा ते ॥
त्यांत न एकासमही होती मेघा असेहि शत दाते ॥ ८४ ॥
द्रोणार्जुन तुल्य-क्रिय बिंब-प्रतिबिंबसेचि ते गमती ॥
किति कुरु-कटकें प्रेक्षक वृत्र-घ्नाचींहि लोचनें भ्रमती ॥ ८५ ॥
अश्वत्थामा धांवे रक्षाया संकटांत जनकास ॥
जन कासया विते सुत कँसिते न करावया भजन कास ॥ ८६ ॥
सार्वर्तिक मेघांच्या लाजाव्या द्रौणि-सायकां धारा ॥
सत्ताताहुनि होइल सुत म्हणवायासि हाय कां धारा ॥ ८७ ॥

---

१ फाद पेटलेला. २ गगनांत गमन करणारे आणि नगभित् ( पर्वताचा भेद करणारा ) म्हणजे इंद्र तो आहे प्रमुख ज्यांत असे जे सुर म्ह० देव त्यांना मान्य जो गुरु ( द्रोण ) त्याबरोबर. ३ पुराणऋषि. अर्जुन हा नरनारायणांपैकीं नराचा अवतार होय. उत्तरार्ध—यासि (क्षत्रियधर्मास अनुसरून मात्र केलेल्या कलहास) वमुनि ( खेरीज करून ) इतरीं गुरुकलहीं ( गुरूशीं दुसऱ्या कोणत्याही प्रकारच्या कलहांत ) जन न रतो; असा अन्वय. ४ उत्तरार्धाचा अर्थ—शिळा महासागरांत ही टाकली असतां जशी ती त्याच्या थेट तळाशी जाते, तसे नानाविध अस्त्रांचा प्रयोग करून जे बाण अर्जुनानें महापराक्रमी द्रोणावर सोडिले ते सर्व त्याच्या शरीरांत भेदून गेले—असा भाव. ५ एकानें आपल्या बाणांच्या वृष्टीनें सूर्य झाकून टाकावा, व दुसऱ्यानें त्या बाणांचा छेद करून पुनः सूर्याचा उदय करावा, असे ते एक एक ( प्रत्येक ) मुहूर्तांत शेंकडों वेळां करीत होते; हा भाव. ६ कोणतें ही प्रतिबिंब ( प्रतिच्छाया ) ज्या पदार्थाचें असतें, त्या पदार्थास ( त्याप्रतिबिंबाचें ) बिंब म्हणतात. पदार्थ आणि त्याचें प्रतिबिंब हीं जशीं सर्वांशीं सारखीं असतात, तसे द्रोण व अर्जुन पराक्रमानें अगदीं सारखे भासले. ७ सुत भजन ( सेवा ) करावया ( जर ) कास न कसिते, ( तर ) जन ( त्यांस ) कासया बिते! असा अन्वय. ८ प्रलयकालसंबंधी. ९ अश्वत्थाम्याच्या बाणांस. उत्तरार्ध—हाय म्हणवावयास ( अरे रे हा कुपुत्र निघाला म्हणून दुःखाचे उद्गार काढविण्यास ) सुत सत्ताताहुनि ( पराक्रमी बापापेक्षां ) धारा ( कमी योग्यतेचा ) कां होईल! असा अन्वय. तात्पर्य, अश्वत्थामा द्रोणापेक्षां पराक्रमानें कमी नव्हता.

बहु कल्पना सु-कविसा विजयहि बहु शर-पंरपरा[1] ल्याला ॥
भंगूं पाहे समरीं गुरु-पुत्रासहि जसें पराल्याला ॥ ८८ ॥
प्रतिरव-मिषें[2] शरांनीं भरतां कुंथावयासि नभ लागे ॥
देवी म्हणति सख्यांनो दारुण हा क्षात्र-धर्म न भला गे ॥ ८९ ॥
झाले भाते समरीं आणाया गुरु-सुतीं उणीव रिते ॥
देती सामग्री जय तरि कां सद्रीतिला गुणी वरिते ॥ ९० ॥
भंगे अश्वत्थामा अश्वत्था.मा क्वचित्[3] सदा हरिला ॥
तसि इतरासि जय-श्री नित्य हरि-जनासि तो तिणें वरिला ॥९१॥
सुर-पुष्प[4]-वृष्टिला न स्पर्शों[5] देती तयां तदिषु-वृष्टी[6] ॥
कीं मधुप-चुंबितां[7] त्या पतितां[8] त्यांच्या पडों[9] नेये दृष्टी ॥ ९२ ॥
हरुनि यशो-धन गोधन योध न गणितां क्षयासि नेऊन ॥
त्या नृप-पुत्रास म्हणे चाल पुरा हें मनींच ठेऊन ॥ ९३ ॥
झांकी[10] वपुला क्षतजें, बसतां मर्मी अरीषु, न्हाल्याला ॥
झाला सारथि पहिल्या योषा-वेषासि[11] तो पुन्हा ल्याला ॥ ९४ ॥
विजयी विराट इकडे ये पूजिति पौर विप्र-जन यातें ॥
येतांचि सभेंत पुसे प्रेमें त्या उत्तरा स्व-तनयातें ॥ ९५ ॥
जन कथिति धेनु कुरुनीं वळिल्या येऊनि उत्तरोंशेला[12] ॥
त्वत्कीर्तिनें[13] पसरिला स्व-परित्राणार्थ उत्तरा शेला ॥ ९६ ॥
गेला कुरु जिंकाया आहे सारथि बृहन्नडा, गमला ॥
सत्य कुमारचि[14], वदला लागो अपकीर्तिचा न डाग मला ॥ ९७ ॥
भूप म्हणे कुरु होतिल वारे, करितील आजि अभ्र मुला[15] ॥
दुःख सुदेष्णेला[16] जें शिरतां सिंहांत कलभ अंभ्रमुला ॥ ९८ ॥

---

१ बाणांच्या पंक्ति. २ प्रतिध्वनीच्या मिषानें. ३ फक्त शनिवारींच अश्वत्थ (पिंपळ ह्यापासीं लक्ष्मीचा बास असतो, अशी प्रसिद्धि आहे. ४ देवांच्या पुष्पवृष्टीस. ५ अर्जुनाला. ६ अर्जुनाच्या बाणवृष्टि. ७ भ्रमरांनीं चुंबिलेल्या. पक्षीं, मद्यपीलोकांनीं चुंबिलेल्या, ८ पडलेल्या, पक्षीं, भ्रष्ट. ९ह्याचा कर्ता अर्जुन (अध्याहृत). १०वर्मी बाण लागून रक्तानें भिजलेल्या शरीरास झांकी. ११स्त्रीवेषास. १२ उत्तरदिशेला. १३त्वत्कीर्तिनें स्वपरित्राणार्थ उत्तरा शेला पसरिला, हा अन्वय; तुझ्या कीर्तीनें उत्तरापुढें पदर पसरून, माझें रक्षण कर अशी बिनंती केली. तुझी कीर्ति राखण्याकरितां तो युद्धास गेला; हें तात्पर्य. १४ सत्य कुमारचि गमलाः—म्हणजे खरोखर कार्तिकस्वामीच बाटला. १५ मुलाला (उत्तराला). १६ सुदेष्णा ही बिराटाची बायको, तिला.

देवा[1] कुमार आला सोडविल्या धेनु पळविलीं कटकें ॥
न वय[2] प्रमाण तेजस्वि-जनीं म्हणती कवी न तें लटकें ॥ ९९ ॥
धर्म म्हणे आयकिलें दूताचें वचन चांगलें कानें ॥
राया सुख-रोमांचित केलें कीं आजि आंग लेकानें ॥ १०० ॥
सारथि बृहन्नडा ज्या तद्विजयें करुत बायका नवला ॥
चिंता[3]-मणि-गळबालक जो दुर्भल त्यासि काय कानवला॥१०१॥
गाजत वाजत साजत आज तया जतन करुनि आणा हो ॥
मजमागें मत्स्यांचा हा रिपु[4]-शशि-राहु-बाहु राणा हो ॥ १०२ ॥

---

## उद्योग-पर्वांतील कृष्ण-शिष्टाई.

पांडवांचा अज्ञातवास संपल्यानंतर त्यांनीं आपला राज्याचा हिस्सा आपणास मिळावा, व दुर्योधनाशीं सल्ला व्हावा म्हणून कृष्णास शिष्ट ( वकील ) करून हस्तिनापुरास पाठविलें, हें ह्या आख्यानांत आहे.

धर्म म्हणे श्रीकृष्णा बुडतों मी सत्य जाण तार मला ॥
भव बुडवी म्हणुनिच तव भजनीं सनकादि जाणता रमला॥ १ ॥
जेणें न बुडे कुरु-कुळ धर्म, यश, न्याय, त्याचि सदुपाया ॥
सांग,सख्या भ्रमला हा जन, केवळ आ[5]म तूंचि यदुपा या ॥२॥
श्रीकृष्ण म्हणे देवा[6] जातों मी त्याकडे हित वदाया ॥
काय सु-योधन न शके पचवाया वृत्रहाहि तव दाया ॥३ ॥
धर्म म्हणे हितहि तया अहित, अहि तसाचि तो परम खळ गा ॥
व्यसनीं भल्यासि पाडी दुष्ट गजा जेविं पिहित[7]-मुख खळगा ॥४॥
शौरि म्हणे राजेंद्रा यद्यपि बलवान् तथापि शुनकानें ॥
हरिचें काय करावें परिसो तो[8] हित-कथा पिशुन कानें ॥ ५ ॥

---

१ हे राजा. २ अंगांत मोठा पराक्रम असण्यास वय मोठें असावें लागत नाहीं; हें तात्पर्य. ३ चिंतामणि (इच्छिलेलें देणारें रत्न) ज्याच्या गळ्यांत आहे असा बाळक. ४ शत्रु हाच चंद्र त्याला राहूसारिखा (ग्रासणारा) आहे बाहु ज्याचा; हें 'राणा' ह्याचें विशेषण. ५ या ( ह्या धर्मास ) यदुपा (हे कृष्णा) तूंचि-आप्त-हित व खरें सांगणारा ( आहेस ). ६ हे धर्मराजा. ७ गवतानें वगैरे झाकलें आहे तोंड ज्याचें असा. ८ तो खल दुर्योधन.

जिंकिल काय हरा तो जिंकी कुतुकेंचि मन्मथ नरा जो
करिल हरि-मथन शश तरि करिल सुयोधनहि मन्मथन राजा ॥६॥
योजीन युक्ति सामीं सांदीपनिच्या तुझ्या बहु नव्या ही ॥
प्राणापरोस बहु मज जेविं तुम्ही तेविं तो बहु न व्याही[2] ॥ ७ ॥
माय करी बाळाचें नित्य श्रमवूनि काय जेविं हित ॥
तेविं करितसे मन्मति होय निज-दयेसि काय जें विहित ॥ ८ ॥
देइल अंश सुयोधन तरि आम्हा पावला सदाशिव हो ॥
म्हणतोसि तूंहि मोही कीं प्रज्ञा-चक्षुचें[3] सदा शिव हो ॥ ९ ॥
श्री-राम जसा प्रेषी शिकवुनि सामोक्ति[4], अंगदा साच्या ॥
धर्म तसा प्रभुला, जो कार्यों देणार अंग दासाच्या ॥ १० ॥
भीम म्हणे केशवजी मृदु बोला उग्र तो सुयोधन हो ॥
बा त्यासीं सख्यचि हो युद्धीं हत एकही सुयोध न हो ॥ ११ ॥
इतर असो लाजेलचि त्या नित्य मदांध सुर-गज गदीशा[5] ॥
दुर्योधना गुरु असें म्हणतिल गरलांध उरग जगदीशा ॥ १२ ॥
श्री-कृष्ण म्हणे हा रे भीमा जरि तूं महा-भुज गदीनें[6] ॥
भ्यालासि, होय जैसा चिंतुनि गरुडा महाभुजग दीन १३ ॥
आम्हा तुझा भरंवसा बहु कीं खळ मर्दिशील तूं अगदीं ॥
निर्वीर्यत्वें[7] चिकित्सा-समयीं[8] आलें चिरार्जितीं[9] अगदीं ॥ १४ ॥
भीम म्हणे हा द्याया सुत-शोक पित्र्यांसि[10] यादवा[11] लाजे ॥
भस्मचि होतील सकळ ते सांपडतील या दवाला[12] जे ॥ १५ ॥
अर्जुन म्हणे सख्या जें कीर्ति-कर असेल तेंचि कर जा गा ॥
सांगावें काय, तुझा प्रणत-त्राणीं असेचि कर जागा ॥ १६ ॥
कृष्णाहि म्हणे कृष्णा म्हणसि जिला प्रिय-सखी पहा हे ती ॥
विसरो तुझी न समयीं ईस श्रित-भव्यदा[13] महा-हेति ॥ १७ ॥

---

१ ज्याला. २ दुर्योधनाची मुलगी लक्ष्मणा ही कृष्णाचा मुलगा सांब ह्यास दिली होती, म्हणून तो व्याही. ३ प्रज्ञा (बुद्धिच) आहे चक्षु ज्यास म्ह० अंध त्याचें-धृतराष्ट्राचें. ४ सामाविषयीं भाषणें. ५ गदा धारण करणाऱ्यांत श्रेष्ट अशा (दुर्योधनास). ६ गदी+इन—गदा धरणाऱ्यांत श्रेष्ठ. ७ निःसारपणा. ८ रोग दूर करण्याचे वेळीं. ९ पुष्कळ दिवस संपादन करून ठेविलेल्या औषधांत. १० कौरवांचा बाप (धृतराष्ट्र) त्यास. ११ हे कृष्णा. १२ हा (मीच जो) वणवा त्याला. १३ आश्रितांचें कल्याण करणारी. किंवा कृष्णाचें संबोधन.

बहु गहिंवरोनि दावुनि दुःशासन-पाणि-कृष्ट-केश वदे ॥
बहु दीर्घ उष्ण सोडुनि सुसकारा तीस अभय केशव दे ॥ १८ ॥
श्रीमद्युधिष्ठिराच्या दूतत्वा परम लाभ मानुनि घे ॥
दुर्योधन-प्रमुख-खळ-खद्योत-तदन्य-पद्म-भानु निघे ॥ १९ ॥
धर्म म्हणे शीघ्र सुखें ये जोडुनि सिद्धि कीर्ति-सह देवा ॥
मातेसि नमुनि वद कीं आहे आरोग्य साधु-सहदेवा ॥ २० ॥
तूं जेविं देवकीला भेटसि तैसाच भेट आतेला ॥
आम्हाहुनि तूंचि अधिक घृत सोडुनि कोण करिल आ तेला॥२१॥
कृष्णा कळेल तैसें वद कुंतीला न दुःख बाधावें ॥
पंकीं धेनु प्रमती पुण्य-श्लोका मुरारि बा धावें ॥ २२ ॥
धृतराष्ट्र भीष्म बाल्हिक विदुर कृप द्रोण सर्व शुचि तज्ज्ञ ॥
जे त्यांसि भेट, वद हित, सांगो तुज काय, तूंचि उचित-ज्ञ॥२३॥
म्यां पुसिलें कुशल असें कर्णासि सुयोधनासि सांगावें ॥
येतां पंचम दाटुनि कर्ण-कटु पिकें शिकोनि कां गावें ॥ २४ ॥
ऐसें अजात-रिपु नृप सूचित सुचवूनि शौरिला परते ॥
मग विजय म्हणे देवा येऊं द्यावे न मजपुढें पर ते ॥ २५ ॥
प्रभु पांडवांसि फिरवुनि जातां पाहे पथांत नाकर्षी ॥
राजर्षि ब्रह्मर्षि स्व-यश जयांच्या मनासि आकर्षी ॥ २६ ॥
इच्छा पुसतां वदले बा तुजसम अन्य बोलका नाहीं ॥
ऐशूं धृतराष्ट्र-सभेमाजि तुझे धन्य बोल कानांहीं ॥ २७ ॥
दे या अयास याया आज्ञा स-दया महोदया परिसा ॥
यापरि साधु-मनोरथ जाणोनि म्हणे मुकुंद या परिसा ॥ २८ ॥

---

१ दुःशासनानें हातानें ओढलेले केस. २ दुर्योधन आदिकरून जे दुष्ट हेच काजवे त्यांस 'ब त्या दुष्टांहून इतर म्ह० (सुजन) तीच पद्मे त्यांस सूर्यासारखा. दुष्टांचें दमन करणारा व साधूंस संतोष देणारा असा कृष्ण. ३ बाळा सहदेवाला. सहदेव सर्वांत लहान असल्यामुळें असें म्हटलें आहे. ४ कुंतीला. ५ कुंती हीच गाय. ६ हा शंतनु-राजाचा भाऊ व भीष्माचा चुलता. ७ ज्ञाते. ८ कोकिळास पंचमस्वर (गोड येत असतां) त्यानें शिकून (दाटून) कर्णकटु कां गायें?–धर्मराजा अगदीं सरळ स्वभावाचा व अजातशत्रु होता म्हणून त्यानें कर्णदुर्योधनांस (ते दुष्ट असतां ही) कुशल विचारिलें हें तात्पर्य. ९ हे सदया, महोदया, (भक्तांचा मोठा उत्कर्ष करणाऱ्या) परिसा, या अयास (हे आम्ही जे लोखंड ह्यांस) याया (येण्याला) आज्ञा दे. *(सु+उचित) योग्य.

सामार्थ प्रभु येतो ऐसें धृतराष्ट्र आयके कानीं ॥
बहु तृषित अंध चातक मेघागम जेंवि काय केकांनीं ॥ २९ ॥
मार्गीं सभादि सर्व हि बहु साहित्य प्रति-स्थळीं करवी ॥
कीं आपणावरि दया-दृष्टि करावी यदूत्तमें बरवी ॥ ३० ॥
देव न पाहे तिकडे कीं तें करणें नव्हेचि निष्कपट ॥
मैंदाचें स्वीकारिल कवण विचक्षण अ-मूल्य निष्क-पट ॥ ३१ ॥
धृतराष्ट्र म्हणे विदुरा जो साधु-मनें स्व-सद्गुणें हरितो ॥
येइल वृक[1]स्थळाहुन आम्हां भेटावया उद्यां हरि तो ॥ ३२ ॥
दासी शत दासहि शत आठ महानाग रुक्म-रथ सोळा ॥
देईन तो हि सन्मणि शुचि तेजाचाचि जो गमे गोळा ॥ ३३ ॥
विदुर म्हणे कपट मनीं प्रेम वरि असें करूं नको पावें ॥
तुजवरि न ईश्वरानें करुणा परती करून कोपावें ॥ ३४ ॥
पांचां पुत्रां द्यावीं पांच न होउनि खळासि वश गावें ॥
तें तों न करिसि जेणें प्रभुनें स्व-मुखेंकरूनि यश गावें ॥ ३५ ॥
गुळखोबरें विलोकुनि भलत्याहि जनासि बाळक वळावा ॥
सत्य प्रेमचि दावुनि सुज्ञें तो विश्व-पाळ कवळावा ॥ ३६ ॥
कपटादरें वळो पर[2] पर परमेश्वर कसा वळेल हरी ॥
कृष्ण-कृपामृत-निधिची अ-कपट-विनता[3]कडे वळे लहरी ॥३७॥
येतो साम कराया होय यशोर्थीच, तो यशा लाहो ॥
देणार तुम्ही हय गज रथ दासी दास, हे कशाला हो ॥ ३८ ॥
समजाल तरि करिल हरि हर्षें पावोनिया विडा लास्य ॥
नाहीं तरि खेदद त्या सर्व, जसें प्रस्थिता बिडा[4]लास्य ॥ ३९ ॥
तेंव्हां सुयोधन म्हणे सत्य न सोडील सख्य हरि त्यांचें[5] ॥
न पुरेल कृष्णा-मानस-हरणीं बळ मेरुच्याहि हरित्यांचें ॥ ४० ॥
कृष्णासि वस्तु संप्रति किमपि न द्यावें तुम्हीं अहो तात ॥
भ्याले म्हणेल, मान्य न अवमानाला कुलीन होतात ॥ ४१ ॥
त्रि-भुवन-पूज्यतम[6] प्रभु सत्यचि हें किंच[7] तो असे व्याही ॥

---

१ वृकप्रस्थ ( गांवाचें नांव ) तेथून. २ ईश्वराहून अन्य. ३ कपट सोडून शरण गेलेल्याकडे. ४ बाहेर जाणारास जसें मांजराचें तोंड, (मांजर) वाटेंत आडवें आलें तर तें दुःखद होतें. ५ पांडवांचें. ६ तिन्ही लोकांत पूजा करण्यास अत्यंत योग्य. ७ आणि.

परि संप्रति सेव्य नव्हे सेवूं कृष्णोतरा अ-सेव्या ही ॥ ४२ ॥
जें वैर वाढलें तें आतिथ्येंकरुनि काय हो शमतें ॥
अवमान नव्हे जेणें तें क्षत्रोचित[1] असें मला गमतें ॥ ४३ ॥
वृष्णिप[2] वृकस्थळाहुनि येतां भीष्मादि सुज्ञ ते सर्व ॥
जन सामोरे गेले अंदुक जाला सुयोधना[3] गर्व ॥ ४४ ॥
धृतराष्ट्र-गृहा नेती राज-पथीं हळुहळूच हरि हरितें[4] ॥
त्यां पशु म्हणेल तो पशु त्यांचें स-रूपत्व अ-तुळ हरिहेरि[5] तें ॥४५॥
भेटे धृतराष्ट्राला तत्कृत पूजेसि बहुत भाउनि घे ॥
मग जगदीश्वर तेथुनि त्याचा[6] निववावयासि भाउ निघे ॥ ४६ ॥
आहेतँ[7] सुखी पाण्डव देवा आलासि काय सामास[8] ॥
खळ न वळेल झिजविला जरि करितां बोध काय[9] सा मांस[10] ॥४७॥
विदुरासि भेटल्यावरि भेटे सर्वाप्तराजे[11] कुंतीतें ॥
जीस अ-सुख सह्य गमे दे जें भेदूनि त्दय कुंतो[12] तें ॥ ४८ ॥
वैकुंठाच्या कंठीं घालूनि मिठी रडे पृथा आर्या ॥
ब्रह्मासहि[13] गहिंवरवी महिवर वीरेंद्र-पांडुची भार्या ॥४९॥
प्रभुला म्हणे मुकुंदा बा तूंचि करिसि सुखी स-खेदांस[14] ॥
संप्रति आहेत कसे मद्बालक ते तुझे सखे दास ॥ ५० ॥
प्रिय-सुत-विरह सु-दुःसह देह[15]-विरह बहु बरा सुसह देवा ॥
पावेन कधीं बा मी म्हणतें स्व बहिश्वरांसु[16] सहदेवा ॥ ५१ ॥
वत्सा सहदेवा मी मेल्यावरि हाय नच वदावें हो ॥
तेरा पळेंहि नसती मातां[17], हें हायँन चवदावें हो ॥ ५२ ॥

---

१ क्षत्रियाला योग्य. २ यादवांचा पति ( कृष्ण ). ३ गर्वानें दुर्योधन सामोरा गेला नाहीं, हें तात्पर्य. ४ घोडे. ५ आश्चर्यवाचक हे शब्द आहेत. कृष्णमूर्ति चांगली सर्वांचे दृष्टीं पडावी म्हणून घोडे हळू चालत होते हें तात्पर्य. ६ धृतराष्ट्राचा भाऊ ( विदुर ). ७ हें विदुराचें भाषण. ८ संधि करावयास. ९ शरीर. १० सहा महिने–पुष्कळ दिवस हा अर्थ. ११ सर्व हितचिंतकांमध्यें श्रेष्ट ( श्रीकृष्ण ). कोठें सर्वाप्तराजंकुतीतें असें एक पद आढळतें, तसें केल्यास, सर्व आप्त (इष्टमंडळी) ह्यांत प्रमुख अशा कुंतीला,असा अर्थ घ्यावा व भेटे ह्याचा कर्ता कृष्ण अध्याहृत घ्यावा. १२ माला धारण करणारा. १३ निर्विकार अशा ईश्वरालाही. १४ दुःखितास. १५ देहाचा नाश. १६ बाहेर संचार करणारा प्राणच. १७ पुत्र–वियोग झाला असतां माता (आई) तेरा पळें ही वाचावयाची नाहीं; परंतु मी १३ वर्षे वाचलें आहें, म्हणून मला माता हें नांव शोभत नाहीं, हें तात्पर्य.

प्रभु अश्रु पुसोनि म्हणे जें संकल्पित घडेल सत्वर तें ॥
आत्याबाई कवणें ऐसे श्रम भोगिले[1] न सत्व-रतें ॥ ५३ ॥
मच्चित्त कौरवांचे चिंतुनि असाधु-वाद तळमळतें ॥
असतों मी तैं तरि न व्यसन-मळें धर्म-पाद-तळ मळतें ॥ ५४ ॥
आहेत स-दार सुखी देवि नमस्कार हे[2] तुला सांजे ॥
ऐसें सांगुनि वंदी तें त्या श्रित-शर्म- हेतुला साजे ॥ ५५ ॥
समजावुनि कुंतीतें भेटे दुर्योधना अ-सेव्या ही ॥
कीं तो स्व-सुता स्व-सुता देउनिया जाहला असे व्याही ॥ ५६ ॥
लघु म्हणति जे सुयोधन-दुःशासन-शकुनि-कर्ण वेनातें[3] ॥
परिरंभ-पात्र केले प्रभुचें सौजन्य वर्णवेना तें ॥ ५७ ॥
पूजुनि घे प्रभु, होइल जल-निधिला तृप्ति-दायक विहीर ॥
थोरपण अनंताचें अनंत वर्णील काय कवि-हीर ॥ ५८ ॥
भोजन करा म्हणे शठ देव म्हणे मज कशास होकरितां ॥
जेवा तुम्हीच, दाटुनि आदर आग्रह कशास हो करितां ॥ ५९ ॥
असतों जरि अन्नार्थी प्रथमचि म्हणतों अवश्य मी तुजला ॥
प्रेमार्थी पांडव-सख हा अन्नाकारणें नसे सुजला ॥ ६० ॥
प्रभुला म्हणे सुयोधन तिकडे[4] हिकडे[4] हि सम असे नातें ॥
ज्याकारणें करावा अस्मदनादर[5] तुवां असेना तें ॥ ६१ ॥
देव म्हणे केवळ ते न सोयरे मदसु सर्व वसु देव ॥
मान्य जसे अक्रूरोद्धव-बळ-भद्रोग्रसेन-वसुदेव ॥ ६२ ॥
जे तत्सख तद्रिपु ते मत्सख मद्रिपु खरे अगा राया ॥
द्विषदन्न[6] न सेवावें म्यां येऊंही नये अगारा या ॥ ६३ ॥
खोटा सुयोधन म्हणुनि विदुर-गृहा जाय देव नच खोटा ॥
गोपोच्छिष्टा[7] वळला वळता कां वासुदेव न चखोटा ॥ ६४ ॥
दुःसंग-नक्र-दत्त[8] क्लेश निवारुनि सर्व विदुर-गजा[9] ॥
मुक्त करी हरि, लाजे गातां गुण-कीर्ति सर्व-विदुरग[10] जा ॥ ६५ ॥

---

१ दुर्भाषणें. २ सहा. ३ ह्या नांवाचा राजा महापातकी व दुष्ट होता; त्यालाही जे सुयोधनादि लघु ( लहान ) ( तो काय आमच्या पुढें! ) असें म्हणती. ४ पांडवांकडे व आम्हांकडे. ५ आमचा अपमान. ६ द्विषत्+अन्न-शत्रूचें अन्न. ७गोपाळांच्या उच्छिष्टास. ८ दुःसंग हाच नक्र ह्यानें दिलेले. ९ विदुररूप गजेंद्रास. १० ( सर्व वित्+उरग ) सर्वज्ञ शेष.

शतसंख्य वाजवी ज्या जेववितां माय देवकी चिटक्या[1] ॥
तो नित्य-तृप्त भगवान् विदुर-गृहीं भोजनांत दे मिटक्या ॥६६॥
आले ढेंकर, दिधल्या मिटक्या बहुसाळ, मारिले फुरके ॥
उरके सर्वांमागुनि अशन परि न ताट चाटणें उरके ॥ ६७ ॥
ज्याच्या चरणें स्व-रजाकरवीं मणतासि मोक्ष देवविला ॥
देव विलास-मनुज-तनु[2] विदुर-प्रेमें यथेष्ट जेवविला ॥ ६८ ॥
मग रात्रौ एकांतीं सर्वज्ञालाहि साधुराय कवी ॥
पाय रगडितां दुर्जन-दुर्योधन-दुर्मतासि आयकवी ॥ ६९ ॥
पंगुहि मेरुवरुनिहि न माथां धरितां यदंघ्रि-रज निसरे ॥
त्या दीन-बंधुची ती चिंता न सरे परंतु रजनि सरे ॥ ७० ॥
प्रातःकाळीं स-शकुनि दुर्योधन ये स्वयें बहायाला ॥
प्रातर्विधि करुनि प्रभु जाय प्रज्ञांबिका[3] पहायाला ॥ ७१ ॥
जन-दृष्टि-चातकी जी तूर्य[4]-रवेंकरुनि देत ओ तीतें ॥
प्रभु-मेघ दर्शनामृत दुर्लभ जें तन्मुखांत ओती तें ॥ ७२ ॥
मग जी जल-द-श्यामा करुणा[5] बसली नवासनावरि ती ॥
जीच्या उपासक-जनाप्रति विषयाच्या न वासना वरिती ॥ ७३ ॥
केवळ जवळ बसविला विदुर प्रेमेंकरुनि मा-पानें[6] ॥
तद्यश न मोजवेल ब्रह्मांडा येवढ्याहि मापानें ॥ ७४ ॥
टकमक पाहत होते प्रभु-मुख-चंद्राकडेचि चातकसे[7] ॥
नसतील जोडिले श्रवणांहिं बसाया मनासि हात कसे ॥ ७५ ॥
सभ्य श्रुति-वदनांतें[8] पसरिति सेवावया भगवदुक्ती ॥
प्राशावयासि जेविं स्वच्छ स्वात्यंबुला[9] जलधि-शुक्ती ॥ ७६ ॥
देव म्हणे धृतराष्ट्रा राया मोठी जगीं तुझी पदवी ॥

---

१ चुटक्या. २ लीलेनें मनुष्यदेह ज्यानें धारण केला आहे असा. ३ प्रज्ञा (बुद्धि) हीच आहे अंबक ( नेत्र ) ज्याचें अशाला म्ह० अंध धृतराष्ट्राला. ४ जनदृष्टि जी चातकी तीतें प्रभु-मेघ तूर्यरवेंकरुनि ओ देत जें दुर्लभ दर्शनामृत तें तन्मुखांत ओती. ५ करुणेची मूर्तिच जो कृष्ण. ६ लक्ष्मीपतीनें. ७ येथें चंद्राच्या संबंधानें चकोरपद पाहिजे; परंतु प्रास साधण्याच्या व्यवधानांत चातकपद योजण्याचा प्रमाद कवीचे हातून झाला असावा. ८ कान हींच वदनें त्यांतें. ९ स्वातिनक्षत्राच्या उदकास.

पद विद्यांचें तूं, परि परिस, मज बळेंचि आमता वदवी ॥ ७७ ॥
जें मेळविलें चंदन-सम झिजवुनि पर-सुखार्थ आंगातें ॥
केवळ कृपाळु-पूर्वज-सद्यश मळविसि बळेंचि कां गा तें ॥ ७८ ॥
दुःख परासि न द्यावें, सत्य वदावें, क्षमा न सोडावी ॥
जोडावी कीर्ति, असी-कुळ-रीति तुम्हीं कधीं न मोडावी ॥ ७९ ॥
मुख्य स्व-बंधु पांडव तन्नाशातेंचि हे अ-कवि टपती ॥
विश्वस्ता मीनातें पर-दारातें जसे बक विट-पती ॥ ८० ॥
वाढिव धर्म प्रेमें वाढवि मज जेविं नंद नवनीतें ॥
सत्पुत्रांनीं भवनीं सुर-तरुनीं न सुख नंदन-वनीं तें ॥ ८१ ॥
म्हणतो युधिष्ठिर नको पायें लोटूं मला अव-नतातें ॥
वचनें-करापत्याचें न करावें काय हो अवन तातें ॥ ८२ ॥
क्रमिले तसेचि कथिले होते त्वां त्यांसि अब्द तेरा जे ॥
धन्य म्हणत होते जे लावितिल तुलाचि शब्द ते राजे ॥ ८३ ॥
सुख-संतति-सुकृतर्द्धि-प्रीति-श्री-पुण्य-कीर्ति या लाभें ॥
साम करीं साधूंसीं नाहीं तरि पावलेंचि यांला भें ॥ ८४ ॥
बहु सत्य बहु प्रिय बहु हित बहु मत दुराप बहु रुचिर ॥
शुचि रम्य क्षीरधिजाननं-चंद्र-चकोर बोलिला सु-चिर ॥ ८५ ॥

---

## आर्या-भीष्म-पर्वांतील युद्ध-प्रकरणीं.

युद्धारंभीं यदु-पति वदला विजया रथातळीं उतर ॥
दुर्गेसि हात जोडीं होइल खल-बल-समुद्र हा सुतर ॥ १ ॥
त्रि-भुवन इच्या प्रसादें जेविं वसंततुनें समस्त वन ॥
शोभे, म्हणुनि करावें त्वां केवळ दुर्बलासम स्तवन ॥ २ ॥
स्व-रथाखालें उतरुनि नमुनि म्हणे विजय विजय दे दुर्गे ॥
त्वत्पद-भजनीं बहु सुख म्हणुनि म्हणे भक्त मुक्तिला दुर्गें ॥ ३ ॥
वासर-मणि-कोटि-रुचे हास-रस-वशीकृत-स्मरारातें ॥

१ दुर्योधनादि मूर्ख. २ आज्ञेंत राहणाऱ्या मुलाचें. ३ सुखादिकांला. ४ लक्ष्मीच्या मुखचंद्राविषयीं चकोरासारखा कृष्ण. ५ गे दूर हो. ६ कोट सूर्याप्रमाणें आहे तेज जीचें. ७ आपल्या सुंदर हास्यानें स्वाधीन केला आहे मदनाचा शत्रु ( शिव ) जीनें.

कासरे-नगासने[1][2] हा दास रणीं विजय-पात्र हो माते ॥ ४[3] ॥
त्वदुदारता जसी तसी न सुरांच्या बहुमता अगो साधो ॥
ऐसें स्तवितांचि शिवा दर्शन देउनि म्हणे·अगा साधो ॥ ५ ॥
द्याया मज यश लोकां सुख गृध्रां तो लुलाय मास मरे ॥
मरतिल तसेचि तव रिपु मानुनि समरीं तुला यमासम रे ॥ ६ ॥
देउनि विजय-वर असा जाली अंतर्हिता भवानी ती ॥
सदवन असदनवन[4] या नित्य जिच्या बहु मता भवा नीती ॥ ७ ॥
युद्धारंभीं भीष्म-द्रोण-प्रमुखाखिलाप्त-वध-भीता[5] ॥
शक्र-सुता[6] त्रि-जगद्गुरु-कृष्णें उपदेशिली स्वयें गीता ॥ ८ ॥
गत-मोह तमोहरसा सजला त्हृत-गोप[7]-मुग्ध-सारथि जो ॥
तत्तेजें न गळे पर-बळ तरि अनळेंहि दुग्ध-सार थिजो ॥ ९ ॥
बहुविध-वाद्य-रव अमर-नाथादि-विमान दाटले खांत ॥
वर्णिति नर-नारायण[8] कोण तयांचे न भाट लेखांत ॥ १० ॥
भीष्म पुढें करुनि उठे प्रथम सुयोधन करावया कदन ॥
भीम पुढें करुनि उठे धर्म प्रभु जो सु-कीर्तिचें सदन ॥ ११ ॥
भीमाचा सिंह-ध्वनि कोणासहि आयको न दे वाद्यें ॥
सोडुनि समाधि मस्तक डोलविलें आयकोनि देवाद्यें[9] ॥ १२ ॥
येउनि वराप्सरा अव-लोकी राजन्य-संगरा[10] जा जी ॥
ती तदितर वांछीना जेविं सती अन्य-संग राजा जी[11] ॥ १३ ॥
वृद्ध-तरुण भीष्मार्जुन परि न रणीं न्यून अधिक ते गमले ॥
सम लेखांपि तयांतें जाणुनि तद्भुज-पराक्रमीं रमले ॥ १४ ॥
सूं सणणण सणणणणण वाजति शर-निकर काय-हानि-कर[12] ॥
वदले सुर मुनि करितो नर-रूपें रुद्र काय हा निकर ॥ १५ ॥
शरधी जलधी फुटले कीं दैवें पाश एकदां तुटले ॥

---

१ महिषासुर व विंध्याचल ह्यांवर बसणारी. २ कल्पवृक्षास. ३ महिषासुर. ४ असत्+अन्+अवन—दुष्टांचें रक्षण न करणें. ५ भीष्म द्रोण आदिकरून संपूर्ण आप्तांचा वध होईल म्हणून भ्यालेला जो. ६ इंद्राचा मुलगा अर्जुन, त्यास. ७ ज्यानें गोप-स्त्रिया हरण केल्या तो कृष्ण ज्याचा सारथी आहे असा. (अर्जुन) ८ अर्जुन व कृष्ण (वर्णिति ह्याचें कर्म) ९ महादेवानें. १० क्षत्रियांच्या युद्धास. ११ हे धृतराष्ट्रा. १२ शरीरांचा नाश करणारे.

कीं काल-व्याल[1], करटि-घोटक-भट-भेक[2] खावया सुटले ॥ १६ ॥
कवि योजुनि उपमा गज-हर-नर-शर-ततिस[3] वाहुटळ लाजो ॥
अ-तुल-बल न कां गर-गल-कलहींहि[4] न विजय-बाहु[5] टळला जो ॥ १७ ॥
देवाऽसुराहव न बहु त्या कौरव-पांडवाहवाहून ॥
शोणित-नदींत गेले स-भट-रथ-द्विरद-वाह[6] वाहून ॥ १८ ॥
तिसरे दिवशीं राया[7] भीमानें अतितरोग्र-कोपानें[8] ॥
दुर्योधन नृप मूर्छित केला भेदुनि उरांत रोपानें ॥ १९ ॥
सावध होउनि राजा भीष्मासि म्हणे अहो पितामह जी ॥
झाली भवत्-प्रतिज्ञा[9] काय, जना दे सुधा पितां मह जी ॥ २० ॥
असतां तुम्ही पति[10] पृथा-पुत्र मथिति या मदीय-पृतनेतें ॥
नवल ज्वलदनलांचें[11] सर्वस्वें बळ हरोनि घृत नेतें ॥ २१ ॥
जिकडे वपु तिकडे मन, युक्त, न शोभेल अन्यथा नातें ॥
पायें अनन्य लोटुनि लावावें काय अन्यें[12] थानातें ॥ २२ ॥
राया भलतें वदसी पथ्यें[13] हित स्व-गुरु-वच न आइकसी ॥
अन्य असोत, वदेल स्व-सुताप्रति अहित वचन आइ कसी ॥ २३ ॥
कैसा जिंकावा हो करुनि बळें आहवा युवा[14] जीनें[15] ॥
बा जिंकिला कधीं तरि जवनें तरुणेंहि वायु वाजीनें ॥ २४
मी आजि साग्रजानुज[16] शक्र-सुताचें करीन वारण गा ॥
बहु हेंहि पद भरिहि जरि सारील अ-नव करी नवा रणगा[17] २५ ॥
असि करुनिया प्रतिज्ञा विष्णु-पदी-नंदनें अति-त्वरितें ॥
पांडव-चमू-पतीचें मथुनि चमू पाडिलें पतित्व रितें ॥ २६ ॥
जिकडे जिकडे पळती तिकडे तिकडे महा-जवन तो बा ॥

---

१ कृष्ण सर्प. २ हत्ती, घोडे, व योद्धे हेच कोणी बेडूक त्यांस गिळावयास. ३ हत्तींचा नाश करणाऱ्या अर्जुनाच्या बाणसमुदायास उपमा वाहुटळ योजून कवि लाजो. ४ विष आहे कंठांत ज्याच्या अशा शिवाबरोबर युद्ध करण्यांत. ५ अर्जुनाचा बाहु. ६ योद्ध्यांसह रथ हत्ती व घोडे. ७ हे धृतराष्ट्रा. ८ अतितर+उग्र+कोप-फारच भयंकर कोप. ९ पांडवांस मी जिंकीन किंवा ते मला जिंकितील अशी ( भार. भीष्म प. अ. ८१ ). १० सेनापति. ११ पेटलेल्या अग्नीचें. १२ दुसरें मूल. १३ नीतीस अनुसरून असणारें १४ तरुण-अर्जुन. १५ म्हातारा जो मी त्यानें. १६ वडील व धाकट्या भावांसह. १७ रणांत आलेल्या.

बहु हाय हाय म्हणती प्राकृत, बुध हंत हा, यवन तोबा ॥ २७ ॥
गरुडहि अहीस न तसा न करि-कुळालाहि तेविं हरि खपवी ॥
दुर्योधनासि जैसा दे भीष्म न हरिस तेविं हरिख पवी ॥ २८ ॥
धर्म-कटक खांडव-वन भीष्म विजय विजय तोचि हरि गमला ॥
शर दव रक्त ज्वाला रूपक याहूनि होय बहु न मला ॥ २९ ॥
पडतांचि गांठ जाले समर-चमत्कार फार न वदवती ॥
लिहितां सरस्वतीच्या सरतिल शत-कलश-सदृश नव दवती ॥३०॥
वाटे तुमचा उरविल कृष्णांचे जोव न स्थविर[4] तात ॥
दिसले शरांत ते [6]नग कल्पांबुधि-जीवनस्थ विरतात ॥ ३१ ॥
शांतनव सिंह गमला पळतां नर-रथ हि तो पळ ससाच ॥
स-सख प्रभुहि वसंतीं बहु फुलला होय हा पळस साच ॥ ३२ ॥
जोंजों हाणी खर शर तो रिपु-यवस-दव तारकोपाया ॥
तोंतों लागे हळुहळु कमला-धव-सदवतार कोपाया ॥ ३३ ॥
जो भ्रातृ-स्नेहाचा चित्तीं स्नेहें निजें विसर घोली[11] ॥
तो भीष्मावरि कोपे स्व-मधु[12]-हराउपरि जेविं सरघोली[13] ॥ ३४ ॥
चक्र करीं धरुनि रथाखालें टाकुनि उडीस जंव धांवे ॥
वाटे त्या सिंहानें सर्वहि भीष्मादि ते गज वधावे ॥ ३५ ॥
धांवुनि यत्नें धरि परि वोढुनि ने देव त्यांसि[14] वोढकसा ॥
जाणों म्हणे भुज-बळें पाहूं जरि वोढितोसि वोढ कसा ॥ ३६ ॥
कर जोडुनि भीष्म म्हणे येतां मारावयासि याहो या ॥
हा सत्य-संध केला मुक्तहि साधूंसि गावया होया ॥ ३७ ॥
केला उभा सिताश्वें चरणीं घालुनि मिठी पदीं दशेमीं[15] ॥

---

१ इंद्राला. २ अर्जुन. ३ इंद्र. अर्जुनानें अग्नीस खांडव-वन जाळावयास दिलें, तेव्हां इंद्राचें व अर्जुनाचें युद्ध झालें; अशी कथा आहे. ४ वृद्ध-भीष्म. ५ कृष्णार्जुन. ६ कल्प+अंबुधि+जीवन+स्थ-प्रलयकालच्या समुद्राच्या पाण्यांतील. ७ अर्जुन व कृष्ण ह्यांस भीष्माचे पुष्कळ बाण लागून त्यांच्या अंगांतून रक्त वाहूं लागले असतां, ते फुललेल्या पळसासारखे दिसूं लागले. ८ शत्रुरूप तृणास वणवाच. ९ तारणारा उपायच जो (कृष्ण) ह्यास. १० लक्ष्मीचा पति जो-विष्णु त्याचा पूर्ण लक्षणाचा अवतार-विष्णूचा कृष्ण हा पूर्ण अवतार मानिला आहे. ११ पाडतो. १२ आपला मध हरण करणाऱ्यावर. १३ मधमाशांचा थवा. १४ अर्जुनास. १५ दहाव्या पावलीं.

प्रभु तत्त्व असें कळवी कीं प्रेम-बळेंचि पद-नता वश मी ॥३८॥
पाय धरुनि पार्थ म्हणे त्यागुनि धन काय जीप्रति ज्ञाते ॥
बहु जपले तद्गुरुनीं त्यागावी काय जी प्रतिज्ञा ते ॥ ३९ ॥
या दासाकरवींच क्षिप्र तुम्ही या यशास करवाल ॥
नखहि नको ज्या कार्या त्या काढावा कशास करवाल ॥ ४० ॥
यापरि हित प्रिय पृथा-पुत्रोक्ति अमान्य कां करील हरी ॥
सन्मित्रोक्ति करी जें अमृत-रसाची न तें करी लहरी ॥ ४१ ॥
बहु काय वदों राया तिसऱ्या दिवसाचिया चरम-यामीं ॥
भूमि-तळा मांसमया देखत होतों नभा शरमया मी ॥ ४२ ॥
भीष्मासि म्हणे राजा व्हावी ऐसी रणांत मद्वस्छा ॥
झाला मला सु-दुःसह हा ऐसा होय ताप न दवस्था[1] ॥ ४३ ॥
शिरला भीम व्यूहीं जेंवि अज-कुळांत लांडगा शिरतो ॥
दैवेंचि रक्षिलें मज कापित होताचि दांडगा शिर तो ॥ ४४ ॥
या तुमच्या पावाव्या दुर्बल-सेनांसमान वध सेना ॥
हें झाल्या कां स्वर्गीं जोडुनि एनास मानव धसेना ॥ ४५ ॥
झालीं युद्धें शतशः सर्व-प्रेक्षक-मनोहरें सरसें ॥
होय रणांगण रक्तो-त्पल-वेन-चित-पद्मरागभू-सरसें[2] ॥ ४६ ॥
भीष्म ग्रीष्म-तरणिसा अर्जुन हेमंत-तरणिसा गमला ॥
देव म्हणे बहु आला वृद्धाहुनि जिष्णुचाचि राग मला ॥ ४७ ॥
हो शूर दूर ओसर म्हणणार महा-प्रभाव हा रविला ॥
हार विलासि-जनेंसा येणें कैसा प्रभाव हारविला[3] ॥ ४८ ॥
झाला धीर परि परि-म्लान सखा जाति-पुष्प-गुच्छकसा ॥
तुच्छ कसा हा प्र-वया चिरडिल भलता अहींद्र-पुच्छ कसा ॥४९॥
हा पांडवांशि भस्मचि करिल उपेक्षा करूं नये याची ॥
पदरा अ-कीर्ति आश्रित-सुहृद्दनवन[4] पथकरून येयोची ॥५०॥

---

१ वणव्यांत सांपडलेल्यास. २ तांबड्या कमलांच्या समुदायानें युक्त व माणकांची ज्यास जमीन आहे अशा सरोवरासारखें सर्व रणभूमीवर रक्ताचे प्रवाह वाहूं लागले, व त्यांत मनुष्यांचीं मस्तकें (तोडलेलीं) तरंगत होतीं, हें तात्पर्य. ३ हा शूर (व) महाप्रभाव (अर्जुन) हो दूर, ओसर, (असें) रविला म्हणणार, (त्या) येणें (ह्या अर्जुनानें) विलासिजनें हारसा, प्रभाव कैसा हारविला; हा अन्वय. ४ आश्रित व मित्र ह्यांचें संरक्षण न करण्याचें पत्करल्यामुळें. ५ यावयाची.

आणुनि मनीं असें ज्या धन्य म्हणति सर्व विप्र तो दास ॥
भीष्म वधाया धांवे हरि हस्तें कवळुनि प्रतोदास ॥ ५१ ॥
देव रथातें सोडुनि धांवे देवापगा-विलापार्थ[1] ॥
कीं दुस्तरारि-सागरिं[2] न बुडो कांसेसि लाविला पार्थ ॥ ५२ ॥
पार्थाप्रति प्रयत्नें तो बळ-कारुण्य-सिंधु राखाया ॥
क्रोधें गर्जत धांवे सिंह जसा मत्त-सिंधुरा खाया ॥ ५३ ॥
एह्येहि देवदेव[3] श्रीकृष्ण नमोस्तु ते असें बोले ॥
बोले गद्गद प्राज्य-प्रेमाश्रु-भरें करूनिया डोले ॥ ५४ ॥
भीष्म म्हणे त्वद्धस्तें व्हाया समरांत शांत[4] नवसा जो ॥
होता करीत तो हा जेंवि हरि-हतेभ[5] शांतनव साजो ॥ ५५ ॥
जरि मारिसील मज गति-लाभ, तुजहि कीर्ति-लाभ गुरुतर तो ॥
विश्व-गुरो प्राकृतही तारुनि शरणागतासि गुरु तरतो ॥ ५६ ॥
तूं हरिसा हरि साचा हरिणी सुर-सिंधु मीहि पाडससा ॥
पाड[6], स-साध्वस हो अरि, हरिशीं पावेल काय पाड ससा ॥ ५७ ॥
ब्रह्मांड भस्म व्हावें ज्याच्या दर-रक्त-चक्षुच्या[7] पातें ॥
तो तूं आंगें मारूं पाहसि मज दावुनि प्रतापातें ॥ ५८ ॥
झालों धन्य त्रिजगीं भास पळ प्राकृतास मारकसा ॥
त्या प्रभुनें[8] हो केला भस्म स्वातिक्रमेच्छु[9] मार कसा ॥ ५९ ॥
धांवुनि धरी धनंजय मागुनि त्या माधवासि बाहूंनीं ॥
मग दृढ चरणींच मिठी घाली पहिलीच रीति पाहूनी ॥ ६० ॥
दूर उसळला तेव्हां कोपावेशें मुकुंद कंदुकसा ॥
राहे उभा प्रभु गमे इभसा धृत-चरण भक्त अंदुकसा ॥ ६१ ॥
पार्थ म्हणे श्रीधर्मा-वरि धरितिल जे असिप्रति ज्ञाती ॥
मरतील, त्यजसी कां आयुध न धरिन असि प्रतिज्ञा ती ॥ ६२ ॥
मारिन भीष्मातें मी इतरांतेंही भवद्दयाधारें[10] ॥

---

१ ( देव+अपगा+विलाप+अर्थ ) गंगेला पुत्राच्या मरणानें विलाप करावयास लावावें म्हणून. २ दुस्तर+अरि+सागरिं—तरण्यास कठीण अशा शत्रूरूप समुद्रांत. ३ एहि एहि ( ये ये ) ते नमः अस्तु ( तुला नमस्कार असो ). ४ मृत. ५ सिंहानें मारलेला हत्ती. ६ मार. ७ किंचित् डोळे लाल करून पाहिलें असतां. ८ महादेवानें. ९ आपली अमर्यादा करण्यास इच्छिणारा. १० तुझ्या कृपेच्या आश्रयानें.

बा त्वत्प्रसाद ज्यावरि केवळ मेर्वग्रेंही[1] तया धारें ॥ ६३ ॥
कुरु-कुंजरासि गेला होता यदु-सिंह तो खरा खाया ॥
परते पर तेथूनि प्राणं-प्रिय-मित्र-तोख राखाया ॥ ६४ ॥
कृष्ण स्व-रथीं चढतां समर-चमत्कार मग नवा तातें ॥
दाखविला, वाहों दे न शर-व्रज-पूर्ण गगन वातातें ॥ ६५ ॥
भीष्म-शर-व्रज दावचि पांडव-भट-निकर तो गमे घास ॥
क्षण सोसवे न कोणासहि जैसा वायु-वेग मेघास ॥ ६६ ॥
जेविं महा-वात करी अभ्रांचा न लगतां पळ विसकट ॥
त्वत्तातें[2]-शर-व्रात ध्वंसुनि सर्वांसही पळवि सकट ॥ ६७ ॥
बहु वधिले उरले जे ते केले बाहुजं[3]-पं[4] पराभूत ॥
पाहों शकले न जसे श्री-नर-हरि-मंत्र-जप-परा भूत ॥ ६८ ॥
तों मावळला दिनकर होय बहु भाम साध्वस, मग तिंहीं ॥
केला अवहार परि-श्रांतांहीं लंघिताध्व-सम-गतिंहीं[5] ॥ ६९ ॥

## द्रोण-पर्वांतील युद्ध-प्रकरणीं.

भीष्म पडतांचि गेले सर्वांचेही पळांत आवांके ॥
नसतां धुरंधर वृषभ बाळ-वृष भरेंकरुनि आ वांके ॥ १ ॥
रवि-रुचिचें तीमागे संपादे स्वल्प काज वातीस ॥
विसरविल काय ? तेज प्रकट करुनि अल्प काजवा तीसें[6] ॥ २ ॥
कुरु-राज म्हणे गुरुजी सेना-पति शत्रु-बळें-विरामा[7] व्हा ॥
तुमची आव्हा पळवू अ-हित-मदा जेंवि पळवि रामा व्हा ॥ ३ ॥
द्रोण म्हणे सेना-पति होतों, म्हणतोस जरि; परि स्पष्ट ॥
धृष्टद्युम्नासि[8] न मी वधिन, करीन त्वदर्थ बहु कष्ट ॥ ४ ॥
मी समर पांडवांसीं करिन हरिन अरि-नराधिपति-कटकें[9] ॥

१ मेरु-पर्वताचें शिखर ही. २ हे धृतराष्ट्रा तुझा जो तात (बापासारखा) (भीष्म हा धृतराष्ट्राचा चुलता होता) त्याच्या बाणांचा समुदाय. ३ क्षत्रियश्रेष्ठ. ४ पसरलेल्या सैन्याचें एकीकरण. ५ लांबून चालून आलेल्या मनुष्याप्रमाणें ज्यांची (मंद) गति आहे अशा. ६ सूर्याच्या कांतीला. ७ शत्रूच्या सैन्याच्या नाशा करितां, अथवा (नाश करणाऱ्या) हें संबोधन समजावें. ८ धृष्टद्युम्न हा आपल्या वधार्थ उत्पन्न झाला आहे, असें द्रोणास माहीत होतें. (भार. द्रो. प. अ. ७). ९ शत्रूकडील राजांचीं सैन्यें.

भट केविं टिकेल इतर गरुड निरखिजेल काय गा चटकें ॥ ५ ॥
गुरु-रथ-वेग असह्यचि झाला त्या विष्णु-पत्रे-रथ-वेगा ॥
केला पांच दिवस बहु युद्ध-चमत्कार तो न कथवे गा ॥ ६ ॥
धृष्टद्युम्नें वधिला अन्यायें, सकळ सैन्य हळहळतें ॥
गुरु-मरण तसें देतें जैसें दे मोह दैन्य हळहळ तें ॥ ७ ॥
धृतराष्ट्र विलाप करी बहु आपण आपणासि निंदुनि घे ॥
स्मृति हरपे, कंपेचि न तन्नयनांतूनि अश्रु-बिंदु निघे ॥ ८ ॥
बहु जन बुडवुनि शोकीं दुष्टा दुर्योधना बुडालास ॥
मकरालय लंघाया मत्ता मशका कसा उडालास ॥ ९ ॥
गज गोष्पदीं बुडाला हा दैवा सिंधु शोषिला मशकें ॥
न शकें सोसाया हें वधिला तो केसरी कसा शशकें ॥ १० ॥
मी माझें हें घातक लागो या आजि आग मोहाला ॥
न मनांत अहं-ममताऽभ्यधिका लोकांचिया गमो हाला ॥ ११ ॥
सांग रण-कथा, काढिल नसतां मनिं मोह काय बाप रडें ॥
वांकेल ताजव्याचें भारावांचोनि काय बा परडें ॥ १२ ॥
संजय म्हणे नृपा मन लावूनि अनश्वरीं सुखीं न रडें ॥
हो सावध काळानें जों नाहीं घातलें मुखीं नरडें ॥ १३ ॥
पुत्राप्त-राज्य-मोहें होय जरि तुज व्यथा परि सराया ॥
मोह श्रोत्यांचा मा कथिन गुरु-वरें कथा, परिस राया ॥ १४ ॥
आम्हां अर्जुन-पालित-धर्म-नृप-बलाकडे पहावेना ॥
त्या पांडवांहि कुरु-गुरु-रक्षित-कटक-प्रभा सहावेना ॥ १५ ॥
भट गांठिती भटांतें अहि अहितें जेविं पतग पतगातें ॥
कीं हरि हरितें अत्यद्भुत होय द्वंद्व-युद्ध-शत गा तें ॥ १६ ॥
करिते झाले युद्ध क्रुद्ध शरभ-सिंह-देव-दानवसे ॥

---

१ विष्णूच्या पक्ष्याच्या (गरुडाच्या) वेगास. २ विष. ३ ह्याचा कर्ता अश्रुबिंदु. ४ समुद्र. ५ गायीच्या उमटलेल्या पावलाच्या पाण्यांत. ६ अहंता व ममता. ७ अहंता व ममता ह्यांपेक्षा अधिक (मोहक). ८ अक्षय सुखाकडे मन लावून म्ह० मोक्षसुख प्राप्त करून देणाऱ्या मार्गाकडे मन वळवून. ९ व्यासाच्या प्रसादानें.

मानवसे गमले न स्नेह कणहि तन्मनीं तदा न वसे ॥ १७ ॥
रविला झांकी गगनीं कुरु-गुरु बहु-शर-भरीं तिमिर[1] विखरी ॥
लीलेनें नर[2]-केसरि लक्ष चिरी, शरभ-रीति मिरवि खरी ॥ १८ ॥
धर्माला गांठाया धांवे तो विप्र[3] कटक विसकटुन ॥
वाटे तदेक-विशिखाहुनि सिंधु-ज-गरल[4]-घट कविस कटु न ॥ १९ ॥
रक्त-नदी वाहविली राया त्या शत्रु-सिंहें[5]-शरभानें ॥
केवळ कुरु-कटकाचीं हरिलीं[6] विखरुनि अनंत-शर भानें ॥ २० ॥
पार्थाचा प्रलय-घनाधिक दारुण देवदत्त दर वाजे ॥
दरवाजेसे डोळे झांकिति आइकति भीतिद रवा जे ॥ २१ ॥
शर्मा रथ धर्मा धनु बाहु भ्राते सुपूर्व[7] पांच विती ॥
ज्यां[8] त्यांशि पूतनाशी[9] विजय-विशिख-वृष्टि पळ न वांचविती॥२२॥
वेष्टा[10] धनंजयाला आत्मयशें सत्यपांड[11] वेष्टाया ॥
चेष्टा करूं न द्याव्या गोपाला सत्य पांडवेष्टा[12] या ॥ २३ ॥
संशमका[13] नर जसा नर-हरि मारी वि-शृंखळ खळातें ॥
होय असृक्स्रोतःशत, वाहे समराजिरीं खळखळा तें ॥ २४ ॥
अरि-कदन जसें अर्जुन कुरु-गुरु हि तसें चि वीर-कदन करी ॥
मिरवी तयापुढें भट जेंवि हरिपुढें बलीहि मद न करी ॥ २५ ॥
कौंतेय[14] गांठिलीं[15] रण-रंगीं नटउनि महा-भट कबंध ॥
जैसा जलद समीरें तैसा विसकटुनिया कटक-बंध ॥ २६ ॥
धीर धरुनि धर्मज्ञें धीरें धर्में धनुष्य चढवीलें ॥
दाखविलें तें गुरुला जें होतें आपणासि पढवीलें ॥ २७ ॥
भीमावरि न गणुनि शर-वृष्टीची झड करी करी[15] लगट ॥

---

१ अंधार पाडी. २ मोठे वीर-हें चिरी ह्याचें कर्म. ३ द्रोण. ४ समुद्रांतून निघालेला विषाचा कलश. ५ अर्जुनानें. ६ त्यांस मूर्छा आणिली. ७ 'सु' आहे आद्यक्षर ज्यांचे असे म्ह॰ सुशर्मा सुरथ, सुधर्मा, सुधनु, व सुबाहु. ८ ज्यां बाणांस. ९ पूतनाराक्षसीप्रमाणें. १० हें संशप्तकांचें भाषण आहे. ११ ब्रह्मांड. १२ पांडवांस इष्ट असणाऱ्या. १३ त्रिगर्त देशाचा राजा सुशर्मा व त्याचे अनुयायी ह्या सर्वांनीं युद्धांत अर्जुनास मारूं किंवा आपण मरूं, अशी प्रतिज्ञा केली होती, म्हणून त्यांस एथें संशप्तक ही संज्ञा दिली आहे. १४ धर्म. गांठिला ह्याचा कर्ता द्रोणानें (अध्याहृत). १५ भगदत्तानें भीमाच्या अंगावर घातलेला सुप्रतीक नांवाचा हत्ती.

वाटे जनासि काळचि तो त्याला झडकरी करील गट ॥ २८ ॥
कुरु-कटका तप्त करी पार्थ, ग्रीष्मीं जसा पतंग जगा ॥
तों प्रेरिला तयावरि भगदत्तें काळसा मतंगज गा ॥ २९ ॥
देव गजोसि म्हणे रे गर्व अयःस्तंभ-सम-रदा न वहा ॥
हा मत्सख नेर सिंहचि वज्र-धरा-सह्यसमर दानवहा ॥ ३० ॥
होय पुढेंचि न मागें पार्थ-शरीहतहि शत-मख-सख सरे ॥
मुनि म्हणति अर्जुनीं तव शक्ति जसी सागरांत खसखस रे ॥३१॥
प्रकट करूं दे समरीं श्री-देवी जेंवि सैरिभासं कला ॥
तेंवि विजय-चापें-लता मग दवडी दूर वैरि-भा सकला ॥ ३२ ॥
विजय-विशिखार्त होतां पूर्वी दुष्करहि आयकोन करी ॥
भगदत्ताचें कथिलें अधनाचें जेंवि बायको न करी ॥ ३३ ॥
तिसरे दिवशीं चक्र-व्यूह सु-दुर्भेद्य युक्तिनें रचिला ॥
जो धीर-वीर-हीर-प्रवर-प्रकरें करोनिया खचिला ॥ ३४ ॥
व्यूहातें भेदाया धर्म झटे करुनि यत्न सानुजेंनी ॥
परि लोपवि प्रतापा गुरु तपना जेंवि रत्न-सानु जनीं ॥ ३५ ॥
सौभद्र म्हणे शिरतों व्यूहीं, डोहीं जसा मतंगज, वा ॥
हरि-पोत दंति-यूथीं कीं दहनीं करुनिया पतंग जवा ॥ ३६ ॥
भीमादि सबळ सर्वहि ते उठले व्यूह-कोट फोडाया ॥
इकडुनि कौरव-कटकहि होय पुढें शत्रु-सैन्य मोडाया ॥ ३७ ॥
रथ थडकले, भडकले हय, शस्त्रज वह्नि धडकले वरते ॥
अन्योन्य द्व्यंगुळेंही राहों देती न धड कलेवर ते ॥ ३८ ॥

---

१ कौरवांकडील एक योद्धा (राजा). २ भगदत्ताच्या हत्तीला. ३ लोखंडाच्या खांबासारखे आहेत दांत ज्याचे अशा. ४ वाहूं नको, ह्याचें कर्म गर्व. ५ हा अर्जुन. ६ इंद्राला (ही) असह्य आहे युद्ध ज्याचें असा. म्ह० इंद्रापेक्षां बलिष्ठ. ७ दानवांस मारणारा. ८ अर्जुनाच्या बाणांनीं विद्ध. ९ इंद्राचा सखा (भगदत्त). १० महिषासुरास. ११ युद्धचातुर्य. १२ अर्जुनाचें धनुष्य. १३ शत्रूंचें तेज. १४ अर्जुनाच्या बाणांनीं पीडित. १५ भगदत्ताचा हत्ती भगदत्तानें सांगितलेली दुर्घट ही गोष्ट पूर्वी ऐकत होता; परंतु जखमी झाल्यावर त्यानें सांगितलेलें ऐकेनासा झाला. दरिद्र्याची बायको जशी त्याची आज्ञा मानीत नाहीं, तसा. १६ आपल्या धाकट्या भावांसह. १७ मेरुपर्वत. १८ सुभद्रेचा मुलगा-अभिमन्यु. १९ दोन बोटें.

पावत असतां दोन्ही करुनि सु-तुमुलीं ऽहवास वध सेना ॥
व्यूहीं सौभद्र शिरे चित्तें हि जयांत वासव धसेना ॥ ३६ ॥
प्रभुचा मर्मी हाणी सर्वांसहि तीन तीन शर भाचा ॥
वाटे बहु सिंहांशीं समर करी कुपित पोत शरभाचा ॥ ३७ ॥
अंध म्हणे रे संजय हें त्या पौत्रास वर्ष सोळावें ॥
लोळावें मांडीवरि तेणें द्रोणादिकांसि घोळावें ॥ ३८ ॥
न पवे सु-नीतिचें परमार्थाची वाट लेंकरूं काय ! ॥
सत्यचि कथिशी परि हें मज लटिकें वाटलें करूं काय ॥ ३९ ॥
संजय म्हणे म्हण अनृत भीष्माचा एकुला पणतु मुलगा ॥
करिता झाला गुहसा बहुतांनीं वेढिला रण तुमुल गा ॥ ४० ॥
कुरु-सैन्यांत गमे ज्यापरि रंभा-काननांत वारा हो ॥
त्या विजय-श्री देउनि परिरंभा कां न नातवा राहो ॥ ४१ ॥
अ-क्षत-धनु तोंवरि हें वीर शिरोरत्न नावरायाचें ॥
यास्तव सर्वहि रक्षूं आजि करुनि यत्न नांव रायाचें ॥ ४२ ॥
कर्ण करी चर्मांचे श्रित-विघ्नाचे जसे गणपँ टुकडे ॥
तरि पाहोंहि न शकले वीर वि-शस्त्राहि त्या रण-पटुकडे ॥ ४३ ॥
त्या सौभद्रावरि बळ-सागर गरगर गदेसि फिरवीत ॥
दुःशासन-सुत धांवे निज-भुज-भुंजग-प्रताप मिरवीत ॥ ४४ ॥
युद्ध-चमत्कार रुचिर सु-चिर प्रकटुनि महा-गद भ्राते ॥
अन्योन्य-कृताघातें बा मूर्छा पावले अदभ्रा ते ॥ ४५ ॥
आधीं उठोनि उठतां सौभद्र-शिरीं प्रभो गदा घाली ॥
वि-वश करी ती दुष्परि-हार्या जेविं प्र-भोगदोघाली ॥ ४६ ॥
पडली जशी कराया प्रेक्षक सुर वि-रस मस्तकोपरि ती ॥
भूवरि सौभद्र-तनुहि ओकुनि स-रुधिर समस्त कोप रिती ॥४७॥

---

१ अत्यंत दारुण युद्धाला. २ सुनीति नांवाच्या स्त्रीचा मुलगा ध्रुव. ३ केळीच्या बनांत. ४ त्या नातवा (अभिमन्यूला) विजयश्री परिरंभा देऊन कां न राहो! म्ह० त्यास जय कां नाहीं मिळणार! ५ गणपति. ६ आपल्या बाहूची सर्पाप्रमाणें चपलता दाखवीत. ७ गदायुद्धांत प्रवीण. ८ दुःशासनाचा पुत्र व अभिन्यु. ९ पुष्कळ-बेळ असणारी-मोठी. १० हे धृतराष्ट्रा. ११ मूर्छित. १२ ( प्र+भोग+द+अघ+आलि ) दुःख देणारी पातकपंक्ति.

धर्म म्हणे हा हा म्यां मंदें दाटुनि कुमार मारविला ॥
बहु-वीरसूत दिसल्या अधिक सुभद्रा उमा रमा रविला[1] ॥ ४८ ॥
तुज उत्तरें मुलि दिल्हा म्यां कापायास मान विश्वास ॥
कलि-कालें[2] काय बुडविल मज बहु-पापासमान विश्वास ॥ ४९ ॥
संशप्तक वधुनि विजय सांजे शिबिरासि यावया परते ॥
प्रभुसि म्हणे कां कांपे मन कांपविले जरि स्वयें पर ते ॥ ५० ॥
कंठ गहिवरें भरला शिरली त्हदयांत केशवा धडकी ॥
येतें रडें वृथा कां बा माजी प्रकृति काय गा रडकी ॥ ५१ ॥
अ-तुल प्र-ताप लोकीं ज्या खल-बल-जलधि-वाडवाऽऽभाचा[3] ॥
तो कृष्णा आज तुझा मैंज आला कां न आडवा भाचा ॥ ५२ ॥
शिबिरीं शिरोनि विजयें धर्मादिक देखिले अधोवदन ॥
तें पुत्र-रत्न एकचि न निरखिलें सद्गुणर्द्धिचें[4] सदन ॥ ५३ ॥
मृदुल-प्रकृति[5] न साहे सुत-शोका जेविं न रविला पाला ॥
शिबिरीं करी परोपरि नारायण-मित्र नर विलापाला ॥ ५४ ॥
ज्याचा शस्त्रीं शास्त्रीं व्यवहारीं वासुदेववत् समज ॥
काय तुम्हीं केला हा आणुनि तो भेटवाचि वत्स मज ॥ ५५ ॥
बहुधां तुम्हीं धरुनि गुरु-कृत-चक्र-व्यूह-भेद-कामातें[6] ॥
केलाचि पुढें नाहीं-तरि करिता स्पर्श खेद कां मातें ॥ ५६ ॥
तुमच्या भुज-शस्त्रांतें धिक् हा निःसार[7] हा खटाटोप ॥
शिर ज्या न रक्षवे तो कार्याचा काय ओखटा टोप ॥ ५७ ॥
कुंतीस काय सांगूं कृष्णेला दाखवूं कसें वदन ॥
दुष्कर मला सुभद्रा-सांत्वन दुर्दर्श उत्तरा-सदन ॥ ५८ ॥
कां माझें उर न उले कवि पवि कीं म्हणति तोक-शोकाला ॥
लोका लाजे मन कीं जावें यश हारवूनि ओकाला ॥ ५५ ॥

---

१ सूर्य हा जगच्चक्षु आहे, म्हणून त्यास दिसल्या, म्हणजे सर्व जगास दिसल्या हें तात्पर्य. २ अन्वय-कलिकाल ( कलियुग ) ( अधर्मप्रवृत्तीनें जगताचा मोठा नाश करणारा आहे, तरी तो ) मज बहुपापासमान ( मी जो परम पापी हा जितका बुडवील तितका ) विश्वास ( जगतास ) बुडवील काय ? ३ शत्रुसैन्यरूप समुद्राला वाडवाग्नीसारखा भाचा. ४ उत्तम गुणांच्या समृद्धीनें म्ह० पुष्कळ उत्तम गुणांचें. ५ कोंवळ्या मनाचा. ६ द्रोणानें रचलेला चक्रव्यूह फोडण्याच्या इच्छेला. ७ व्यर्थ.

हा वत्सा रक्ताक्षा झाले त्वत्सु-गुण आजि घातकसे ॥
बा वाहिले परांचे तुजला हाणावयासि हात कसे ॥ ५६ ॥
मारिन जयद्रथ, करिन यश भुवनीं विशिख-जाल वितत रणीं ॥
हें न घडतां जळेन ज्वलनीं होतां चि अस्तंमित[1] तरणी ॥ ५७ ॥
कृष्णोत्तरा-सुभद्रा-धेनूंच्या मथुनि मोह-यवनातें ॥
भवनातें येउनि तो प्रभु विजयाच्या करी समवनातें[2] ॥ ५८ ॥
शयनीं निजोनि पाहे परमेश्वर परि न पळहि निज लागे ॥
चित्तीं चिंतेशि म्हणे त्वां वरिलों[3] कोण जडहि निजलो गे ॥ ५९ ॥
धर्म म्हणे जें झालें तें कथितों सर्व ऐक बा ज्ञात्या ॥
म्यां व्यूहीं द्वार करीं ऐशी केली स्वयेंचि आज्ञा त्या ॥ ६० ॥
द्वार करी शिरतां भी न व्यूहा जेविं सागरा मगर ॥
नुरवी कुमार पर-मद लवहि जसा धरुनि राग राम-कर ॥ ६१ ॥
होय जयद्रथ आम्हां हेतु कुमारास अंतरायास ॥
त्यास न निवारवें बा जेविं प्रबलास अंतरायास ॥ ६२ ॥
आम्हां त्या-क्षुद्र-वरें रुद्रे[4]-वरें करुनि वारिलें वाटे ॥
प्रभुनें सौभद्रासि न पांचांसहि आजि मारिलें वाटे ॥ ६३ ॥
देव निशीथीं शयनीं बैसे मग दारुकासि आणवुनी ॥
त्यासीं वदे प्रतिज्ञा पार्थाची प्रथम सर्व जाणवुनी ॥ ६४ ॥
भक्तीं जसा मदात्मा देहींहि तसा न दारुका रमला ॥
या विजय-वेद[5]-वचना घावा लागे सदा रुकार मला ॥ ६५ ॥
निज-रक्षणाधिक ध्वज-रक्षण राजासि दारुका पडतें ॥
मोलें राज-शिराहुनि बहु असतें काय दारु कापड[6] तें ॥ ६६ ॥
देव म्हणे अर्जुनजी व्हा सिद्ध रथस्थ तपन-कोपार्थ[7] ॥

---

१ अस्त पावलेला. २ सम्+अवन–उत्तम रक्षण. अर्जुनाची प्रतिज्ञा शेवटास जाऊन त्याचें रक्षण कसें होतें ह्याचा विचार करूं लागला हें तात्पर्य. ३ ज्यास चिंता लागली त्यास झोंप यावयाची नाहीं, हें तात्पर्य. ४ ह्या पुस्तकांतील जयद्रथ-कृत द्रौपदीहरण पहा. ५ वेदवाक्य जसें उल्लंघितां येत नाहीं तसें अर्जुन जें म्हणतो तें मला मोडतां येत नाहीं, हा आशय. ६ ध्वजाचें लांकूड व वस्त्र. ७ सूर्यास राग आणावा म्हणून; म्ह० तूं सूर्यापेक्षां तेजस्वी दिसलास म्हणजे त्यास राग येईल.

तैं कां न म्हणेल मनीं ब्रह्मपदार्थ[1]र्थ तप नको पार्थ ॥ ६७ ॥
करुनि प्रदक्षिणा द्विज-वृंदासि रथासि तो कवि नयानें ॥
मग वेंघोनि अधिष्ठी[2] जनकांकीं जेविं तोक विनयानें ॥ ६८ ॥
झाला निज-दासाचा ज्या स्तविति सु-धीर विप्र तो दास ॥
श्री-नलिनीचा[3] चक्र त्यजुनि धरि सुधो रवि प्रतोदास ॥ ६९ ॥
पांसु-निकरहि प्रभुच्या हेतु बहु-प्रीतिचा बुकासाच ॥
वाटे न कौस्तुभाला जपला जगदीश चाबुका साच ॥ ७० ॥
कृष्ण रथीं चढले मग तोहि चढे पुत्र सत्यकाचा[4] हो ॥
जेविं हर-रथीं विधि हरि दुसरा दृष्टांत सत्य काचा हो ॥ ७१ ॥
द्रोणें रचिला सैंधव-रक्षार्थ व्यूह-नायक व्यूह ॥
परमार्थ-रक्षणीं-क्षम[5] अ-परा-जित[6] जेविं काय कव्यूह[7] ॥ ७२ ॥
सेनाग्रीं वाजविती नर नारायण सखे दर-वरा जे ॥
ते मोरसे. भुजगसे ऐकति होउनि स-खेद रव राजे ॥ ७३ ॥
रोमांच-कंचुकाला कडकडतां कृष्ण-कंबु कंपि त्याला ॥
पर[8] सोडी भानाला सिंह-रवें जेविं जंबुक पिल्याला ॥ ७४ ॥
हांसोनि द्रोण म्हणे पार्था मजला न जिंकितां आजी ॥
जिंकावया जयद्रथ शक्य नव्हे मजसवें करीं आजी[9] ॥ ७५ ॥
ऐसें वदोनि मार्गण-वृष्टि तयावरि महा-तपा सोडी ॥
जैसी आटोपाया मत्त-गज-शिरीं महात पासोडी ॥ ७६ ॥
मारुति सात्यकि धृष्टद्युम्न तसे कुरु-बळासि तुडवीती ॥
कु-नृपति-राष्ट्रासि जसे दुष्काळ व्याधि चोर बुडवीती ॥ ७७ ॥
द्रोण न थारे[10] क्षण पर-कटकांत जसा न रुद्र थारावा ॥
तच्चाप-रवा पांडव भीति जसे अहि गरुडरथाऽऽरावा[11] ॥ ७८ ॥
इषुनीं झांकुनि घेती ते करुनि छत्र-केतु विध्वस्त ॥
तो अप्रकाश त्यांचा आप्त-कुमुद-खेद-हेतु विध्वस्त[12] ॥ ७९ ॥

---

१ सत्यलोकादिकांच्या प्राप्त्यर्थ. २ बसे. ३ श्री ( लक्ष्मी ) हीच कमलिनी, तिला रविच ( कृष्ण. ) ४ सात्यकि. ५ सुरस अर्थ अथवा मोक्ष ह्यास राखण्याविषयीं समर्थ. ६ अबाध-सर्वांस मान्य. ७ कवीची कल्पना. ८ मारुति. ९ युद्ध. १० स्थिर झाला नाहीं म्हणजे शत्रुसैन्यास अत्यंत दुःसह झाला; हें तात्पर्य. ११ गरुडाच्या शब्दास. १२ बाणांनीं झांकल्यामुळें त्यांचें अदर्शन, हें आप्तरूप कुमुदांच्या खेदास कारणभूत विधु+अस्त-चंद्रास्तच झालें.

अरि एक क्रोश पुढें लक्षुनि ज्या ज्या शरा विजय सोडी ॥
क्रोश पुढें गेल्या वरि मागें तो तो तदीय शिर तोडी ॥ ८० ॥
श्वश्रू-कर जेंवि शिरे गेहिं जरि न म्हणती सुना सीर ॥
व्यूहीं तेंवि कुरु-चमू धिक्कारुनि तो धरो-सुनासीर ॥ ८१ ॥
श्रमला जयद्रथाच्या जायासि न शक्त हा निकट कांहीं ॥
हें योजुनि वेढियला पार्थ करायासि हानि कटकांहीं ॥ ८२ ॥
त्या समयीं पार्थ म्हणे देवा संश्रित-शुभाकरा वाजी ॥
श्रमले कीं श्रम-शमना घडिभरि तरि रथ उभा करावा जी ॥८३॥
उतरे रथावरुनि नर पळवी कुरु-कटक कृत-पराभव तें ॥
करि निर्मनुष्य मंडल तो एक क्रोश आपणाभवतें ॥ ८४ ॥
स्वस्थ-स्वांतें क्रीडे कुरु-बळ-पंकज-वनांत पार्थ-करी ॥
मंत्र-बळें सु-सरोवर निर्मुनि शर-गृह अनातपार्थ करी ॥ ८५ ॥
शर जेंवि किरण भवतें जें कौरव-कटक तोचि परिवेष ॥
रविच कवि-मतें अर्जुन तेजें रूपें हि, भिन्न परि वेष ॥ ८६ ॥
निःशंक कुरु-बळीं नर जेंवि हरि-शतावृतीं हि शरभ वनीं ॥
पर्वी शिवालयींसा शिरला देवर्षि शीघ्र शर-भवनीं ॥ ८७ ॥
प्रभुनें मुक्त करुनि हय चुचकारुनिया हळूच कौशल्यें ॥
निज-बोधें श्रित-त्द्दत-दुःखेंशीं सकळ काढिलीं शल्यें ॥ ८८ ॥
अश्व पर-शरांहीं भव-तापांहीं जेंवि दास पोळविले ॥
ते देवें भक्ति-रसें जाणो स्व-चरण-रजांत लोळविले ॥ ८९ ॥
देवर्षि मुखीं घालुनि बोट म्हणे हा सुयोधना कुटिला ॥
भक्ति-बळेंच पहा हा परमेश्वर आजि अर्जुनें लुटिला ॥ ९० ॥
ज्याचें पद-नख दासां जें सुख दे तापल्या न तें विधु तो ॥
भगवान् स्वयें अहा या विजय-हयां सत्पदांस तेंवि धुतो ॥ ९१ ॥
ज्याच्या श्री-पद-दास्यें पावे तोखा सदा रमा-जाया ॥

---

१ अर्जुनाच्या रथाचा वेग इतका होता कीं, शत्रू एक कोसभर दूर असतां, त्याला मारण्याकरितां अर्जुन जो बाण सोडी तो त्या शत्रूचें शिर तोडीत आहे तोंच तो रथ त्या शत्रूच्या पुढें एक कोसभर जाई. २ पृथ्वीवरील इंद्रच. (अर्जुन.) ३ आश्रितांच्या कल्याणाची खाणच-अशा देवा. ४ ऊन न लागावें म्हणून. ५ बाणांच्या गृहांत. ६ परमात्मस्वरूपज्ञानानें. ७ साधूंचे पाय धुवावे त्याप्रमाणें.

हरितो मना नराचा होउनि तो खासदार माजा या ॥ ९२ ॥
पुरुषार्थद ते केले दास-हय-हितोदया कर खरारे ॥
झालासि दास-दास प्रभुही तूं बा दयाकर खरा रे ॥ ९३ ॥
प्रेमें माता बाळा न्हाणी कीं भक्त शंभुच्या लिंगा ॥
तैसाचि नर-हयां हरि कवि हो याचेचि पाय आलिंगा ॥ ९४ ॥
औषध सु-चणक कल्पी पीत-पट पसाहि तोबरा माप ॥
श्रित-साहित्य कराया न बरा मंदार तो बरा माप ॥ ९५ ॥
हरि हरित-तृणीं चारी तो प्रभु ज्याचा प्र-ताप दुर्वार ॥
हरि हरि तई करिति पद देउनि गणपति-शिरीं हि दुर्वा रं ९६ ॥
तोक-तृषा-शमना कीं क्षालाया तात तोक-मल पाणी ॥
प्यायाचें हीं वेंची, करि न पिउनि तेंचि तो कमल-पाणी ॥ ९७ ॥
उच्चैःश्रवा म्हणावा पार्थाच्या कां न नीच तुरगांनीं ॥
ज्यां पूजी तो ज्याचें यश नंदन-काननीं चतुर-गानीं ॥ ९८ ॥
योजुनि तुरग-वर रथीं आपण कुरु-बळ पहात देव रिघे ॥
मग विजयातें मर्दुनि रडवाया खळप हात दे वरि घे ॥ ९९ ॥

---

## आर्या-दाम-रामायणांतील.

श्री-पति झाला दश-रथ-सुत राम दशाननासि माराया ॥
मा राया जनकाची होय सुता त्रिजगदार्ति साराया ॥ १ ॥
सारा या प्रभुचीहे लीला गाती सदैव ही सु-कवी ॥

---

१ तो ( कृष्ण ) नराचा ( अर्जुनाचा ) खासदार होऊन या माजा ( माझ्या ) मना हरितो. ( हें नारदाचें म्हणणें आहे. ) २ ( आपल्या ) दासाच्या हयांचे कल्याणासाठीं. ३ पीतपट ( पीतांबर ) हाच तोबरा, व पसा हेंच माप. ४ कल्पवृक्ष. ५ लक्ष्मीपति. ६ हे उद्गारबोधक शब्द. ७ र ( रुदन. ) ८ कृष्ण. ९ ज्या कृष्णाचें यश नंदन-वनांत चतुरगानीं ( चतुरांच्या गायनांत ) आहे तो ( कृष्ण ) ज्यां पूजी ( ज्यांची सेवा करितो ) त्या तुरगांनीं इ० १० महादुष्ट. ११ 'दाम' ह्याचा अर्थ हार असा आहे. फुलें एकांत एक गुंतवून ज्याप्रमाणें त्यांचा हार करितात, त्याप्रमाणें ह्या आर्यांपैकीं प्रत्येक अर्धाचीं शेवटील तीन अक्षरें, दुसऱ्या अर्धाच्या आरंभीं आणिलीं आहेत; म्हणून त्या आर्या एकांत एक गुंतल्या जाऊन त्यांचा हारच बनून गेला आहे, ह्यावरून कवीनें ह्या रामायणास 'दामरामायण' हें नांव दिलें आहे. १२ स्वर्ग, मृत्यु व पाताल ह्यांतील लोकांचें दुःख. १३ श्रेष्ठ.

सु-कवी भव-जल-निधितें निरुपम सुख रसिक-जन-मनीं पिकवी[२]
पिक वीत[१]-बाध कवि या चरितांम्र[२]-वनांत कूजती[३]; सुरस ॥
सुर-सद्मींचा[४] लाजे, यश[६] हें श्री-शिव म्हणे शिवे[५] परिस ॥ ३ ॥
परिस सुवर्ण करितसे लोहा, जीवास शिवचि हा महिमा ॥
महि मान्यी[७] स्वर्गाही, स्व-कुल म्हणे धन्य यत्प्रभा अ-हिमा ॥४॥

---

## आर्या-निरोष्ठ-रामायणांतील.

ह्या रामायणांत कवीनें ओष्ठ्य वर्ण सर्वथैव वर्ज्य केले आहेत, म्हणून ह्यास ' निरोष्ठरामायण ' म्हटलें आहे.

गंगा-तीरीं राहे तृण-सदनीं[८] अ-जित, तों जिचा दादा[९] ॥
राक्षस राजा[१०] ती ये रति याची त्वद्धरा[११], धरी नादा ॥ १ ॥
तत्कर्ण-घ्राणांतें खड्गें दाशरथि[१२] धाकटा खंडी ॥
अ-जित-शरें[१३]-निहत स-कटक खर तें कथि रडत अग्रजा चंडी॥२॥
लंकेश कनक-हरिण श्री-दृगतिथि[१४] करि, अजी धरा यास[१७]॥
ऐसें ती सांगे, तें जाय अ-जित ही तया धरायास ॥ ३ ॥
कळतां खळ, अज हाणि[१५] शर, हरिसा तार आर्त-नाद करी ॥
हा सीते हा सखया ऐसा, अरि तत्क्षणींच[१६] धैर्य हरी ॥ ४ ॥
न त्रास धरी न निघे अग्र-ज-संरक्षणासि निज दीर ॥
याकरितां रागें जें सीता गांजी तया, त्यजी धीर[१६] ॥ ५ ॥

---

१ गेली आहे बाधा ज्यांची म्ह० निर्भय. २ (राम) चरित्र हेंच आंब्यांचें बन, त्यांत ३ गातात-शब्द करितात. ४ स्वर्गांतील सुरस-( अमृतरस ). ५ हे पार्वति. ६ हा रामाचा महिमा. ७ ( रामावतारामुळें ) पृथ्वी ही स्वर्गलोकास मान्य झाली; ( व ) यत्प्रभा ( ज्याची कांति ) अहिमा ( उष्ण ) ( तो सूर्य ) ( आपल्या वंशांत राम जन्मल्या मुळें ) स्वकुल धन्य म्हणे. ८ गवताच्या झोंपडींत. ९ वडील भाऊ रावण. १० शूर्पणखा. ११ मनोहर अशा रामाला, रति याची. ( रतिसुख मागे ), ( व ) नादा धरी. १२ लक्ष्मण. १३ सकटक ( ससैन्य ) खर ( ह्या नांवाचा राक्षस तिचा भाऊ ) अजितशरनिहत ( रामाच्या बाणानें नष्ट झाला ), तें ( वर्तमान ) चंडी ( रागीट शूर्पणखा ) अग्रजा ( रावणाला ) कथी, असा अन्वय. १४ सीतेच्या दृष्टीस पडण्याजोगा. १५ रामासारिखा. १६ ( सीतेचा ) धीर. १७ ह्याचा कर्ता लक्ष्मण.

अति-तीक्ष्णे-गी-शर-क्षत जाय रडत दाशरथि, तशांत शिरे ॥
दिक्कंठ अ-जित-सदनीं श्रीस हरि, शस्त्र गिळि जरी न जिरे ॥ ६ ॥

## आर्या-परंतु-रामायणांतील.

ह्या रामायणांतील प्रत्येक आर्येत 'परंतु' हा शब्द घालून कवीनें त्यास 'परंतु-रामायण' ही संज्ञा दिली आहे.

श्री-राम-चरित करितें मुक्त सकृत् किमपि सेवितां भाव ॥
पार न लागे दश-शत-वदनाहि, परंतु वाटतें गावें ॥ १ ॥
संकल्पेंचि सुर-द्विज-पीडके-रक्षः-क्षयें स्व-भजन-रसा ॥
देता; परंतु झाला दशरथ-भक्त-प्रियार्थ अज नरसा ॥ २ ॥
एकेचि मूर्तिनें प्रभु करिता त्रैलोक्य-कामना-पूर्ति ॥
क्रीडार्थ परंतु धरी चार त्रि-जगन्मनोहरा मूर्ति ॥ ३ ॥
ते राम भरत लक्ष्मण शत्रुघ्न कुमार सारसाक्ष जना ॥
दिसती बाळ, परंतु स्व-गुणांहीं हरिति गुरु-मुनींद्र मना ॥ ४ ॥
स्त्री-वध निंद्य परंतु ब्रह्मोक्तें तूर्ण ताटका मारी ॥
त्या प्रभु-यशासि मानी अमृताचें पूर्ण ताट कामारी ॥ ५ ॥
मुनि मिथिलेशि निघे कीं जनक स्वाध्वरें-विलोकना बाहे ॥
नेणार, परंतु म्हणे प्रभु शिव-चापेक्षणे-स्पृहा आहे ॥ ६ ॥
जातां गौतम-मुनिचा आश्रम लागे, पुसे कथा राम ॥
तत्काळ अहल्येचें चिर-नष्ट परंतु वाढवी धाम ॥ ७ ॥
अति-कठिण भर्ग-धनु अति-सुकुमार प्रभु, परंतु गुणें जोडी ॥
ओढी स-लील लीला-नर-तनु तें इक्षु जेविं गज मोडी ॥ ८ ॥

---

१ अति तीक्ष्ण जी ( सीतेची ) वाणी, तेच बाण त्यांनीं जखमी झालेला. २ दिक् म्हणजे दिशा, त्या १० आहेत; म्हणून लक्षणेनें दिक्शब्दाचा अर्थ १० असा घेऊन, 'दिक्कंठ' ह्याचा अर्थ दशकंठ ( रावण ) असा करावयाचा. ३ थोडें ही. ४ दशशत म्ह० हजार आहेत वदनें ( तोंडें ) ज्यास असा जो शेष त्याला ही. ५ देव आणि ब्राह्मण ह्यांस पीडा देणाऱ्या राक्षसांच्या क्षयानें. ६ दशरथ हाच भक्त त्याच्या संतोषाकरितां. ७ मनुष्याकारसा. ८ त्रैलोक्याच्या इच्छेची तृप्ति. ९ विश्वामित्राच्या सांगण्यावरून. १० आपला यज्ञ पाहण्यास. ११ महादेवाचें धनुष्य पाहण्याची इच्छा. १२ दोरी चढवी ( धनुष्य सज्य करी. ) १३ केवल मौजेनें मानवी तनु धारण करणारा ( राम ).

## आर्या-सन्मणि-मालेंतील.

"सत् म्ह० साधु हींच रत्नें ह्यांची माला." ह्या आर्यांपैकीं प्रत्येकींत एकेका साधूचें वर्णन केलें आहे, म्हणून ह्या प्रकरणास 'सन्मणिमाला' म्हटलें आहे.

जो ज्ञान-राज[1] भगवान् श्रवणें सु-ज्ञान दे वेद वाचा ॥
अवतार गमे अकरावा कां सुज्ञा न देव-देवाचा ॥ १ ॥
नमिला शमि-लास्य[2]-प्रद शांति-जलधि एकनाथ तो भावें ॥
शोभावें ज्याचें यश विश्वीं ज्या देव-वृंद लोभावें ॥ २ ॥
कर जोडून करिन मी न नृ-सिंह-सरस्वतीस[3] कां नमन ॥
सज्जन सेविति ज्याचें सद्यश व्हाया सु-तृप्त कान मन ॥ ३ ॥
स्वर्वल्लि-सुरभि-सुर-सरिदधिका[4] श्रित-सर्व-कामदा साची ॥
श्री-रामाची जैशी सत्कीर्ति तशीच रामदासाची ॥ ४ ॥
नमिला साष्टांग श्री-पति-भक्ति-रसज्ञ वामन-स्वामी[5] ॥
रस-भवना[6] तत्कवना मानीं या तेंवि वाम[7] न स्वा[8] मी[9] ॥ ५ ॥
वंदन नंदनसा मी करितों भावें मुकुंद-राजाला ॥
वश झाल्या सद्विद्या सत्कीर्ति सु-युक्ति सुंदरा[10] जाला ॥ ६ ॥
वंदाया मजला तो ब्राह्मण बहिरा[11] तथा पिसा मान्य ॥
जरि उकिरड्यांत पडला मळला न हिरा तथापि सामान्य ॥ ७ ॥
हरि-विजय-ग्रंथातें आधिं मग श्री-धरासि वंदीन ॥
शिव-वंदन-कामांहीं वंदावा प्रथम देव, नंदी न ? ॥ ८ ॥
श्री-मुक्तेश्वर कवि-वर यातें कोण न शुभेच्छु वंदील ॥
बंदी लक्ष जयाचे ज्याचें यश भव्य जेंवि मंदील ॥ ९ ॥
कीर्तन-सुखार्थ झाला अवतारचि अमृतराय जीवाचा[12] ॥
भलत्या मुखांतुनि अशी सु-रस-खनि निघेल काय जी वाचा ॥ १० ॥
कर जोडितों सुटाया तनु-रूपा ताप-हेतु कारा मी ॥

---

१ ज्ञानदेव. २ शांतिप्रधान अशा जनाला लास्य ( नृत्य ) लक्षणेनें आनंद देणारा. ३ ह्या नांवाच्या साधून. ४ कल्पलता कामधेनु व भागीरथी ह्यांच्या ( कीर्तीपेक्षां ) अधिक. ५ ( कवि ) वामन पंडित. ६ शृंगारादि रसांचे गृह. ७ सुंदर. ८ स्वकीय कवनास. ९ मी मोरोपंत. १० सुंदर स्त्रिया. ११ ह्या नांवाचा. १२ बृहस्पतीचा.

कीं स-तनु मुक्त झाला योगाची सिद्धि हे तुकारामीं ॥ ११ ॥
माया हे संसृतिची जाळूनि स-शोक तो कवी रमला ॥
राम-पदाब्जीं अलिसा, बहु-मत सु-मुदोंक[1] तो कबीर मला॥१२॥
साधु म्हणावे म्हणती नर माधवदास साधु याला जे[2] ॥
अति-सारीं पट ज्याचे न रमा-धव दाससा धुया लाजे ॥ १३ ॥
नरहरिनामा पावे[3] संत न सोनार दास-मान कसा ॥
तरला करुनि भवाचा अंत नसो नारदासमान कसा? ॥ १४ ॥
लाजविलेचि निज-यशें दुग्धाब्धि-तरंग[4] रंगनाथानें ॥
भक्ति ज्ञानें ज्याची मति पोषी जेविं अंगना थानें ॥ १५ ॥

---

## आर्या-धर्मोपदेश-प्रकरणीं.

सत्यातें जोडावें सुज्ञें धर्मासि पळ न सोडावें ॥
पाशांतें[5] तोडावें धीरें न कदापि पाप जोडावें ॥ १ ॥
बागा धर्माच्या तों कोणी सोडूं नयेचि कासेतें ॥
निष्फल होतीं मेघें त्यजिलीं आलींहि जीविका सेतें[6] ॥ २ ॥
अंभो-दास पहाती जैशीं पसरूनि नित्य आं[7] शेतें ॥
धर्मासि तशीं भूतें[8] करि पूर्ण समर्थ हाचि आशेतें ॥ ३ ॥
निज-हित-कर धर्माचें कुशलें विटवूं नयेचि मन कांहीं ॥
यापरि[9] पोषण पालन लालन करिजे न अन्य जनकांहीं ॥ ४ ॥
साधु म्हणति[10] जो न करी धर्माशीं नीतिशीं विरोधा त्या ॥
रक्षीं व्यसनीं, तदितर जन उदकीं लोष्टसा विरो, धात्या ॥ ५ ॥

---

१ ( सु+मुत्+ओक )-उत्तम आनंदाचें स्थान. २ जे नर माधवदास याला साधु म्हणती ( ते ) साधु म्हणावे; असा अन्वय. ३ अन्वय- ( जो ) भवाचा अंत करून तरला, (तो) सोनार ( जातीचा ) नरहरिनामा संत दासमान ( भगवद्भक्ताची योग्यता) कसा न पावे ! (आणि) कसा ( कसोटीस लाविला असतां ) नारदासमान नसो ( काय ) ! ४ दुग्ध+अब्धि+तरंग-क्षीरसागराच्या लाटा. ५ मायापाशास. ६ पिकाला आलेलीं ही शेतें ( जर ) मेघें त्यजिलीं ( तर ) निष्फल होतात. ७ आ पसरून=मोठ्या उत्कंठेनें. ८ हा शब्द पाहोंत ह्या अध्याहृत क्रियापदाचा कर्ता. ९ धर्माप्रमाणें. १० साधु म्हणती हे धात्या ( ईश्वरा ) जो धर्माशीं ( व ) नीतिशीं विरोधा न करी इत्यादि.

म्हणऊनि अनुसरावें सुज्ञें न क्रोध-लोभ-काम-मता ॥
पतनार्थ कां अहंता पोषावी गा तशीच कां ममता ॥ ६॥

---

## संशय-रत्न-माला.

संसारसागरांत बुडत असतां परमेश्वरानें आपणास तारावें म्हणून मोरोपंतानें त्याचा धावा केला. भक्ताविषयीं अत्यंत प्रेमळ असा ईश्वर भक्ताच्या हाकेसरसा धांवत यावयाचा, असें असून त्याला यावयास उशीर लागला; हें पाहून मोरोपंत अनेक प्रकारचे संशय घेत आहे. ते पुढील आर्यांत वर्णिले आहेत, म्हणून ह्या प्रकरणास 'संशय-रत्न-माला' ( संशयरूप रत्नांची माला ) असें नांव दिलें आहे.

उठतां बहु त्वरेनें कोठें जातां असें तुम्हां देवी ॥
पुसतो झाली जाणो, पुसतां[1] ज्ञाता पुढें न पद ठेवी ॥ १ ॥
किंवा नारद आला आलोपीत[2] स्वकीयें[3] सच्चरितें ॥
प्रेमळ गीत तुम्हांला हॅरि[4] हरिणापरिस बहुत वश करितें ॥ २ ॥
कीं माझें दुर्दैव प्रभुच्या मार्गांत आडवें पडलें ॥
शरणागेत-भय-शमना[5] यास्तव येणें तुझें नसे घडलें ॥ ३ ॥
किंवा मजहुनि दुसरा कोणी बहु दीन दास आढळला ॥
तच्छुभ-दैव-समोरें[6] त्यावरि करुणा-घन प्रभू वळला ॥ ४ ॥
अथवा येतां[7] झालां तन्मय शिव-तांडवांत कैलासीं ॥
केला असेल गरुडें गर्व पुन्हां काय त्याच[8] बैलासीं ॥ ५ ॥

---

१ कोणी कामाकरितां बाहेर जात असतां त्याला कोठें जातां ? असें कोणी विचारिलें तर तो अपशकुन समजून त्यानें बाहेर जाऊं नये असें आहे; ह्या गोष्टीस अनुलक्षून हें लिहिलें आहे. २ गात गात. ३ तुमचीं स्वतःचीं. ४ अहो हरि. ५ शरण आलेल्याचे भय नाहींसें करणाऱ्या. ६ त्याचें शुभकारक दैव हाच समीर म्हणजे वायु, त्यानें. ७ येत असतां ( वाटेंत ) कैलासपर्वतावर शिवाच्या नृत्यांत तर तुम्ही तल्लीन झालां नाहीं नां ! ८ एकदा विष्णु कैलासीं शिवदर्शनार्थ गेला असतां, त्याचें वाहन गरुड ह्यानें बळाच्या गर्वानें नंदीच्या नाकांत बोटें घालून त्याचा उपहास केला; तेव्हां त्यास मोठा क्रोध येऊन त्यानें गरुडाला श्वासानें नाकांत ओढून घेतलें; अशा रीतीनें त्याच्या गर्वाचा परिहार केला; अशी कथा आहे.

बहुधा बळिचें द्वार क्षणभरि हि सोडितां नये देवा ॥
न चुकावी छल-पाप[1]-प्रायश्चित्तार्थ साधुची सेवा ॥ ६ ॥
प्रायः सु-मुहूर्ताचा शोध करायासि लागली वेळ ॥
होय महत् कार्य परी प्रभुचा तों नित्य सहज हा खेळ ॥ ७ ॥
कीं मी भागवतांचा[3] भाग असें आणिलें मनीं स्वामी ॥
हें सत्यचि परि कैंचा हा भेद प्रभु-वरा तुझ्या धामीं ॥ ८ ॥
किंवा तुज एकाकी पाहुनि खळ दैत्य आडवे[4] आले ॥
फुटतां सागर सिकता-सेतूचें[5] काय त्यापुढें चाले ॥ ९ ॥
किंवा तुज गुंतविलें भजकीं, परि ते दयार्द्र या रंकीं ॥
उद्धरित्यासि न सज्जन गुंतविती गाय कष्टतां पंकीं ॥ १० ॥
किंवा चुकतें कांहीं स्तवनीं तेणेंचि मागुता बससी ॥
तरि हें मन्मूर्खत्व प्रभु तूं दोषज्ञ ही तसा नससी ॥ ११ ॥
कीं कळवाया कर्मे धर्म तुज दाविली असेल वही[6] ॥
त्वद्दृष्टि-पुढें राहे ऐसा पापांत त्यां नसे लव ही ॥ १२ ॥
कीं[7] न श्रवणीं गेली ही माझी हाक हा कसा तर्क ॥
कशि गुरु-जनीं सतीची शिवला ज्या कुमुदिनीस असर्दर्क ॥१३ ॥
अथवा स्वस्थचि अससी कीं घेतो नाम रक्षणीं शूर ॥
हें सत्य परि प्रबळ हि बळें[9] दुर्बळ जरि रणीं धणी दूर ॥ १४ ॥
कीं भीतो भ्रांत वृथा मृग-जळ-मग्नासि काय तारावें ॥
सत्यचि हें, परि शिशुचें भय जाया बागुलासि मारावें ॥ १५ ॥
कीं कांहीं व्रत-नियमीं बोलों चालों नये असें झालें ॥
तरि दीन-रक्षणाहुनि अधिक-फळें[10] व्रत कधीं मना आलें ॥१६ ॥

---

१ वामनावतारीं (बळीचा) छळ केल्यामुळें जें पाप लागलें त्याच्या प्रायश्चित्ता-करितां. २ मजसारख्या मोठ्या पातक्यास तारणें हें महत्कृत्य खरेंच. ३ मी (ईश्वर) भक्तांच्यामात्र वाट्यास येराणा म्ह० त्यांसच प्राप्त होणारा. ४ युद्धा-करितां आडवे आले. ५ वाळूच्या बांधाचें. ६ यम हा प्राणिमात्राची सर्व कर्में जींत लिहून ठेवीत असतो ती. अशा माहपातकी मनुष्यास तारणें योग्य नाहीं, असें म्हणून यमानें तुला माझीं पातकें दाखविलीं असतील.—असा संशय. ७ पतिव्रता द्रौपदी हिची. ८ खलदुःशासनरूप सूर्य. ९ सैन्य. १० (दीन-रक्षणापेक्षां) अधिक आहे फळ ज्याचें असें व्रत.

कीं हाक ऐकतांचि प्रभुला हा रक्षणार्ह सें वाटे ॥
वाटे या दुःशीलें-ग्रीष्मीं नव नव दया-नदी आटे ॥ १७ ॥
कीं पावावें समयीं सं-दय मनांतून योजिलें जरि तें ॥
तरि जेंवि रुक्मिणीचें चित्त माझें अ-धीर मन करितें ॥ १८ ॥
किंवा पुराण-पुरुषा संप्रति बहु भागलासि या कामीं ॥
तुज नीज लागली तों सजलों मारावयासि हाका मी ॥ १९ ॥
किंवा बरी परीक्षा केल्यावांचूनि न प्रसाद करां ॥
तरि वरि तसाच आंतहि उगाळितां कोळसा प्रयास करा ॥ २० ॥
कीं धाडिलें पुढें निज नाम करी सर्व सिद्धता आधीं ॥
ऐसें प्रभो म्हणावें तरि तुमचीं चरण-सारसें सौधीं ॥ २१ ॥
कीं आर्जविला नाम-प्रतिनिधि हा अमृत उधळितो स्वैर ॥
न पुसे, न भी, न ऐके, यास्तव दोघांतें लागलें वैर ॥ २२ ॥
कीं संप्रति अ-भय दिलें कलिला चालावया बरें राज्य ॥
परि कोण प्राणि-स-दय शिंपील बळें दवानळीं आज्य ॥ २३ ॥
किंवा म्हणसि समर्थोऽहं कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुं ॥
दीनाऽवनाविणें क्षण देइल दयिता दया कशी वर्तुं ॥ २४ ॥
कीं अक्ष-क्रीडेनें हरिलें मन, सर्व कार्य जी चुकवी ॥
तरि बद्ध-मूळ एकचि भजदवन-व्यसन वर्णिती सु-कवी ॥ २५ ॥

---

१ हा मी (मोरोपंत) जो अत्यंत दुष्टस्वभावाचा हाच ग्रीष्मऋतु ह्यांत (हे ईश्वरा) तुझी. २ दयारूप नदी आटे (आटली). ३ तुम्ही जरी मला प्रसंगीं पावावयाचा संकेत केला असेल, तरी तुम्ही अतिप्रिय व दुर्मील असल्यामुळें विवाहाचे पूर्वीं रुक्मिणीचें मन जसें तुम्हांविषयीं अधीर झालें होतें, तसें माझें मन अधीर झालें आहे. असा भाव. ४ म्हातारा. पक्षीं अनादि. ५ दीनांचा उद्धार करण्याच्या कामांत. ६ हातास श्रम (मात्र होईल). ७ ज्यांना डामडौल आवडत नाहीं अशीं. ८ तुझा नाम हाच प्रतिनिधि ह्याचे (कोणी) आर्जव केलें असतां तो यथेच्छ मोक्ष देतो; व तुम्हाला पुसत नाहीं इ०. ९ तुम्हा दोघांत. १० समर्थः (समर्थ) अहं (मी) कर्तुं (कोणती ही गोष्ट करावयास) अकर्तुं (को०गो० न करावयास), अन्यथा कर्तुं (को०गो० उलट करावयास). ११ दीनांच्या रक्षणावांचून. १२ तुमची आवडती दया. १३ वागावयास. १४ सोंगटीं खेळण्यानें. १५ (कार्य करण्यांत) विघ्न आणितें. १६ दृढ झालेलें. १७ भक्तांचें रक्षण हेंच व्यसन (छंद).

कीं वैकुंठीं पुष्कळ भक्त, तिळ स्थळ नसे, नसावेंची ॥
वसवा पुरें, पुरे कां म्हणतां, धनवंत कण कसा वेंची[1] ॥ २६ ॥
कीं बहु काळ विसरला फारचि संकोचला[2] सखा लाजे ॥
येत असेल हळु हळू म्हणुनचि एकहि न पादुका वाजे ॥ २७ ॥
कीं श्री-भुज-बंधांतुनि व्हावें त्वां मुक्त म्यांहि तेव्हांची ॥
स्त्री-जित नसोनि होते स्त्रीची समजाविशीच केव्हांची ? ॥२८ ॥
कीं नाम स्पर्श-मणि स्पर्शें परि काय करिल खापर मी ॥
स-दयहि घालील कसा दुर्दैवाला सुखीं सखा परमीं ॥ २९ ॥
कीं प्रथम मदपराधें तारूं ना म्हणुनि वाहिल्या आणा ॥
प्रभुजी पुरे प्रतिज्ञा, भारत-रण-वृत्त[3] तें मनीं आणा ॥ ३० ॥
कीं याचकांसि देतां सरले चारीहि[4] मुक्ति-धन-राशी ॥
भक्तिच मज द्या, द्यावें देवाला अमृत, योग्य न नराशी ॥ ३१ ॥
कीं जरि म्हणाल असतां जन्म-शुचि[5] स्व-पद-नीरजा मिळतो ॥
तरि झकवितां मला अजि चुकला नव्हताचि कीं अजामिळ तो?॥३२॥
कीं वाटलें[6] खळाला मुक्ति न द्यावी जशी सुधा सर्पा ॥
तरि ती अर्घादिकांला द्या, सु-वरा भक्तिमात्र मज अर्पा ॥ ३३ ॥
कीं अ-कृपा नावडती आवडती स्त्री कृपा तिचें[7] भाज्य ॥
लोक-त्रयांत देवा पहिलीचें काय एक मी राज्य[8] ॥ ३४ ॥
कीं गमलें जरि आधीं[9] म्हणतों दावा स्व-पाद यां लोकीं[10] ॥
जो जो वांछिल जें जें तें द्यावें हें मुधा दयाळो कीं ? ॥ ३५ ॥
कीं आज काल ज्याचा तेणें अधिकार घेतला रागें ॥
तरि हें अ-श्रद्धेय[11] प्रभ्वंतर[12] ऐकिलें नसे मागें ॥ ३६ ॥

---

१ वेंचतां ( सांचवून ठेवतो ). २ केवढा वेळ ! ३ कृष्णानें 'मी शस्त्र धरणार नाहीं' ही प्रतिज्ञा अर्जुनाचें रक्षण करण्याकरितां मोडिली; ह्या कथेस अनुलक्षून हें लिहिलें आहे. ४ सलोकता, समीपता, सरूपता आणि सायुज्य असे मुक्तीचे चार प्रकार आहेत. ५ जन्मापासून पवित्र. ६ हरिविजय ( श्रीधर ) ह्यावरील टीप पहा. ७ अकृपेचें. ८ अधिकार चालविण्याचें स्थान. ९ योग्यता येण्याच्या पूर्वीं. १० मृत्युलोकीं आपलें दर्शन ( मला ) द्या असा अर्थ. ११ विश्वास न ठेवाया जोगें. १२ दुसरा ईश्वर.

कीं भेटि बहु-दिसां भय भेटाया दीन-बंधुला वाटे ॥
तरि भेटावें विधिनें गेले जाताति साधु ज्या वाटे ॥ ३७ ॥
कीं स्त्री-पूर्व-शिखंडी त्यातें समरांत भीष्म पाहेना ॥
मी ही पहिला पापी तैसें करितां सु-कीर्ति राहेना ॥ ३८ ॥
कीं भीशी मज एका उद्धरितां लागतील फार झटें ॥
तरि कोणाहि न कळतां न्यावा झाकूनि दास पोत-पटें ॥ ३९ ॥
कीं लक्ष-भोजनापरि केला संकल्प संपला देवा ॥
तरि दाते क्षुद्विकला मग न म्हणति काय या बसा जेवा ॥ ४० ॥
कीं एक मीच उरलों पापी, हें बीज ठेविलें जतन ॥
वतेन स्वकीय मज कां करितें त्वन्नाम मंगलायतन ॥ ४१ ॥
कीं कार्य-बहुत्वें तुज फावेना यावया जगत्पाळा ॥
तरि रूप घ्या दुजें, ती विद्या कंठीं वसे जशी माळा ॥ ४२ ॥
कीं मागें गुप्त उभा असिस प्रेमें उभारुनी बांहे ॥
तरि काय बाळकाचे तूं सादर बोल ऐकशी बा हे ॥ ४३ ॥

---

## अभंग-सीता-गीत.

राम वनवासांतून आल्यावर सीतेच्या जावा तिला चौदा वर्षांत घडलेली हकीकत विचारूं लागल्या. तेव्हां सीतेनें त्यांस अयोध्येस परत येईपर्यंत झालेलें सर्व वर्तमान सांगीतलें; तें ह्यांत वर्णिलें आहे.

यज्ञासाठीं भूमी नांगरीतां धन्या ॥ सांपडली कन्या सीता देवी ॥ १ ॥
जनकाची पुत्री दुर्जना दुर्मिळा ॥ ती भार्या उर्मिळा लक्ष्मणाची ॥ २ ॥

---

१ बारा वर्षानंतर आप्ताची भेट घेणें झाल्यास सांबाच्या देवालयांत भेट घ्यावी, असा कांहीं विधि आहे; त्या विधीनें. २ पूर्वी स्त्री असून (पुढें पुरुष झालेला) शिखंडी–कौरव पांडवांच्या युद्धांत भीष्म आटोपेना, तेव्हां पांडवांनीं, शिखंडीला पुढें करून मागून अर्जुनानें बाण मारावे, असें योजिलें. ह्यांत उद्देश हा कीं भीष्म स्त्रीवर कधीं बाण सोडणार नाहीं. ह्या गोष्टीस लक्षून हें लिहिलें आहे. ३ मी पूर्वींचा पापी म्हणून मला न पाहणें असें कराल तर. ४ भुकेनें व्याकुल झालेल्यास. ५ हक्काची जागा. ६ तुझें परम मंगलकारक नांव माझ्या मुखीं येत असतां मी खचीत तरल्यावांचून राहणार नाहीं हा भाव. ७ कल्याणाची जागा. ८ ह्यांत ९ धन्य जो जनकराजा त्यास.

जनकाचा बंधु होता एकनिष्ठ ॥ वयानें कनिष्ठ श्रेष्ठ गुणें ॥ ३ ॥
तेणें भरतासी मांडवी दुहिता ॥ दिली जी सु-हिता[1] दोहीं कुळीं ॥ ४ ॥
शत्रुघ्नाला दिली दुजी श्रुतकीर्ती ॥ जीची गाती कीर्ती पतिव्रता ॥ ५ ॥
चवघी बहिणी भाग्यें झाल्या जावा ॥ त्यांचा गीतीं[2] गावा सु-संवाद ॥ ६ ॥
वन-वास-वृत्त सीतेसी पुसती ॥ प्रेमें त्या सु-सती तिघी जणी ॥ ७ ॥
सीता म्हणे ऐका वन-वास-कथा; ॥ परी मनीं व्यथा न धरावी ॥ ८ ॥
चित्रकूटाहूनी पादुका घेऊनी ॥ वियोग देऊनी[3] तुम्ही आलां ॥ ९ ॥
आम्हीही तेथूनी तशींच निघालों ॥ वनांत रिघालों तिघे जणें ॥ १० ॥
लक्ष्मण भावोजी मागें पुढें स्वामी ॥ मज आहें धार्मी ऐसें वाटे ॥ ११ ॥
न बाधेची मज उष्ण क्षुधा तृषा ॥ तुम्हांपाशीं मृषा न बोलावें ॥ १२ ॥
जेव्हां कांहीं वाटे चालतां मी भागे ॥ मुरडोनी मागें विलोकीती ॥ १३ ॥
बाई काय सांगों स्वामीची ती दृष्टी ॥ अमृताची वृष्टी मज होय ॥ १४ ॥
अत्रीच्या आश्रमीं नेलें मज वाटे ॥ माहेरची वाटे खरेंखुरें ॥ १५ ॥
अनसूया सती करी वेणीफणी ॥ आनंदाची धणी दिली मज ॥ १६ ॥
आजवरी ओली चंदनाची ऊटी ॥ आली नाहीं तुटी माळा-गुणीं ॥ १७ ॥
ऋषींतें वंदीत गेलों गोदातटीं ॥ जेथें पंचवटी पुण्य-स्थान ॥ १८ ॥
भावोजीनीं केली माझी बहु सेवा ॥ ती त्या महादेवा ठावी असे ॥ १९ ॥
तेथें शूर्पणखी भार्या व्हाया आली ॥ तिला माझी भ्याली चित्त-वृत्ती ॥ २० ॥
भावोजीनीं तिचा कर्ण-नासा[4]-छेद ॥ केला कीं ते वेद-शास्त्रार्थज्ञ[5] ॥ २१ ॥
तिचा भाऊ खर होऊनीया क्रुद्ध ॥ करावया युद्ध आला बाई ॥ २२ ॥
चवदा सहस्र राक्षस पापिष्ठ ॥ रणीं केले पिष्ट स्वामीनीं ते ॥ २३ ॥
तिणें घ्राण-रक्तें मूख मळवीलें ॥ वृत्त कळवीलें रावणासी ॥ २४ ॥
छळाचा उपाय मनीं आठवीला ॥ दुष्टें पाठवीला माया-मृग[6] ॥ २५ ॥
स्वर्ण-रत्न-मय मृग म्यां देखीला ॥ तो सत्य लेखिला[7] मनामध्यें ॥ २६ ॥
गृहीं आणावया मागें हरीणा मी ॥ दुःख परीणामीं नेणोनीया ॥ २७ ॥
मज रक्षावया लक्ष्मणा ठेवूनी ॥ निघाले घेऊनी धनुर्बाण ॥ २८ ॥
माया-मृगामागें जगदेक[8]-शूर ॥ गेले बहू दूर अरण्यांत ॥ २९ ॥

---

१ फार हितकारक. २ गीतांत. ३ आम्हांला वियोग दुःख उत्पन्न करून. ४ कान व नाक यांचा छेद. ५ वेद आणि शास्त्र ह्यांचा अर्थ जाणणारे. ६ कपटानें झालेला मृग. ७ खरा मानिला. ८ जगतामध्यें अद्वितीय शूर.

कपटी राक्षसें जाणोनीया प्राण ॥ घ्यावयासी बाण मोकलीला ॥ ३० ॥
तो बाण लागतां हृदय विदारी ॥ दुष्ट हाक मारी स्वामीवाणी ॥ ३१ ॥
हा सीते हा बंधो लक्ष्मणा ये धांवें ॥ अंतकाळीं पावें भेटावया ॥ ३२॥
मज वाटे माझ्या स्वामींचीच हाक ॥ शिरें कंप धाक हृदयांत ॥ ३३ ॥
मी म्हणे भावोजी धांवा रक्षा प्राण ॥ हे घ्या चाप-बाण उठा वेगीं॥३४
भावोजी म्हणती राक्षसाची माया ॥ कोण रामराया पाहों शके ॥ ३५॥
वाटलें तें वाक्य सत्य परी खोटें ॥ झालें दुःख मोठें माझ्या मनीं ॥३६॥
न वदावें तेंची बोलील्यें मी कोपें ॥ चित्त शब्द-रोपें विदारीलें ॥ ३७ ॥
वांछितोसी दुष्टा अग्र-जांचा घात॥ माझ्या आंगा हात लावावया॥३८॥
हात लावीतांची सोडीन मी प्राण ॥ शिरीं पाद-त्राण कोण वाहे॥ ३९ ॥
माझ्या दृष्टीपुढें नको राहों जाच ॥ नरकींचा जाच मूर्त तूंची ॥ ४० ॥
ऐशी बाई माझी ऐकतांची वाणी ॥ डोळां आलें पाणी भावोजींच्या॥४१
मातेनें दापीतां वत्स पित्याकडे ॥ जाय तैसें घडे लक्ष्मणासी ॥ ४२ ॥
साधूसी गांजीतां झालें सद्यो फळ ॥ सज्जनाचा छळ करूं नये ॥ ४३ ॥
वाटेंत धनुष्यें ओढोनिया रेघ ॥ गेले दया-मेघ स्वामीकडे ॥ ४४ ॥
तों आला रावण होवोनी संन्यासी॥न कळे अन्यासी छद्म त्याचें॥४५॥
भिक्षा द्याया गेल्यें रेघेच्या बाहेर ॥ सासूर माहेर बुडवाया ॥ ४६ ॥
न लंघीतें जरी धनुष्याची रेखा ॥ तरी त्याचा लेखा काय होता ॥४७॥
रेघेच्या बाहेरी जसा दिला पाय ॥ झाला महा-काय दश-मुख ॥ ४८ ॥
जसा हरीणीतें हरीतो लांडगा ॥ तसा तो दांडगा हरी मातें ॥ ४९ ॥
त्या पाप्याच्या स्पर्शें देह हा कोमेला॥आकाशीं तो मेला रथीं चढे ॥५०॥
हा राम लक्ष्मण ऐशी हाक माजी ॥ जटायु मामाजी आयकती ॥ ५१ ॥
सखे दशरथ-मामांजीचे आप्त ॥ सोडवाया प्राप्त झाले दैवें ॥ ५२ ॥
जातीचे ते गृध्र वृद्ध मोठे शूर ॥ रथ केला चूर रावणाचा ॥ ५३ ॥
चंचू- नखायुध गृध्र युद्ध-दक्ष ॥ रावणाचें वक्ष विदारीती ॥ ५४ ॥

१ रामचंद्राच्या सारखी. २ शब्दरूप बाणानें. ३ वडील भावाचा. ४ पाय राखणारा—जोडा. ५ तत्काळ. ६ दयेचा घन ( लक्ष्मण ). ७ रावणाचा पाड. ८ मोठें आहे शरीर ज्याचें असा. ९ एका गिधाड पक्ष्याचें नांव, तो दशरथराजाचा मित्र होता म्हणून त्यास सीतेनें मामाजी म्हटलें आहे. १० चोंच आणि नखें हींच आहेत आयुधें ज्याचीं.

अन्यायें रावण छेदी त्यांचे पक्ष ॥ मज वाटे लक्ष-बंधू-घात ॥ ५५ ॥
मूर्छीत मामाजी पडले भूवरी ॥ स्कंधीं वाहे अरी मला बाई ॥ ५६ ॥
रडतां काढीले पांच सात नग ॥ वस्त्र-खंडीं मग बांधीले म्यां ॥ ५७ ॥
पर्वतीं वानर देखिले म्यां मग ॥ त्यांमध्यें ते नग सोडियेले ॥ ५८ ॥
शतें[1]-गांवें सिंधू त्यांत एक लंका ॥ तेथें ने कलंका लावावया ॥ ५९ ॥
नेऊनीया ठेवी अशोक-वनांत ॥ न शोक मनांत माये माझ्या ॥ ६० ॥
सहस्र राक्षसी करीती रक्षण ॥ चिंतो[2]-तीर क्षण न सांपडे ॥ ६१ ॥
दिव्यान्नाचा[3] ज्यांत नानापरी थाट ॥ धाडी नित्य ताट शक्र[4]-भार्या ॥६२॥
दिव्यान्नाचें ताट ये मज जवळ ॥ भक्षीं मी कवळ एक दोन ॥ ६३ ॥
फिरले घेऊनी मारीचाचे[5] प्राण ॥ दिव्य धनु-बाण[6]-पाणी मागें ॥ ६४ ॥
मार्गीं लक्ष्मणजी करीती वंदन ॥ श्री-रघु-नंदन-चरणांतें ॥ ६५ ॥
म्हणती वत्सा त्वां कां आज्ञा मोडिली ॥ एकटी सोडिली कां ती वनीं॥६६॥
भावोजीनीं सर्व वृत्त कळवीलें ॥ मुख मळवीलें अश्रू-पातें ॥ ६७ ॥
ऐकोनी बोलीले स्वामी झालें खोटें[7] ॥ राक्षसांनीं मोठें विघ्न केलें ॥६८॥
दोघांच्या हृदयीं धडधड करी ॥ आले झडकरी धांवोनीया ॥ ६९ ॥
पर्ण-शाळेमध्यें देखीले कावळे ॥ स्वामींचा मावळे धैर्य-सूर्य ॥ ७० ॥
केला आधीं फार शोध मग शोक ॥ धन जातां लोक करी जैसा ॥७१॥
शोधीतां वनांत मामाजी पाहीले ॥ धरूनी राहिले कंठीं प्राण ॥ ७२ ॥
पुसती बापाजी झाली हे कां गती ॥ मामाजी सांगती अर्ध-शब्दें[8] ॥ ७३ ॥
स्वामीपाशीं माझें सांगतां हरण ॥ पावले मरण शोक-भरें ॥ ७४ ॥
हा तात हा तात म्हणूनी रडले ॥ मूर्छीत पडले घडीभरी ॥ ७५ ॥
मामाजीची सांग संपादिली क्रिया[9] ॥ त्या काळीं हे मियां[10] नाठवीली ॥७६॥
पुन्हा वनीं मातें रडत शोधीती ॥ लक्ष्मण बोधीती नाना-यत्नें ॥ ७७ ॥
आलिंगल्या वल्ली वियोगें भ्रमले ॥ शोधीतां श्रमले रात्रंदीस ॥७८॥
वनीं कबंधानें[11] केला होता घात ॥ चार कोस हात लांब त्याचे ॥ ७९ ॥

---

१ सुमारे चारशें कोश. २ काळजीचा शेवट, मी नेहमीं चिंताग्रस्त असें हा भाव. ३ स्वर्गांतील अन्न. ४ इंद्राणी. ५ मारीच हा मृग झालेला राक्षस. ६ धनुष्य आणि बाण ज्याच्या हातीं आहेत असा. ७ वाईट. ८ प्राणव्याकुळ झाल्यामुळें शब्दोच्चार पूर्ण होत नव्हता, म्हणून अस्पष्ट शब्दांनीं. ९ मेलेल्याचे उत्तर संस्कार. १० मी ( सीता ). ११ राक्षसविशेष; ह्यास डोकें नव्हतें.

धरीतां खड्गांनीं केला भुज-च्छेद ॥ शाप-तांप देख निवारीला ॥८०॥
मतंग-मुनीच्या आश्रमीं शबरी ॥ व्हाया यश बरी युक्ति सांगे ॥ ८१॥
हनुमंतावरी केली अनु-कंपा ॥ या प्रभूनीं पंपा-सरोवरीं ॥ ८२॥
सुग्रीवासीं भेटी ऋष्यमूकीं झाली ॥ त्याची दृष्टी धाली पाहतांची ॥८३॥
त्याच्या मूखें वृत्त आयकीलें मग ॥ आणूनी ते नग दाखवीले ॥ ८४ ॥
सु-ग्रीव वानर सूर्याचा तनय ॥ ज्या स्वमीं अ-नय नाहीं ठावा ॥८५॥
दोषावीणें रागें सु-ग्रीवासी जाची॥त्याच्या अग्रजाची बुद्धी खोटी॥८६॥
बंधूची स्त्री वाळी बळात्कारें भोगी॥सु-ग्रीव तो जोगी केला होता॥८७॥
एकें बाणें वाळी स्वामीनीं मारीला ॥ सु-ग्रीव तारीला संकटांत ॥८८॥
वानरांचें राज्य दिलें सु-ग्रीवाला ॥ तो फार निवाला ऊपकारें ॥ ८९ ॥
माजी वार्ता कोणा न कळे किमपी ॥ पाठवीले कपी शोधावया ॥९०॥
न लागतां माझा शोध कपी सारे ॥ म्हणती ते हा रे दुरैदृष्टा ॥ ९१ ॥
मारील सु-ग्रीव लंघीला आवधी ॥ मरावें नव-धीं करूं नये ॥ ९२ ॥
समुद्राच्या तीरीं पर्वतीं रडले ॥ मराया पडले उपोषीत ॥ ९३ ॥
धिक्कार आम्हांला झालों सेवा-चोर ॥ व्यर्थ मृत्यु थोर खेद वाटे ॥ ९४ ॥
श्रीरामाची भार्या सोडवीतां मेला ॥ जटायू तो गेला सद्गतीसी ॥९५ ॥
ऐसी जी बोलीले वाणी दे कंपा ती ॥ विचारी संपाती गृध्र-राज ॥ ९६ ॥
वार्ता वाटे कानीं पडतां शंपा ती ॥ रडला संपाती बंधू-शोकें ॥ ९७ ॥
त्याणें सांगीतली त्यांला माझी शुद्धी॥त्या कवीची बुद्धी सम-दृष्टी॥९८॥
शत गांवें बाई मारुती उडाला ॥ पुण्यें न बुडाला सागरांत ॥ ९९ ॥
पुरीं शोधी, होय स-शोक मनांत॥ अ-शोक-वनांत मग आला॥१००॥
तो रात्रीं रावण मांथीं बडबडे ॥ बुद्धी गडबडे मारुतीची ॥ १०१ ॥
पाण्यापरीस मीं पातळ तो केला ॥ मग रागें मेला असें म्हणे ॥१०२॥
दों मासांत मान्य न होतां हे मारा॥राक्षसी हो चारा मांस मज॥१०३॥

१ कबंध हा मूळचा एक गंधर्व असून ऋषीच्या शापानें राक्षस झाला होता; सांप्रत रामानें त्याचा वध केल्यामुळें तो शापमुक्त झाला; हें तात्पर्य. २ ऋष्यमूकपर्वतावर सुग्रीव वानर आहे, त्याचें साह्य घे म्हणजे तुला सीतेचा शोध लागून तुझें कार्य होईल, अशी युक्ति शबरीनें रामास सांगितली. ३ पर्वतविशेष. ४ वाळीची. ५ हारे दुष्टा दैवा. ६ दुसरा विचार करूं नये. ७ सेवेंत कुचराई करणारे. ८ मुक्तीस. ९ जटायूचा वडील भाऊ. १० शोध. ११ लंकापुरांत. १२ मी त्यास वश व्हावें म्हणून माझें आर्जव करीत होता व बडबडत होता. १३ ही सीता.

ऐसें राक्षसींला सांगोनी तो जाय ॥ म्हणे हाय हाय हनू-मंत ॥१०४॥
हळूच मारुती सद्गुण-समुद्रा ॥ वर्णी मग मुद्रा मज दावी ॥ १०५ ॥
निववी ह्रदय प्रिय-सखी मुद्रा ॥ काय सुधा क्षुद्रा नीववील ॥ १०६ ॥
मज म्हणे चाल बैस माझे स्कंधीं॥ तूं दुर्गा मी नंदी दास तुझा॥१०७॥
तेव्हां मी बोलिल्यें नेशील बा खरें ॥ परि नव्हे बरें असें जाणें ॥१०८॥
युद्धीं मारितील या मेल्यासी स्वामी ॥ तेव्हां मूख बा मी दाखवीन॥१०९॥
मग तें अ-शोक-वन कपी मोडी ॥ राक्षसांचें झोडी बळें सैन्य ॥११०॥
मारीला समरीं रावणाचा अक्ष ॥ कुमार जो दक्ष रण-रंगीं ॥ १११ ॥
इंद्रजिताला तो दाटूनी सांपडे ॥ हनूमंत पडे ब्रह्म-पाशीं ॥ ११२ ॥
रावणें वानर मानूनिया तुच्छ ॥ पेटवीलें पुच्छ जाळावया ॥ ११३ ॥
पुच्छ पेटतांची हनूमंत ऊडे ॥ लंकेमध्यें हूडे वाडे जाळी ॥ ११४ ॥
देवांनीं वदनीं घातली आंगोळी ॥ लंकेची रांगोळी पाहोनीया ॥११५॥
विचारोनी मज जाय स्वामीकडे ॥ पायांवरी पडे हनूमंत ॥ ११६ ॥
माझा समाचार ऐकोनी हर्षले ॥ प्रेमाश्रू वर्षले स्वामी माझे ॥ ११७ ॥
स्वामींस मद्वृत्त करी सु-प्रसन्न ॥ जैसें दिव्य अन्न क्षुधार्ताला ॥ ११८ ॥
हनूमंतावरी झाली दया मोठी ॥ उपकार कोटी मानीयेले ॥ ११९ ॥
निघाले घेवोनी वानरांची सेना ॥ धरणी दिसेना सूर्य-प्रभा ॥ १२० ॥
रावण धर्माच्या वाटे न लागला ॥ सांगोनी भागला बिभीषण ॥१२१॥
नायके रावण क्रोधानळें पेटे ॥ श्रीमंतांसी भेटे सिंधू-तटीं ॥ १२२ ॥
म्हणे गुण-कल्प-वृक्षांच्या अरण्या॥दयाळा शरण्या रक्षीं मज ॥१२३॥
स्वामीचें शरणा-गतीं प्रेम प्राज्य॥ दिलें लंका-राज्य वंदितांची॥ १२५॥
भेटला सागर जोडोनीया करा ॥ म्हणे सेतु करा तारा मज ॥ १२५ ॥
शत गांवें सेतु समुद्रीं रचीला ॥ पर्वतीं खचीला मार्ग मोठा ॥ १२६ ॥
सेतु-पथें सिंधु लंघूनीया आले ॥ वार्तामृतें धाले कर्ण माझे ॥ १२७ ॥
दूत पाठवीला दुर्जन-भंगद ॥ तेजस्वी अंगद वाळि-पुत्र ॥ १२८ ॥
स्वामींचा निरोप दोंहीं लोकीं पथ्य ॥ सांगीतला तथ्य अंगदानें ॥१२९॥
खळ नेघे वाक्य स्वामींचें तोखंद ॥ न सेवी ओखद गतायुष्य ॥१३०॥
म्हणे आम्हांपुढें बोलतें वांकडे ॥ मर्यादा माकडें टाकीली कीं ॥१३१॥

---

१ रामाला. २ नामाक्षरयुक्त आंगठी. ३ ब्रह्मास्त्राच्या पाशांत. ४ धरणीवर. ५ रामाला. ६ दुर्जनांस भंग ( पराभव ) देणारा. ७ इहलोकीं व परलोकीं. ८ संतोष करणारें. ९ ज्याचें आयुष्य सरलें आहे तो म्ह० मरणोन्मुख झालेला.

राक्षस हो धरा मारा धांवा चावा ॥ पळ न वांचावा मर्कट हा ॥१३२॥
अंगासी राक्षस झोंबले चवघे ॥ झाडोनी अवघे पिष्ट केले ॥ १३३ ॥
उडतां मोडिली स्वर्ण-वज्र-सभा[1] ॥ मळविली प्रभा रावणाची ॥१३४॥
धर्म-मर्यादेच्या संकोचें[2] धोपले ॥ अ-धर्मे कोपले राक्षसाच्या ॥ १३५॥
ज्यांला चावावया वज्राहुनी गाढा॥काळाच्याही दाढा न शकल्या॥१३६
ते राक्षस लक्ष-कोटी बळ-पूर्ण ॥ वानरांनीं चूर्ण नखीं केले ॥ १३७ ॥
रक्त-नद्या तेथें शतशा वाहिल्या ॥ देवांनीं पाहिल्या डोळेभर ॥ १३८ ॥
मारीले प्रधान रावणाचे पोर ॥ त्यांत बळी थोर इंद्रजित ॥ १३९ ॥
रावणाचा भ्राता कुंभ-कर्ण काळ ॥ तेणें कपी-पाळ[3] धरीयेला ॥ १४० ॥
बहिणीची तैशी त्याची[4] केरी गति ॥ स्वयें कपी-पति सुटोनीया॥१४१॥
जसे बेरे गरे बहु कपी भट ॥ तेणें गटगट गिळीयेले ॥ १४२ ॥
पळाया त्यां वाट मिळे कर्णी नाकीं॥मिथ्या वर्णीना कीं जानकी मी॥१४३
प्रभूनीं हरीलें तत्तेज सर्व तें ॥ नुरावें पर्वतें वज्रापुढें ॥ १४४ ॥
माझे स्वामी झाले त्या तमा तरणी॥त्यांची मात रणीं काय सांगों॥१४५॥
इंद्रासी अ-सह्य इंद्रजित परी ॥ मारीला तो अरी भावोजीनीं ॥ १४६ ॥
वाहूनी मस्तकें तोषवीला भर्ग ॥ कांपवीला स्वर्ग कैलासही ॥ १४७॥
तो काय सामान्य परी झाला गर्व ॥ त्याचें तेज सर्व वायां गेलें॥१४८॥
मारीला प्रभूनीं सहपरोवार ॥ उतरोला भार धरणीचा ॥ १४९ ॥
उर्मिळे मूर्छित तुझे माझे धणी ॥ झाले होते रणीं सेने-सह ॥ १५० ॥
वांचवीले सर्व हनूमंतें बाई ॥ सांगों याचे काई उपकार ॥ १५१ ॥
ओषधी-पर्वत[5] स-मूळ खाणीला ॥ घडींत आणीला, जैसा चेंडू ॥१५२॥
हनूमंतें आम्हां दिलें चुडेदान ॥ ऐसा नाहीं आन आप्त कोणी ॥१५३ ॥
उठले वानर, अमृत-वृष्टीनें ॥ स्वामींच्या दृष्टीनें हेंचि सत्य ॥ १५४ ॥
शिबिकेंत मज घालोनी आणिलें॥देह म्यां न्हाणिलें अग्नि-कुंडीं॥१५५॥
त्या काळीं देवांनीं केली पुष्प-वृष्टी ॥ आनंदानें सृष्टी कोंदाटली॥१५६॥
आले दश-रथ मामाजी विमानीं॥धन्या जीवीं मानी आपणा मी॥१५७॥
देवांची प्रार्थना मामाजींची आज्ञा ॥ केली सर्व प्राज्ञा सुखवाया॥१५८॥

---

१ सोनें व हिरे ह्यांनी बनविलेलें सभास्थान. २ प्रतिबंधानें. ३ वानरांचा नायक ( सुग्रीव ). ४ कुंभकर्णाची बहीण शूर्पणखा तिचें नांक व कान जसे लक्ष्मणानें कापिले तसे सुग्रीवानें कुंभकर्णाचे कापिले; हें तात्पर्य. ५ द्रोणाचल.

मांडीवरी मज घेतलें स्वामींनीं ॥ घनीं सौदामिनी जना वाटे ॥ १५९ ॥
भृंग-युक्त पति पुष्पक-विमानीं ॥ पुष्प कवि मानी जैं बैसले ॥ १६० ॥
स्वामींनीं समुद्रीं दाखवीला सेतू ॥ भवाब्धींत हेतू तराया जो ॥ १६१ ॥
रुंद दहा गांवें लांब शत गांवें ॥ पाप न तगावें जो देखतां ॥ १६२ ॥
दाविली किंष्किधा भेटविली तारा ॥ सु-ग्रीवाची दारा जाऊबाई ॥ १६३ ॥
ऐसा भरतासी शत्रुघ्नाशीं बोल ॥ प्रभूनीं तो फोल केला नाहीं ॥ १६४ ॥
संतती संपत्ती वाढे होय हित ॥ प्रेमें गातां गीत श्रीरामाचें ॥ १६५ ॥
न बाधे पर्जन्य वात उष्ण शीत ॥ प्रेमें गातां गीत श्रीरामाचें ॥ १६६ ॥
धन्यधन्य होय संसारीं जीवित ॥ प्रेमें गातां गीत श्रीरामाचें ॥ १६७ ॥
काळापासूनीही नव्हे चित्त भीत ॥ प्रेमें गातां गीत श्रीरामाचें ॥ १६८ ॥
अंतीं वसे स्वर्गीं अमृतातें पीत ॥ प्रेमें गातां गीत श्रीरामाचें ॥ १६९ ॥
श्रीरामातें ध्यावें, श्रीरामातें गावें ॥ श्रीरामातें भावें आठवावें ॥ १७० ॥
श्रीराम दयेचा मेघ त्यासमोर ॥ प्रेमें दास मोर नाचताती ॥ १७१ ॥

---

## केकावली. परमेश्वर-प्रार्थना.

केका म्हणजे मोराचा शब्द आणि आवली म्हणजे पंक्ति. मयूरपंतानें आपणास मयूरपक्षी कल्पून आपण ईश्वरास मारलेल्या हाकांना केकावली अशी संज्ञा दिली आहे.

### पृथ्वी-छंद.

तुझ्या बहुत शोधिले अघनिधी पदाच्या रजें ॥
न तें अनृत वर्णिती बुध जनीं सदाचार जें ॥
असें सतत ऐकते सतत बोलते मीच तें ॥
प्रमाण न म्हणों जरी उचित माझिया नीचतें ॥ १ ॥
तसाचि उरलों कसा पतित मी नसें काय, कीं ॥

---

१ पति जैं पुष्पक–विमानीं बैसले (तें) कवि (तें विमान) भृंगयुक्त पुष्प मानी असा अन्वय. २ शुद्ध केले. ३ पापाचे राशीच केवळ. (असे लोक). ४ जनीं सदाचार (चांगलें आचरण करणारे) बुध (ज्ञानी पुरुष) जें (प्रथम चरणांतलें) वर्णिती तें अनृत (खोटें) न (नाहीं). ५ ऐकणारे व बोलणारे (लोक). ६ ते प्रमाण न (ते खरे नाहींत) असें मी जर म्हणेन तर. ७ हलकेपणास. ८ अथवा.

कृपाचि सरली, असें हि न घडे जगन्नायकीं ॥
नसेन दिसलों कसा, नयन सर्व-साक्षी रवी ॥ १
विषाद धरिला म्हणों, न सुरभी[1] विष क्षीर वी ॥ २ ॥
मला निरखितां भवच्चरण-कन्यका[2] आपगा ॥
म्हणे अगइ ऐकिलें हि न कधीं असें पाप गा ॥
कर श्रवणिं ठेविते, नुघडि नेत्र, घे भीतिला ॥
न घालिन भिडेस मी जरिहि कार्य-लोभी तिला ॥ ३ ॥
सदैव नमितां, जरी पद ललाट[3] केलें किणें ॥
नसे इतर तारिता मज भवत्पदाब्जाविणें[4] ॥
नता करुनि मुक्तहो म्हणसि मी बुडालों रिणें ॥
अशा तुज न जो भजे मनुज, धिक तयाचें जिणें ॥ ४ ॥
सदैव अपराध हे रचितसें असे कोटि गा ॥
स्वयें हि कथितों नसे तिळ हि लाज मी कोटिगा ॥
अजांड-शत-कोटि ज्या उदरिं सर्वदा नांदवा ॥
न त्यांत अवकाश या स्थळ दिलें तदा कां देवा ॥ ५ ॥
दयाब्द वळसील तूं तरि न चातकां सेवकां ॥
उणें किमपि. भाविकां उबगशील तूं देव कां ॥
अनन्य[6]-गतिका जना निरखितांचि[7] सोपद्रवा ॥
तुझेंचि करुणार्णवा मन धरी उमोप द्रवा ॥ ६ ॥
कळी करि सु-निर्मळीं परम उग्र दावा नळीं ॥
तयांत अवि-शुद्ध[11] मी शलभ जेंवि दावानळीं ॥
व्रणार्त[12] पशुच्या शिरावरि वनीं उभे काकसे ॥
स्मरादि-रिपु[13] मन्मनीं, अहि न काळ[14] भेका कसे ॥ ७ ॥

---

१ सुरभि (कामधेनु) जरी कोपली तरी विष कधींही विणार (देत) नाहीं, क्षीर (दुधच) देते. २ तुमच्या पायाची कन्या (पायापासून उत्पन्न झालेली) नदी (भागीरथी). ३ ललाट (कपाळ) किणें (घट्यानें) पद (स्थान) केलें.—कपाळास जरी घट्टे पडले असा अर्थ. ४ आपल्या चरणकमलावांचून ५ श्रीधर–हरिविजयओवी ५९ ही–वरील टीप पहा. ६ नाहीं (आपणावाचून) दुसरा थारा ज्याला. ७ पीडीलेले असे पाहतांच. ८ कलबलल्यास. ९ नळराजाविषयीं. १० त्या कळीच्या झपाट्यांत. ११ अत्यंत अपवित्र (सांपडलों आहें) १२ जखमेनें पिडलेल्या. १३ कामादि शत्रु. १४ अहि (सर्प) भेका (बेडकाला) काळ कसे न (होतील)?

धना परिजना घरीं तुमचिया उणें कायसें ॥
न लाभ मणि-हेम-भू-पतिस जोडिल्या आयसें ॥
परि प्रभुहि संग्रहीं सकल वस्तुला ठेविती ॥
गुणा न म्हणतां उणोअधिक आदरें सेविती ॥ ८ ॥
अ-तर्क्य महिमा तुझा, गुणहि फार बा हे विधी ॥
श्रुति-ज्ञहि म्हणे सदा, स्तविल आमची केविं धी ॥
तरी जन यथामति स्तवुनि जाहले सन्मती ॥
स्तवार्थ तुझिया तुझ्या सम कवी कधीं जन्मती ॥ ९ ॥
निज-स्तुति तुम्हा रुचे स्तविति त्यां वरें तार्पितां ॥
नमस्कृति-परां बरें स्व-धन सर्वही अर्पितां ॥
स्व-भाव तुमचा असा विदित जाहला याचकां ॥
करूं स्तव जसातसा फळ नव्हे जना याच कां ॥ १० ॥
तुम्ही परम चांगले बहु-समर्थ दाते असे ॥
सु-दीन जन मी तुम्हां शरण आजि आलों असें ॥
पुन्हाहि कथितों बरें श्रवण हें करा यास्तव ॥
समक्ष किति आपुला सकळ-लोकराया स्तव ॥ ११ ॥
किती श्रवण झांकिती प्रभुहि काय ते पोळती ॥
पुसाल जरि कोण ते, पद-रजीं तुझ्या लोळती ॥
बरें तुजचि सोसवें स्तवन, कृत्ति-वासा गरा ॥
न पी, तरि कसें घडे हित-करा दया-सागरा ॥ १२ ॥
गमो मधुर हें विष स्तवन, सेवितां माजवी ॥
करी मलिन सद्यशोमुख, हलाहला लाजवी ॥
हरापरिस तूं बरा प्रभु-वरा सदा जो पिशी ॥

---

१ मणि-हेम-भू-पतिस जोडिल्या आयसें लाभ न, असा अन्वय. २ गुणानें कमी किंवा ज्यास्त असें न म्हणतां त्यास आदरानें सेवितात. ३ तुमच्या तोंडावर. ४ कित्येक प्रभुहि, (समर्थ स्तुतिपात्र असेही लोक) कोणी आपली स्तुति समक्ष करूं लागलें असतां, जसे काय ते पोळतात व (आपले) हात कानावर ठेवितात. ५ (जर) महादेव विष न पिता तर (लोकांची) कशी अवस्था झाली असती? म्हणून भक्तांकरितां स्तवनरूप विष तुम्हाला सोसणें अवश्य आहे हें तात्पर्य. ६ चांगली कीर्ति हेंच मुख. ७ महादेवापेक्षां तूं बरा; कारण तो एकदाच विष प्याला आणि तूं (स्तुतिरूप विष) नित्य पितोस.

असा रस समर्पि[1] त्या अमृत आपुलें ओपिशीं ॥ १३ ॥
प्रभो शरण आलियावरि नव्हां कधीं वांकडे ॥
म्हणोनि इतुकेंचि हें स्व-हित-कृत्य जीवांकडे ॥
प्रसाद करितां नसे पळ विलंब बापा खरें ॥
घनांबु न पडे मुखीं उघडिल्या विना पांखरें[2] ॥ १४ ॥
शिवे न तुझिया पदा अदयताख्य[3] दोष क्षण ॥
प्रभो चुकतसों तरी करिशि तूंचि सं-रक्षण ॥
नसेचि शरणागती[4] घडलि सत्य अद्यापि ती ॥
रुचे विषय, ज्यां मिळे अमृत ते न मद्या पिती ॥ १५ ॥
म्हणा मज उताविळा गुणचि घेतला[5], घाबरें ॥
असो मन असेंचि बा भजक-बर्हि-मेघा[6] बरें ॥
दिसे क्षणिक सर्व हें[7] भरंवसा घडीचा कसें ॥
धरील मन आधिनें बहु परिश्रमे चाकसें ॥ १६ ॥
कृतांत-कटकामल-ध्वज[8] जरा दिसों लागली ॥
पुरःसर-गदांसवें[9] झगडतां तनू भागली ॥
सहाय दुसरा नसे तुजविणें बळें आगळा ॥
न हों जरि उताविळा स्व-रिपु[10] कांपितो हा गळा ॥ १७ ॥
कथा-सुरभि[11] या भल्या स्व-जननीहुनी वाटती ॥
शिशूंस जरठांस ही निरखितां रसें दाटती[12] ॥
दुहोत भलते सदा तरि न लेश ही आटती ॥
स्व-वत्स-मलें[13] भक्षिती परि न सर्वथा बाटती ॥ १८ ॥

---

१ देतोस. २ चातकपक्ष्यानें तोंड उघडल्याखेरीज पर्जन्याचें पाणी त्याच्या तोंडांत पडत नाहीं, तद्वत् तुम्हास शरण आल्याशिवाय तुमचा प्रसाद घ्हावयाचा नाहीं. हा सारांश. ३ अदयता ( निर्दयपणा ) ह्या नांवाचा. ४ अद्यापि (माझी) ती शरणागति ( शरण येणें ) सत्य घडली नसेचि; ( कारण कीं मला अद्यापि ) विषय रुचे असा अन्वय. ५ उतावळेपणा हा तुम्हीं माझा गुणच घेतला, ( दोष नव्हे असें मी समजतों. ६ भक्तरूप मोरांस मेघासारखा. ७ हें जग. ८ जरा ( म्हातारपण ) हाच यमाच्या सैन्याचा पांढरा ध्वज. ९ अग्र भागीं येणाऱ्या रोगांबरोबर. १० आपला शत्रु-मृत्यु. ११ कथारूप कामधेनु. १२ त्यांस पान्हा फुटतो. १३ आपल्या वत्सांचा मळ म्ह० पुरीष, पक्षीं, पातक.

असो वरि कसा तरी विमल भाव ज्याचा करां ॥
तयावरि दया, पचे वर असाचि द्या चाकरा ॥
वृथाचि गमतें दिलें बहुहि जें न दासा जिरे ॥
पुसोनि अधिकार द्या, सु-कर तें सदा साजिरें ॥ १९ ॥
तुझ्या समचि हें गुणें अणु उणें नसें नाम, हां ॥
दिसे अधिक ही तसा गुण तुला असेना महा ॥
सदैव भलत्यास ही सुलभ आणखी गायका ॥
छळी न, न अधोगति क्षणहि दे, जगन्नायका ॥ २० ॥
छळाल कृपणासि कां अजि दया-निधे, कांपिती ॥
भटासि भट संगरीं परि न कातरा दापिती ॥
कराल तितुकी कृपा बहु अहो शरण्या तमीं ॥
बुडोनि शरणागत श्रमतसें अरण्यांत मी ॥ २१ ॥
तयीं प्रभुवरा तसे सदय कां असे आज हो ॥
विचारुनि पहा बरें निज-मनीं महाराज हो ॥
वनींवनिं फिरां पिशापरि म्हणा अहोरात्र हां ॥
नसे कुशल भाषणीं परि असे कृपा-पात्र हा ॥ २२ ॥
न जें प्रिय स-दोष तें प्रिय स-दोष ही चांगलें ॥
स्व-तोक पितरां रुचे जरि हि कर्दमीं रांगलें ॥
तुलाचि धरि पोटिशीं कशि तदा यशोदा बरें ॥
जरी मळविशी रजोमलिन-काय तूं अंबरें ॥ २३ ॥
प्रसिद्ध तुमचे महा सदय पाय, जीवांकडे ॥
चुकी म्हणुनि होतिल क्षणहि काय जी वांकडे ॥
न निष्ठुर पिता म्हणे मनिं न हो प्रजा टोणपी ॥

---

१ तिसऱ्या व चवथ्या चरणांत सांगितलेला गुण. २ अनधिकाऱ्यासही. ३ विष्णूनें वामनावतारीं बळीशीं कपट केलें व त्यास अधोगति दिली म्ह० पाताळांत घातलें; ही गोष्ट सुचवून कवीनें ईश्वरापेक्षां नामाचें महत्व वर्णिलें आहे. ४ अज्ञानांधकारांत. ५ संसाररूप अरण्यांत. ६ रामावतारीं सीता रावणानें नेली असतां तीविषयीं. ७ असे निर्दय. ८ हायहाय. ९ धुळीनें मळलें आहे शरीर ज्याचें. १० वस्त्रें. ११ पिता ( बाप ) निर्दय नसतो; फक्त त्याच्या मनांत इतकेंच असतें कीं, आपली संतति मूर्ख न व्हावी, म्हणून तो तीस शासन करितो.

अ-पथ्य-रुचि रुग्ण तो कटुक ओखदें कोण पी ॥ २४ ॥
अ-संख्य खळ संगरीं निज-करीं तुवां मारिले.॥
न निष्ठुरपणें, कृपा करुनि ते भवीं तारिले ॥
जगज्जनक तूं मुलें सकळ जीव, यां भातुकें ॥
दटावुनिहि देशि बा अमृत नेदिजे घातुकें ॥ २५ ॥
सदाहि हित नायकों बहु अपाय केले करूं ॥
तरी स-कृप बाप तूं म्हणसि नायके लेंकरूं ॥
कधीं न करिसी प्रभो भजक-बालकोपेक्षण ॥
न तूजवरि ज्यापरी पशु-पें-पाळ कोपे क्षण ॥ २६ ॥
पिता जरि विटे विटो न जननी कुं-पुत्रीं विटे ॥
दयामृत-रसार्द्र-धी न कुल-कज्जलें त्या किटे ॥
प्रसाद-पट झांकिती परि परा गुरूंचे थिटे ॥
म्हणूनि म्हणती भले न ऋण जन्म-देचें फिटे ॥ २७ ॥
अशी तरि कृत-ज्ञता हरि तुझ्याच ठायीं अगा ॥
सख्या अणुचि मानिसी करुनि सु-प्रसादा अगा ॥
भुले सु-कवि-वाग्वधू तव गुणा अनर्घ्या नगा ॥
म्हणेल जन कोण कीं यश पुनः पुन्हां तें न गा ॥ २८ ॥
करा श्रवण येवढें अ-पटु लोक हांसो मला ॥
अहो जरि गिळावया प्रिय कुमार घे सोमला ॥
तयासि ठकवूनि दे बहुत शर्करा माय जी ॥
तिला स्व-शिशु-वंचनें अ-दयता शिवे काय जी ॥ २९ ॥
सु-संगति सदा घडो सु-जन-वाक्य कानीं पडो ॥
कलंक मतिचा झडो विषय सर्वथा नावडो ॥

---

१ प्रकृतीस न मानणाऱ्या पदार्थांविषयीं ज्याला आवड आहे असा आम्हांला विषयाची गोडी असल्यामुळें पहिल्यानें कठिण वाटणारा असा जो सन्मार्ग तो कसा गोड लागेल! हा अर्थ येथे विवक्षित आहे. २ भक्तरूप लेंकराची उपेक्षा. ३ गवळ्यांचा नायक–नंद. ४ दयारूप अमृतरसानें स्निग्ध आहे अंतःकरण जीचें अशी. ५ कुलाला कलंक लावणारा जो कुपुत्र त्याच्या योगानें. ६ मळत नाहीं, म्ह० तिची त्याच्यावरची ममता कमी होत नाहीं. ७ प्रसादरूप वस्त्रें. ८ श्रेष्ठ बापाचे. ९ पर्वतमाय. १० सुकवींची वाणी हीच उपवर कन्या. ११ नका गाऊं.

सदंघ्रि-कमळीं दडो[1] मुरडितां हृदानें अडो ॥
वियोग घडतां रडो मन[2] भवच्चरित्रीं जडो ॥ ३० ॥
न निश्चय कधीं ढळो कु-जन-विघ्न-बाधा टळो ॥
न चित्त भजनीं चळो मति सदुक्त-मार्गीं वळो ॥
स्व-तत्त्व त्वदया कळो दुरभिमान सारा गळो ॥
पुन्हा न मन हें मळो दुरित आत्म-बोधें जळो ॥ ३१ ॥
मुखीं हरि वसो तुझी कुशल[3]-धाम नामावली ॥
क्षणांत पुरवील जी सकल कामना मावली ॥
कृपा करिशि तूं जगत्त्रय-निवास दासांवरी ॥
तशी प्रकट हे[4] निजाश्रित जना सदा सांवरी ॥ ३२ ॥
दयामृत-घना अहो हरि वळा मयूराकडे ॥
रडे शिशु तयासि घे कळवळोनि माता कडे ॥
असा अतिथि धार्मिक-स्तुत-पदा[5] कदा सांपडे ॥
तुम्हां जड भवार्णवीं उतरितां न दासां पडे ॥ ३३ ॥

---

## सुदाम-चरित्रांतील पृथुकोपाख्यान.

कृष्णाचा सखा सुदामा-नांवाचा अति दरिद्री ब्राह्मण त्याचे भेटी-करितां द्वारकेस गेला. तेव्हां त्यानें आपल्या अतिशय गरीबीमुळें नुसते पोहे त्यास नजर करण्यासाठीं नेले होते, तरी भक्तांविषयीं अत्यंत प्रेमळ जो श्रीकृष्ण त्यानें त्या पोह्यांचा मोठ्या आदरानें स्वीकार केला, व त्या बद्दल सुदाम्याला सोन्याची नगरी दिली. असें ह्या आख्यानांत वर्णिलें आहे. म्हणून ह्यास 'पृथुकोपाख्यान' हें नांव दिलें आहे.

### साक्या.

गावीं संत-चरित्रें हो तारक मधुर पवित्रें हो ॥ ध्रु० ॥
हरिचा सखा सुदामा ब्राह्मण निःस्पृह आत्मज्ञानी ॥
होता गृहीं यदृच्छा[6]-लाभें परम सुखातें मानी ॥ १ ॥

---

१ साधूंच्या चरणकमलीं आसक्त होवो. २ दडो इत्यादि क्रियापदांचा कर्ता. ३ कल्याणाचें केवळ स्थानच अशी ४ नामावलि. ५ धर्मशील जनांनीं स्तविलीं आहेत पदें ज्याचीं. ६ आपोआप जें मिळेल तेणेंकरून.

त्या विप्राची भार्या आर्या मलिना कृशा कु-चैला ॥
पति-पदं[1]-भजनें सर्षप मानी भव-दुःखाभिध-शैला[2] ॥ २ ॥
ते एकदा पतीच्यां पाशीं बहु भीत भीत गेली ॥
अवाङ्मुखी कंपित-तनु साध्वी कर जोडुनिया ठेली ॥ ३ ॥
भय-गद्गद[3]-कंठी ते साध्वी म्हणे पतीतें स्वामी ॥
श्री-पति तो स्व-सखा हें कथितां नित्य तुम्ही निज-धामीं॥४॥
भेटाया त्या दीन-बंधुला द्वारावतिला जावें ॥
गातां ध्यातां परि सखयातें नेत्रें अवलोकावें ॥ ५ ॥
भजकाला आत्मा ही देतो ऐसा उदार तो कीं ॥
दीन-जनाचा कल्पवृक्ष ही कीर्ति तयाची लोकीं ॥ ६ ॥
मोक्षहि देतो तेथें देणें अर्थ काम हें काय ॥
यास्तव जाऊनि पहा कुटुंब-त्राणार्थें यदुराय ॥ ७ ॥
देइल कांहीं दयाळु तो प्रभु रक्षाया हीं बाळें ॥
तुम्हाला स्व-सख्याचें दर्शन घडेल बहुता काळें ॥ ८ ॥
ऐसें स्त्रीचें प्रिय हित भाषण ऐकुनि मुनी सुखावे ॥
आलें मनांत कीं जाउनिया प्रभुचे पाय पहावे ॥ ९ ॥
स्त्रीस म्हणे अनंदें तो द्विज जातो सखा पहाया ॥
तच्चरणावरि निज तनु मनही पुष्पांजळी वहाया ॥ १० ॥
आहे कांहीं गृहीं उपायन दे हो सत्वर आणी ॥
रिक्त-पाणिनें[4] न विलोकावा गुरु ऐशी स्मृति-वाणी ॥ ११ ॥
ऐसें परिसुनि भिक्षा मागुनि चार मुष्टि पृथुकांशी ॥
आणुनि बांधूनि चैल-खेंडीं अर्पी निज-कांताशी ॥ १२ ॥
घेउनि मुनि तो उपायनाला बहु हर्षेंचि निघाला ॥
भेटेल कसा प्रभु हें स्व-मनीं चिंतित जाता झाला ॥ १३ ॥
हरिला त्वद्र्यां[5] चिंतित जातां मार्ग जाहला थोडा ॥
बहुधा केला हरि-संदर्शन-कामें[6] प्रेमा[7] घोडा ॥ १४ ॥

---

१ नवऱ्याच्या पायाच्या सेवेनें. २ भव+दुःख+अभिधा+शैल=संसारसंबंधी दुःख हेंच आहे अभिधा म्ह० नांव ज्याला असा शैल म्ह० पर्वत त्याला. ३ भयानें दाटला आहे कंठ जीचा. ४ रिकाम्या-हाताच्या मनुष्यानें. ५ फडक्यांत. ६ कृष्णाला पाहण्याची अत्यंत आवड आहे ज्याला अशा सुदाम्यानें. ७ प्रेम (पु०).

अमरावती-समाना द्वारा-वती परी कनकाची ॥
विलोकिली दिव्य राजधानी विश्वाच्या जनकाची ॥ १५ ॥
काय तिची वर्णावी शोभा सत्यवती जिस लाजे ॥
मी धन्य म्हणुनि जीच्या योगें रत्नाकर बहु गाजे ॥ १६ ॥
जेथिल लोक वि-शोक स्व-सुखें तुच्छ मानिती स्वर्गा ॥
लाजति सुर-वर योगी ज्ञानी नागरिकांच्या वर्गा ॥ १७ ॥
त्या नगरींत मुनी तो गेला जैसा वैकुंठातें ॥
ब्रम्हण्य-देवं-पुरींत नाहीं निरोध पळ विप्रातें ॥ १८ ॥
एका परीस एक सु-रम्यें यादव-गृहें अ-पारें ॥
विप्रावांचुनि जेथें न शिरे आज्ञा नसतां वारें ॥ १९ ॥
त्यांतहि सोळा सहस्र आणिक अष्टोत्तर शत गेहें ॥
स्त्री-सुत-युक्तें केलीं शोभित हरिनें अनेक-देहें ॥ २० ॥
त्यांतुनि एका गृहांगणीं तो गेला ब्राह्मण दीन ॥
सुख पावला स्व-चित्तीं जैसा ब्रह्मानंदीं लीन ॥ २१ ॥
श्री-रुक्मिणिच्या पलंगीं तेव्हां होता जगन्निवास ॥
तेथें कळलें कीं भेटाया आलासे निज-दास ॥ २२ ॥
झडकरि उठला दयाळु माधव वस्त्रादिक नावरितां ॥
धांवत आला पुढें रमेला सांडुनि दासाकरितां ॥ २३ ॥
ये ये बंधो ऐसें सद्गद बोलत धांवत आला ॥
कडकडुनी भुज-युग्में स्व-सखा त्हृदयीं धरिता झाला ॥ २४ ॥
मित्रांग-स्पर्शानें झाला सुखी दयेचा सिंधू ॥
लोचन-पद्मांपासुनि गळती प्रेमाश्रूचे बिंदू ॥ २५ ॥
धरुनि स्व-सखा करीं हरीनें पर्यंकीं बसवीला ॥
सात्विक-भावें भक्ति-प्रेमा देवें बहु दाखविला ॥ २६ ॥
जळ घाली रुक्मिणी पदांवरि मणि-कनकांच्या पात्रें ॥

१ ब्राह्मणांविषयीं दयालु जो देव म्ह० कृष्ण, त्याच्या पुरांत. २ विश्वाचा आधार कृष्ण. ३ दोन्ही हातांनीं. ४ कमळासारख्या नेत्रांतून. ५ रोमांचादिक जे ८ प्रकारचे सात्विक भाव आहेत त्यांहीं करून. ६ रत्नजडित सोन्याच्या भांड्यानें.

प्र-क्षालन केलें श्री-नाथें सुख-रोमांचित गात्रें ॥ २७ ॥
शंभु-शिरीं ज्याचें चरणोदक वेद जयाचे बंदी ॥
तो तीर्थ-रूप तीर्थांचाही मुनि-पादोदक वंदी ॥ २८ ॥
गंधालेपें धूपें दीपें पुष्पें गुरु-समान ॥
ब्रह्मण्य देव मुनितें पूजो वाढवुनी बहु मान ॥ २९ ॥
व्यजन चामरें घेउनि हातीं शैब्या घाली वारा ॥
तें परिसुनिया आला तेथें अंतःपुर-जन सारा ॥ ३० ॥
हरि-स्त्रिया त्या म्हणति अगाई कोण विप्र हा आला ॥
जगद्गुरुसहि बलापरिस हो पूज्य कसा हा झाला ॥ ३१ ॥
कृष्णा सख्यातें करीं धरुनिया सांगे गोष्टी गोडा ॥
त्यांशीं सर्व रसाधिक परि तें अमृत न पावे जोडा ॥ ३२ ॥
देव म्हणे मी बंधो गुरुंची आलों घेउनि आज्ञा ॥
संपादिला तदुत्तरें पाणि-ग्रहण-विधी कीं माझा ॥ ३३ ॥
बहुधा गृहीं उदासीन तुझें मन धन-वांछा कांहीं ॥
नाहीं, हें मज पूर्वीपासुनि अवगत आहे पाहीं ॥ ३४ ॥
परि लोक-संग्रहास्तव मीहो करितों गृहस्थ धर्म ॥
योगर्चि हा फळ-वांछा टाकुनि सर्व करावें कर्म ॥ ३५ ॥
गुरु-कुळ-वास तुला स्मरतो कीं जेणें तरतो मूढ ॥
त्वरितचि होतो अ-क्षय-सुखद-स्वात्म-पदीं आरूढ ॥ ३६ ॥
सांदीपनि-गुरुंच्या पत्नीनें काष्ठें आणायासी ॥
पाठविलें विपिनाला स्मरतें तें माझ्या त्हृदयासी ॥ ३७ ॥
गेलों आपण वनासि तेव्हां झाली अ-काल-वृष्टी ॥
कल्प-क्षयचि निशा-काळीं तो झाला गोचर दृष्टी ॥ ३८ ॥
प्रातःकाळीं श्री-गुरु आला आम्हां शोधायाला ॥
श्रांत शिष्य देखतां स्व-त्हृदयीं फार दया-कुळ झाला ॥ ३९ ॥

---

१ गंधाच्या उटीनें. २ रुक्मिणी. ३ जनानखान्यांतील जन म्ह० स्त्रिया. ४ कृष्णाचा जो गुरु सांदीपनि त्याची. ५ त्यानंतर. ६ विवाह. ७ लोकांची स्वधर्माचेठायीं प्रवृत्ति व्हावी या उद्देशानें. ८ ईश्वरप्राप्तीचें साधन-मोक्षसाधन. ९ गुरूच्या घरीं राहून त्याची सेवा करणें. १० अविनाशि अशा प्रकारचें सुख देणारें स्वात्मपद म्ह० मुक्ति. ११ कृष्णाचा गुरु.

धरुनि पोटिशीं आशीर्वादें गौरविलें बहु सकळां ॥
दिल्या चतुर्दश विद्या त्द्या शुद्ध चतुःषष्टि कला ॥ ४० ॥
हें सारें मजला आठवतें स्मरतें तुज कीं नाहीं ॥
गुरु-प्रसादें शिष्य-जनाला नसे उणें सुख कांहीं ॥ ४१ ॥
हें ऐकुनिया तो श्री-दामा म्हणे प्रभो सर्वज्ञा ॥
लोक-विडंबन[1] सारें केलें वदतों करुनि अवज्ञा[2] ॥ ४२ ॥
आम्हांला तारायाकरितां गुरु-कुळ-निवास केला ॥
तुझ्या प्रसादें या दासाचा सारा संशय[3] गेला ॥ ४३ ॥
वेदमया[4] कल्याणाऽऽधारा जगद्गुरो तुज कवणें ॥
सर्वज्ञाला अज्ञ-मनुष्यें काय ज्ञान शिकवणें ॥ ४४ ॥
देव म्हणे सखया मज द्याया काय उपायन आजी ॥
आणिलें असेल देउनिया तें वांछा पुरवीं माजी ॥ ४५ ॥
भक्तें प्रेमें अणुही दिधलें तें मज पुष्कळ होतें ॥
बहुहि अ-भक्तें समर्पिलें परि अल्पचि भासे हो तें ॥ ४६ ॥
पत्र, पुष्प, फल, जळ, जें मजला भक्त आदरें अर्पी ॥
तें विश्वात्म्याला मज बंधो सुधा-रसाहुनि तर्पी ॥ ४७ ॥
हें परिशिलें परंतु स्व-मनीं मुष्टि-चतुष्टय[5] पोहे ॥
द्यावे प्रभुला हा धीर तरी त्या विप्राला नोहे ॥ ४८ ॥
संकोचला अधोमुख बसला विप्र न बोले कांहीं ॥
बुडतचि होता मुनि तो केवळ लज्जा-नदी-प्रवाहीं ॥ ४९ ॥
सखा कृतार्थ कराया निद्या चिंध्या आपण पाहे ॥
पृथुक[6]-मोटली सापडतां प्रभु बहु-हर्षाला लाहे ॥ ५० ॥
सोडुनि गांठी पृथुक-मुष्टि तो वदनीं घालुनि भक्षी ॥
तों तों लाजे विप्र प्रभुच्या मुख-पद्मासि न लक्षी ॥ ५१ ॥
भूतात्म्याला मजला तर्पिति[7] पोहे हे बहु फार ॥
याहुनि न रुचे भुवनीं बंधो अन्य उपायन-सार[8] ॥ ५२ ॥
ऐसें स्तवुनि उपायन दुसरी मुष्टि श्री-पति उचली ॥

---

१ लोकांसारखें वागणें. २ भीड-मुर्वत न धरितां. ३ अज्ञान-द्वैतभ्रांति. ४ ज्ञानस्वरूपा. ५ चारमुठी. ६ पोह्यांची गांठोडी. ७ तृप्त करितात. ८ उत्तम नजराणा.

तों रुक्मिणी धरी कर धांवुनि म्हणे मला हे रुचली ॥ ५३ ॥
द्यावा प्रसाद हा सर्वांला भक्षूं वाडेंकोडें ॥
सेवन करितां तुम्हांला तों हें ब्रह्मांडहि थोडें ॥ ५४ ॥
इह[1]पर भवज्जनाला[2] येणें सर्वहि समृद्धि झाली ॥
पुरे मुष्टिपृथुकांचें भक्षण ब्रह्मांडावलि धाली ॥ ५५ ॥
पोहे नेले हिरोनि भगवत्-पर-पद्मजा[3]-सतीनें ॥
प्रार्थुनि रिझवुनि हंसवुनि रमवुनि निज-पतिला सु-मतीनें॥५६॥
षड्रस[4]-युक्तें चतुर्विधान्नें[5] भोजन झालें रातीं ॥
ब्रह्माद्यलभ्य[6]-पंक्ति लाधली दैवें विप्र-वरा ती ॥ ५७ ॥
निज-पर्यंकीं[7] मृदु-शयनावरि विप्राला यदुराय ॥
निजवुनि परमादरें हळूहळु करें चुरी मग पाय ॥ ५८ ॥
स्वर्ग-सुखाहुनि बहु सौख्याला विप्र पावला रातीं ॥
प्रातःकाळीं उठतां आज्ञा मग दे कंसाऽराती[8] ॥ ५९ ॥
पावित[9] गेला दूर जगत्पति कंठ दाटला भारी ॥
मित्र-वियोगें प्रभुच्या वाहे नेत्रांपासुनि वारी ॥ ६० ॥
माझें स्मरण असों दे ऐसें म्हणे स-गद्गद-कंठ ॥
आलिंगुनि वंदुनि विप्राला परते मग वैकुंठ[10] ॥ ६१ ॥
ब्राह्मण देव-वियोगें व्याकुळ होउनि सावध झाला ॥
भगवद्दर्शन-लाभ घेउनी स्वांतीं पुष्कळ धाला ॥ ६२ ॥
मनीं म्हणे द्विज मजला कांहीं कृष्णें न दिलें वित्त ॥
मी मागावें तेंहि विसरलों स्व-मुखें, भुललें चित्त ॥ ६३ ॥
स्त्री परि हांसेल घरां जातां यासि करावें काय ॥
हांसो सुखें परंतु वदान्य-श्रेष्ठ खरा यदुराय ॥ ६४ ॥
दरिद्र मी वित्ताच्या लाभें होइन मत्त उदंड ॥
आतांचेपरि मग न घडेल प्रभुचें स्मरण अ-खंड ॥ ६५ ॥

---

१ ह्या लोकीं व पर लोकीं. २ तुमच्या भक्तांस. ३ भगवत्सेवेविषयीं तत्पर जी पद्मजा म्ह० लक्ष्मी तद्रूप जी सती म्ह० पतिव्रता रुक्मिणी. ४ गोड, अंबट, तिखट, खारट, तुरट, कडू; असे सहा रस. ५ खाद्य, पेय, लेह्य व चोष्य अशीं चार प्रकारचीं अन्नें. ६ ब्रह्मादिक देवांसही मिळण्यास कठीण. ७ आपल्या पलंगावर. ८ कंसाचा अराति म्ह० शत्रु कृष्ण. ९ पोंचवीत. १० कृष्ण.

यास्तव करुणा-निधिनें दुर्लभ दर्शन देउनि मातें ॥
धन न दिलें हें बरवें केलें दीन-जनाच्या तातें ॥ ६६ ॥
असें मनीं चिंतित निज-मार्गे आला स्व-गृहापाशीं ॥
तों त्याच्या दृष्टीला पडला सहसा तेजोराशी ॥ ६७ ॥
म्हणे काय हें कैसें झालें गृह जें माझें होतें ॥
तेथें कैशी स्वर्ण[1]-पुरी ही काय जाहलें हो तें ॥ ६८ ॥
विस्मित होउनि पाहे तो मुनि नानोपवनें[2] रम्यें ॥
कनक-पुरीच्या मध्यें सदनें रत्नांचीं अनुपम्यें[3] ॥ ६९ ॥
नर-नारी-जन देव-समान स्वालंकृत[4] अति गेहीं ॥
रत्न-भूषणें वस्त्रें रवि-सम दीप्ति जयाच्या देहीं ॥ ७० ॥
आला स्वामी म्हणुनि पुढें मग नागरीक जन धांवे ॥
वाजत गाजत गृहासि आणिति मुनिला पूजुनि भावें ॥ ७१ ॥
देवांगना तशी शुभ-गात्री विप्राची स्त्री गेहीं ॥
पति आला हें परिसुनि झाली सुख-रोमांचित देहीं ॥ ७२ ॥
देव-स्त्री-सम दासी-शत[5]-युत आली धांवुनि दारा ॥
पतिस विलोकुनि त्द्ददयीं[6] भेटे साध्वी परमोदारा[7] ॥ ७३ ॥
नेला गेहीं पति निज-हस्तें धरुनि करीं बहु-मानें ॥
दिव्य समृद्धि विलोकुनि जाणे मुनि तद्वीज[8] ज्ञानें ॥ ७४ ॥
म्हणे मुनी मी जन्मापासुनि दरिद्र केवळ पापी ॥
हरि-दर्शनाविणें कोण दुजा या भाग्य-पदीं स्थापी ॥ ७५ ॥
महाविभूति[9]-यदूत्तम-दर्शन समृद्धि-कारण साचें ॥
कामद मेघ-श्याम पुरवितो कामितें[10] निज-दासाचें ॥ ७६ ॥
देवाचे परि देव-प्रभुनें समर्चिलें मज हस्तें ॥
तीर्थपदें[11] मत्पदावनेज[12] धरिलें कीं निज-मस्तें ॥ ७७ ॥

---

१ सोन्याची नगरी. २ नानाप्रकारच्या बागा. ३ ज्यांना उपमा नाहीं अशीं. ४ उत्तम प्रकारें अलंकारांनीं शोभविलले. ५ शेंकडो दासीसहित. ६ आलिंगन देई. ७ फार मोठ्या मनाची. ८ त्या समृद्धीचें कारण. ९ मोठा ऐश्वर्यवान् जा यदूत्तम म्ह० यदुकुलांत उत्तम-श्रीकृष्ण त्याचें दर्शन. १० इच्छिलेलें. ११ ज्याच्या पायाच्या ठिकाणीं तीर्थें आहेत अशा श्रीकृष्णानें. १२ मत्+पद+अवनेजन= ज्यांत माझे पाय धुतले आहेत असें पाणी.

केली माझी सेवा देवें नीजविलें स्व-पलंगीं ॥
सु-गंध-लेपन केलें प्रभुनें निज-हस्तेंचि मदंगीं[1] ॥ ७८ ॥
मज दीनातें बंधो बंधो ऐसें वदला स्वामी ॥
अन्वर्थता[2] प्रकट केली कीं दीन-बंधु या नामीं ॥ ७९ ॥
सौत्दृद[3] मैत्री सख्य दास्य त्या देवाचें चि असावें ॥
जन्मोजन्मीं तद्भजनाचें प्रेम मनांत वसावें ॥ ८० ॥
केलें कृतार्थ भुवन हि माझ्या सख्या मुकुंदा स्वामी ॥
तूं करुणांबुदं[4]-जीवन-सुखकर मयूर चातक आम्ही ॥ ८१ ॥
ऐसा भगवत्सखा सुदामा स्त्रीसह भजे प्रभूतें ॥
इहपर-नित्यचि पवता झाला तेणें सुखें प्रभूतें ॥ ८२ ॥
दीनोद्धरण[5] चरित्र विभूचें पावन गोड उदार ॥
राम-नंदनें मयूरेश्वरें फार मानिलें सार ॥ ८३ ॥
वाणी पवित्र करावयास्तव पृथुकोपाख्यान सुखें ॥
लेशमात्र वर्णिलें पुन्हां[6] ही मयूरेश्वरें स्व-मुखें ॥ ८४ ॥
रसिक विष्णु-भक्तांहीं हें शिशु-भाषण परिसावें ॥
दोष निवारुनि गुण घेउनिया स्व-सुखानें नाचावें ॥ ८५ ॥
गावीं संत-चरित्रें हो तारक मधुर पवित्रें हो ॥ ध्रु० ॥

---

# श्रीधर.

श्रीधर हा पंढरपुराजवळ नाझरें म्हणून गांव आहे तेथील एका कुळकरण्याचा मुलगा. जातीचा देशस्थ ब्राह्मण. ह्याच्या बापाचें नांव ब्रह्मानंद आणि आईचें नांव सावित्रीबाई. ह्यानें चौदा वर्षांचे वयांतच संन्यास घेतला. हा नेहमीं पंढरपुरांत राहत असे.

१ माझ्या अंगाला. २ नांवाच्या अर्थास अनुरूप अशी कृति. ३ एथें बहुधा एकार्थकच अशा अनेक शब्दांची योजना करून कवीनें सुदाम्याचा प्रेमभर दाखविला आहे. ४ मयूरपक्षीं करुणांबुद व चातकपक्षीं करुणांबुदजीवन (करुणारूप मेघोदक), असा अर्थ समजावा. परंतु ही रचना अशीच असेल तर सदोष आहे. ५ दीनाचा उद्धार करणारें. ६ एकदा आर्यावृत्तानें लिहिलें असून आतां आणखी साकीवृत्तानें लिहिलें आहे, म्हणून "पुन्हांही म्हटलें आहे."

श्रीधरानें ओंव्या केल्या आहेत. त्याची कविता रसभरित आहे. हा पैठण येथें आपल्या पन्नासाव्या वर्षी समाधिस्थ झाला.
जन्म शके १६०० इ० स० १६७८. मरण शकें १६५० इ० स० १७२८

## त्यानें केलेले ग्रंथ.

रामविजय ( शके १६२५ त समाप्त. ) हरिविजय ( शकें १६२५ त समाप्त. ) पांडवप्रताप ( शके १६३४ त समाप्त. ) शिवलीलामृत ( शके १६४० त समाप्त. )

काशीखंड. ब्रह्मोत्तरखंड. जैमिनीअश्वमेध. पांडुरंगमाहात्म्य.

---

# वेंचे हरि-विजयांतील.

## ओंव्या.

### अध्याय अठरावा.

#### अक्रूरागमन.

बलराम आणि कृष्ण ह्यांस फसवून मारण्याकरितां धनुर्याग पाहण्याचे निमित्तानें मथुरेस बोलावून आणावें, म्हणून कंसानें अक्रूराला गोकुळास पाठविलें. ही कथा ह्या प्रकरणांत सांगितली आहे.

ऐकोनि हरि-प्रताप उदंड ॥ कंस चिंताक्रांत अखंड ॥ म्हणे कृष्णें दैत्य मारिले प्रचंड ॥ देव समस्त भीती जया ॥ १ ॥ पंचाननाचा प्रताप ऐकोन ॥ भयाभीत जेंवि वारण ॥ कीं यशवंत विनता-नंदन ॥ दंदशूक ऐकोन तटस्थ ॥ २ ॥ तैसा भयें व्यापिला कंस ॥ गोड कांहीं न वाटे जिवास ॥ नाठवे विलास रात्रंदिवस ॥ परम-पुरुष दृष्टी पडे ॥ ३ ॥ देखिला नसतां चक्र-पाणी ॥ दुरूनि ऐकतां प्रताप श्रवणीं ॥ तैसीच मूर्ती ध्यानीं मनीं ॥ ठसाउनिया बैसली ॥४॥ मेळऊनिया प्रधान चतुर॥ विचारीं बैसले सकळ नृप-वर॥म्हणती आम्हांसी नाटोपे नंद-कुमर॥ कैसा प्रकार करावा ॥ ५ ॥ प्रधान म्हणतो धनुर्याग ॥ आरंभावा स-वेग ॥ बळिराम आणि श्री-रंग ॥ आदरेंकरूनि आणावे ॥ ६ ॥ नंद गौळीयांसमवेतें ॥ मान देऊनिया आणावा येथें ॥ नम्र वचन बोलून त्यातें ॥ शेवटीं घात करावा ॥ ७ ॥ दिवाभीताचे घरीं जाण ॥ काग गेलिया न

मता धरून[१]॥ तैसा गौळियांसमवेत कृष्ण ॥ येथें कोंडोनि वधावा ॥ ॥ ८ ॥ विष-वल्ली जों वाढ नेघे ॥ तों खंडूनिया टाकावी वेगें ॥ तरीच आपणास सुख भोगे ॥ चिरकाळ नृपवरा ॥ ९ ॥ पुढां अनर्थ बहु दिसताहे ॥ म्हणऊनि सुख-निद्रा करूं नये ॥ सत्वर शोधावा उपाये ॥ तरीच कुशळ आपलें ॥ १० ॥ नयनीं हरळ खुपतां ॥ सत्वर काढावे तत्वतां ॥ कंटक पदीं भेदितां ॥ आधीं काढिजे कोरोनि ॥ ११ ॥ तैसा नाना उपाय करूनी ॥ राम-कृष्णांसी आणूनी ॥ विश्वासें घ्यावा प्राण येच क्षणीं ॥ तरीच हें कार्य साधेल ॥ १२ ॥ दाऊनिया आंगपतन[२] ॥ पाषाण फोडील लोह-घन ॥ कीं कांटे चरणीं लागून ॥ जैसे जिव्हार भेदिती ॥ १३ ॥ मस्तक करूनिया खालतें ॥ पारधी विंधी मृगातें ॥ सरांटे जेविं महागजातें ॥ कळ लाउनि उभे करिती ॥ १४ ॥ कीं बचनाग मुखीं घालितां ॥ जिव्हेसी गोड लागे तत्वतां ॥ मग सर्वेचि मृत्यु-व्यथा ॥ प्राप्त करी तात्काळ ॥ १५ ॥ वरी आमिष लाऊनि साचार ॥ क्षणमात्रें गळ भेदी जिव्हार ॥ कीं चणे टाकूनि वानर ॥ विश्वासवूनि धरिती पैं ॥ १६ ॥ कीं वरवर बोले गोड मैंद ॥ परी आपुल्या कार्यासी सावध ॥ तैसे बळदेव आणि गोविंद ॥ विश्वासवूनि वधावे ॥ १७ ॥ ऐकूनि प्रधानांची युक्ती ॥ कंसासी हर्ष न समाय चित्तीं ॥ म्हणे तुमचे बुद्धीपुढें बृहस्पती ॥ उणा वाटे मजलागीं ॥ १८ ॥ तरी आतां पाठवावा कोण ॥ नम्रते बोले विचक्षण ॥ नाना-युक्ती करून ॥ राम-कृष्णां आणील ॥ १९ ॥ प्रधान म्हणती पाठवावा अक्रूर ॥ स्थिर-बुद्धी परम चतुर ॥ त्याचिया बोलें क्षणमात्र ॥ न लगतां येथें येतील ते ॥ २० ॥ मग बोलावूनि अक्रूर ॥ त्यास सांगें मनींचा विचार ॥ गोकुळा जाऊनि सत्वर ॥ राम-कृष्णांसी आणावें ॥ २१ ॥ धनुर्याग मांडिला येथें ॥ सांगावें नंदादिगोळियांतें ॥ महोत्सव पाहोनि मागुतें ॥ गोकुळासी जाइजे ॥ २२ ॥ आमुचा दिव्य रथ जावा घेऊनी ॥ त्यावरी बैसवीं राम-चक्रपाणी ॥ उदयीक सत्वर दोघांसि आणोनी ॥ महोत्सव दाखवावा ॥ २३ ॥ आज्ञा वंदूनि अक्रूर ॥ रथ घेऊन निघाला सत्वर ॥ म्हणे माझिया सुकृत-तरु-वरें ॥ वाढ आजी घेतली ॥ २४ ॥ मनांत

---

१ भोगावयास सांपडेल. २ नम्र होणें. ३ पाषाण कठिण असतो, तरी लोखंडाचा घण पतन पावून त्याचा नाश करील.

चिंता वाटे थोर ॥ म्हणे कंस चांडाळ दुराचार ॥ बळराम आणि यदु-वीर ॥ दोघे सुकुमार कैसे आणूं ॥ २५ ॥ मागुती श्री-कृष्ण-चरित्र ॥ अद्भुत आठवी मनांत ॥ संहारिले दारुण दैत्य ॥ [1]केशी [2]अघ [3]बकादिक ॥ २६ ॥ कृष्ण-प्रताप प्रचंड देख ॥ काय करील कंस मशक ॥ जगद्वंद्यासी आवश्यक ॥ नेईन आतां निर्धारें ॥ २७ ॥ आणीक एक चिंता अंतरीं ॥ विश्वास धरी कीं न धरी ॥ हा कंस-सेवक म्हणोनि मजवरी ॥ कोपेल काय जगदात्मा ॥ २८ ॥ तो तरी सर्वात्मा सर्व-साक्षी ॥ जो अनंत ब्रह्मांडें चित्तीं परीक्षी ॥ भक्ताभक्तांचीं लक्षणें लक्षी ॥ संकटीं रक्षी निज-दासां ॥ २९ ॥ म्हणे आजि धन्य नयन ॥ देखेन वैकुंठींचें निधान ॥ पूर्ण-ब्रह्म सनातन ॥ मी पाहेन डोळेभरी ॥ ३० ॥ जो दश-शत-मुखांग-[4]शयन ॥ मी त्याचे पदीं भाळ ठेवीन ॥ जो नील-ग्रीवाचें [5]हृदय-ध्यान ॥ चतुरानन बाळ ज्याचें ॥ ३१ ॥ जो क्षीराब्धिवासी पूर्ण ब्रह्म ॥ वेद-शास्त्रांसि न कळे वर्म ॥ त्या हरीसी आजि क्षेम ॥ मी देईन प्रेमावडी ॥ ३२॥ जो निर्गुण निर्विकार ॥ जो देश-कालातीत [6]अ-पार ॥ तो गोकुळीं यादवेश्वर॥डोळेभरी पाहीन मी ॥ ३३ ॥ दुरूनि गोकुळ अक्रूरें देखतां ॥ साष्टांग घातलें दंडवता ॥ म्हणे धन्य व्रज-वासी समस्त ॥ नित्य मुख पाहती हरीचें ॥ ३४ ॥ तों गोखुरांमागें चांगलीं ॥ पाउलें हरीचीं उमटलीं ॥ अक्रूरें घेऊनिया धुळी ॥ लाविली भाळीं आपुले ॥ ३५ ॥ जोडोनिया दोन्ही हात ॥ चरणचाली अक्रूर चालत ॥ कंठ झाला सद्गदित ॥ अश्रु-पात वाहती ॥ ३६ ॥ पद-मुद्रा उमटल्या जेथें ॥ मागुती प्रणिपात करी तेथें ॥ तों वृक्ष देखिले निज-भक्तें ॥ काय त्यांतें बोलत ॥ ३७ ॥ म्हणे धन्य धन्य तुम्ही वृक्ष ॥ तमचे छायेसि बैसला कमलाक्ष ॥ जो भूतांतरात्मा कर्माध्यक्ष ॥ सहस्राक्ष शरण जया ॥ ३८ ॥ तों सायंकाळीं परतला गोभार ॥ गोपांसहीत यादवेश्वर ॥ सर्वें ज्येष्ठ बंधु बळिभद्र वीर ॥ वाद्यगजर बहु हो-

---

१ केशी दैत्य हा कंसाकडून कृष्णाला मारण्याकरितां घोडा होऊन गोकुळांत गेला होता, तो कृष्णानें मारला. २ अघासुर हा कृष्णाला मारण्याकरितां मोठा अजगर होऊन गेला होता, तोही कृष्णानें मारला. ३ बकासुर हा कृष्णाला मारण्याकरितां बगळा होऊन गेला होता, तोही कृष्णानें मारला. ४ शेषशायी. ५ शंकराचें. ६ निज ( अनाद्यंत ) ( कृष्ण ) त्याच्या भक्तानें.

ती ॥ ३९ ॥ गोरज-धुळी दाटली बहुत ॥ तेणें झांकोळला अक्रूर-रथ॥ नंद-मंदिराजवळि अकस्मात ॥ अक्रूर तेधवां पातला ॥ ४० ॥ अक्रूरें नंद देखोन ॥ धांवोनि दिधलें क्षेमालिंगन ॥ तों पातले दोघे जण ॥ शेष-नारायण ते काळीं ॥ ४१ ॥ देखिला त्रिभुवन-नाथ डोळां ॥ नीळ-जीमूत-वर्ण घन-सांवळा ॥ रुळती आपाद वनमाळा ॥ गोरजें डौरला वदन-चंद्र ॥ ४२ ॥ उदार श्री-मुख आकर्ण-नयन ॥ कुंडलास भोंवती किरण ॥ हरि-तनूचा आश्रय पूर्ण ॥ अलंकार घव-घवित ॥ ४३ ॥ अक्रूर यादवाचा वडील बहुत ॥ देखूनिया श्री-कृष्णनाथ ॥ चरण वंदावया धांवत ॥ तो अक्रूरें दंडवत घातलें ॥ ४४ ॥ नेत्रीं चालल्या प्रेमांबु-धारा ॥ ऐसें देखोनि परात्पर[2] सोइरा ॥ अक्रूराचा कर धरोनि सत्वरा ॥ उठवूनिया क्षेम[3] दीधलें ॥ ४५ ॥ अक्रूराचे गळां मिठी ॥ दृढ घालीत जगजेठी ॥ रेवती-रमण, परमेष्ठी ॥ त्यांस हो भेटी नोहेची ॥ ४६ ॥ निज-भक्त जाणतो गोडी ॥ समाधी कायसी बापुडी ॥ तीर्थांव्रतांचिया कोडी ॥ करूनिया वोंवाळिजे ॥ ४७ ॥ क्षणक्षणां तो अक्रूर ॥ कृष्ण-मुख न्याहाळोनि सुंदर ॥ धरी हरि-चरण वारंवार ॥ तृप्ति नोहे सर्वथा ॥ ४८ ॥ बळिरामासी नमून ॥ अक्रूरें दीधलें आलिंगन ॥ साक्षात् शेष-नारायण ॥ अवतार-पुरुष देखिले ॥ ४९ ॥ अक्रूराचे दोन्ही हात ॥ बळदेव आणि अनंत ॥ धरूनि प्रवेशले मंदिरांत ॥ नंदासहित तेधवां ॥ ५० ॥ यशोदेसी नमस्कारी अक्रूर ॥ आसनीं बैसला सादर ॥ सांगे मथुरेचा समाचार ॥ स-विस्तर साद्यंत ॥५१॥ नंदासि म्हणे अक्रूर ॥ कंसें बलाविलें तुम्हांसि सत्वर ॥ बळदेव आणि यादवेश्वर ॥ याग पाहावया चलावें ॥ ५२ ॥ धनुर्याग पाहोनिया मागुती ॥ सर्वेचि यावें गोकुळाप्रती ॥ उदया येतां गभस्ती ॥ अति-सत्वर निघावें ॥ ५३ ॥ तों नंद-यशोदा बोलत ॥ मथुरेसि नेतां श्री-कृष्णनाथ ॥ तेचि क्षणीं आमुचा प्राणांत ॥ होईल जाण अक्रूरा ॥५४॥ कृष्णाचा करावया घात ॥ कंस अहो-रात्र जपत ॥ अक्रूरा तूं आमुचा परम आप्त ॥ पाहे विचारूनि मानसीं ॥ ५५ ॥ अक्रूर हांसोनिया बोलत ॥ तुमचे दृष्टीस हा बाळ दिसत ॥ परी कृतांतासी शिक्षा करीत ॥ कृष्णनाथ निर्धारें ॥५६॥ हरी

---

१ भेटणें. २ सर्वांहून पर जी माया तीहून पर म्ह० उत्कृष्ट किंवा पलीकडला. ३ आलिंगन.

बोले तेचि समयीं ॥ अंतरीं भय धरूं नका कांहीं ॥ चला मथुरेसि लवलाहीं ॥ गौळी समागमें घेऊनी ॥ ५७ ॥ अक्रूर बोले न लागतां एक क्षण॥ कंसासी मारील श्री-कृष्ण ॥ मुष्टीक[1] चाणूर यांचे मरण ॥ जवळि बहुधा पातलें ॥ ५८ ॥ कृष्णें पूर्वीं पराक्रम केले ॥ ते नंद-यशोदेशी आठवले ॥ थोर दैत्य संहारिले ॥ अघ[2] बक केशी प्रलंब॥५९॥ गोवर्धन पर्वत उचलिला ॥ काळिया मर्दोनि अग्नी[3] प्राशिला ॥ आखंडल[4] शरण आला ॥ तोही देखिला सकळिकीं ॥६०॥ हा असे निर्भय सर्वदा पाहें॥ यासी कळिकाळाचें नाहीं भय॥ बुद्धि-बळाचा समुद्र यादवराय॥ ते गोष्टी मानवली समस्तांसी ॥ ६१ ॥ कर्ता हर्ता भुवन-गोप्ता ॥ सरी सर्वत्र जयाची सत्ता ॥ त्या ह्या यशोदे तव सुता ॥ नाहीं भय कंसाचें ॥ ६२॥ अक्रूर म्हणे प्रातःकाळीं ॥ निघावे नंदादि सर्व गौळी ॥ गोकुळीं मात प्रगटली ॥ कीं वनमाळी उद्यां जातो ॥६३॥ तों उगवला वासर-मणी ॥ स्नान-संध्यादि भोजन सारूनी ॥ बळदेव आणि चक्र-पाणी ॥ सिद्ध-जाले तेधवां ॥ ६४ ॥ दिव्य रथ अक्रूरें सजिला ॥ गौळीयांचा मेळा निघाली ॥ गोरस कावडी ते वेळा ॥ भरोनि घेतल्या कंसभेटी ॥ ६५ ॥ यशोदा आणि रोहिणी यांते ॥ नमस्कारिलें बळराम-कृष्णनाथें ॥ हात

---

१ मुष्टिक आणि चाणूर हे दैत्य मोठे पहिलवान होते. त्यांनीं कृष्णाला आणि बलरामाला कुस्ती करून मारावें म्हणून कंसानें कृष्ण व बलराम मथुरेस आल्यावर त्यांची ह्यांची कुस्ती लाविली. त्या वेळीं मुष्टिकास बलरामानें मारलें आणि चाणूरास कृष्णानें मारलें. २ अघ, बक, आणि केशी ह्यांच्या कथांच्या टिपा ह्याच अध्यायांत मागें दिल्या आहेत त्या पहाव्या. प्रलंबासुर हा गौळ्याचे सोंग घेऊन कृष्ण-बलराम वृंदावनांत गोपांसहवर्तमान खेळत होते तेथें त्यांस मारण्याकरितां गेला होता तो बलरामानें मारला. ३ कृष्णानें कालियमर्दन केल्यावर यमुनातीरीं एकाएकीं मोठा वणवा लागला, तो अग्नि कृष्ण पियाला अशी कथा आहे. ४ इंद्र-इंद्रानें वर्षास वृष्टि चांगली करावी म्हणून त्यास प्रसन्न करून घेण्याकरितां तदुद्देशानें नंद वर्षास यज्ञ करीत असे, तो न करितां ब्राह्मण, गाई, गोवर्धन-पर्वत ह्यांच्या उद्देशानें यज्ञ करावा म्हणजे पर्जन्य वृष्टि चांगली होऊन धान्यतृणाची समृद्धि होईल, असें सांगून इंद्रोद्देशक यज्ञ कृष्णानें मोडिला. त्यावरून इंद्रास मोठा राग येऊन गोकुळ सर्व वाहवून नेण्याकरितां त्यानें मनस्वीच वृष्टि करविली. त्या वेळीं कृष्णानें गोवर्धनपर्वत बोटावर उचलून धरून त्याचे खालीं सर्व गोकुळाचें संरक्षण केलें. हें इंद्रानें पाहिलें, तेव्हां इंद्र हतगर्व होऊन कृष्णास शरण आला; अशी कथा आहे.

जोडोनिया म्हणती माते ॥ जाऊनि येतों पुढतीं ॥ ६६ ॥ यशोदा म्हणे हे जगजेठी ॥ आतां कैंची तुझी भेटी ॥ स्नेहाचे उमाळे उठती पोटीं ॥ स्तनीं पान्हा फूटला॥६७॥ तूं जातोसि मन-मोहना॥ मी आतां न ठेवीं आपुल्या प्राणा ॥ माझिया विसांव्या राजीव-नयना ॥ मन-रंजना श्री-हरी ॥ ६८ ॥ मम सांवळे कान्हाई ॥ जगन्मोहने कृष्णाबाई ॥ तुझे गुण आठऊं कितीकाई ॥ मिती नाहीं तयांते ॥ ६९ ॥ विश्वरूप दाविलें नयनीं ॥ गोवर्धन उचलिला चक्रपाणी ॥ द्वादश गावें महा अग्नी ॥ गिळोनि तुवां रक्षिलें ॥ ७० ॥ नंद बुडाला यमुना-जीवनीं ॥ घेऊनि आलासि सारंगपाणी ॥ सर्पें गिळिलें शक्ति-स्थानीं ॥ तेथें रक्षिलें पाडसा ॥ ७१ ॥ ब्रह्मांड-नायका तवं जननी ॥ म्हणतां लज्जा वाटे मनीं ॥ माता पिता बंधु भगिनी ॥ तूंचि माझी श्रीरंगा ॥ ७२ ॥ मातेचिया चरणावरी ॥ मस्तक ठेवी श्री-मुरारी ॥ माता म्हणे पूतनारी ॥ उपेक्षा कां केली तुवां माझी ॥ ७३ ॥ तंव गोपिका आल्या धांवत ॥ दोहीं हातीं ह्रदय पिटित ॥ कितीएक पडती मूर्छागत ॥ थोर प्राणांत वोढवला ॥ ७४ ॥ एक धरणीवरी लोळती ॥ एक दीर्घ स्वरें हाका देती ॥ एक अवनीवरी कपाळ पिटिती ॥ प्राणांत गती वोढवली ॥ ७५ ॥ एक म्हणती गेला सांवळा ॥ आतां अग्नि लावा गोकुळा ॥ गोकुळींचा प्राण चालिला ॥ अंत-कळा आली पैं ॥७६॥ हा चांडाळा अक्रूरा परियेसीं ॥ अकस्मात कोठूनि आलासी ॥ आहा गोकुळींचा प्राण नेतोसी ॥ निर्दय होसी तूं साच ॥ ७७ ॥ सकळ गौळिणींचिया हत्या ॥ अक्रूरा पडतील तुझिया माथां ॥ नेवों नको श्री-कृष्णनाथा ॥ इतुकें आतां आम्हांसि देईं ॥ ७८ ॥ तुझें नाम ठेविलें अक्रूर ॥ परि तुजसारिखा नसे

---

१ कृष्णानें मृत्तिका खाल्ली म्हणून बळरामानें एकदां यशोदेस सांगितलें; तेव्हां यशोदा कृष्णास मारूं लागली, त्या वेळीं आपण मृत्तिका खाल्ली नाहीं म्हणून दाखविण्या-करितां कृष्णानें आपलें तोंड उघडून यशोदेस दाखविलें; त्या वेळीं तोंडाचे आंत सर्व विश्व दाखविलें. २ कंसानें एकदां कृष्णास मारण्याकरितां गोकुळांत दूत पाठवून गोवर्धनपर्वत आणि आजूबाजूचें बारा कोस अरण्य यांस आग लावविली, ती कृष्णानें गिळली, अशी कथा आहे. ३ देवीच्या जत्रेंत.—एकदा नंद हा अंबिकेच्या जत्रेस गेला असतां तेथें सर्पानें (अजगरानें) त्यास गिळिलें; तेव्हां तेथें कृष्णानें त्यापासून त्यास (नंदास) सोडविलें. अशी कथा भागवत. दशमस्कं. पूर्वार्ध यांत आहे.

निर्दय थोर ॥ बहुत झालासी कां क्रूर ॥ परम निष्ठूर तूं होसी ॥ ७९ ॥ तंव राम-कृष्ण रथावरी ॥ बैसोनिया चालिले सत्वरो ॥ रथापुढें येऊनि व्रज-नारी ॥ धरणी आडव्या पडताती ॥ ८० ॥ एक अक्रूरापुढें पदर पसरोन ॥ म्हणती आम्ही अ-नाथ दीन ॥ करीं आजि कृष्ण-दान ॥ कीर्ति त्रिभुवनीं भरों दे ॥ ८१ ॥ अक्रूरा देखतां घेऊनिया माती ॥ गोपी आपुल्या मुखीं घालिती॥ म्हणती मन-मोहना यदु-पती॥ भेटसी आतां कधीं तूं ॥८२॥ ऐसें देखोनि त्या अवसरा ॥ अष्ट[1]-भाव नावरती अक्रूरा ॥ नयनीं चालिल्या अश्रु-धारा ॥ प्रेम देखोनि गोपिकांचें ॥८३ ॥ म्हणे धन्यधन्य यांचें प्रेम ॥ यांनीं वश्य केला पुरुषोत्तम ॥ जो निर्विकार पर-ब्रह्म ॥ नाम-रूपातीत जो ॥ ८४॥ गोपींचिया शोकासी नाहीं पार॥ जैसा वनासि जातां रघु-वीर ॥ पाठी लागे अयोध्या-नगर॥तैसेंचि येथें जाहलें ॥ ८५ ॥ जीवनावीण मीन जैसे ॥ गोकुळींचे लोक तळमळती तैसे ॥ यशोदेशी मूर्छा येतसे ॥ धांवतसे रथापाठी ॥ ८६ ॥ माझे विसावया जग-जीवना ॥ तुझें मुख पाहों दे मन-मोहना॥ येई मज प्रेमाचा पान्हा ॥ पाजूं कोणा सांग पां॥८७ ॥ माझे सांवळे कान्हाई ॥ उभी राहें कृष्णाबाई ॥ तुज वेगळ्या दिशा दाही ॥ वोस झाल्या मज आतां ॥८८ ॥ ॥ व्रज-स्त्रियांचा आकांत भारी ॥ ऐकोनि श्री-कृष्ण रथावरी॥ हातानें दुरूनि खुणा करी ॥ येईन लौकरी म्हणोनी ॥८९॥ हरी म्हणे अक्रूरा ॥ आतां रथ चालों द्या सत्वरा ॥ तरीच या गोपिका सुंदरा ॥ दुरी मागें राहतील ॥ ९० ॥ रथ घडघडां समीर-गती ॥ क्रमूनि मागें टाकिली जगती ॥ तेधवां गोपिका मूर्छागत पडती॥ हाका फोडिती कृष्ण-नामें ॥९१॥ म्हणती सखया वनमाळी ॥ तुझा वियोगानळ आम्हां जाळी ॥ एक म्हणती रथाजवळी ॥ धांवोनि जाऊं चला गे ॥ ९२ ॥ अक्रूरासि घालोनि कृष्णाची आण ॥ रथ वेगें आणावा परतोन ॥ नेदी तरी बळें हिरोन ॥ आणूं मन-मोहन आतांची ॥ ९३ ॥ आम्ही आहोंत इतक्या सुंदरी ॥ अक्रूर एकला काय करी ॥ तों रथ गेला बहुत दुरी ॥ विकळ नारी पडियेल्या ॥ ९४ ॥ रथ उतरला खोल भूमीस ॥ न दिसे ध्वज आणि कलश[2] ॥ मग होऊनिया निराश ॥ गोपी समस्त परतल्या ॥ ९५ ॥

---

१ सात्विक अष्टभाव ते येणेंप्रमाणें—१ स्तंभ ( स्तब्धता ), २ प्रलय ( बेशुद्धि ), ३ रोमांच (आंगावर कांटायेणें), ४ स्वेद ( घर्म ), वैवर्ण्य ( तोंडावरचा वर्ण फिरणें ), ६वेपथु (कंप),७अश्रु (डोळ्यांतून पाणी येणें), आणि८ वैस्वर्य (स्वर पालटणें). २ कळस.

अवघ्या गोपी आक्रांत करीत ॥ गोकुळा चालिल्या समस्त ॥ एक म्हणती आग त्वरित ॥ लावा आतां गोकुळा ॥ ९६ ॥ ऐसा शोक करीत सुंदरी ॥ प्रवेशल्या यशोदेचिया मंदिरीं ॥ यशोदा म्हणे ते अवसरीं ॥ माझा श्री-हरी दावा गे ॥९७ ॥ सकळ गोपी यशोदेचे कंठीं ॥ घालिती तेधवां दृढ मिठी ॥ शोक केला तो न माय सृष्टी ॥ न वर्णवेचि कोण्हातें ॥ ९८ ॥ श्री-कृष्णाची बाळलेणीं ॥ टाकिलीं गोपीपुढें आणोनि॥ हरीची खेळणीं पोटीं धरूनी ॥ माय रडे तेधवां ॥ ९९ ॥ असो तें, खेद करीत गौळिणी ॥ प्रवेशल्या आपुले सदनीं ॥ गृह-कृत्य करितां चक्र-पाणी॥ गीत गाती सर्वदा ॥ १०० ॥

---

## वेंचे, राम-विजयांतील.

### ओंव्या.

### अध्याय पहिला.

जय जय गज-वदना निरुपमा॥ अ-गाध न वर्णवे तुझा महिमा॥ तुझि-या गुणांची पावावया सीमा ॥ कैसा सरता होईन मी ॥ १ ॥ काखेसी मेरु घेवूनि देखा॥ कैसे नृत्य करील पिपीलिका ॥ कैसें ब्रह्मांड उचलेल मशका ॥ भू-गोळ मक्षिका केविं हालवी॥२॥ चंद्रासी कर्पूराचें उटणें॥ वासर-मणीसी दर्पण दाखवणें॥ हिम-नगासी वारा घालणें॥मेघासी स-मर्पण उदकांजुळी ॥ ३॥ सुर-तरुपुढें ठेविलें बदरी-फळ ॥ मळयानिळा-सी सु-गंध परिमळ ॥ कामधेनूसी शुष्क-तृण-कवळ॥आणोनिया सम-र्पिलें ॥ ४ ॥ क्षीर-सिंधूसी समर्पिलें अजा-क्षीर॥ कनकाद्री-पुढें ठेविली गार ॥ तैसें प्राकृत-बोलें अ-पार॥ तुझें महत्व केविं वर्णूं ॥५॥ परी जो छंद घेत बाळक॥ स्नेहें करून पुरवी जनक॥ तरी हा राम-विजय ग्रंथ सुरेख ॥ सिद्धी पावो तव कृपें ॥ ६ ॥ आतां नमूं सरसिजोद्भव-कुमा री ॥ जे विलसे सदा कवि-जिव्हाग्रीं ॥ जीचे वरदें मूकही करी ॥ वाचस्पतीसीं विवाद ॥ ७ ॥ जे आनंद-सरोवर-मराळिका ॥ जे चातु-र्य-चंपक-कळिका ॥ जीचे कृपेची करून नौका ॥ कवि-बाळका नेत पर-तीरा ॥ ८ ॥ कृपें तुझे विरंची-कुमारी ॥ जन्मांध होती महा जो-हरी ॥ अति-मूढ तो वेदार्थ करी ॥ शक्र-पदीं बैसे रंक ॥ ९ ॥ अंबे तूं

कवि-हृदयाब्ज-भ्रमरी ॥ कीं निजानंद-सागरींची लहरी ॥ वाग्वल्ली तूं बैसे जिव्हाग्रीं ॥ विरुढे सफळ सर्वदा ॥ १० ॥ विवेक-हंस शुद्ध धवळ ॥ त्यावरी तुझें आसन चंचळ ॥ तप्त-कांचन जैसें सुढाळ ॥ तैसें निर्मळ निजांग तुझें ॥ ११ ॥ शुभ्र कंचुकी शुभ्र अंबर ॥ दिव्य मुक्तलग[1] अलंकार ॥ निज-बोध-वीणा घेऊनि सु-स्वर ॥ गायन करिसी स्वानंदें ॥ १२ ॥ ऐकतां शारदेचें गायन ॥ तन्मय विधी विष्णु ईशान ॥ अंबे तुझें सौंदर्य पाहून ॥ मीन-केतन तटस्थ ॥ १३ ॥ रंभा उर्वशी तिलोत्तमा ॥ सावित्री आणि मुख्य रमा ॥ तुझ्या चातुर्य-समुद्राची सीमा ॥ त्याही कदा न पावती ॥ १४ ॥ अंबे तुझे गुण केविं वर्णावे ॥ केविं अर्कासी अर्कसुमनें पूजावें ॥ अंबर कैसें मुष्टींत साठवे ॥ पालवीं बांधवे वायु कैसा ॥ १५ ॥ न करवे उर्वीचे वजन ॥ न गणवे सिंधूचें जीवन ॥ सप्तावरणें[2] भेदून ॥ मशक केवीं जाऊं शके ॥ १६ ॥ ऐकोनि बाळकाचीं वचनें ॥ जननी हृदयीं धरी प्रीतीनें ॥ तैसें सरस्वतीनें निज कृपेनें ॥ घातलें ठाणें जिव्हाग्रीं ॥ १७ ॥ माझें मन मूढ चकोर ॥ कुहूमाजी इच्छी रोहिणी-वर ॥ परी सरस्वती कृपाळू थोर ॥ शुद्ध बीज प्रगटली ॥ १८ ॥ बीजेपासून चढत्या कला ॥ तो चकोरासी अधीक सोहळा ॥ तैसीच येथें रघु-नाथ-लीला ॥ चढे आगळा रस पुढें ॥१९॥ ज्ञानाचे अनंत डोळे ॥ उघडिले एकेचि वेळे ॥ आतां वंदूं सद्गुरूचीं पाउलें ॥ ज्याचेनि प्रगटे दिव्य ज्ञान ॥ २० ॥ जो अज्ञान-तिमिर-छेदक ॥ जो प्रगट वेदांत-ज्ञानार्क ॥ तो ब्रह्मानंद महाराज देख ॥ परमाद्भुत महिमा ज्याचा ॥ २१ ॥ जो कां पांडुरग-नगर-विख्यात ॥ जो भक्त भीमा-तटीं समाधिस्थ ॥ तो यति-राज महिमा अद्भुत ॥ कवण वर्णू शके पैं ॥२२॥ जागृती स्वप्न सुषुप्ती तुर्या पूर्ण ॥ चहू अवस्थांवरी ज्याचें आसन ॥ उन्मनीही निरसून ॥ स्व-सुखीं पूर्ण समाधिस्थ ॥२३॥ चांदणें कैंचें नसतां मृगांक ॥ कीं किरणें कैंचीं नुगवतां अर्क ॥ जीवनावांचोनि बीज देख ॥ सहसा अंकुर फुटेना ॥२४॥ जरी नेत्रेंवीण न दिसे पदार्थ ॥ मथनेंवीण न निवडे नवनीत ॥ तैसा सद्गुरुवांचोनि परमार्थ ॥ ठायीं न पडे जीवासी ॥ २५ ॥ वर नसतां व्यर्थ वऱ्हाड ॥ शीर नसतां कायसें धड ॥

१ ज्यांस मोतीं लाविलीं आहेत असे. २ पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, अहंकार, आणि महत्तत्त्व-हीं सात.

तैसें गुरु-कृपेवीण व्यर्थ कावाड ॥ व्रतें तपें साधनें ॥ २६ ॥ अंजनेंवीण न सांपडे निधान ॥ कीं गायत्रीवीण ब्राह्मण पूर्ण ॥ सीमा कैंची ग्रामावीण ॥ तैसें गुरुवीण ज्ञान न घडे ॥ २७ ॥ म्हणोनी तनु-मनधनेसी अनन्य ॥ ब्रह्मानंद-स्वामीस शरण ॥ आरंभीं श्री-राम-कथा गहन ॥ ग्रंथ संपूर्ण सिद्धी पावो ॥२८॥ ऐसे ऐकतां स-प्रेम बोल ॥ बोलिला श्री-गुरू दयाळ ॥ चकोराकारणें उतावेळ ॥ मृगांक जैसा उगवे ॥ २९ ॥ कीं चातकालागीं धांवे जल-धर ॥ कीं क्षुधितापुढें क्षीर-सागर ॥ कीं कल्पवृक्ष शोधीत आला घर ॥ दरिद्रियाचें साक्षेपें ॥३०॥ तैसा श्री-गुरु दया-सागर ॥ तेणें दीधले अ-क्षय्य वर ॥ म्हणे सिद्धी पावेल साचार ॥ राम-विजय ग्रंथ हा ॥३१॥ आतां वंदूं संत-सज्जन ॥ जे वैराग्य-वनींचे पंचानन ॥ जे ज्ञानांबरींचे चंड[1]-किरण ॥ उदय अस्त नसे जया ॥ ॥ ३२ ॥ जे भक्ति-सरोवरींचे राजहंस ॥ जे कां अविद्यारूया हुताश ॥ कीं ते पद्म-हस्तो विशेष ॥ भव-रोग-वैद्य हे ॥ ३३ ॥ कीं जीव पावे आपुल्या स्व-पदासी ॥ ऐसे मुहूर्त देणार जोशी ॥ कीं ते पंचाक्षरी निश्चयेसीं ॥ जे पंच-भूतांसी पळविती ॥ ३४ ॥ कीं दैवी संपत्तीचे भाग्यवंत ॥ मुमुक्षांसी करिती दरिद्र-रहित ॥ कीं सद्विद्येचीं अद्भुत ॥ गोपुरें काय उंचावलीं ॥ ३५ ॥ संत श्रोते चतुर पंडित ॥ माझें बोलणें आर्ष-अत्यंत ॥ जैसें सरस्वतीपुढें मूढ बहुत ॥ वाग्विलास दावितसे ॥ ३६ ॥ सूर्यापुढें जैसा दीप देख ॥ जान्हवीस न्हाणी थिल्लरोदक ॥ कीं कनकाद्री अति सुरेख ॥ त्यासी अलंकार पितळेचे ॥ ३७ ॥ कामधेनूस समर्पिलें अजा-क्षीर ॥ चंद्रासी सीतळ करी रंभा-पत्र ॥ कल्पतरू कल्पिलें देणार ॥ त्यासि निंबोळ्या समर्पिल्या ॥ ३८ ॥ रत्नाकरापुढें काचवटी समर्पिली ॥ तैसी माझी आर्ष बोली ॥ परी तुम्हीं प्रीती ठेविली ॥ प्राकृत शब्दीं नवल हें ॥ ३९ ॥ विष्णूसि भूषणें अपार ॥ परी तुळसीवरी आवडी थोर ॥ कीं अपर्णा-पतीसी बिल्व-पत्र ॥ भक्तीं वाहतां आवडत ॥ ॥ ४० ॥ रायें पाठिसीं दासी घालितां ॥ तिची सर्वांवरी चाले सत्ता ॥ प्रभु अल्प-मोलाचे अलंकार लेतां ॥ जनां समस्ता थोर दिसे ॥ ४१ ॥ म्हणोनि तुम्ही संत प्रभु थोर ॥ महिमार्णवींचीं जाहाजें अपार ॥ मोटेंत बांधवेल समीर ॥ चरणीं अंबर क्रमवेल पैं ॥ ४२ ॥ गणवेल पृथिवीचे

---

१ सूर्य.

रजःकण ॥ मोजवेल सागरीचें जीवन ॥ कनकाद्रीचा चेंडू करून ॥ उडविजेल सर्वथा ॥ ४३ ॥ भोगींद्र-मस्तकींचा मणी ॥ आणवेल एकादे क्षणीं ॥ सूर्य जातां धरवेल गगनीं ॥ नक्षत्रें गुणीं ओंविजे ॥ ४४ ॥ काढवेल शशि-मंडळींचें अमृत ॥ मोडिजेल ऐरावताचे दंत ॥ दिग्गज आणोनि समस्त ॥ एके ठायीं बांधिजेती ॥ ४५॥ तुरग करुनी प्र-भंजन ॥ सर्वांठायीं करवेल गमन ॥ परी तें संतांचें महिमान ॥ ब्रह्मानंदें पूर्ण न वर्णवे ॥ ४६ ॥ तों संत बोलती आनंद-घन ॥ मन निवालें तुझे बोल ऐकोन॥आम्ही करूं इच्छितों राम-कथा-श्रवण॥वरी दृष्टांत गोड तुझे ॥ ॥ ४७ ॥ मेरू सुंदर रत्नेंकरून ॥ नक्षत्रीं मंडित गगन ॥ कीं वृक्ष फळीं परिपूर्ण ॥ दृष्टांतीं संपूर्ण ग्रंथ-शोभा ॥४८॥ कीं शांति-क्षमा-दया-विशेष ॥ तेणें मंडित सत्पुरुष ॥ कीं परिवारासमवेत नरेश ॥ दृष्टांतें सु-रस ग्रंथ-शोभा ॥ ४९ ॥ आधींच भूक लागली बहुत ॥ त्याही वरी वाढिलें पंचामृत॥कीं दुर्बळासी अकस्मात ॥ कल्पतरू भेटला ॥ ५० ॥ कन्यार्थी हिंडतां भू-मंडळ ॥ त्यासी राज-कन्या घाली माळ ॥ कीं रोगिया रसायण निर्मळ ॥ अकस्मात जोडलें ॥ ५१ ॥ आतां बहुत टाकुनी शब्द-जाळ ॥ बोलें राम-कथा रसाळ ॥ जैसी सिकता सांडोनि मराळ ॥ मुक्ता-फळें सेवितो ॥५२॥ कीं कोश-गृहीं प्रवेशोनी ॥ भांडारी रत्नें काढी निवडोनी ॥ कीं दोष टाकोनि सज्जनीं ॥ उत्तम गुण स्वीकारिजे ॥ ॥ ५३ ॥ ऐसे संतांचे बोल-परिकर ॥ ऐकोनि ब्रह्मानंदें श्रीधर ॥ साष्टांग घालोनि नमस्कार ॥ म्हणे सादर परिसीजे ॥५४॥ अ-संभाव्य श्री-राम-चरित्र॥शत-कोटि ग्रंथ-विस्तार॥वाल्मीकि बोलिला अ-पार॥कथा-समुद्र अ-गम्य ॥५५॥ मूळापासोन इतुक्या कथा ॥ कैशा वर्णवतील तत्त्वतां ॥ त्यामाजि वाल्मीकि-रामायण-नाटक-ग्रंथा ॥ श्री-राम-विजयालागीं कथूं ॥ ५६ ॥ समस्त कवींसी नमस्कार ॥ जो जगद्गुरु आचार्य शंकर॥ जेणें मतें उच्छेदूनि समग्र ॥ शुद्ध मार्ग वाढविला ॥ ५७ ॥ जो श्रीधराचार्य टीकाकार ॥ त्यासी नमस्कारीत श्रीधर ॥ मधुसूदनादिक नरेंद्र ॥ ग्रंथ अ-पार जयांचे ॥ ५८ ॥ जो शृंगार-वनींचा विहंगम जाण ॥ तो जयदेव पद्मावती-रमण ॥ ज्याची काव्य-कळा पाहोन ॥ पंडित जन तटस्थ ॥ ५९॥ जो वेदांत-क्षीरार्णवींचा मीन ॥ जेणें विवेक-सिंधू निर्मि-

ला पूर्ण ॥ तो मुकुंदराज गुण-निधान ॥ तयाचे चरण वंदिले ॥ ६० ॥ तारावया जग समग्र ॥ पुन्हा अवतरला रमा-वर ॥ गीतार्थ केला साचार ॥ तो ज्ञानेश्वर जगद्गुरू ॥ ६१ ॥ जो भानुदास-कुल-भूषण ॥ प्रतिष्ठानवासी परिपूर्ण ॥ त्या एकनाथें ग्रंथ संपूर्ण ॥ बहु रसाळ कथिyले ॥ ६२ ॥ जे चातुर्य-राजधानीचे कळस ॥ मुक्तेश्वर मुद्गलदास ॥ ज्यांचे ग्रंथ पाहतां सु-रस ॥ ब्रह्मानंद उचंबळे ॥ ६३ ॥ जैसा चंडांशु स-तेज व्योमीं ॥ तैसाचि केवळ वामनस्वामी ॥ ज्याची श्लोक-रचना ये भूमी ॥ भू-मंडळावरी अ-पूर्व ॥६४॥ कृष्णदास जयराम ॥ जें शांति दयेचें निज-धाम॥ज्याचे ग्रंथ ज्ञान-भरित परम॥ जो निःसीम ब्रह्मचारी ॥६५॥ श्री-राम-उपासक निर्मळ ॥ जो भजन-सरोवरींचा मराळ॥ तो रामदास महाराज केवळ ॥ भक्ती प्रबळवी जना ॥ ६६ ॥ ब्रह्मानंदस्वामीचा बंधू सत्य ॥ नाम तयाचें श्रीरंगनाथ ॥ ज्याची कविता समस्त ॥ अ-पार जन उद्धरिले ॥६७ ॥ आतां असो समस्त कवि-वर ॥ अवघे ब्रह्मानंद-रूप साचार ॥ त्यांसी अनन्य-शरण श्रीधर ॥ द्यावा वर ग्रंथासी ॥ ६८ ॥ रवि-कुळीं अवतरला श्रीधर ॥ कैसें केलें लीला-चरित्र ॥ तरला वाल्मीकि साचार ॥ कथा अ-पार बोलिला ॥ ६९ ॥ हें वर्णितां श्री-राम-चरित्र॥तरला वाल्मीकि साचार॥पाप आचरला अ-पार॥ऐका सादर गोष्टी ते ॥ ७० ॥ वाल्मीकि पूर्वी द्विज-सुत ॥ त्यजोनि आचार यज्ञोपवीत ॥ किरात-संगें वाट पाडित ॥ अति उन्मत्त विषयांध ॥७१॥ महा-दुर्धर कानन ॥ देखतां भयाभीत होय मन ॥ पर्वत-दरीमाजी स्थळ करोन ॥ सहपरिवारें वसे तेथें ॥७२॥ भोंवतें द्वादश गांवेंपर्यंत ॥ पाळती राखोनि वाट पाडित ॥ केल्या ब्रह्म-हत्या अ-संख्यात ॥ नाहीं गणती इतर जीवां ॥ ७३ ॥ मत्स्य धरावया लागीं बक ॥ जैसा होऊनि बसे सात्विक ॥ कीं मूषकालागीं बिडालक ॥ बैसे टपत तयापरी ॥ ७४ ॥ कीं अंग-संकोचें पारधी ॥ जाणोनि तात्काळ मृग साधी ॥ तैसा वाल्ह्या जीव वधी ॥ पाप-बुद्धी निर्दय ॥ ७५ ॥ अ-पार जीव मारिले ॥ पापाचे पर्वत संचिले ॥ जैसें अंत्यज-गृहाभोंवते पडिले ॥ ढीग पशु-अस्थींचे ॥ ७६ ॥ ऐसें करितां पापाचरण ॥ तयासी आलें वृद्धपण ॥ पुत्र जाले अति तरुण ॥ परी आंगवण[1] न सांडी ॥७७॥ हातीं शस्त्र घेऊनि वाल्ह्या॥

---

1 सवय.

मार्ग लक्षीत जों बैसला ॥ तों अकस्मात नारद प्रगटला ॥ पूर्व-पुण्यें-करोनी ॥ ७८ ॥ चंद्र वेष्टिती नक्षत्रें जैसीं॥ भोंवती ऋषींची मांदी तैसी॥ तों पाळती सांगती वाल्हियासी ॥ जाती तापसी बहुसाल ॥ ७९ ॥ वाटेसी धांवून आडवा आला ॥ शस्त्र उभारूनि ते वेळां ॥ दटावूनि ऋषींचा मेळा ॥ उभा केला क्षणभरी ॥८०॥ कीं स्वर्ग-पंथें जातां नेटें ॥ जैसी यम-पुरी लागे वाटे ॥ कीं पुण्यें आचरितां उद्भटें ॥ काम-क्रोध आडविती ॥ ८१ ॥ असा वाल्ह्या म्हणे तयांसी ॥ यात्री[1] आणारे मज-पासीं ॥ नाहीं तरी मुकाल प्राणासी ॥ माझे हस्तें करोनी ॥ ८२ ॥ मग पुढें होऊन ब्रह्म-नंदन ॥ म्हणे ऐक ऐक माझें वचन ॥ तुज आलें वृद्ध-पण ॥ पापें अ-पार घडलीं कीं ॥ ८३ ॥ द्रव्य जोडिलें तुवां अ-पार ॥ जाले दुष्कृताचे संभार ॥ तुझ्या पापासी वांटेकर ॥ कोण्ही आहेत कीं विचारीं ॥ ८४ ॥ आलें तुज जवळी मरण ॥ यम जेव्हां गांजील दारुण ॥ तेव्हां तुज सोडवील कोण ॥ पाहें विचारोनि अंतरीं ॥ ८५ ॥ दारा पुत्र धन यौवन ॥ बंधु सेवक आप्त-जन ॥ शस्त्रें अस्त्रें चतुरंग सैन्य ॥ न ये कामा ते वेळे ॥ ८६ ॥ जीं जीं कर्में प्राणी करिती ॥ तितुकीं देव विलोकिती ॥ सकल तत्वें व्यापून वर्तती ॥ मग साक्ष देती परत्रीं ते ॥ ॥ ८७ ॥ यम-पुरीस चित्रगुप्त ॥ पत्रें काढोनि वाचीत ॥ मग त्यासारिखा दंड करित ॥ कोण तेथें सोडवील ॥ ८८ ॥ जो पुण्य-पंथें न चाले नर ॥ निंदी तीर्थ-यात्रा समग्र ॥ त्यास ताम्र-भूमी तप्त अ-पार ॥ चालविती त्यावरी हळूहळू ॥८९॥ जे परोपकार न करिती॥ त्यांसी असि-पत्रावरी हिंडविती॥ इकडून तिकडे शस्त्रें फुटती॥ कोण सोडवील ते स्थानीं॥९०॥ तप्त-लोह-स्तंभ दारुण ॥ त्यासीं भेटविती नेऊन ॥ देव-द्विजां न करी नमन ॥ त्यासही जाण तेचि गती ॥ ९१ ॥ जो संतांस देखों न शके अपवित्र ॥ त्याचे गीध फोडिती नेत्र ॥ जो कीर्तन स्मरण न करी अणु-मात्र ॥ जिव्हा तोडिती तयाची ॥ ९२ ॥ गुरु देव ब्राह्मण सांडोनी ॥ जो शरण न ये पाप-खाणी ॥ महा-नरकींचें पाणी॥ त्याचे वदनीं ओतिती ॥९३॥ जो तीर्थ-स्नानें निंदी खळ ॥ त्यासी तप्त कढईमाजी तेल ॥ त्यांत तळविती तात्काळ ॥ कोण सोडवी तेथें पां ॥ ९४ ॥ जे साधु-संतांसी पीडिती॥त्यांचे आंगींचीं सालें काढिती ॥ जे द्विज गुरु तीर्थें अव्हेरिती ॥

---

[1] यात्रेकरू लोकांजवळील सामानसुमान.

मिळोन ॥ मोला चढली तिजसमान ॥ तैसेंच माझें प्राकृत भाषण ॥ कराल मान्य वाटतें ॥ २९ ॥ कीं दुग्धांत पडलें किंचित् जीवन ॥ पयें केलें आपुल्यासमान ॥ तेंवि तुम्हांसीं सलगी करितां जाण ॥ सरतीं वचनें होतील कीं ॥ ३० ॥ तुम्ही संत ईश्वर-मूर्ती ॥ ऐसा निश्चय दृढ चित्तीं ॥ म्हणोनिया महीपति ॥ नमन करी सद्भावें ॥ ३१ ॥

---

## ओंव्या, भक्तविजय-एकनाथ-चरित्र.

### अध्याय ४५.

त्या भानुदासास पुत्र सद्गुणी ॥ त्याचें नांव ठेविलें चक्र-पाणी ॥ तो परम भाविक वैष्णव ज्ञानी ॥ श्री-हरि-भजनीं निमग्न ॥ १ ॥ त्याचा पुत्र सूर्यनारायण ॥ जो ज्ञान-प्रकाशें देदीप्यमान ॥ त्याची कांता सु-लक्षण ॥ नाव रुक्मिणी तियेचें ॥ २ ॥ ते निज-उदरीं प्रसवली सुत ॥ नाम तयाचें एकनाथ ॥ तो जगद्गुरु अवतरला साक्षात ॥ परिसा चरित्र तयाचें ॥ ३ ॥ तो दिवसेंदिवस जाहाला थोर ॥ व्रत-बंध लग्न केलें सत्वर ॥ माय-बापें तयावर ॥ कृपा अपार करिताती ॥ ४ ॥ तेथें जनार्दनपंत सु-ज्ञान-रासी ॥ दत्तात्रेय-दर्शन होतसे त्यासी ॥ एकनाथ उठोनि एके दिवशीं ॥ गेला दर्शनासी तयाच्या ॥ ५ ॥ आंगडें टाकोनी मस्तकावरी ॥ सद्भावें तयासी नमस्कार करी ॥ जनार्दनें देखोनि ते अवसरीं ॥ विस्मित अंतरीं होतसे ॥ ६ ॥ म्हणे तूं कोणाचा सांग त्वरितें ॥ कशास्तव आलासी येथें ॥ जनार्दन संबोखून होते ॥ वृत्तांत पुसत तेधवां ॥ ७ ॥ कीं टाकोनि माता-पितयांसी ॥ रुसोनि आलासि आम्हांपाशीं ॥ हें यथार्थ सांगावें मजपाशीं ॥ संकोच मानसीं न धरितां ॥ ८ ॥ मग जोडोनिया दोन्ही कर ॥ एकनाथ बोले मधुरोत्तर ॥ म्हणे ऋग्वेदी ब्राह्मण-कुमर ॥ दर्शना साचार पातलों ॥ ९ ॥ माय-बापांवरी न रुसतां ॥ उगाचि अनुताप वाटला चित्ता ॥ कीं देहीं जडली प्रपंच-ममता ॥ काम-क्रोधें चित्ता गांजिलें ॥ १० ॥ लोभ माया दंभ अहंकार ॥ हे देहीं दिसती अनिवार ॥ म्हणोनि स्वामि-दर्शनासी सत्वर ॥ आलों साचार निज-प्रेमें ॥ ११ ॥ आतां हेचि इच्छा आहे मानसीं ॥ निरंतर राहावें तुम्हांपासीं ॥ सेवा करावी अहर्निसी ॥ निज-भावेसी आवडी ॥ १२ ॥ मी पती-

त शरण आलों पाहें ॥ अंगीकार करीं सद्गुरु-माये ॥ ऐसें बोलोनि लव-लाहें ॥ धरिले पाय सद्भावें ॥ १३ ॥ एकनाथाचें ऐकोनि वचन ॥ आ-श्चर्य करिती जनार्दन ॥ म्हणे वय तो दिसताहे लहान ॥ परि विशाळ ज्ञान अनुपम्य ॥ १४ ॥ मग जनार्दनें अ-भय देऊनि त्यासी ॥ म्हणि-तलें सुखें असावें आम्हांपासीं॥ हें वचन ऐकोनि मानसीं॥ उल्हास चि-त्तासी वाटला ॥१५॥ जैसा द्वैपा-यन पडतां संशयवनीं ॥ तयासी भेटला नारद-मुनी ॥ तेवि जनार्दनाचे अ-भय-वचनीं॥ एकनाथ मनीं संतोषले ॥ १६ ॥ स्वामी-सेवेसी निरंतर ॥ अहो-रात्र असे तत्पर ॥ कोणे दिशीं न पडे अंतर ॥ भावार्थ थोर धरियेला ॥ १७ ॥ रात्रीं निजतां जना-र्दन ॥ स्व-करें चुरीत बैसे चरण ॥ निद्रा लागतां त्याजकारणें ॥ परी नाहीं उठणें सर्वथा ॥ १८ ॥ विडा करूनि निज-हस्तें ॥ सर्व साहित्य घालोनि त्यांत ॥ जनार्दनासी होऊनि वि-नत ॥ मुखांत घाली निज-प्रेमें ॥१९॥ मुख प्रक्षाळावयासी तस्त ॥ निज-करें पुढें आ-णोनि ठेवित ॥ स्नान घालोनि आपल्या हातें ॥ साहित्य देत पूजेचें ॥ २० ॥ जेवित शेष उच्छिष्ट राहत ॥ तें प्रीतीनें भक्षी एकनाथ ॥ ऐसी सेवा दिवस बहुत ॥ असे करीत निज-प्रेमें ॥ २१ ॥ हें जनार्दन दृष्टीसि देखतां ॥ मग आश्चर्य करिती निज-चित्ता॥म्हणे मनुष्य म्हणों नये ए-कनाथा ॥ सकळ गुरू-भक्तां वरिष्ठ कीं ॥ २२ ॥ एकांत पाहोनि एके दिवशीं ॥ जनार्दन कृपेनें पुसतो तयासी ॥ तूं सेवा करिसि आम्हांपा-सीं ॥ माय-बापांसी न कळतां ॥२३॥ तुम्ही तो विरक्त दिसतां जाण ॥ घरीं पाहिजे वस्त्र अन्न ॥ वडील वृद्ध दोघे जण ॥ चिंता दारुण करतील कीं ॥ २४ ॥ ऐसें जाणोनि जनार्दन ॥ घरीं पाठवीत वस्त्र अन्न ॥ वडि-लांसि कळतां वर्तमान ॥ समाधान वाटलें ॥ २५ ॥ जनार्दन विचारूनि अंतरीं ॥ म्हणे यासि सांगावी कांहीं चाकरी ॥ मग एकनाथासि आज्ञा

---

१ व्यासानें आपल्या वैशंपायनादि शिष्यांस जरी वेद-शास्त्रें पढविलीं व महा-भारत ही रचलें तरी त्यास समाधान होईना; तेव्हां नारदानें येऊन त्यास बोध केला कीं, तूं धर्मादिकाचें विवरण केलें, परंतु वासुदेवाचा महिमा वर्णिला नाहीं म्हणून तुझा आत्मा स्वप्रसन्न होत नाहीं. हें नारदाचें म्हणणें ऐकून व्यासानें भागवत रचलें आणि तेणेंकरून त्याचें समाधान झालें. अशी कथा आहे. ( भाग० स्कं० १ अ० ४ )

करी ॥ हिशोब दप्तरीं राखावा ॥ २६ ॥ तूं तेथें असशील जरी प्रवीण ॥ तरी कळों येईल अवघें ज्ञान ॥ मग अवश्य म्हणोनि केलें नमन ॥ आज्ञा प्रमाण स्वामीची ॥ २७ ॥ गुरु-सेवेसि न पडतां अंतर ॥ हिशेब राखी निरंतर ॥ जनार्दन म्हणती हा परम चतुर ॥ कळला विचार मजलागी ॥ २८ ॥ तरी कांहीं निमित्त करून जाण ॥ स्वरूपीं लावावें त्याचें मन ॥ एकनाथासी जवळ बोलावून ॥ म्हणे हिशेब दाखवणें आम्हांसी ॥ २९ ॥ पाहोनि खर्डा खतावणी ॥ हिशोब दाखवीं आम्हांलागोनी ॥ अवश्य म्हणोनि तये क्षणीं ॥ पुढती चरणीं लागले ॥ ३० ॥ सेवेचा सारोनि नित्य नेम ॥ रात्रीं दीपकासी घातलें भरण ॥ एकनाथ आडका राहिला चुकोन ॥ तोचि धुंडोनी पाहातसे ॥ ३१ ॥ तो कोठें न सांपडे तयास ॥ ताळा न पडेचि हिशोबास ॥ मग एकाग्र करोनि चित्तास ॥ हिशोब पाहात बैसला ॥ ३२ ॥ क्षणभरी कांहींच न करी शयन ॥ न मानुनी निज-देहाचा शीण ॥ तृषा लागली अति दारुण ॥ परि उदक-पान करीना ॥ ३३ ॥ म्हणे उपहार करून उदकास घेतां ॥ तरी निद्रा आळस येईल आतां ॥ मग काय सांगावें गुरुनाथा ॥ विवेक चित्ता करितसे ॥ ३४ ॥ जनार्दन जागृत होऊन त्वरित ॥ सभोंवतें विलोकून जों पाहत ॥ तो एकनाथ न दिसे तेथ ॥ म्हणऊनी विस्मित जाहले ॥ ३५ ॥ अंतर-गृहीं धुंडितांचि देखा ॥ तों हिशोब पाहात बैसला एका ॥ भरण घालोनिया दीपका ॥ धुंडित आडका निश्चळत्वें ॥ ३६ ॥ तों अकस्मात ताळा पडतां ॥ हारुष वाटला एकनाथा ॥ मग आपुल्याचि हातें टाळी पिटितां ॥ दुसरा नसतां सन्निध ॥ ३७ ॥ मागें उभे राहोनि तेथ ॥ जनार्दन कौतुक पाहात ॥ मग सन्मुख होउनि त्वरित ॥ स्व-मुखें पुसती तयासी ॥ ३८ ॥ सद्गुरु म्हणती एकनाथा ॥ काय आश्चर्य वाटलें आतां ॥ म्हणउनि हर्ष मानुनी चित्ता ॥ हांसलासि तूं ये क्षणीं ॥ ३९ ॥ ऐसें ऐकोनिया वचन ॥ वरते पाहे विलोकून ॥ मग सत्वर उभा राहोन ॥ केलें नमन सद्भावें ॥ ४० ॥ म्हणे सर्व हिशोब शोधून पाहतां ॥ त्यांत एक अडका चुकला होता ॥ त्याचा अकस्मात् ताळा पडतां ॥ उल्हास चित्ता वाटला ॥ ४१ ॥ म्हणउनी संतोष पावोनि मनें ॥ हांसें आलें मजकारणें ॥ ऐसें ऐकोनि वचन ॥ जनार्दन विस्मित जाहला ॥ ४२ ॥ मग एकनाथासी सद्गुरु बोलत ॥ तुझें आडक्याकडे लागलें चित्त ॥ तैसें

श्री-कृष्ण-चरणीं होतां रत ॥तरी पावसी निज-हित आपुलें॥४३॥ ऐशीं अक्षरें पडतां कानीं ॥ अनु-ताप जाहला तये क्षणीं ॥ म्हणे हे इच्छा होती मनीं ॥ जे आज्ञा स्वामीनीं मज द्यावी ॥ ४४ ॥ धन्य दिवस सु-दिन आजिचा ॥ अनु-भव जाहला निज-कृपेचा॥ ऐसें म्हणऊन ते समयीं॥ घातलें पायीं दंडवत ॥ ४५ ॥ हें वचन ऐकतांचि श्रवणीं ॥ जनार्दनं विस्मित झाले मनीं ॥ म्हणती यास उपदेश द्यावयालागोनी ॥ अधिकार दिसोनी येतसे ॥ ४६ ॥ मग उठवूनि एकनाथाप्रती ॥ जनार्दन कृपेनें आलिंगिती ॥ राम-कृष्ण मंत्र तारक निश्चितीं ॥ सद्गुरु सांगत तेधवां ॥ ४७ ॥ तेथेंच विश्वास• ठेवूनी दृढ ॥ परमार्थ योग साधिला पुढें ॥ कीर्तनीं श्री-हरीचे पवाडे ॥ गातसे कोडें निज-प्रीती ॥४८॥ इतुकी कृपा जालियावर ॥ परि सद्गुरु-सेवेसी न पडे अंतर ॥ दिवसेंदिवस अधिकोत्तर ॥ सद्भाव साचार बैसला ॥ ४९ ॥ हा निश्चय देखोनि जनार्दन ॥ म्हणे यासी मनुष्य म्हणेल कोण ॥ विश्वोद्धार करावयालागोन ॥ अवतार पूर्ण विष्णूचा ॥ ५० ॥ आतां यावरी करूनी कृपा-दृष्टी ॥ श्री-दत्तात्रेयाची करावी भेटी ॥ ऐसें विचारोनी पोटीं ॥ जीविची गोष्टी सांगतसे ॥ ५१ ॥ एकनाथासि म्हणे जनार्दन ॥ तुज दत्तात्रेयाची भेटी करवीन ॥ परि निर्भय असोनिया मन ॥ चित्तीं न भिणें सर्वथा ॥ ५२ ॥ ते आपुली स्व-रूपें कडोविकडी ॥ पालट करित घडोघडी ॥ अ-ज्ञानें जन निंदिती रोकडी ॥ काया चोखडी तेंचि धरिती ॥ ५३ ॥ मी जयासीं बोलेन गोष्टी ॥ तूं त्याचे चरणीं घालीं मिठी ॥ आलिंगन देऊनि उठाउठी ॥ सद्गुरूशीं पोटीं धरावें ॥ ५४ ॥ प्रसाद देतील तुज• कारणें ॥ तरी तेथेंच भक्षो निज प्रीतीनें ॥ ऐशी जनार्दन देतां शिकवण ॥ एकनाथ चरण धरीतसे ॥ ५५ ॥ म्हणे हेचि इच्छा बहुत दिनीं ॥ वाढत असे माझिये मनीं ॥ परि स्वामिची मर्यादा उल्लंघोनी ॥ सर्वथा माझेनी न बोलवे ॥ ५६ ॥ तें आज आपुल्या स्व-मुखेंकरून ॥ मज दिधलें अ-भय-वचन ॥ तें आणि मनोरथ पूर्ण करून ॥ करवावें दर्शन दत्ताचें ॥ ५७ ॥ ऐसा पूर्ण जाणोनिया हेत ॥ एकनाथासी नेलें अरण्यांत ॥ तंव तेथें अनसूया-सुत ॥ आले अकस्मात भेटावया॥५८॥ विशाळ डोळे आ-रक्त नयन ॥ हातीं शस्त्रें अश्व-वाहन॥ सन्निध येऊन उतरला जाण ॥ मग केलें नमन जनार्दनें ॥ ५९ ॥ यवन-भाषेनें अ-

नसूया-सुत ॥ जनार्दनाशीं गोष्टी बोलत ॥ हें दृष्टीशीं देखतां एकनाथ॥ आश्चर्य करिती मानसीं ॥ ६० ॥ मग एकनाथ बोलाउनी लवलाहीं ॥ उचलोनि स्वामीच्या घातला पायीं ॥ त्यांनीं आश्वासन देऊनि पाहीं ॥ वर-दान काय बोलत ॥ ६१ ॥ श्रुति-शास्त्राचें जे मथित ॥ व्यासें काढिलें श्री-भागवत ॥ त्याचा अर्थ सखोल गुप्त ॥ वदेल प्राकृत प्रसिद्ध हा ॥७२॥ आणीक भावार्थ-रामायण ॥ वदेल रसाळ निरोपण ॥ तें निज प्रीतीनें करित श्रवण ॥ तरतील जन सकळिक ॥ ७३ ॥ आणीक पद-पदांतरें बहुत ॥श्री-हरि-चरित्र अति अद्भुत॥कीर्तनीं गावोनि सप्रेम-युक्त ॥ उद्धरील पतित श्रवणमात्रें ॥ ७४ ॥ ऐसा वर देऊन सत्वर ॥ मस्तकीं ठेविला अ-भ-य कर॥निमिष न लोटतां साचार॥अ-दृश्य झाले तेधवां ॥ ७२ ॥ एकनाथासी धरोनि हातीं ॥ मंदिरा आले सत्वर गती ॥ एकएकासी न विसंबिती ॥ जेंवि लेंकुराप्रती निज-माय ॥७६॥ तान्ह्यास न पडे मातेचा विसर ॥ हें परस्परें साक्ष देतसे अंतर ॥ तेंवि एकनाथ जनार्दन निरंतर॥ असती साचार एक-चित्तें ॥ ७७ ॥ तंव कोणे एके दिवशीं॥ जनार्दन बिचारिती मानसीं ॥ आतां सेवा घेणें याज-पाशीं ॥ अनुचित मज दीसताहे ॥ ७८ ॥ मग एकनाथासी बोलती वचन ॥ माझी आज्ञा तुज प्रमाण ॥ आतां प्रतिष्ठानासि जाऊन ॥ गृहस्थाश्रम चालवीं ॥ ७९ ॥ हें प्रमाण वचन करितां त्वरित ॥ तुज प्रसन्न होईल रुक्मिणी-कांत ॥ जनार्दनें मस्तकीं ठेविला हात ॥ प्रतिष्ठानासी त्वरित चालिला ॥८०॥ सद्गुरु-वचन हेंचि प्रमाण ॥ त्याहुनि वरिष्ठ नाहीं साधन ॥ हे गुरु-भक्तीची जाण खूण॥ इतराकारणें न घडेची ॥८१ ॥

## रघुनाथ-पंडित

ह्या कवीनें केलेला असा एकच लहानसा ग्रंथ प्रसिद्ध आहे, त्याचें नांव नल-दमयंती-स्वयंवराख्यान.[1] हा ग्रंथ संस्कृत भाषेंतील नैषध काव्याचे आधारानें केलेला आहे. हा फार सुरस असून ह्यांत यमकादि शब्दालंकार व उपमादि अर्थालंकार चांगले साधलेले आहेत ; आणि वृत्तेंही नाना प्रकारचीं योजिलेलीं आहेत.

१ 'सीतास्वयंवर,' 'रुक्मिणीस्वयंवर' इत्यादि संज्ञांवरून पहातां ह्या ग्रंथालाही दमयंतीस्वयंवर अशी संज्ञा दिली असती तर चांगली शोभती, परंतु 'नलदमयंती-स्वयंवराख्यान, ही संज्ञा पुष्कळ दिवसांपासून प्रसिद्धीस आलेली दिसते

हा कवि शालीवाहन शकाच्या १७ व्यां शतकाच्या अखेरीस होता असें म्हणतात. ह्याखेरीज ह्या कवीचें वृत्त कांहींच माहीत नाही.

## नल-दमयंती-स्वयंवराख्यान.

शार्दूल-विक्री० पुण्य-श्लोक-नृपावळींत पहिला होवोनि जो राहिला ॥
तो राजा असतां समस्त महिला विश्रांति शेषाहिला[1] ॥
व्यासोक्तें अवगाहिला बुध-जनीं नाना-गुणीं गायिला ॥
जो नामें नळ तत्कथौघ लिहिला तो पाहिजे पाहिला ॥ १ ॥

आर्या. इंद्रादिक वर असतां, कशी नल-सतीच होय दमयंती ॥
सुंदर-सकळ-वधूंसें, कशी न लसतीच होय दमयंती ॥ २ ॥

दिंडी कथा बोलूं हे मधुर सुधा-धारा ॥ होय शृंगारा करुण-रसा थारा ॥
निषध-राजा नळ-नामधेय होता ॥ वीरसेनाचा तनय महा-होता ३
चौगुणीनें[2] जरि पूर्ण शीत-भानु ॥ नळाऐसा तरि कलीं[3]-निधी वानूं ॥
म-तापाचा जो न मावळे भानू ॥ तयासारीखा कोण दुजा मानूं ॥ ४ ॥

वसंत तिल० चंद्रासि लागति कळा[4] उपराग येतो ॥
गंगेशि भंग बहु पाण-उतार होतो ॥
जें होय चूर्ण तरि मौक्तिक तें कशाला ॥
नाहीं समान नळ-राज-महा-यशाला ॥ ५ ॥

---

१ राजा दुराचरणी असला म्हणजे पृथ्वीला भार होतो, व त्यामुळें तिला मस्तकावर धारण करणारा जो शेष त्यालाही भार होतो असें मानिलें आहे. ह्या गोष्टीस लक्षून नळराजा मोठा सदाचरणी होता, हें दाखविण्याकरितां 'विश्रांति शेषाहिला' इ० वर्णन केलें आहे. २ चौपटीनें म्हणजे पौर्णिमेचा पूर्ण चंद्र १६ कळांचा असतो, तो ६४ कळांचा होईल तर. ३ चंद्र. कला म्हणजे चंद्र-बिंबाचा १६ वा अंश-श्लेषानें लेखनगायनादि ६४ कलांपैकीं प्रत्येक. तात्पर्य कीं चंद्राला कला आहेत पण १६ आहेत; आणि नळराजाला तर ६४ कला आहेत म्हणून त्यांची बरोबरी नाहीं. ४ क्षय वृद्धि. ५ लाटा. "भंग बहु" येणेंकरून पावसाळ्यांत पूर येतो तो सुचविला; आणि "पाणउतार" येणेंकरून उन्हाळ्यांत पाणी आटतें तें सुचविलें. तात्पर्य कीं, गंगेचें पाणी कमजास्त होतें आणि नळाचें यश सर्वदा एकसारखें असतें तेव्हां चंद्र गंगा व मौक्तिक हीं शुभ्र आहेत, तरी त्यांची नळ-यशाला उपमा देतां येत नाहीं. ह्या पद्यांत 'उपराग' 'भंग' व 'पाणउतार' ह्या शब्दांचे जे अनुक्रमें अंगास लागणाऱ्या कळा, ग्रहण, मोड व अप्रतिष्ठा हे व्यावहारिक अर्थ आहेत; त्यांस लक्षून कवीनें हे शब्द योजिलेले आहेत.

शार्दूल वांजीचें मन जाणता, सकळही राजी शिपाई जया ॥
वि०वृ० याजी होउनिया द्विजांसि म्हणतो या जी धनें घ्यावया ॥
त्याजी जो धनदांपरी, सुकृत[1] जें त्या जीव ऐसें गणी ॥
गाजी तो नळ भूप हूप धरुनी गाजी गुणींच्या गणीं ॥ ६ ॥

बिडी लोके-बंधू[2] जो होय रवी-ऐसा ॥ कुवलैयाला[3] जो सुखद चंद्र जैसा ॥
सांगें[4] नोहे तो कुसुम-चाप तैसा ॥ निषध-रायाशीं तुल्य-रूप कैसा ॥ ७ ॥

आर्या. नाडी-ज्ञान जयाचें, स-रोग बंधूं[5] चतुष्पद गणावे ॥
सुत तेजी-तुरगीचे[6] नळ-सम सुंदर कदापि न म्हणावे ॥ ८ ॥

शिखरि कदा नेणों वोढी शरधितुनि काढी शर कदा ॥
णीवृ० कदा धन्वीं जोडी वरिवरिहि सोडी तरि कदा ॥
विपक्षाच्या वक्षावरि विवर-लैक्षास्तव[7] रणीं ॥

---

१ पुण्य ज्याला प्राणाप्रमाणें आवडे; म्ह० प्राणरक्षणाविषयीं जसें जपावें तसें सद्धर्म व न्याय ह्यांच्या रक्षणाविषयीं तो जपत असे. २ लोकबंधू=लोकांचें हित करणारा. ३ कुवलय म्ह० चंद्रविकासी कमल. हीं कमलें चंद्रोदयीं विकासतात म्हणून ह्यांस चंद्र हा सुखद म्ह० सुख देणारा आहे. तसा नळही कुवलयाला म्ह० कुच्या ( पृथ्वीच्या ) वलयाला म्ह० सर्व पृथ्वीवरच्या लोकांना सुख देणारा आहे. ४ सांग म्ह० अंगासहित. कुसुम-चाप म्ह० मदन हा अनंग ( अंगरहित ) आहे. ५ बंधू म्ह० चंद्र, हा सरोग म्ह० रोगी म्ह० क्षयी आहे, कारण चंद्राच्या कलांचा कृष्ण पक्षीं क्षय होत असतो. ६ तेजी ( घोडा ), तुरगी ( घोडी ) चे सुत म्ह० अश्विनी-कुमार. हे सूर्याचे पुत्र होते. त्वष्ट्याची संज्ञानामक कन्या सूर्यास दिली होती, तिला सूर्याचें तेज सहन होईना म्हणून ती घोडी झाली; मग सूर्य ही घोडा होऊन तिचे पाठीस लागला; तेव्हां पुढें त्या उभयतांपासून हे उत्पन्न झाले, अशी कथा आहे. हे स्वर्गीचे वैद्य असून रूपानें सुंदर होते. ह्याचा अन्वय-जयाचें नाडीज्ञान ( इतकें होतें कीं त्यापुढें, सरोग बंधु ( व ) तेजी-तुरगीचे सुत ( हे ) चतुष्पद गणावे; हे नलसम सुंदर कदापि न म्हणावे, ' सरोग बंधु ' ह्याचा अवयवार्थ-सरोग, म्ह० रोगी आहे बंधु म्ह० भाऊ ज्याचा, असा आहे. एथें ह्या शब्दाचा अर्थ धन्वंतरी ( देवांचा वैद्य ) असा घ्यावयाचा. त्याला सरोगबंधु म्हणण्याचें कारण असें कीं, धन्वंतरी आणि चंद्र हे दोघे ही समुद्रमथनाचे वेळीं एकाच क्षीरसागरापासून उत्पन्न झाले. म्हणून चंद्र हा धन्वंतरीचा भाऊ मानिला आहे; आणि तो सरोग ( क्षयी ) आहे, म्हणून धन्वंतरी सरोगबंधु झाला. ७ विवर म्ह० व्रण व लक्ष म्ह० पाहणें. शत्रूच्या वक्षःस्थलावर व्रण दृष्टीस पडल्यामुळेंच त्यानें बाण जोडिला व सोडिला, असें लोक अनुमान करीत. ( तो बाण जोडी केव्हां व सोडि केव्हां हें कोणाच्या दृष्टीस पडत नसे; इतकी त्याची चलाखी होती; हा भाव ).

कळे राजेंद्राची त्वरित शर-संधानं-करणी ॥ ९ ॥

वसंत ति० धाले धनी पुढिल याचक या नळाचे ॥
येतां फिरोनि समुदाय पथीं तयांचे ॥
मागावयास जन मागिल देखियेले ॥
त्याहींच ते सकळ पूरित-काम केले ॥ १० ॥

दिंडी. अशी अ-गणित-गुण-कीर्ति नैषधाची ॥
फिरे भुवन-त्रयिं जान्हवीच साची ॥
असें असतां द्विज पांच सात याची ॥
भेटि घेती वैदर्भ-राजयाची[1] ॥ ११ ॥

वसंत ति० द्वारीं झुलोत गज-संघ हिंसोत वाजी ॥
गाजी तुला सकल लोक असोत राजी ॥
सोमाभिराम-वदना सदनांत रंगीं ॥
क्रीडा करो तुजसवें ललना पलंगीं ॥ १२ ॥

दिंडी. अशा आशीर्वादासि तिहीं केलें ॥ भीम-भूपें मग तयां बोलिजेलें ॥
तुम्ही आलां कोठूनि अशा बोलें ॥ द्विजीं निषधा-पासाव म्हणीजेलें ॥ १३ ॥
भीम-राजा मग गिरा वदे ऐसी ॥ निषध-देशीं नळ-राज-रीति कैसी ॥
असें ऐकोनी वदति विप्र त्यासी ॥ विप्रयासीं वक्तृत्व ये जयांसीं ॥ १४ ॥

वसंत ति० हे वामनैक[3]-पद भूमि नसोनि जंघी ॥
एके दिशींच दिनें[4]-राज नभास लंघी ॥

---

१ भीमराजाची. २ ह्या चरणाचें तात्पर्य असें आहे कीं, नळाचे गुण अनंत व अनुपम असल्यामुळें त्यांचें यथार्थ वर्णन आपणांस कसें करितां येईल ! ह्या विचारांत ते पडले. ३ हे भूमि वामनैक-पद=वामन म्ह० लहान मुलगा ह्याच्या एका पावला इतकी, तेव्हां ती नळाच्या विस्तीर्ण यशाला उपमा देण्याला योग्य नाहीं. वामनावतारीं विष्णूनें बलि-राजापाशीं त्रिपाद भूमि मागितली, पण त्याच्या एका पावलांतच सर्व पृथ्वी आटली, अशी कथा आहे; तिकडे ह्या वर्णनाचें धोरण आहे. ४ दिनराज म्ह० सूर्य, हा अनूरु-सारथि आहे म्ह० ज्याला मांड्या नाहींत असा त्याचा सारथि आहे; तेव्हां तो जंघी म्ह० वेगानें चालणारा नसूनही एका दिवसांत आकाश ओलांडितो. तेव्हां नळराजाच्या विस्तीर्ण यशाला अशा लहानशा आकाशाची उपमा देतां येत नाहीं.

वारांशि[1] वानर-विलंघित होय तो कीं ॥
लोकीं नसे नल-यशस्तुलना विलोकीं ॥ १५ ॥

शार्दूल वि० जो पाहे[2] सदसद्विचार ऱ्हदयीं जोपा जनाची करी ॥
जो पावे समयीं[3], विशेष गणिला जो पावनांभीतरीं[4] ॥
सोपा[5] जो सकळां द्विजां, सु-मतिचा सोपा, सदा लाभतो[6] ॥
कोपातें न धरीच तो नळ मही-गोपायिता शोभतो ॥ १६ ॥
जो धैर्ये धरें-सा[7], सहस्र-कर-सा तेजें तमा[8] दूरसा ॥
जो रत्ना-कर-सा[9] गभीर, शिरसा भूपां, यशो-हारसा[10] ॥
ज्ञाता जो सरसावला[11] नव-रसां-माझारि शृंगारसा ॥
शोभे तामरसाक्ष तो नळ रसा-नाथ स्तवूं फारसा ॥ १७ ॥

दिंडी. अशी होतां नळ-चरित-कथा कांहीं॥भीमनामा भूपाळ परिसतांही॥
जवळि होती लडिवाळ जे सदांही[12]॥सुता दमयंती नाम जीस पाहीं१८

मालिनी. निषध-पति-कथा हे जे सुधेतें जयंती ॥
परिसुनि दमयंती रंजली रंजयंती ॥
नवल मज न भासे चंद्र[13]-वंशैक-शाली ॥
नल तरि वन[14]-माळी भीमकी[15] हेचि जाली ॥ १९ ॥

---

१ वारांशि म्ह० समुद्र, हा तर वानरांनीं ( मर्कटांनीं ) ओलांडला आहे; तेव्हां नलाच्या यशाला समुद्राची ही उपमा देववत नाहीं. २ ‘ पाहण्यांत ’ अथवा ‘ समज ’ असे दोन ही अर्थ एथे शोभतात. ३ जो समयीं पावे म्ह० प्रसंगीं कार्य करी म्हणजे उपयोगी पडे. ४ पवित्र करणारांमध्यें. ह्याच्या नामाच्या स्मरणानें स्मरण-कर्ता पवित्र होतो अशाविषयीं पुराण प्रमाण आहे. ५ सद्बुद्धीचा सोपा म्ह० घर. ६ ज्यापासून नेहेमीं लाभ होतो. ७ पर्वतासारखा—पर्वताला अचळ असें नांव आहे म्ह० कांहीं झालें तरी तो हालत नाहीं, त्याप्रमाणें हा कसाही प्रसंग आला तरी डगत नव्हता, म्हणून धैर्यानें तसा. ८ तमा दूरसा—तेजस्वी, तेजानें सूर्याप्रमाणें तेजस्वी. ९ समुद्राप्रमाणें—समुद्र फार खोल असतो त्याप्रमाणें हा मनानें खोल; अर्थात् गंभीर. १० यशच आहे हार ज्याच्या असा—म्ह० सत्कीर्ति हेंच ज्याचें भूषण होतें; त्याच्या शरीराला शोभा आणण्याला इतर भूषणांची गरज नव्हती ११ पुढें आला—पहिली पदवी पावला, नऊ रसांत शृंगार जसा पहिला तसा सर्व ज्ञानिजनांत हा पहिला. १२ ब्राह्मण नलाचें वर्णन करीत असतां तें वर्णन संपे तोंपर्यंत एकसारखी. १३ चंद्रवंशांत एकटा शोभणारा. १४ कृष्ण. १५ कृष्णाकडे भीमकी म्ह० रुक्मिणी आणि नळाकडे भीमकी म्ह० भीम—कन्या दमयंती.

मालय नळ-राज-कथा सुधा[1]चि साजे ॥ दमयंती वैरवर्णिनी[2]विराजे ॥
भारा मिळणी[3] उभयांशि होय जेथें[4]॥अधिकारी[5] अधिकानुराग[6] तेथें ॥२०॥
दिंडी. भीमकी ते मोहिली गुप्त-रूपें॥मनीं लावियला वेध कुसुम-चापें ॥
असो गौरविले विप्र तिच्या बापें॥धनें वसनें त्यां दिधलीं अमूपें॥२१
कथा तेथिल ही होय असो ऐसी ॥ हेर आला तो वंदे नैषधासी ॥
तुझ्या कथनीं वैदर्भ-राजया सी॥प्रीति होती तनयाहि तयापासी२२
शार्दूल बापाच्या उजवे कडेसि बसली ग्यां पाहिली नोवरी ॥
वि०वृ० व्यापारांतर टाकुनी तव कथालापासि जे आदरी ॥
तापातें हरिते, करोनि मधुरालापासि जे सुंदरी ॥
ज्या पावे जगदीश, सांग-सुमन-श्चापा[7] नृपा त्या वरी ॥२३॥
वसंत जें अंतरंग पिवळें सरसीरुहाचें ॥ भासे मनांत मज अंग तसें तियेचें॥
ति० गोरोचनापरिस गौरअसें गणावें॥सोनेंच बावनकसी न कसें म्हणावें२४
दिंडी असें बोले तों चार समाचारा ॥ करी दमयंती नल-मनीं विहारा॥
नोवरी हे मज होय कसी दारा॥करूं लागे तैं भूप या विचारा॥२५
विभूतीनें झांकला अनळसा तो॥गुप्त दमयंती-विरह नृपा होतो ॥
नित्य पोटीं वडवाग्नि पेट घेतो॥सागरानें तो काय सांगिजेतो॥२६॥
वसंत मानी मनोज-शर हार तुरे फुलांचे॥कंदर्प-कोप-वचनें ध्वनि कोकिलांचे॥
ति० राका-शशी मदन-दर्पण भाविला हे॥नेघे[8]चि तो, न परिसे, न तयासि पाहे२७

---

१ अमृत. २ उत्तमाचें वर्णन करणारी. ३ एकत्र होणें. ४ दमयंती ठिकाणीं. ५ हक्कदार. ६ अधिक प्रीति, ह्या श्लोकाचें तात्पर्य—अमृत हा उत्तम पदार्थ पडला आणि दमयंती ही उत्तम पदार्थांचें वर्णन करणारी म्ह० गुण घेणारी पडली; म्हणून ह्या दोघांचा मिलाफ झाल्यावर अधिक अनुराग म्ह० प्रीतिच हक्कदार म्ह० हक्काची आहे म्ह० उचित होणारी आहे. गुणी आणि गुणज्ञ ह्यांची गांठ पडल्यावर गुणवानाविषयीं गुणज्ञाचे चित्तांत प्रीति उत्पन्न होते नव्हे‌‌‌ तर. येथें श्लेषानें ही एक दृष्टांत सुचविला आहे; तो असा—सुधा म्ह० चुना आणि वरवर्णिनी म्ह० हळद हीं एकत्र मिळालीं असतां अधिकच अनुराग म्ह० रक्तिमा येतो, नव्हे तर. एकंदर तात्पर्य कीं, दमयंती ही नळाची कथा ऐकून रिझली म्हणून वरच्या श्लोकांत जें सांगितलें तें योग्यच आहे; कारण तें तसेंच व्हावयाचें. ७ अंग धारण करणारा मदन. हें "नृपा" ह्याचें विशेषण. ८ "ने घे" "न परिसे" आणि "न पाहे" ह्या क्रियापदांचा मागील तीन चरणांतील कर्मांशीं यथासंख्य अन्वय आहे. म्हणजे हार तुरे ने घे, कोकिलांचे ध्वनि न परिसे, आणि राकाशशी (पौर्णिमेचा चंद्र) न पाहे.

शार्दूल छाया-नायकसा निदाघ-समयीं छाया करी तो विधू ॥
वि०वृ० वायां या त्वदया श्रमासि करितो दायादसा हा मधू ॥
जाया जे रुचली मनीं तिजकडे जोया नये कीं पहा ॥
रायाला न गमे न जाय रजनी आयास होती महा ॥ २८ ॥

आर्या. रजनी दिवस गमेना नृपतिस संगीतही सुखं गमेना ॥
मन कोठेंहि रमेना म्हणोनि करि वन-विहार सहसेना॥२९॥

वसंत गंगा-तरंग-सम जो निज-देह-वर्णी ॥
ति०वृ० भृंगापरी रुचिर कांति जयाशि कर्णी ॥
जंघाल जो पवन-संगतिची सवे घे ॥
शृंगारिला हय तयावरि भूप वेंघे ॥ ३० ॥
जो अंबरीं उफळतां खुर लागलाहे ॥
तो चंद्रमा निज-तनूवरि डाग लाहे ॥
जों या यशास्तव कसें धवलत्व ने घे ॥
शृंगारिला हय तयावरि भूप वेंघे ॥ ३१ ॥

दिंडी. सर्वें सेना भूपाळ निघालाहे ॥ शींव लंघी उद्यान एक पाहे ॥
रिघे तेथें मित सेवकांसि बाहे॥फौज सारी बाहेर उभी राहे॥३२॥
पनस जंबू जंबीर विविध निंबें ॥ कुंद चंदन माकंद सु-दाडिंबें ॥
तुंग नारिंगें विकसलीं कदंबें ॥ वसति जेथें शुक-सारिका-कदंबें३३

वंश लते-तळीं रुंद निरुंद कालवे ॥ गळोनि तेथें मकरंद कालवे ॥
स्थ० परागही सांद्र तयांत रंगती ॥ फुलांसवें भृंग-तती तरंगती ॥३४ ॥

आर्या. उपरि स-कंटक साचे परंतु सांचे जयांत सु-रसांचे ॥
घोंस असे फणसांचे षण्मासांचे कितेक वरसाचे ॥ ३५ ॥

उपेंद्र. तया वनीं एक तटाक तोयें ॥ तुडुंबलें; तामरसानपायें ॥
व० निरंतरामंद मरंद वाहे ॥ तपांतही यास्तव रिक्त नोहे ॥ ३६ ॥
द्रुत अमृतही पयही म्हणवीतसे ॥ उभय होय तसी रुचि वीतसे ॥

---

१ स्त्री. २ जायाला. ३ सुख देणारें. ४ वायूच्या अत्यंत वेगाची सवय घेई. तात्पर्य कीं वायूप्रमाणें जलद चालणारा. ५ (रंगामुळें) शोभतात. ६ साठे. सु-रसाचे साठे म्ह० गरे. ७ तामरस म्ह० कमल व अनपाय म्ह० अविनाश. कमलें विपुल असून त्यांचा नाश होत नसल्यामुळें. हें 'अमंद मरंद वाहे' ह्याचें कारण.

वि० मधुर सारसे[1] तें जल गातसें ॥ मधुर सारस[2] यास्तव गातसे ॥३७॥<br>
वसंत पीतां मरंद उदरंभर-बंभराचें ॥ जें होय मंदिरहि सुंदर इंदिरेचें[3] ॥<br>
ति० जें पद्म तेथिल सहस्र-दळां धरी तें॥प्रत्यक्षसूर्य-किरणांस विसांववीतें[4]॥३८

दिंडी. तया कासारीं राजे-हंस[5] पाहे ॥ राजहंसांचा कळप पोंहताहे ॥<br>
तयांसाठीं हे वापिकाच पोहे ॥नळें केली हें कोण म्हणे नोहे ॥३९॥<br>
तया हंसांचे देह कांचनाचे ॥ पक्ष झळकती वीज जशी नाचे ॥<br>
रंग माणिकसे चंचुचे पदांचे ॥ जसे अधरींचे[6] भीम-कन्यकेचे॥४०

वसंत ति० त्यांतील एक कलहंस तटीं निजेला ॥<br>
जो भागला जल-विहार विशेष केला ॥<br>
पोटींच एक पद, लांबविला दुजा तो ॥<br>
पक्षीं तनू लपवि भूप तया पहातो ॥ ४१ ॥<br>
टाकी उपानह पदें अति-मंद ठेवी ॥<br>
केली विजार वरि डौरहि मौन सेवी ॥<br>
हस्तीं करी वलय उंच अशा उपायीं ॥<br>
भूपें हळूच धरिला कलहंस पायीं[7] ॥ ४२ ॥

मालि कलकल कलहंसें फार केला सुटाया ॥

---

१ सरोवरांतलें   २ एका जातीचे पक्षी आहेत. हे बगळ्यासारखे असतात. पण त्यापेक्षां मोठे असतात. अन्वय—गा तें सारस जल तसें मधुर (कीं) अमृत हीं पय ही म्हणवी तसें; (कारण) उभय होय तशी रुचि वीतसे; यास्तव (तेथील) सारस मधुर गातसे.   ३ लक्ष्मीचें नांव पद्मालया असें आहे. तेव्हां अर्थात् कमल हें तिचें मंदिर आहे, तें भ्रमरांचेंही मकरंद पितानां मंदिर होतें. तात्पर्य कीं, त्या सरोवरांत कमलांवर भ्रमर पुष्कळ होते.   ४ विसावा देतें. म्ह० सूर्याच्या सहस्र किरणांस ही सहस्र-पत्रांचीं कमळें वरचेवर धरून ठेवीत. तात्पर्य कमळें मोठ-मोठालीं व तेजस्वी असून सरोवरांतील उदक गार राही.   ५ राजमुख्य—नळ.   ६ दमयंतीच्या ओठाचा रंग एकच तांबडा असतां बहुवचन योजण्यामध्यें, पहिल्या दोन चरणांतील 'चे' ह्या अक्षराशीं मेळ बसविणें हाच कवीचा उद्देश दिसतो.   ७ कलहंसाचा पाय धरून त्याला पकडिलें. कोणास धरावयाचें असतां त्याचा जो अवयव धरावयाचा तद्वाचक शब्दाची सप्तमी योजण्याचा संप्रदाय संस्कृतांत ही आहे. जसें वाल्मीकिरामायण—

सतं रुचिरमाक्रम्य देशमाश्रमकर्मणि ॥<br>
हस्ते गृहीत्वा हस्तेन रामः सौमित्रिमब्रवीत् ॥

गीवृ फडफड निज-पक्षीं दाविलें कीं उडाया ॥
नृपतिस मणि-बंधीं टोंचिता होय चंचू ॥.
धरि सु-दृढ जया तो काय सोडील पंचू ॥ ४३ ॥
तदितर खग भेणें वेगळाले पळाले ॥
उप-वन जल-केली जे कराया मिळाले ॥
स्व-जन गवसला जो त्याजपाशीं नसे तो ॥[1]
कठिण समय येतां कोण कामास येतो ॥ ४४ ॥

दिंडी. न सोडी हा नळ भूमिपाळ मातें ॥ असें जाणोनी हंस वदे त्यातें ॥
हंस-हिंसा नच घडो तुझ्या हातें॥स्व-स्थळातें पावेन पक्ष-पातें॥४५
जागजागीं आहेत वीर कोटी ॥ भले झुंजारहि शक्ति जयां मोठी ॥
तयां माराया धैर्य धरीं पोटीं ॥ पांखरूं हे मारणें बुद्धि खोटी॥४६॥
वधुनि माझी हे कनकरूप काया॥कटक-मुकुटादिक भूषणें कराय
कशी आशा उपजली तूज राया॥काय नाहीं तूजला दया माया॥४७

शार्दूल म्हातारी उडतां[2] नयेचि तिजला माता मदीया अशी ॥
वि०वृ० कांता काय वदों नव-प्रसव[3] ते सातां दिसांची तशी ॥
पाता त्या उभयांस मी, मज विधी घातास योजीतसे ॥
हातामाजि नृपा तुझ्या गवसलों आतां करावें कसें ॥४८॥

पद. हरहर सांपडलों, सांपडलों ॥ कैसा फांशीं पडलों ॥ ध्रु० ॥
इतर नदी जळ टांकीं ॥ टाकुनि आलों याच तटाकीं ॥ १ ॥
सोडुनि मानस-केली[4] ॥ कापुनि घ्याया आलों शेली ॥ २ ॥
ठेविन तव पदिं माथा ॥ आतां सोडवि मज रघु-नाथा॥३॥ ॥४९॥

दिंडी. सखे[5] माझे परतोनि घरा येतां ॥ तुवां सजणे हा समाचार घेतां ॥
तया शोकें घायाळ त्दृदय होतां॥कशी होशिल तें आठवितों आतां॥५०
थोर होतिल बाळकें तुझीं बाळे ॥ तुला कामा येतील बेल्हाळे ॥
माय माझी बैसेल शोक-शाळे॥मला आठवितां त्दृदय तिचें पोळे॥५१

मालिनी सदय त्दृदय याचें भूप हा ताप- हारी ॥
वृत्त. म्हणुनि परिसतां मी होय येथें विहारी ॥
मजहि वध कराया घातकी पातला जो ॥

---

१ अन्वय-जो गवसला त्याजपाशीं तो स्वजन नसे. २ उडून. ३ नुकतीच बाळंतीण झालेली. ४ मानससरोवरांतील क्रीडा. ५ हे प्रिये.

वरुनि पति असा ही भूमि कैसी न लाजो ॥ ५२ ॥

वसंत ति०वृ०
येणेंपरी परिसतां अति दीन वाचा ॥
हेलावला नळ पयोधि दया-रसाचा ॥
सोडी, म्हणे विहर जां अथवा फिराया ॥
राहें यथा-निज-मनोरथ हंसराया ॥ ५३ ॥

मालिनी वृत्त.
सुटुनि खग पळाला बैसला शाल-शाखे ॥
क्षणभरि निज-देहीं मुक्ति-विश्रांति चाखे ॥
स्व-जन तंव तयाचे भोंवताले मिळाले ॥
कवळिति निज-बंधू बाष्प-बिंदू गळाले ॥ ५४ ॥

शिखरिणीवृ०
विसांवा घे कांहीं उडुनि लवलाहीं परतला ॥
नृपाळाचे स्कंधीं बसुनि मणि-बंधीं उतरला ॥
म्हणे हंस क्षोणी-पतिस तुज कोण्ही सम नसे ॥
दयेचा हा ठेवा तुजजवळि देवा बहु वसे ॥ ५५ ॥

दिंडी. ऐक राया तूं थोर दया-सिंधू ॥ नीति-सागरही तूंच दीन-बंधू ॥
निखंदूनी बोलिलों नको निंदूं॥सकल वदसी तरि पाय तुझे वंदूं[1]५६
पारधीमाजी खगा मृगा राजे॥करिति हिंसा जी तीच बरी साजे ॥
तुवां दिधली मज मोकळीक बा जे॥दया केली ही कीर्ति तुझी गाजे५७
हंस मिळणें हें कठिण मही-लोकीं॥सोनियाचा तो नवल हें विलोकीं॥
तशा मजलाही सोडिलें तुवां कीं॥तुझा ऐसा उपकार मी न झांकीं५८
तुझा कर-पंजर होय मला थारा॥तुझ्या वचनांचा ओघ दुग्ध-धारा॥
तुझें मानस बहु थोर गा उदारा॥सत्य-लोकेशहि तूंचि गुणागारा५९
किती रांवे असतील तुझे धामीं॥किती कोकीळा सारिका तसा मी॥
चित्त जडलें हें तूझिया लगामीं॥नृपा स्वामी मज योजि तुझ्या कामीं६०

वसंत ति०वृ०
हें पांखरूं मजसि येइल काय कामा ॥
ऐसें नृपा न वद पूरित-लोक-कामा ॥
मोलें उणें व्यजन तें धरितां पुढारीं ॥
छाया करी तपन-दीप्तिसही निवारी ॥ ६१ ॥

द्रुत विरहिंसा दिसतोसि महा नळा ॥ परि हरीन तुझ्या विरहानळा ॥

---

१ अन्वय—वदसी तरि (आम्ही) सकल तुझे पाय वंदूं. म्ह० तूं सांगशील तर आम्ही सारे तुझ्या पायां पडून क्षमा मागूं.

वि० चतुर जी तरुणी [1]ह्रदयंगमा ॥ करवितों तिजशीं तुज संगमा ॥६२॥

मालिनी वृत्त.

वर[2]-नृपति विराजे भीम हें नाम ज्याला ॥
वर[3] दमन-ऋषीनें दीधला कीं तयाला ॥
वर[4] सुत दम-नामा दांत-नामा द्वितीय ॥
वर[5]-तनु दमयंती नंदिनी हे तृतीय ॥ ६३ ॥

वसंत ति० वृ०

तेजो-निधीस तनया यमुना जसी ते ॥
सीता जशी सु-[6]जनका जनका[7] तसी ते ॥
ते आवडे सुतहि ते न तसे तयाला ॥
ते नोवरी करवितों तुज मी दयाला ॥ ६४ ॥
राया तिचें मुख सुधा-कर या द्वयाला ॥
नाहींच वेगळिक हें गमतें मनाला ॥
संपूर्ण नित्य असता नसता कलंकी ॥
हा चंद्र हें मुख असें मग कोण शंकी ॥ ६५ ॥
चांपेकळीपरिसही सरलत्व नाकीं ॥
जीचा धरी अधर विद्रुम[9]-भावना कीं ॥
भासे मनांत मज बिंब[10]-फळ-भ्रमानें ॥
कीं सत्य चंचु-पुट वोढविलें शुकानें[11] ॥ ६६ ॥

पद

रूपवती ते भूप-सुता अनुरूप नसे दुसरी वनिता ॥
रूप धरूनि वरीं तिजला अनुरूप पयोधि जशी सरिता ॥ ध्रु० ॥
वीज अ-चंचळ शीतळ जे तजवीज कशी तुज हे नुमजे ॥
नीज जशी तुझिया नयना सुख[12][13]-बीज स-पल्लव भाव लता ॥१॥

---

१ मनांत भरणारी. म्ह० सुंदर. २ श्रेष्ठ. ३ प्रसाद, देणगी. ४ ज्येष्ठ म्ह० पहिला मुलगा. ५ उत्तम शरीराची. ६ जनक राजाला. ७ बापाला. ८ वाटलें असते. ९ पोंवळ्याशीं सारखेपणा. १० अधरोष्ठ पोंवळ्यासारखा लाल असल्यामुळें त्यावर तोंडल्याची भ्रांति होऊन. ११ राघूनें अधरोष्ठास तोंडलें समजून तें खाण्यासाठीं आपली चोंचच काय पुढें केली. येथें दमयंतीचे नासिकेवर राघूचे चोंचीची उत्प्रेक्षा केली आहे. म्हणजे तिचें नाक राघूचे चोंचीसारखें होतें हें तात्पर्य. आतां या श्लोकाचे प्रथम चरणांत चांपेकळीसारखें तिचें नाक सरळ होतें असें म्हटलें आहे, तेव्हां पूर्व भाग सरळ असून शेंडा चोंचीसारखा होता असें समजावें. १२ सुखबीज म्ह० सुखाचें मूळ आहे. १३ जशी नीज सुखबीज (किंवा) सपल्लव लता (सुखबीज) (तशी) (ही) तुझिया नयना भाव. म्ह० निद्रेनें जसें सुख होतें, किंवा पल्लवानीं भरलेली वेल पाहून जसें सुख होतें, तशी ही तुला सुख देईल.

सुंदरता तव तीजविणें अतिमंद[1] गमे तरि काय जिणें ॥
कुंद-रदा तर मंदर-धीरा सुंदरिला हो वश करिता ॥ २ ॥
नूतन-नीरज-नूतें[2]-मुखी पुरुहूत-वधूसि सखी निरखी ॥
दूत तुझा परि मीच सुखी करवीन म्हणे रघुनाथ[3]-नुता ॥ ३॥६७॥

संत ति० वृ०

धाता करींच करिता मृदु हे न होती ॥
या कारणास्तव मनोमय मूस ओती ॥
तेथें भरोनि पहिला[4] रस पूर्ण केली ॥
ओतीव हे न घटिताकृति बोलिजेली[5] ॥ ६८ ॥
ऐसीं खगेंद्र वचनें वदतां तयाला ॥
विश्रांति ही विरह[6]-खेदहि फार झाला ॥
आधार हा मज म्हणोनि गणोनि डोले ॥
झाला सवेंचि विरही नळ-राज बोले ॥ ६९ ॥
वेल्हाळ ते न दिसतां विरहांधकारीं ॥
चालून मी हळुच चांचपतां पुढारीं ॥
चक्रापरीच[7] सजलों असतां फिराया ॥
हंसा तुझा उदय होय सुखी कराया ॥ ७० ॥
ध्यानीं धरूनि तिजला मन हें निरीक्षी ॥
दृष्टीपुढें दिसतसे मज ते मृगाक्षी ॥
आहे जणो जवळि हे गज-राज-गामी ॥
ऐसाच भाव तंव बोलतसें तिला मी ॥ ७१ ॥
भृंगें विराजित नवीं अरविंद-पत्रें ॥
पाहूनि मानुनि तिचींच विशाल नेत्रें ॥
घालीन अंजन अशा मतिनें तटाकीं ॥

---

१ फार विशोभित. २ "नुत" ह्या बद्दल छंदाकरतां "नूत" असें घातलें आहे. नवीन कमलानें जिचें मुख नुत म्ह० स्तुत आहे म्ह० नवीन कमलापेक्षां ही जिचें मुख चांगलें. ३ रघुनाथ-पंडितानें स्तुत असा जो नळ त्याला. ४ शृंगार. ५ हे न घटिताकृति (घडलेल्या आकाराची) (तर) ओतीव बोलिजेली. ६असें मानून. ७ चक्रवाकपक्ष्याप्रमाणें. रात्रीं चक्रवाक आणि त्याची स्त्री यांचा वियोग होत असतो आणि तो तिला आंधारांत धुंडीत फिरत असतो, अशी कविप्रसिद्धि आहे. ८ श्लेषानें सूर्य असा अर्थ घ्यावयाचा. सूर्योदय झाला म्हणजे चक्रवाकपक्ष्यांचा संयोग होत असतो.

आहा वृथा उतरलों भिजलों विलोकीं ॥ ७२ ॥
हंसा विलोकुनि सुधा-कर अष्टमीचा ॥
म्यां मानिला निटिल-देश तिचाच साचा ॥
शंख-द्वयीं धरुनि कौंकुम[1] कीर-वाणी ॥
लावावया तिलक लांबविला स्व-पाणी ॥ ७३ ॥

दिंडी. भला माझा तूं हंस गडी राया ॥ विरह दुस्तर-विस्तार निस्तराया ॥
चित्त नेघे मज तूज जा म्हणाया ॥ तेंचि[3] वाहन तरि तूं करीं फिराया ७४
असें बोलोनी नळें रंजवीला ॥ अंजुळीमाजी हंस बैसवीला ॥
गमे चंपक-कुसुमो-घ-हार झेला ॥ पाठवाया युवतीस सिद्ध केला ॥ ७५
त्वरित पुनरागम असो तुझा येथें ॥ झेंप घालीं सुखरूप गगन-पंथें ॥
नको विसरूं आम्हांसि असों येथें ॥ वदुनि धरिजे गहिंवरा मही-नाथें ७६
बरें येतों म्हणऊनि हंस बोले ॥ उडुनि जातां बहु शकुन तया झाले ॥
पवन-चंचळ मधु-बिंदु मुखीं आले ॥ वामभागीं उभयतां गरुड गेले ७७
उडत होते खग वायसादि जाणा ॥ तयां भासे तें हंस तो ससाणा ॥
नभा मानूनी किं निकष-पाषाणा ॥ स्वर्ण-रेखा तें तेज मनीं आणा ७८
असा वेगें[4] तो नभामाजि धांवे ॥ तया वीदर्भी देशिं झणी पावे ॥
तेथ कुंडिन-नगरासमीप धांवे ॥ राज-मंदीरीं गोपुरीं विसावे ॥ ७९ ॥

मालिनी वृत्त
खग मग नगरीचे गोपुरीं झेंप घाली ॥
मृदु-पवन-गवाक्षीं बैसतां झोंप आली ॥
तदुपरि जेंव-शाली वेंघला चंद्रशाला ॥
निरखि विततें[5]-शाला राजधानी विशाला ॥ ८० ॥

चूर्णिका. वृत्त.
सकल-भुवन-ललामायमाना ॥
मानाधिक[6]-विभव-धनिक-सदन-शत-विराजमाना ॥
कलश-जनित-मुनि[7]-चकित-जलधि-शरणार्ति-

---

१ कुंकुमाचा. ह्याचा पुढील "तिलक" शब्दाकडे अन्वय. २ सरोवर. ३ चित्त. ४ वेगवान्. ५ विस्तीर्ण आहेत वाडे जीमध्यें अशी. ६ मानाधिक म्ह० गणती होत नाहीं असें, ७ अगस्तिऋषि. अगस्तिऋषीनें समुद्रप्राशन केलें अशी कथा आहे. तेव्हां त्याला भ्यालेला जो समुद्र त्याचें रक्षण करणाऱ्या अशा अतिविस्तृत ज्या परिखा म्ह० खंदक त्यांच्याभंव्यें अंतरीपायमान म्ह० बेटाप्रमाणें असणारी. तात्पर्य कीं, कुंडिन-नगरीस सभोंवती खंदक असून ते इतके मोठे होते कीं, त्यांत समुद्रसुद्धां सामावला असता.

विस्तृत-परिखांतरीपायमाना[1] ॥
चंद्रशाला-विजित-सुर-विमाना[2] ॥
जिचे सौध गगन-मंडपाधार-स्तंभचि माना ॥
लाविति ते जलदा निज माना ॥
वासव-चाप जयास कमाना ॥
ऐसी कुंडिन-नामधेय-नगरी राजहंसें पाहिली ॥८१॥

वसंत ति० वृ०
कोणी वणिक्-जन विकी तुळितां तराजे ॥
कस्तूरिका तिजसवें अलिनी विराजे ॥
दोन्ही समान निरखी विकणार देतो ॥
घेणार तो न समजोनि उगाच घेतो ॥ ८२ ॥
तेणें तसें नगर तें धरितां निडारीं ॥
तेथें विलास-वन एक दिसे पुढारीं ॥
जेथें सु-शीतळ मही-तळ सांद्र साई ॥
जाई जुई फुलमयी बहु अंबराई ॥ ८३ ॥

पद. तया वनीं खेळे भूप-सुता ॥ ध्रु० ॥
खेळविता बहु मेळविला सखि-मेळ तया सहिता ॥ १ ॥
राजस ते द्विज-राज-मुखी गज-राज-गती ललिता ॥ २ ॥
ध्यात असे नळ-राज-कथा रघुनाथ-कवींद्र-नुता ॥ ३ ॥८४॥

वसंत ति० वृ०
तो मंडळाकृति फिरे उतरावयाला ॥
भैमी-मुखेंदु-परिवेष म्हणों तयाला ॥
तेथें महीवरि असा खग बैसताहे ॥
कीं सुंदरी निज कुतूहल जेविं पाहे ॥ ८५ ॥
जो बैसतां चपळ पक्ष-पुटीं धरेला ॥
हाणीतसे फडफडां ध्वनि हो उदेला ॥
पाहे तया खग-वरासि वरानना हे ॥
मानी मनीं नवलही मग बोलताहे ॥ ८६ ॥

---

१ अंतरीप (बेट) म्ह० बेटासारखी झालेली. २ देवांची विमानें फार सुंदर असून ती पृथ्वीपासून फार उंचावर चालतात, त्यांपेक्षांही कुंडिन-नगरींतल्या चंद्रशाला म्ह० वरच्या माड्या सुंदर आणि उंच होत्या; असें तात्पर्य. ३ पृथ्वीला

शिखरिणीवृ०
असा पक्षी लक्षी बहु-विहग-लक्षीं न मिळता ॥
सुवर्णी जो वर्णीं वद कवण वर्णी कवयिता ॥
अगाई हा बाई त्वरित वरि जाईल पळुनी ॥
धरूं जातें हातें हळुहळु तयातें न कळुनी ॥ ८७ ॥

वसंततिलकावृ०
ऐसें वदे मग तयास धरावया हे ॥
तैं होय हंस-गमना पहिलीच आहे ॥[1]
वाजेच ना वलय नूपुर-नाद नोहे ॥
तो तद्गतीस निरखून कसा न मोहे ॥ ८८ ॥
हे मंद-मंद-पद सुंदर कुंद-दंती ॥
चाले जसा मद-धुरंधर इंद्र-दंती ॥
हंसा धरूं जवळि जाय कृशोदरी ते ॥
निष्कंप-कंकण-करासि पुढें करीते ॥[2] ८९ ॥

द्रुतविलंबितवृ०
गवसलाच असा खग भासला ॥ तव तदीय सखी-जन हांसला ॥
मग सवेंच बुझावुनि हांकिला ॥ उडविलाचि पिटाळुनि टाकिला ॥ ९० ॥

वसंततिलकावृ०
कांही उडोनि गगनीं मग नीट येतो ॥
नाहींच दूर न समीप बसे तसा तो ॥
पाहे सुधा-कर-मुखी कलहंस-राया ॥
लाहे मनोरथ तयास पुन्हा धराया ॥ ९१ ॥

सवाई. हंस धरीन म्हणोनि मनोरथ हा मज होय विनोद तुम्हांला ॥
हा कलहंस पिटाळवितांहि, पुन्हा उडवाल तया विहगाला ॥
जा परत्याच, तुम्ही नलगेच, असें वदुनी नृप-राज-सुता ते ॥
राहविला सखिचा जन आपणमात्र तयास धरूं मग जाते ॥ ९२ ॥

वसंततिलकावृ०
रांगेजली अरुण-कांति विराजवीते ॥
हे एकली सु-तनु चंद्र-कला तसी ते ॥
गेली हळूच कलहंस समीप केला ॥
कांहीं पुढें फडकला अवलोकिजेला ॥ ९३ ॥
आणीकही पद न वाजत मंद चाले ॥

---

१ दमयंती पहिलीच ( हंसगमना हंसाप्रमाणें हळू चालणारी ) होती ती पुनः हंस धरण्याकरितां तशी झाली, म्ह० श्लेषानें, हंसाकडे गमन करणारी झाली.
२ हातांत कांकणें होतीं तीं न वाजावीं म्हणून हात न हालवितां.

जो चालतां पदर सांवरिला न हाले ॥
हेहो करी निज-करीं खग सांपडेसा ॥
तोही हळू हळुच होय पलीकडेसा ॥ ९४ ॥

मालिनी वृ०
मद-गज-गमनेनें मागुती चाल केली ॥
वि-नत-तनु-लता हे तत्समीपास गेली ॥
पुनरपि फडके तो फारसा दूर नाहीं ॥
जवळि जवळि ऐसा भासला हंस कांहीं ॥ ९५ ॥

वसंत ति० वृ०
हंसें तदा चतुर-संमत युक्ति केली ॥
ते चालवीत सु-तनू बहु दूर नेली ॥
छाया तियेशि दुसरी तिसरी वनाळी ॥
जे सांवळी युवति-तुल्य दिसे निराळी ॥ ९६ ॥

प्रमाणि काव०
तया वनांत एकली ॥ विलासिनी विलोकिली ॥
मदें भरोनि डोलतो ॥ तियेस हंस बोलतो ॥ ९७ ॥

दिंडी.
भूमि-भागीं फिरणार तूं तुला मी॥कसा सांपडेन सांग गगन-गामी॥
बाळें बाळे जरि होय चंद्रकामी॥हस्त त्याचा लागेल काय सोमीं ॥९८
कसें नांदे तारुण्य तुझ्या देहीं ॥ बाल्य गेलें तें नेणसीच कांहीं ॥
उगवतांच कीं सहस्र-भानु पाहीं॥काय नलिनी-संकोच जात नाहीं ९९
असो,सांपडतों तुझ्या करामाजी॥पुन्हा सुटका करिशील काय माझी॥[2]
कसा पातेजूं बाळ-बुद्धि तुझी॥स्त्री-स्वभावें बहु आणशील बाजी१००

मालिनी वृ०
चतुर नर जसा हा बोलतो हंस तैसा ॥
तरि न धरि मृगाक्षी विस्मयीं भाव कैसा ॥
पळुनि तिज निखंदी तीस तो खेद नाहीं ॥
शिणहि विसरली ते बोलती होय कांहीं ॥ १०१ ॥

दिंडी.
कोण तूं गा कोठील कवणियाचा॥कसा जाला तव देह सोनियाचा॥
कशी आली ही तुज मनुज-वाचा॥काय भाग्योदय सांगु या वनाचा १०२
धरिल पाहिल सोडील असा पाहीं॥मजवरता विश्वास तुझा नाहीं॥
असो, पुसतें ते सांग कथा कांहीं॥जाइं अथवा मग याच वनीं राहीं १०३
असें बोलोनी मौन धरुनि राहे ॥ काय बोले तो हंस असें पाहे ॥

---

१ तिला दुसरी सोबतीला तिचीच छाया होती आणि तिसरी वनपंक्ति होती. तात्पर्य कीं, तेथें तिचे शिवाय दुसरें कोणी मनुष्य नव्हतें. २ मीं विचारिलें तें.

तदा त्याचा वचनौघ असा वाहे॥राज-कन्ये तूं आयकें गिरा हे१०४
ब्रह्मदेवाचे बहु विमान-वाही ॥ हंस आहेती ऐकिलें तुवांही ॥
तया वंशीं सौवर्ण-देह हाही॥ज्यासरीखा सखि सर्व-मान्य नाहीं१०५

वसंत-ति० वृ०

मंदाकिनीमधिल जीं कनकारविंदें ॥
तीं जेवितों मृदुल-नाल-मृणाल-कंदें ॥
आम्ही असों नृप-सुते तरि[1] कांचनाचे ॥
जें कार्य तें धरिल कीं गुण कारणाचे ॥ १०६ ॥
जो मानसीं[2] विहरतो विहरो परी तो ॥
कां आमुची कुलें-सती[3] अ-सती[4] करीतो ॥
राखीं नळा निज-यशो-मय-हंस राया[5] ॥
आलों महीवर फिराद अशी कराया ॥ १०७ ॥
मी गुंतलों नळ-महींद्र-गुणौघ-पाशीं ॥
सेवेसही मग करोनि तयाच पाशीं ॥
आलोकुनी कवण या चतुरा न नाचे ॥
लोकेशता विभवही चतुराननाचे ॥ १०८ ॥
एकांत लेखनहि वाचनही करीतो ॥
माझी तनु-द्युति समीप तदा धरीतो ॥
याकारणें नळ मला बहु आप्त मानी ॥
तो सांगता निज-मनोरथ होय कानीं ॥ १०९ ॥
आधींच नैषध-कथा नवनीत-भेला[6] ॥
होतां अलंकरणरूप इच्या जिभेला ॥
हंसोदयें[7] विधरतां अधरीं धरी ते ॥
स्वीकारितां वचन तें मग आदरी ते ॥ ११० ॥

दिंडी. नळें तुजशीं एकांत काय केला॥तोचि ऐकाया जीव हा भुकेला ॥

---

१ म्हणून. २ मानस-सरोवरीं. ३ कुलाची कीर्ति. ४ खोटी. ५ नळाचा यशोमय हंस हा मानससरोवरीं येऊन विहार करतो तो खुशाल करो, पण " आम्ही सुवर्ण-कांति हंस " ही जी आमची कुळाच्या कीर्ति आहे ती नाहींशी करतो. कारण तो शुभ्र असल्यामुळें आम्ही शुभ्र होतों. याकरतां हे नळा आपला यशोमय हंस आपलेजवळ राखून ठेव अशी फिर्याद करण्याकरतां पृथ्वीवर आलों आहें. तात्पर्य कीं, नळाची कीर्ति मानससरोवरापर्यंत गेली होती. ६ गोळा. ७सूर्योदयें, पक्षीं, हंसागमनानें.

तया बोलोनी निवावें या भुकेला॥ऐकवावा मज म्हणुनि नायिकेला॥१११॥
नळाशीं जो एकांत तुझा तो कां॥प्रकट कीजे म्यां सांग इतर लोकां॥
धन्य डोळे न करोनि तदालोका॥नळ-कथेनें हे कर्ण धन्य हो कां॥११२॥
निषध-राजीं हे फार दिसे राजी ॥ असें हंसें जाणोनि मनामाजी ॥
बोलिजेली नळ-राज-कथा हे जी॥भला हेजीब तीशि म्हणे हे जी॥११३॥
नळ म्हणाला मज सहज धरुनि बाहीं॥तुला कोठेंहो बंक अटक नाहीं॥
सकळ भुवनें तरि फिरुनि राज-गेहीं॥एक नवरी मज योग्य बरी पाहीं॥११४

वसंत ति० वृ०

एकांत हाच वदला मज जाण बाळे ॥
तूं सांग तो वर तुला रुचला रसाळे ॥
येणेपरी परिसतांच तया अनन्या ॥
ते बोलते चतुर सुंदर राजकन्या ॥ ११५ ॥
मी जाण देवनळही स्व-करीं धराया ॥
सांगेन काय चतुरा मज लाज जाया ॥
काळें करूनि सुख जोंवरी होय लेखीं ॥
हें बोलणें खग-मनीं उभयार्थ लेखी ॥ ११६ ॥

---

१ न ऐकलेला म्हणून. २ होईनात कां. ३ जवळ कोणी दुसरें नव्हतें अशाला म्ह० एकट्याला. ४ ( अन्वय-१ )-काळें करूनि जोंवरि लेखीं सुख होय (तोंवरि) देवनळ ही स्वकरीं धराया ( योग्य आहे असें ) मज लाज जाया ( मला निर्लज्जता प्राप्त होण्याला ) चतुरा मी सांगेन काय ? हें जाण. अर्थ-कांहीं काळानें जोंपर्यंत नळ मला वरील तोंपर्यंत देवनळ ही हातीं धरण्याला म्ह० लेखनद्वारीं परस्परांचें मनोगत परस्परांस कळविण्यामध्यें सुख करून घेतलें पाहिजे. मला ज्यास्त बोलण्याला लाज वाटते. तूं चतुर आहेस. तुला आणखी सांगणें नको. अथवा-अन्वय-( हे ) देवनळ ( नळराजा ) या ( व ) हीं ( मी ) स्वकरीं धरा. मी जाण ( जाणती ) मज जाया ( आपण होऊन जाण्याला ) लाज न काय ? काळेंकरूनि इ० ( पूर्ववत् ) ( असें ) चतुरा सांग. अथवा अन्वय-चतुरा मला लाज काय ! ( हे ) देवनळ या ( व ) ही जाया ( स्त्री म्हणून ) स्वकरीं धरा, (असें) मी काळेंकरूनि सांगेन जाण. जों ( जोंपर्यंत तो मला वरि ) (वरील) तोंवरि लेखीं सुख होय. अथवा नळ हा देव ही म्ह० देव असला तरी दैवीं लिहिलें असेल त्याप्रमाणें कांहीं काळानें त्याचें प्रतिरूप सुख होई पर्यंत मला निर्लज्जता येण्याला मी तो पाणिग्रहण करण्यास योग्य आहे असें सांगेन काय ! तात्पर्य कीं, तुला नळ हा वर आवडला कीं नाहीं म्हणून तूं पूर्व श्लोकांत विचारिलें, तर स्त्रिया अमुक वर आवडला असें कधीं सांगत असतात काय ? असें सांगण्यास त्यांला लाज नाहीं काय ! देव असला तरी सांगणार नाहींत; असें उत्तर दिलें. यांत लाजेमुळें सांगत नाहींत पण मनांतून तसें असतें असें सुचविलें. ह्या वरून नळच इष्ट आहे असें दर्शविलें.

स्रग्वि० वृ०
श्लेषं-शब्दें इणें भाव सांगीतला ॥
नैषधाधीश तो नाथ मागीतला ॥
होयँ जाणीयली घे त्रपा-कंचुला ॥
हंस बोलावया हालवी चंचुला ॥ ११७ ॥

वसंत ति० वृ०
गांव्याळ जें ह्रदय सांद्र न होय ज्याचें ॥
नामेंचि देवनळ कार्य नसे तयांचें ॥
धत्तूर हा कनक-नाम सदा धरीतो ॥
होईल काय रसिका कनकापरी तो ॥ ११८ ॥
तो बोलते युवति, लाज मनीं दडाली ॥
होती, तुवां विघरतां मन ती उडाली ॥
आतां वरूं नळ-वरासि तुला नवाजूं ॥
गाऊं तुझी स्तुति करूनि कशास लाजूं ॥ ११९ ॥

मालिनी वृ०
परिसुनि वच ऐसें जें इणें बोलिजेलें ॥
पतग-कुल-वतंसें अंतरीं ध्याइजेलें ॥
पर-वश-ह्रदया हे नैषधें राज-हंसें ॥
म्हणुनि समजतां हें बोलिजे राजहंसें ॥ १२० ॥

दिंडी जशी रंजलि आहेस निषध-भूपीं ॥ तसा तोही रंजला तुझ्या रूपीं॥
दैव-घटने अन्योन्य व्हाल सोपीं॥तुम्ही नांदालहि सत्य हें निरोपीं॥१२१
कोण योजावी नोवरी नळाला ॥ ब्रह्मदेवानें हा विचार केला ॥
तुझा नामाक्षर-संघ घेइजेला॥असें भासतसे माझिया मनाला॥१२२॥

मालिनी वृ०
नळ-रहित वराशीं तूज योजूनि पाहे ॥
तरि मग विधि ऐसा कोण तो मूढ आहे ॥
अ-चतुर नर तोही जाहल्यां जेविता कीं ॥
सळमिसळ करीना सर्वथा क्षीर-ताकीं ॥ १२३ ॥

दिंडी कशाला हें बोलणें काय येणें ॥ तुवां वरिला नळराज तुंही तेणें॥
स-फळ माझें हें येथवरी येणें॥राजकन्ये नीरोप मला देणें॥१२४॥
चतुर सुंदर तो तरुण निषध-राजा॥तुवां राजी केलाच तूं घरा जा॥
धन्य वैदर्भी दैव-योग तूझा॥बोल मानीं सत्यार्थ मनीं माझा१२५

---

१ ओळखिली गेली-म्ह० तिचा भाव हंसानें जाणिला· २ स्निग्ध, मृदु, कोमल. ३ योजूं पाहील. ४ जेविता जाहला तर-जेवूं लागला तर·

असें जाउनि तूं बोल राजहंसा. ॥ तुझी दासी जाहलें राज-हंसा ॥
नको चिंता तूं करूं अरि-ध्वंसा॥ऐक शुभ्रांशू-वंश-जावतंसा॥१२६
नको पाहूं तूं नोवरी नळाशी ॥ मीच भावें होईन सत्य दासी ॥..
जरी यावें आतांचि तयापाशीं॥गोष्ट भासे विपरीत लौकिकार्शी॥१२७

मालिनी वृ० करुनि मज रवाना राजसे तूजसाठीं ॥
नृपति निरखि माझी वाट आराम[1]-वाटीं ॥
बसवुनि निज-पाठीं तूज नेईन तेथें ॥
परि चुकुर तुझे हे लोक होतील येथें ॥ १२८ ॥

वसंत ति०वृ० येरीकडे नृपति धाडुनि राजहंसा ॥
तो बैसला करित आपण तत्प्रशंसा ॥
येईल शीघ्र घटना करुनी तियेची ॥
होईल भेटि मज आज तये प्रियेची ॥ १२९ ॥

शार्दूल वि०वृ० आरामीं विरहोत्करें[2] तरु-तळीं थारा करोनी स्वयें ॥
वारा घेत बसे तपे तपनसा तारा-पती निश्चयें ॥
माराचा शर-मार नावरि म्हणे दारा घडे ती कशी ॥
हा राजीव-दलाक्ष माधव जनोद्धारा कृपा हो अशी ॥ १३० ॥
तों चिन्हें शुभ पाहुनी नृप म्हणे लाभेल लाभावळी ॥
आला सन्मुख राजहंस निरखी, बाहू-युगें आंवळी ॥
बोले मंजुळ वाक्य येथ बसलों त्वद्ध्यान लावूनि रे ॥
झालें वृत्त समग्र सांगुनि करीं हंसा समाधान रे ॥ १३१ ॥

दिंडी. काय वदली तुजसवें हंसराया ॥ मान्य झाली कीं ती मला वराया॥
कधीं भेटे ती निज-करीं धराया॥विरह-बाधा मज नये आंवराया१३२
हंस बोले नृप-राज सु-गुण-सारा॥माळ घालीते ती तुला उदारा ॥
तुझ्याध्यानीं सल्लग्न[3] जे विचारा॥सत्य मानी ती होय तुझी दारा॥१३३
जाइं नगरा तूं नृपा कृपा-राशी ॥ पत्र येतांची जा स्वयंवरासी ॥
स्वयें ये ते चालूनि मंदिरासी॥फार वदणें नलगे सुखोत्करासी॥ १३४॥
बरें येतों बोलोनि पाय हातें ॥ नमुनि चाले स-प्रेम तो गृहातें ॥
नृप निघे तैं सहचमू निज-पुरातें॥हंस वचनीं लावुनी अंतरातें॥१३५॥

---

१ बागेच्या बहिर्यांत-बागेंत. २ विरहाच्या आधिक्यानें. ३ अन्वय-जे तुझ्या ध्यानीं सल्लग्न ती तुझी दारा होय ( हा ) विचारा सत्य मानी.

जनक-तनयेशीं पवन-तनयसा तो॥वदुनि वेगीं उड्डान नभीं घेतो॥
नळापाशीं वृत्तांत निवेदी तो।स्व-धामातें पावोनि सुखी होतो॥१३६
असो ऐशी हे कथा सौरसाची॥श्रवण करितां बहु गोड गमे साची॥
धन्य लीला त्या ऐक नैषधाची॥प्रकट वाणी रघुनाथपंडिताची ॥३७॥
असो आल्या इजजवळि सख्या ऐशा॥बोलती त्या मग तीस सकळ कैशा
हंस धरुनी परिपूर्ण तुझी आशा॥काय गेला तो उडुनि गगन-देशा१३८

मालिनी वृ० धरुनि कर सख्यांनीं सौध-शाळेंत नेली ॥
खग-वचन-मधूनें जे मनीं मोहिजेली ॥
नळ-विरह-भरानें पोळली गुप्त-रूपें ॥
नवल कनकशी ते गोरही तप्त-रूपें॥ ३९ ॥

वसंत ति०वृ० होणार जो वर तदीय वियोग दाही ॥
सांगावयासहि नये लपवावयाही ॥
या सांगवी मदन लाज न सांगवी तें ॥
कीं या दुहींत शिणलें मन रंग वीतें ॥ १४० ॥

शिख रि०वृ० न रंजे कारंजें निरखुनि फणीतें फणफणी ॥
मुदेनें मोदेना नल-गुण-गणीं जे गुणगुणी ॥
न वैसे जे सेजेवरि न परिसे जे शुक-गिरा ॥
नें नाहे मोना हे न धरि ललना हेतु दुसरा ॥ १४१ ॥

वसंत ति०वृ० लज्जावती युवति हे वडिलांसि धाके ॥
झांकीतसे विरह-पावक तो न झांके ॥
जो पंजरीं लपविला वसनांतराळीं ॥
तो झांकिला गगन-दीप तरी झळाळी ॥ १४२ ॥

मालिनी वृ० गजबज बहु झाली माय धांवोनि आली ॥
धरुनि हृदय-देशीं तीजला सेज केली ॥
करिं तिं विझण-वारे त्या सख्या वेगळाल्या ॥
वडिल वडिल दाया जाणत्याही मिळाल्या ॥ १४३ ॥

---

टीप—१ अन्वय—कनकशी ते तप्तरूपें ही गौर—सुवर्णासारिख्या कांतीची ती तप्त झाली असतां ही गौर राहिली, हें नवल होय. २ शोभा देतें. ३ केंस विंचरण्याचे फणीला. ४ त्रासे. ५ डोकींत घालण्याच्या मुदेनें. ६ गुणगुण करी. ७ स्नान न करी. ८ समजा.

आर्या — ते शीतळोपचारीं जागी झाली हळूच मग बोले[1] ॥
औषध नलगे मजला परिसुनि जननी बरें म्हणुनि डोले १४४

दिंडी. मूल उपवर हे जाहली इयेला ॥ पाहिजे कीं वर योग्य पाहिजेला ॥
असें ऐकोनी वधूचिया बोला ॥ सैंवराचा मग यत्न नृपें केला १४५
नगर सारें शृंगारविलें तैसें ॥ भूमि-लोकिं वैकुंठ दिसे जैसें ॥
लिखित पाठविलें सकळ नृपा कैसें॥तुम्हीं यावें जी सैंवरासि ऐसें १४६
निषध-राजासी लिखित पाठवी तो॥प्रतिद्वीपीं भू-पतिसही लिहीतो॥
अशा यत्नीं लागला नृप अहो तो॥पुढें परिसा वृत्तांत कसा होतो १४७
ऋषी नारद असतां नभोविहारी ॥ वैजयंती ज्या दिसे मनोहारी ॥
मणी रमणीय कनक-कलश भारी॥सुर पतीचा जो सौध महा भारी १४८
तया प्रासादीं जाय ऋषी पाहे ॥ सभा केली देवेंद्र बैसलाहे ॥
फार आदरिलें तया देव-रायें॥अर्घ्य-पाद्यादिक करुनि विनत-कायें १४९

भुजंगप्रयात वृ० — समुद्रोद्भवा अप्सरा साठ कोटी ॥
जयांची द्युती ते रतीलाहि लोटी ॥
विधीनें तशा त्या तुळूं पाहिजेल्या ॥
जियेशीं हळू[2] जाहल्या उंच गेल्या ॥ १५० ॥

मालिनी वृ० — उपवर दमयंती जाहली नोवरी ते ॥
कवण वर कळेना हे जयातें वरीते ॥
दृढतर-निज-लज्जा-गव्हरीं गुप्त केला ॥
जिवलगहि सखीला जो नगे सांगिजेला ॥ १५१ ॥

दिंडी. नवे तरणे नृप-मुख्य तीजसाठीं॥मोहिले ते करितात यत्न कोटी ॥
कलह-वार्ता ही मानितात पोटीं॥तया युवतीची आस तयां मोटी १५२
असें नारद बोलोनि तो निघाला॥जाय हृदयासी भानल्या स्थळाला॥
थोर चिंता मग होय सुरेंद्राला॥म्हणे कैसी ते वरिल आपणाला १५३
वरुण पावक यम इंद्र हे मिळाले ॥ असे चौघेही रथारूढ झाले ॥
मही-लोकासी यावया निघाले॥तया कुंडिन-नगरासमीप आले १५४

द्रुतवि० वृ० — तंव तया चवघांस तया पथीं ॥
निषध-नायक येत दिसे रथीं ॥

---

१ नलगे म्ह० नको. श्लेषानें—नल गे म्ह० मजला गे नल हेंच औषध. २ हलक्या—हें नारदाचें म्हणणें.

तरुण सुंदर जो चतुराग्रणी ॥
अतुळ-वैभव राज-शिरोमणी ॥ १५५ ॥

मालिनी
निरखुनि निषधेंद्रा इंद्र तो बोलताहे ॥
युवति उभयथाही लभ्य आम्हांसि नोहे ॥
वरिल जरि नळाला ते तया लाभली जे ॥
न वरि तरि आम्हांसी मूढ[1] ते काय कीजे ॥ १५६ ॥

शिख० रि० वृ०
नळातें पाचारी सुर-पति विचारी कुशल तो ॥
म्हणे आम्हांपाशीं तव गुरु[2] विलासी निवसतो ॥
खुणा ज्या ज्या त्याच्या तुजजवळि[3] त्या त्या निरखितों ॥
खरा तूं तद्वंशी म्हणउनि तदंशी समजतों ॥ १५७ ॥

वसंत ति० वृ०
तो वन्हि तो वरुण तो यम इंद्र गा मी ॥
झालों तुला सकळ हे विदित स्व-नामीं ॥
बोले मही-रमण हा नळ चंद्र-वंशी ॥
वंदी पदास तुमच्या तुमचाच अंशी ॥ १५८ ॥

दिंडी. नळा कोठें जातोसि असें बोले ॥ नळें इंद्रासी असें बोलिजेलें ॥
भीम-भूपें हें लिखित पाठवीलें ॥ सैंवरालागीं येइजे वहीलें ॥१५९॥
बोलताहे देवेंद्र नृष-वराला ॥ नैषधा तूं आलासि सैंवराला ॥
सुमज आम्ही तुज जवळि याचनेला॥करूं आलों मनि धरुनि कामनेला१६०

वसंत ति० वृ०
जे हे दिशा-पति विशाल-यशा अशांला ॥
आशा-वशा कु-वलयांत दशा कशाला ॥
हा बोल तूं न वद तूजसमीप येतां ॥
आम्ही मखीं निज-मुखीं अवदान घेतों ॥ १६१ ॥
केला विचार ह्रदयीं नळराज यानें ॥
हा जीवही धनहि देइन निश्चयानें ॥

---

१ मूर्ख. जर नळाला तिनें वरलें नाहीं तर अशी मूर्ख आम्हांला काय करायाची आहे. २ पिता वीरसेन. ३ राजा हा अष्टलोकपालांचा अंश असतो.– "अष्टानां लोक-पालानां वपुर्धारयते नृपः" असें मनूचें वचन आहे. ४ अन्वय–"(हे) विशालयशा (नळा) जे हे दिशापति अशांला कु-वलयांत आशावशा दृशा कशाला, हा बोल तूं न वद" हे विशालकीर्ते नला, हे सारे दिक्पाल असून त्यांची दृष्टि पृथ्वीवरील पदार्थांच्या आशेनें बद्ध कां ! असें तूं म्हणूं नको; कांकीं.

देवेंद्र दे जरि म्हणेल कदापि भैमी ॥
ते देववेल मज काय? करीन गे मी ॥ १६२ ॥

दिंडी. म्हणे राजेंद्र तया देव-देवा ॥ काय आज्ञा जी काय करूं सेवा ॥
वीरसेनाचा थोर पुण्यठेवा ॥ मज मिळाला तो दर्शनाख्य मेवा॥१६३

वसंत तो० वृ०
बोले सुराधिप नराधिपतीस राया ॥
भैमी जसी मज वरील तसें कराया ॥
बोलावयास तिजशीं तिचिया घरा जा ॥
तूं बोलका चतुर केवळ होंस राजा ॥ १६४ ॥

मालिनी वृ०
मग हळुच सुरेंद्रा बोलिजे भू-पतीनें ॥
मज निज-सुमनाची घातली माळ तीनें ॥
त्हदय तरी तियेचें सांद्र जालें सुवासें ॥
चलित न करवें तें कोणत्याही प्रयासें ॥ १६५ ॥

दिंडी. पुन्हा बोले देवेंद्र नृप-वरा या ॥ तुला झालें वश त्हदय तिचें राया॥
तरिच आलों हे याचना कराया॥तुझ्या वाक्यें आम्हांसि ते वराया॥१६६

वसंत ति० वृ०
दातव्यही स्ववश आपण जाणताही ॥
पर्याय उत्तर वदेच न देच कांहीं ॥
दाता असा शठ कसा ठकसा कदापि ॥
जो याचकावरि दया न करीच पापी ॥ १६७ ॥
गहिंवरत गळाही चावळे जीभ वाळे ॥
विकळपण शरीरीं कंपही या निराळे ॥
धनिक विमुख होतां अंतरीं शोक राहे ॥
हरहर मज भासे यातना याचना हे ॥ १६८ ॥
भांबावला धन-मदें भलतेंच बोले ॥
तो बोलही सरस मानुनि लोक डोले ॥

---

१ काना डोळा. २ पुष्पाची. तरी तिचें त्हदय सुवासानें (चांगल्या वासानें) भरलें आहे. आतां मजकडे पुष्पांची माळ आली असतां तिजकडे सुवास राहील कसा! तर सुमनाची म्ह० आपल्या चांगल्या मनाची आणि सुवास म्ह० माझा तिचे मनांत चांगला वास वसति. तात्पर्य कीं, तिचे मन मजवर पक्कें बसलें आहे. ३ जें द्यावयाचें तें. ४ ह्या क्रियेचा कर्ता "धनिक" अध्याहृत आहे.

मांसेंकरूनि फुगला गळसाच[1] भावे ॥
ज्या दीन मीन धरितां वळसाच पावे ॥ १६९ ॥

दिंडी. असें परिसोनी बोल वासवाचे ॥ तया नळ-राजा काय वदे वाचे ॥
तुम्ही ज्ञाते हो थोर थोर साचे॥असां साक्षो तुम्हि माझिया मनाचे १७०
ज्याशि जेथं सामर्थ्य नसे त्यातें॥कसें कार्या त्या तुम्हीं सांगिजेतें॥
बाळ तान्हें उचलील काय जातें॥बोलणाराचें मोल[2] फोल जातें १७१
सात बंकांही पलोकडे हो ते ॥ राजकन्येचो भेट कशी होते ॥
त्यजुंनि राज्य त्वद्दूतता कंशीते॥धरावी म्यां त्वद्दयासि जे कंशीते[3] १७२

वसंत ति० वृ० बोले सुरेंद्र नृप-सौध सुखें फिराया ॥
आकार गुप्त वर देइन देवराया ॥
जाई विदर्भ-वसुधेस सुतेस शोधीं ॥
आम्हांस ते तरि वरील तुझ्याच बोधीं ॥ १७३ ॥

ओव्या. इंद्र त्रैलोक्य-नायक ॥ तोही जालासे याचक ॥
दाक्षिण्यानें भूपाळक ॥ यांच्या वाक्यें गुंतला ॥ १७४ ॥
बरें म्हणोनी उत्तरें ॥ रथावरोनि ऊतरे ॥
तया राजपुरीं[4] शिरे ॥ शोभा तेथील पाहतो ॥ १७५ ॥

वसंत ति० वृ० तो जाहला नृप-वर स्थिर दूत-भावीं ॥
मानोचना यवांतच्या विरहास भावी ॥
कुंभोद्भवें तरि महोदधि-पान केलें ॥
दुर्वार वाडव-शिखिस न मानिजेलें[5] ॥ १७६ ॥
प्राणापरीच त्वदयो नगरांतरीं तो ॥
गुप्त स्वरूप नल-भूप तदा धरीतो ॥
बंकीं रिघे तव तया दिसतात बंके ॥
पंकेरुहास्य न दिसेचि तया न शंके ॥ १७७ ॥

---

१ मासे धरण्याच्या गळाप्रमाणेंच भाव म्ह० वाटतो. हा गळ मांसानें फुगलेला असतो म्ह० ह्यास मांस लावलेलें असते. धनिक तर मांसाने पुष्ट असतोच. ह्या गळाला मीनानें म्ह० माशानें धरलें म्ह० तो वळसा पावतो म्ह० गरक्यांत येतो. तसें दीनानें धनिकास धरिलें असतां त्याला गोता बसतो म्ह० फसतो. २ बोलण्याची मातब्बरी ( योग्यता ) राहत नाहीं. ३ पीडा देते. ४ कुंडिननगरीस. ५ म्हणून.

ओंव्या. तया राज-सौधांतरीं ॥ शोभा पाहे परोपरी ॥
कोठें आहे ते सुंदरी ॥ धुंडावया लागला ॥ १७८ ॥
कोणी एक दोघी दूती ॥ तेथें अन्योन्य बोलती ॥
येथें आहे दमयंती ॥ जांई बोलोनि येई ॥ १७९ ॥
तिजसवें सौधांतरीं ॥ राजा जाय अंतःपुरीं ॥
तेथें देखिली सुंदरी ॥ जैसा पूर्ण चंद्रमा ॥ १८० ॥
सुमन-सेजेच्या पलंगीं ॥ बैसलीसे तन्वंगी ॥
सख्या खेळताती सगीं ॥ बहु अप्सरा त्या जेशा ॥ १८१ ॥

मालिनी वृ० प्रगट तिजपुढारां जाहाला राज-मौळी ॥
पदर वरि न घेतां हार जैसा झळाळी ॥
निज-त्दृदय-निवासी काय बाहीर आला ॥
निरखुनि दमयंती तोवें मानी तयाला ॥ १८२ ॥

द्रुत वि० गजबजोनि समस्त तिच्या सख्या॥गजगमा उठल्या तिजसारिख्या॥
पदर सांवरितां नृप-बाळिका॥झळकती त्दृदयीं मणि-माळिका॥१८३॥

शार्दूल वि०वृ० कोणी एक सखी विलोकुनि नळ-क्षोणीश्वरा मोहिली ॥
कोणी तत्तनु-कांति-सिंधु-पतित द्रोणी-परी पोंहली ॥
कोणी हा मज नाहीं नाथ म्हणुनी लोणी तशी पाझरे ॥
कोणी एक तयास लाजुनि विरे कोणी वियोगें झुरे ॥१८४॥
रामातें जनक-क्षमा-पति-सुता, रामा जशी रेवती ॥
कामारीस नगाधिराज-तनया, कामासि जैशी रती ॥
या मानूनि तसी विदर्भ-दुहिता रामा मनीं भाविते ॥
हा माझा त्दृदयाब्ज-सूर्य म्हणुनी त्या मानिनी बोलते१८५

साकी. कोण तुम्ही कवणीचे कोठुनि येथें कां आलां हो ॥
काय निमित्तें दिधला मजला हा निज-दर्शन-लाहो ॥ १८६ ॥
अटक न केली तुम्हांसि येतां त्या सातांही बंकीं ॥
हीं माझ्या नयनाचीं सुकृतें विशेष मी हें शंकीं ॥ १८७ ॥
संभवलां कवणाचे वंशीं सांगा हो अ-कलंकीं ॥
उभे असां कां भागतसां हो या बैसा पर्यकीं ॥ १८८ ॥

वसंत राजे असाल तरि धन्य वसुंधरा हे ॥

१ होडी. २ बलरामास. ३ शिवास.

तिं०वृ शोभाल दैव तरि नाक यथार्थ आहे ॥
भोगी तुम्ही उपजलां जरि नाग-लोकीं ॥
खालीं असोनि सकळांवरि होय तो कीं ॥ १८९ ॥

साकी. दुग्ध-पूर नसतां निज-रूपीं क्षीर-सिंधु तो जैसा ॥
वसंत आला नाहीं तरि तो उद्यान-भाग जैसा ॥
अमृत-कराचा उदय न होतां रजनी-समयो जैसा ॥
तुमच्या विरहें आजि जाहला कवण देश तो ऐसा ॥ १९० ॥

वसंत भूपाळ जो मम मनो-मुकुरीं उभा से ॥
तिं०वृ० तो नैषधेंद्र तुमचा अनुबिंब भासे ॥
रूपें तरीच दिसताति दिगंतराळीं ॥
तीं हीं कसीं म्हणवतील तुम्हां-निराळीं ॥ १९१ ॥

साकी. सरस-द्युति-पद फुल शिरसाचें फुललें मृदु स्वभावें ॥
चालवाल किति दूर तयातें अ-दय त्द्दय मज भावें ॥
कर्ण-युगल हें धन्य करावें सांगुनिया निज नांवें ॥
स्तवन करी रघुनाथ तयाचें कवन स्वीकारावें ॥ १९२ ॥

मालिनी तुजवरि मन ईचें यापरी कां इयेला ॥
वृ० त्यजसि सुम-शरानें हा असा बोध केला ॥
तृण-कण गणि जैसा त्यासि धैर्यें गणीतो ॥
युवतिसि मग बोले राज-चूडा-मणी तो ॥ १९३ ॥

वसंत आहेस कीं सुखवती कमनीय-लीळे ॥
तिं०वृ० निश्चित कीं त्द्दय होय तुझें सु-शीळे ॥
आतां नकोच अवलंब विलंबनाचा ॥
हेजीब मी समज मुख्य सुराधिपाचा ॥ १९४ ॥

स्वा- जो धरी निज-करीं शत-कोटी ॥ ज्याशि नम्र सुमनः शत-कोटी ॥
ग०वृ० तो सुरेंद्रहि तुला नत याची ॥ हा असो वर तुला न तयाची ॥ १९५ ॥

घना- तया इंद्रा करीं धरीं ॥ अथवा तयाचे शेजारीं ॥
क्षरी. नांदे जो तेजोनिधी भारी ॥ तया वरीं राजसे ॥ १९६ ॥
तोही येईना जरी मना ॥ तरी वरावें शेमना ॥

---

१ शिरसाचा. २ याचना करतो. ३ बरोबरी. ४ [illegible]. ५ यमाला.

अथवा करूनि करुणा ॥ त्या वरुणा वरीं कीं ॥ १९७ ॥
ऐसें बोलतां भूपाळ ॥ काय बोले ते वेल्हाळ ॥
कांहो बोलतां पाल्हाळ ॥ नाम कुळ सांगावें ॥ १९८ ॥

वसंत ति० वृ०
बोले नृपाळ पुससी मज वंश नामें ॥
यावीण सांग तटलीं तुझि काय कामें ॥
आलों सुधांशु-मुखि जे घटाना कराया ॥
तीतें विचारुनि वरीं सुर-लोक-राया ॥ १९९ ॥

घनाक्षरी.
बोले सुंदरी तयासी ॥ स्व-वंश-नाम न सांगसी ॥
तरी आम्हीं पर पुरुषासीं ॥ वदणें मर्यादा नोहे ॥२००॥
तिचा पाहुनिया कोप ॥ काय बोले नळ भूप ॥
चंद्र-वंशाचें हें रोप ॥ माझें जाण राजसे ॥ २०१ ॥
महा-जनाचा आचार ॥ निज-नामाचा उच्चार ॥
करूं नये हें साचार ॥ शास्त्राधार आहे कीं ॥ २०२ ॥
पुन्हा बोलते सुंदरी ॥ चंद्र-वंशी महीवरी ॥
बहु आहेत ते परी ॥ नामें घेतां जाणवे ॥ २०३ ॥

आर्या. मी वासुदेव ऐसें स्व-नाम मुरहर वदे सकळ-वेदी ॥
आधार तोचि मानुनि निजाभिधानासि कवण न निवेदी ॥२०४॥

घनाक्षरी.
बोले नैषधेंद्र वाचा ॥ नाम हेजीब इंद्राचा ॥
किती साक्षेप नामाचा ॥ काय तेणें करिसी तूं ॥ २०५ ॥
केला काय अंगीकार ॥ बोलूं इंद्रासी निर्धार ॥
तंव ते बोले सुकुमार ॥ चंद्राकार-वदनातें ॥ २०६ ॥

वसंत ति० वृ०
ऐरावतावरि बसोनि विमान-देशीं ॥
जो संचरे सुर-पती सुख-संपदेशीं ॥
मी भूमिकेवरि असोनि तयास कांहीं ॥
मागावया तरि कशी मज लाज नाहीं ॥ २०७ ॥

घनाक्षरी.
नळावेगळा भ्रतार ॥ नलगे स्वमीं हें साचार ॥
ऐसा निश्चय विचार ॥ तंव राजेंद्र बोलतो ॥ २०८ ॥

---

१ आत्मनाम गुरोर्नाम नामातिकृपणस्यच ॥ श्रेयस्कामोन गृण्हीयाज्ज्येष्ठापत्य-कळत्रयोः ॥ अशी स्मृति आहे. २ जाणणारा. ३ विमानें फिरतात तेथें म्ह० आकाशांत.

टाकुनि इंद्रीचा संभ्रम ॥ धरिशी कां तूं नळ-भ्रम ॥
जाईल विश्राम-विभ्रम ॥ नसता श्रम होईल ॥ २०९ ॥
तुझें सौंदर्य पहावया ॥ धरी सहस्राक्ष-काया ॥
तया वरीं देवराया ॥ नळ-माया टाकुनी ॥ २१० ॥
अथवा तुज तो मोहला ॥ होऊं[1] नेदी नैषधाला ॥
यास्तव त्याच इंद्राला ॥ माळ गळां घालावी ॥ २११ ॥

वसंत ति० वृ०

येणेंपरीच अनळासि यमाधिपासी ॥
पाशीसही तरि वरीं म्हणतां नृपासी ॥
आधार लेश न वदे नव-सारसाक्षी ॥
होते तयासि सुर-नायक गुप्त साक्षी ॥ २१२ ॥
ऐसा अ-वंचक वदोनि नृपाळ आला ॥
इंद्रादिकांसहि निवेदित वृत्त जाला ॥
पाचारिले मग महींद्र विदर्भ-भूपें ॥
आले समस्तहि सभेसि स-हर्ष-रूपें ॥ २१३ ॥

ओंव्या.

इंद्रादिक तेही अधिप ॥ धरूनि आले नळ-रूप ॥
सभे बैसले अमूप ॥ जेथें भूप शोभती ॥ २१४ ॥
आला नळही भूपाळ ॥ कीर्तिरूपें जो विशाळ ॥
तदा दमयंती वेल्हाळ ॥ सखियांसी बोलते ॥ २१५ ॥
नळ-राज-हिरा वरिला ॥ तोचि मनीं म्यां धरिला ॥
सुर किंवा नर भला ॥ न वरीं अन्यातें निश्चयें ॥ २१६ ॥
ऐसें बोलोनी सुंदरी ॥ बैसे शिबिकेभीतरीं ॥
आली राज-सभांतरीं ॥ बरोबरी शारदा[2] ॥ २१७ ॥
बोले शारदा तियेला ॥ ऐकें राजांच्या नामांला ॥
मना येईल तयाला ॥ माळ गळां घालीं तूं ॥ २१८ ॥

शार्दूल वि० वृ०

हा राजा ऋतुपर्ण नाम धरिता हारावळी कंधरीं ॥
हा राहे शरयूसमीप नगरीं हा राजसे आदरीं ॥

---

१ घडूं नेदी. २ स्वयंवराचे वेळीं वधू ( नवरी ) राजसभेमध्यें वर निवडण्याकरितां जाऊं लागली म्हणजे जिला तेथें जमलेल्या राजांची चांगली माहिती असून जी मोठी चतुर असेल अशा प्रकारची एक स्त्री तिच्या बरोबर असते, अशी प्रसिद्धि आहे. तशी ही एथें शारदा आहे.

हा राजीव-दलाक्ष सद्गुण-निधी फारा जनाच्या मह्या ॥
थारा, हाच वरीं रिपूंशि परते सारावयाचा पह्म ॥२१९॥

वसंत ति॰ वृ॰ येणेंपरीच बहु भूप निवेदिजेले ॥
हीच्या मनासचि न येति उगेचि ठेले ॥
जेथें वेळी[1] धरुनि पंच[2]-नळी वसे ते ॥
तेथें विरिंचि-तनयेसमवेत येते ॥ २२० ॥

घनाक्षरी. बोले शारदा वचन ॥ येथें बाई सावधान ॥
वरें घालूनिया मन ॥ वर-लाभें सुखी हो ॥ २२१ ॥

वसंत ति॰ वृ॰ ज्याचीं पदें धरिति देव शिरोललामीं ॥
स्वा[3]राज्य जों[4] मिरवितो गज-राज-गामी ॥
जो वज्र-पाणि बहु-लोचन कांति भारी ॥
हीं पाहिजे तरि वरीं नळ-रूप-धारी ॥ २२२ ॥
साहील कोण सजणे बहु तेज याचें ॥
मध्यस्थें रूप धरितो हरिचे यमाचे ॥
स्नेहा धरी अधिक होय तमासि वारी ॥
हा[6] पाहिजे तरि वरीं नळ-रूप-धारी ॥ २२३ ॥
संपूर्ण ते समज यास्तव दक्षिणां-शा ॥
पाप्यांस दंड धरितो करितो विनाशा ॥
देहीं जया मिरवते घन कांति भारी ॥
हीं पाहिजे तरि वरीं नळ-रूप-धारी ॥ २३४ ॥

---

१ ओळ. रांग. २ पांच नळ. ३ स्वर्गाचें राज्य. ४ इंद्र. ह्या श्लोकांत "बहु-लोचन" ह्या विशेषणानें इंद्र हजार डोळ्यांचा आहे, तेव्हां तो कुरूप असल्यामुळें वरण्यास अयोग्य असें सुचविलें. ५ पूर्व व दक्षिण ह्या दिशांचे स्वामी अनुक्रमें इंद्र व यम हे आहेत; व ह्या दोन दिशांच्या मधील जी आग्नेयी दिशा तिचा स्वामी अग्नि आहे, म्हणून व विदर्भराजसभेंतही तो इंद्र व यम ह्यांचे मध्यें बसला होता; म्हणून त्यास "मध्यस्थ रूप धरितो" इ॰ म्हटलें आहे. ६ अग्नि. ह्या श्लोकांत आरंभींच अग्नीच्या तापाची असह्यता सुचवून तो वरण्यास अयोग्य असें सुचविलें. ७ यम. ह्या श्लोकांत "घन कांति" ह्या शब्दांनीं यम काळा आहे, असें सुचवून तो वरण्यास अयोग्य असें सुचविलें.

आधार हांच सजणे बहु-जीवनाचा ॥
रक्षी दयेंकरुनि मान ऋषी-जनाचा ॥
यादांस फार म्हणती जन सौख्य-कारी ॥
हा[2] पाहिजे तरि वरीं नळ-रूप-धारी ॥ २२५ ॥
होतील नंदन-विलास जयास तो हा ॥
आहे धनंजयहि धर्महि जाण तो हा ॥
रत्नाकरीं तुज विराजविता विहारी ॥
हा[3] पाहिजे तरि वरीं नळ रूप-धारी ॥ २२६ ॥
शारदेस मग राज-सुता हे ॥ शारदेंदु-वदना वदताहे ॥
शेवटील नळ हा मज बाई॥मानला बहु मनीं सुख-दाई२२७॥

---

१ पूर्वी एकदा वरुणानें यज्ञ केला, तेव्हां त्याला ऋत्विज पाहिजे होते, म्हणून वरुणाचा मुलगा बंदी ह्यानें वादांत कहोड इ० ऋषींचा पराजय करून त्यांस समुद्रांत बुडविलें. आणि अशा रीतीनें आपले बापास ऋत्विज पाहिजे होते ते दिले. पुढें यज्ञ संपल्यावर वरुणानें त्यांचा मोठा आदरसत्कार करून त्यांस परत पाठविलें; अशी कथा आहे ( भार०, आदि०, १३२ अ०) तिला अनुलक्षून हें लिहिलें असावें. २ वरुण. ह्या श्लोकांत जीं विशेषणें आहेत तीं सर्व, वरुण इतरांचे बरें करण्यांत सर्वदा असतो, त्यास स्वस्त्रीकडे लक्ष्य देण्यास वेळ होत नाहीं, असें सुचवितात. त्यावरून तो वरण्यास अयोग्य हें उघड आहे. ३ नळ. ह्या श्लोकांत वरच्या चारही देवांचे गुण नळामध्यें आहेत असें सुचविलें आहे. " नंदनविलास " शब्दानें इंद्रता सुचविली. इंद्राकडे नंदन बनांतले विलास आणि नळाकडे आनंदकारक विलास. " धनंजय " शब्दानें अग्निता सुचविली. धनंजय असें अग्नीचें नांव आहे; तसा नळही आहे. नलपक्षीं धनांतें जिंकणारा असा अर्थ म्ह० पुष्कळ द्रव्य मिळविणारा. " धर्म" हें यमाचें नांव आहे. नळ ही धर्म आहे म्ह० नीतिमान् आहे. " रत्नाकरीं विहारी" म्ह० समुद्रांत राहणारा वरुण आहे, तसा नळ ही आहे. नळपक्षीं, रत्नाकरीं म्ह० रत्नाचे खाणींत ( रत्नसमुदायांत ) विहारी म्ह० खेळणारा, म्ह० ज्यांपाशीं पुष्कळ रत्नें आहेत, असें सुचवून नळाकडे वरुणता सुचविली. पण वरुणाला स्त्रीकडे पाहण्याला बनत नाहीं असा त्याकडे वरती दोष सांगितला आहे, तो दोष न यावा म्हणून " तुज विराजविता " असें विशेषण दिलें आहे. म्हणजे यावरून तुला रत्नांच्या दागिन्यांनीं भरून खुष ठेवील असें सुचविलें. " नळरूपधारी " म्ह० नळाचें रूप धारण करणारा असा वरती चार श्लोकांत अर्थ आणि येथें " रूपधारी " म्ह० सुरूप नळ असा अर्थ.

ओंव्या तेव्हां दमयंती सुंदरी ॥ इंद्रादिकां नमस्कारी ॥
तयां बोलली उत्तरीं ॥ अमृतापरीस मधुर ॥ २२८ ॥
माझा भीम जैसा पिता ॥ तसे तुम्ही जी तत्वतां ॥
करा कन्या-दान आतां ॥ नळ-नाथाचे करीं ॥ २२९ ॥

द्रुत सुर समस्त इच्या वर-निश्चयें ॥ सुरस[1] मस्त[2] असें वदले स्वयें ॥
वि० नळ-वराशि वरोनि सुखी असें ॥ तुज नको जन कोण म्हणे असें २३०

वसंत भावे चना सुख मनीं कमनीय बाला ॥
ति० मायेसही विसरली न पुसेचि बाला[3] ॥
वृ० दूर्वा[4]-दळीं कदेलि[5]-बंध-मधूक-माळा ॥
तोणें अलंकृत करी नळ-कंठ-नाळा ॥ २३१ ॥

ओंव्या चौघे[6] श्रेष्ठ सुरेश्वर ॥ देते झाले अष्ट वर ॥
मस्तकीं ठेवोनी कर ॥ दोन दोन एकेकें ॥ २३२ ॥
देऊनिया तया वर ॥ स्वर्ग-भुवना गेले सुर ॥
निराश होऊनि नरेश्वर ॥ जाते झाले स्व-स्थाना ॥ २३३ ॥

शिख नृपाळाचे मांडीवरी बसुनि मांडी[7] हरिख[8] ते ॥
रि० वृ० तयां पाहों आले जन सकळ जाले हरिखते[9] ॥
महावाद्यें नाना निनदहि तनाना मग घडे ॥
पिता तीचा पाटीभर धनहि वांटी बहु विडे ॥ २३४ ॥

ओंव्या नानापरींचें मिष्टान्न ॥ चारी दिवस भोजन ॥
वधू-वरें मिरवून ॥ घर-भरणी करविली ॥ २३५ ॥
राजा निरोपा तें घेत ॥ मग दमयंतीसमवेत ॥
आपल्या नगरातें जात ॥ नांदे आनंद-भरें ॥ २३६ ॥

शार्दूल लोकीं सौरभ-काव्य-नाटक-कलालंकार-चूडामणी ॥
वि० वृ० सर्वां नैषध विद्वदौषध असे विख्यात वाग्धोरणी ॥
हे त्याचीच टिका टिकोनि घटिका ऐकेल जो आदरें ॥
बोले त्या रघुनाथ-पंडित कवी भेटे हरी सादरें ॥ २३७ ॥

इति रघुनाथपंडित-विरचित नळदमयंती-स्वयंवराख्यान समाप्त.

---

१ सुरस म्ह० मधुर. २ पुष्कळ. ३ बापाला. ४ दूर्वांनीं युक्त. ५ केळीच्या सोपटाच्या दोऱ्यांत गुंफवलेली मधूक ( दुपारी ) पुष्पांची माळ. ६ इंद्र, अग्नि, यम, आणि वरुण. ७ करी. ८ आनंद. ९ हरिखते झाले—आनंद पावते झाले.

# चिंतामणि कवि.

## दिंड्या-ध्रुवांख्यानाच्या.

स्वायंभु मनूचा पुत्र उत्तानपाद राजा ह्यास दोन बायका होत्या. थोरलीचें नांव सुनीति व धाकटीचें नांव सुरुचि. सुरुचि ही राजास फार प्रिय होती. थोरलीचा मुलगा ध्रुव एकदा बापाच्या मांडीवर जाऊन बसला, तें धाकटीस न साहून, तिनें त्यास पायानें मांडीवरून खालीं लोटलें. तेव्हां ध्रुवास फार वाईट वाटून तो परमेश्वरास शरण गेला; तेव्हां त्यानें प्रसन्न होऊन ध्रुवास अचल पद दिलें. ही कथा ह्या आख्यानांत आहे.

सूर्य-वंशीं उत्तानपाद-राजा ॥ रूपवंती तयास दोन भाजा ॥
कनिष्ठशी अत्यंत प्रीत-मायाँ ॥ पट्टराणीची पडों नदे छाया ॥ १ ॥
वरिष्ठेसी जाहला एक पुत्र ॥ भक्त-राज वैकुंठ-पाळ-मित्र ॥
सुकुमार आ-कर्ण-पद्म-नेत्र ॥ ठाणँ माण रेखिलें जेविं चित्र ॥ २ ॥
पांच वर्षं लोटलीं ध्रूवा आंगीं ॥ पिता ठाऊका नाहिं तयालागीं ॥
पुसे मातेसी भक्तराज योगी ॥ तात कोठें तो सांग मला वेगीं ॥ ३ ॥
म्हणे माता तान्हया तोचि तूझा ॥ धराधीश बोलती ज्यास प्रजा ॥
येरु बोले पाहीन पिता माझा ॥ नको जाऊं मारील राज-भाजा ॥ ४ ॥
पूर्व पुण्यें शुभ दिवस ऊगवला ॥ मुलांसंगें तो राज-गृहा गेला ॥
राज-दृष्टी सन्मूख उभा ठेला ॥ पिता पाहे तों मोह झळंबला ॥ ५ ॥
अनीवार मोहास पूर आला ॥ ऊचलोनी मांडिये बैसवीला ॥
बोळ-शब्दें खेळवी तनूजाला ॥ न साहे तें राणीस कोप आला ॥ ६ ॥
उचंबळे क्रोधाग्नि शिखा टाकी ॥ कवण बोले बैसला राज-अंकीं ॥
राव कैसा खेळवी कवतूकीं ॥ ध्रूव राजा होईल धरा-लोकीं ॥ ७ ॥
धरोनीया सापत्न भाव चित्तीं ॥ पदें लोटोनी पाडियला क्षीती ॥

---

१ ह्या आख्यानांत ऱ्हस्वदीर्घ अक्षरें व दिंडी-वृत्ताच्या मात्रांची संख्या ह्यांकडे कवीचें कांहींसें दुर्लक्ष्य दिसतें. २ वैकुंठाचा पालक जो विष्णु त्याचा मित्र (भक्त ३ कानापर्यंत गेले असून कमलासारखे आहेत नेत्र ज्याचे. ४ स्थान आणि मान म्ह० ज्या स्थानीं ज्या प्रमाणाचे अवयव असावयाचे त्या स्थानीं त्याप्रमाणाचे ते होते. ५ तो ध्रुव.

रडत गेला माउली जेथ होती ॥ अश्रु-पातें हालवी नेत्र-पातीं ॥ ८ ॥
म्हणे माता तान्हया काय झालें ॥ कोण पापीयें तूज गांजियेलें ॥
मला रायें मांडिये बैसवीलें ॥ राज-भाजेनें पदें लोटियेलें ॥ ९ ॥
बुझावीतां माउली काय बोले ॥ अम्हीं देवासी नाहि पूजियेलें ॥
येरु बोले तो देव कसा आहे ॥ वसे कोठें तो सांग लवलाहे ॥ १० ॥
माय बोले सर्वत्र देव आहे ॥ चराचर ही व्यापूनि विश्व राहे ॥
तयालागीं धुंडितो महायोगी ॥ पूर्व पुण्यें दरूषण[1] तयांलागी ॥ ११ ॥
तुझी बुद्धी काय बा वय सान ॥ तुला कैसें देईल दरूषण ॥
ध्रूव बोले त्यागीन तरी प्राण ॥ हरी देईना जरी दरूषण ॥ १२ ॥
उभा जैसा तैसाचि निघे वेगें ॥ रडत पाठी लागली माय मागें ॥
पुत्र गेला रायासि दूत सांगे ॥ राय झाला घाबरा मोहें-संगें[2] ॥ १३ ॥
सर्व सौख्याचें मूळ बाळ माझें ॥ ध्रूव गेला घेणार राज्य-ओझें ॥
वनीं प्राण त्यागीन लोक-लाजे ॥ काय जोणें मारिलें दुष्ट भाजे ॥१४॥
लवलाही लागला ध्रुवापाठी ॥ म्हणे बाळा ऐक बा एक गोष्टी ॥
बुझावीतों तुज धरुनि हनूवटी ॥ तूजवीणे दाटला प्राण कंठीं ॥ १५ ॥
फीर मागें देईन एक गांव ॥ ध्रूव बोले देईल देवराव ॥
पांच गांव दीधले फीर आतां ॥ ध्रूव बोले मागेन जगन्नाथा ॥ १६ ॥
राय बोले देईन एक देश ॥ ध्रूव बोले देईल जगदीश ॥
अर्ध राज्य दीधलें आण तुझी ॥ ध्रूव बोले देवासि लाज माझी ॥ १७ ॥
सर्व राज्य दीधलें फीर मागें ॥ ध्रूव बोले देईजे रमा-रंगें[3] ॥
स्नेह कां रे सांडिला ध्रुवा आजी ॥ काळतोंडा जाहलों जगामाजी॥ १८॥
ध्रूव बोले पितयास तात देवा ॥ अतां येतों मी लोभ असों द्यावा ॥
हरी-भक्तीचा लोभ कसा देहीं ॥ अनूतापें कोंदल्या दिशा दाही ॥१९॥
सर्व भावें उभवूनि दोन बाही ॥ म्हणे देवा भेट दे लवलाहीं ॥
निरंजनी जावोनि उभा राहे ॥ शोक आक्रोशें करूनिया बाहे ॥ २० ॥
दुरूनीया अष्टाक्ष-सुता[4] पाहे ॥ तया दृष्टी[5] सायुज्य-पदा[6] लाहे ॥
जवळ येऊनी पुसे बाळका जी ॥ सान वय तूं कोण ह्या वनामाजी॥२१॥

---

१ दर्शन. २ ममतेच्या योगानें. ३ लक्ष्मीला रंजविणारा विष्णु त्यानें. ४ आठ आहेत अक्ष (डोळे) ज्याला असा जो ब्रह्मदेव त्याच्या सुताला म्ह० नारदाला. ५ नारदाच्या दर्शनानें. ६ मोक्षाला.

पूर्व वृत्तांत सांगे नारदासी ॥ आयकोनी तोषला देव-ऋषी ॥
गुरुमंत्रावांचोनि देव कैंचा ॥ श्रुती सान्या बोलती अशी वाचा ॥२२॥
सकल मंत्रांमाझारि मुख्य साचा ॥ मंत्रराज द्वादशा अक्षरांचा ॥
ध्रुया कार्नी सांगूनि मुनी गेला ॥ जपतांची तो त्द्दयिं प्रगटला ॥ २३ ॥
चतुर्भुज सायुध घन-नीला ॥ तया दृष्टी सन्मूख उभा ठेला ॥
दिव्य रूपा त्या ध्रुवें देखियेलें ॥ नमस्कारोनी मनीं पूजियेलें ॥ २४ ॥
देव बोले तूं काय इच्छितोसी ॥ धराधीश कीं स्वर्ग-भोगवासी ॥
ध्रुव बोले मज भक्ति सदा देई ॥ पद न दीजे, [1] ऊठवी दुजी आई॥ २५ ॥
ध्रुव यानीं तो वाहुनिया नेला ॥ ध्रुव-स्थानीं [2] तो अढळ बैसवीला ॥
चंद्र सूर्य नक्षत्र ग्रह तारा॥ सप्त-ऋषिही घालती ज्यास फेरा ॥ २६ ॥
ध्रुवाख्यान ऐकती गाति वाचे ॥ ध्रुवासनींही अढळ वास त्यांचे ॥
चिंतामणी गावोनि गुण साचे ॥ सौख्य पावोनी हरी-पदीं नाचे ॥२७॥

---

# प्रभाकर.

**लावणी-लक्ष्मी-पार्वती-संवाद** ( हा विनोदपर आहे )

लक्षुमि गर्व निंदा बोलुनि झिडकारिति पार्वती [4] ॥
अहे ठाउक पुरुषार्थ तुझा तुज प्रीय असो पशु-पती [5] ॥ ध्रु० ॥
स्मशानवासी भुषण भयंकर पिंगट मुकुटीं जटा ॥
भाळ-चंद्र ज्या तीन नेत्र भस्माचा कपाळीं पटा ॥
व्याघ्रांबर गज-चर्मांबर [6] परिधान शुद्ध कानफाटा [7] ॥
रुंडमाळा [8] तो कंठीं कुंडलें भुजंग हळती [9] कटीं [10] ॥
त्रिशूळ पाणी त्रिपुंड्र भाळीं लोह-कंकण मणगटा ॥
नंदी-वहन सर्पाचा सदोदित करि कमरे लंगूटा ॥

---

१ मला त्वां राज्यादि पद देऊं नये. २ अचळ पदावर. ३ ह्या अख्यानांत तर ऱ्हस्वदीर्घांच्या यथायोग्य प्रयोगाकडे कवीनें मुळींच लक्ष्य दिलें नाहीं. ४ पार्वतीला. ५ शिव. पक्षीं, मोठा पशु. ६ हत्तीच्या कातड्याचें वस्त्र. ७ कानफाटा गोसावी. ८ शरीरापासून तुटलेल्या मस्तकांची माळा. ९ हालती. १० गालांवर.

कसा अवडतो शंकर गिरिजे सांग तुला मंजमती ॥<br>
लक्ष जन्मिचें पातक म्हणवुनि पडलिस ऐशा हतीं ॥ १ ॥ ल०<br>
भोळा माझा सांब लक्ष्मी उगाच निंदू नको ॥<br>
अनाद्यंत ज्या अ-गम्य सुख तें अ-लभ्य ब्रह्मादिका ॥<br>
सोळा सहस्र शत एक मुख्य तुम्हि आठ जणी नायिका ॥<br>
कार्यवादु[1] तो कृष्ण कसा करि पूर्ण मनोरथ सखा ॥<br>
वक्रदंत शिशुपाळ कंसही कपटें मर्दुनि बका[2] ॥<br>
प्रताप बहु वर्णितां कशा भाळल्यात गो-रक्षका[3] ॥<br>
जरासंध-रिपु-भयें वसवली जळांत द्वारावती ॥<br>
तस्करास कसा श्वशूर जडला हा भीमक भू-पती ॥<br>
मच्छ कूर्म हा सूकर झाला सिंह वामन श्री-पती ॥<br>
जन्म गेला पहा अशाखालिं म्हणे लक्ष्मीला पार्वती ॥ २ ॥ ल०<br>
भुतें पिशाचें यक्ष ब्रह्म-राक्षस हे ज्याचे दूत ॥<br>
श्वान सभोतें मिळवुनि संगें फिरे भीक मागत ॥<br>
भुंभुं वाजवि शंख मुखानें चिता-भस्म लावि नीत[4] ॥<br>
शूर्प-कर्ण[5] षण्मुख जयाचे नवल-परीचे[6] सूत ॥<br>
मना गमे तिथे निद्रा करितो ज़िवंत पहातां भूत ॥<br>
हिमालयाचें थोर असें प्रारब्ध पाहुन विस्मित ॥<br>
धन्य तुझी पार्वती अशाची राखितेस चित-वृत्ती ॥<br>
दैव-दशा भर्तार तामसी कठीण ते तव गती ॥<br>
लक्ष्मि गर्वें निंदा बोलुनि झिडकारिति पार्वती ॥<br>
अहे ठाउक पुरुषार्थ तुझा तुज प्रीय असो पशु-पती ॥ ३ ॥<br>
अनंत घेतो जन्म तुझा पति क्षीर-समुद्रामधीं ॥<br>
शेषाकर निद्रिस्त नाभिवर चारमुखाचा विधी ॥<br>
वहन विहंगम दिलें सुदर्शन करुन शंकरें अधीं ॥<br>
सुरासुरीं तुजसाठिं मथिला पराक्रमें जल-निधी ॥<br>
इच्छा करितो प्राणिमात्र तूं चंचळ, नाहिस सुधी[7] ॥

---

१ केवल स्वहित साधणारा. २ बकासुरास. ३ गुरें राख्याला. ४ नित्य. ५ सुपासारिखे आहेत कान ज्याचे असा गणपति. ६ विलक्षण प्रकारचे. ७ सरळस्वभावाची नाहींस.

शंख सुहोदर तुझा लक्षुमी श्रीमंत झालिस कधीं ॥
कृपा-निधी हा सांब वसे अर्धांगि मी त्याची सती ॥
लिला तयाची विचित्र भासे विदीत सर्वांमती ॥
मत्स्य कूर्म हा सूकर झाला सिंह वामन श्रीपती ॥
जन्म गेला पहा अशाखालिं म्हणे लक्ष्मीला पार्वती ॥ ४ ॥ ल०
तप-सामर्थ्यें करूनि शिवाला भस्मासुरें जिंकिलें ॥
धरुनि तुला पार्वती त्वरेनें स्कंधावर वाहिलें ॥
लपुं लागला सांब तेव्हां मम पतीस पाचारिलें ॥
मोहनीरूप प्रत्यक्ष धरुनी त्या राक्षसास मारिलें ॥
गजेंद्र करितां धांवा नक्रासह त्या उद्धारिलें ॥
सुधन्व्यास तैलामधिं तळतां तैल थंड जाहलें ॥
अशी घालितो उडी संकटीं बघ माझा श्री-पती ॥
कोमलांग राजीव-नेत्र नव्हे शिवासारखा जैती ॥
लक्षुमि गर्वे निंदा बोलुनि झिडकारिति पार्वती ॥
अहे ठाउक पुरुषार्थ तुझा तुज प्रीय असो पशुपती ॥ ५ ॥ ल०
नको सांगु बडिवार रिकामा लक्षुमि नानापरी ॥
नंदाचीं गोधनें चारिलिं कुंजवनाभीतरी ॥
मुखांत घालुनि वेणू वाजवुनि मोहित करि सुंदरी ॥
गवळ्याचें उच्छिष्ट भक्षिलें नव्हे निर्मळ श्री-हरी ॥
श्याम-वर्ण सर्वांग, खोंवितो मयूर-पिच्छें शिरीं ॥
नवनित-चोरें कसें मर्दन केलें दैत्याचें तरी ॥

---

१ देवांनीं समुद्रमंथन करून १४ रत्नें काढिलीं, त्यांपैकीं 'लक्ष्मी 'व' शंख' हीं आहेत; म्हणून शंखाला तिचा सहोदर म्ह० सखाभाऊ म्हटलें आहे. २ धर्मानें अश्वमेधयज्ञानिमित्त सोडलेला वारू हंसध्वज राजा (सुधन्व्याचा बाप) ह्यानें धरिला, व त्याच्या संरक्षणार्थ आलेल्या पांडवसैन्याशीं लढावयाकरितां आपल्या सर्व लोकांस, (कोणी आज्ञाभंग केल्यास कढत तेलांत त्यास तळूं असें भय घालून,) ताकीद दिली; तथापि त्याचा मुलगा सुधन्वा हा लढावयास आला नाहीं; ह्यामुळें राजानें त्यास तापलेल्या तेलांत टाकिलें, तेव्हां तो मुलगा परम कृष्णभक्त होता, म्हणून तें तेल थंड झालें. अशी कथा आहे. ३ यति.

लग्न लाविलें बसून रिसाशीं, कुब्जा होती दुती ॥
किती एकक गुण सांगु ऐकतां दुःखित होशिल चित्तीं ॥
मत्स्य कूर्म हा सूकर सिंह वामन श्री-पती ॥
जन्म गेला पहा अशाखालिं म्हणे लक्ष्मीला पार्वती ॥ ६ ॥ ल०
अनंत कोटि ब्रह्मांड निर्मिता जगांत जगवेगळा ॥
चार वेद सा शास्त्रें धुंडितां कुंठित झाल्या कळा[3] ॥
निराकार निर्गुण स-गुण मी पाहुनि पडलें गळां ॥
जन्मोजन्मिं हा असो पती मज घन-श्याम सांवळा ॥
परम सु-शिल निष्कलंक वानिं उद्धारलि अहल्या शिळा ॥
नाम-स्मरणें शीतळ झाला सांब-देह सागळा[4] ॥
मुकुट-मणी वैकुंठ पीठ ज्या अमर सदां वंदिती ॥
प्राप्त व्हावे हे चरण म्हणुनि किति समाधिस्थ बैसती ॥
लक्षुमि गर्वें निंदा बोलुनि झिडकारिति पार्वती ॥
अहे ठाउक पुरुषार्थ तुझा तुज सोय असो पशु-पती ॥ ७ ॥ ल०
ताड-पत्र शृंगार म्हणुनि ग्यां छळिलें जइं शंकरा ॥
प्रसन्न झाला महेश मज समजावी घेउनि करा ॥
शृंगाराचे पर्वत पडले अमोल एकक हिरा ॥
कुबेराची संपदा तुळेना अहारे विश्वेश्वरा ॥
एकरूप शिव विष्णू लक्ष्मी गौरी एक स्मरा ॥
लय लावुनि एकाग्र भजावें मृत्युंजय-श्रीधरा ॥
लक्ष्मीपार्वतिचा संवाद ऐसा गोड हा खरा ॥
भक्तिपुरस्सर जपुनि करावें प्रसन्न नित[5] हरि-हरा ॥

---

१ जांबवान् नांवाच्या अस्वलाची जांबवती कन्या कृष्णानें वरिली; त्या गोष्टीस अनुलक्षून हें लिहिलें आहे. २ कुब्जा ह्या नांवाची अंगानें तीन ठिकाणीं वाकडी अशी कंसाची एक दासी होती; तिचें काम उत्तम चंदनाची उटी तयार करण्याचें होतें. कृष्ण व बळराम ह्यांस कंसानें गोकुळांतून आणविलें असतां ते मधुरेंत रस्त्यांतून चालले, तेव्हां त्यांस पाहून कुब्जेनें त्यांच्या आंगांस गंधाची उटी लाविली. मग कृष्णानें तिची हनुवटी हातानें धरून व पायावर पाय देऊन तिला सरळ केलें, आणि तिच्यावर कृपा केली; अशी कथा आहे. ३ चौसष्ट कला. ४ समग्र. ५ नित्य.

महादेव गुणि सांब-हरीच्या चरणांबुजिं लोळती ॥
प्रभाकराच्या कवना गुणि-जन हेत धरुनि धांवती ॥ ८ ॥ ल०

---

# आनंदतनय.

## श्लोक-मार्कंडेयाख्यान.

मृकंडुऋषीस पुत्र नव्हता, म्हणून त्याचे स्त्रीनें तुम्ही शिव प्रसन्न करून घेऊन त्यापाशीं पुत्र मागा असें त्यास सांगितलें. त्याप्रमाणें त्यानें पुत्र मागितला; पण शिव म्हणाला कीं एक १६ वर्षें आयुष्याचा पण सुंदर व शाहाणा आणि दुसरा १०० वर्षें आयुष्याचा पण कुरूप आणि मूर्ख अशा दोन पुत्रांपैकीं जो तुला आवडेल तो तूं घे. मृकंडूनें पहिल्या प्रकारचाच मागितल्यावरून शिवानें तो दिला. पुढें १६ वर्षें भरण्याचे सुमारास आईबापांस फार वाईट वाटूं लागलें; तेव्हां मार्कंडेय (मृकंडुपुत्र), भिऊं नका, मी शिव प्रसन्न करून घेतों म्हणजे मला भय नाहीं, असें सांगून शिवपूजेस लागला. पुढें शिव प्रसन्न होऊन त्यानें मार्कंडेयाचे अंतसमयीं आलेल्या यमास लाथ मारून पाडून मार्कंडेयास चिरंजीव केलें. ही कथा ह्या आख्यानांत वर्णिली आहे.

मालिनी वृ० शिव हर मृड शंभो छंद जैं लागला हो ॥
सुर-वर वरला हो सर्व-सौभाग्य-लाहो ॥
असि सुरस कथा हे वर्णिलीसे पुराणीं ॥
अजि तुम्हि परिसा हो, पूर्ण होती शिराणी ॥ १ ॥

शार्दूल वि० पूर्वीं एक मृकंडु-नामक मुनी सत्कर्म-धर्मार्थिला ॥
कांतेनें प्रिय कांत तो प्रियपणें पुत्रार्थ हो प्रार्थिला ॥
संतानाविण हें जिणें जड जगीं संसार निःसारसा ॥
भासे, यास्तव हो स्तवा पशु-पती मागा कुळोद्धारसा ॥२॥

---

१ ह्या पदाचा संबंध सांब व हरी ह्यांकडे आहे. २ प्राप्त करून घेतला. ३ लाभ. ४ इच्छा. ५ सत्कर्म (सदाचार) व सद्धर्म ह्यांविषयीं अर्थिला म्ह० गरजू म्ह० आस्था बाळगणारा. ६ प्रेमपुरःसर. ७ जिवंत असणें हे जड (असून नसल्यासारिखें). ८ निरर्थक. ९ शिव. १० कुळाचा उद्धार करील असा.

वसंत ति० जाणोन त्वद्व्रत तिचें मुनि-राज-राजें ॥
हे,मी सुखी करिन् फार सुतातुरा जे ॥
तो आचरे गिरि-दरींत[1] महा-तपातें ॥
सोसूनिया कठिण-वात-हिमातपातें ॥ ३ ॥
ध्यानीं बसे मुनि उदार-सदा-शिवाचे ॥
पंचाक्षरि[2]-प्रमुख मंत्र जपोनि वाचे ॥
ऐसें पुरश्चरण[3] संचित फार झालें ॥
शेवीं[4] तयासि निज-पुण्य फळासि आलें ॥ ४ ॥
झाला प्रसन्न मुनि-मान्य पिनाक-पाणी ॥
बा रे अभीष्ट वर माग म्हणे सु-वाणी ॥
मी तो विरक्त, विभवादि नको, परंतु ॥
संतान एक मज दे कुळ-हेतु[5]-तंतु ॥ ५ ॥
त्यानंतरें शिव सनातन कर्म-साक्षी ॥
बोले सखोल तनु अर्ध जया मृगाक्षी ॥
देईन दान परि एक विधा[6] न भासे ॥
तूं ऐक, माग मग, लाग विवेक-कासे ॥ ६ ॥

शार्दूल वि० साधू सुंदर शाहणा सुत तया सोळाच वर्षें मिती ॥
जो का मूढ कुरूप तो शत वरी वर्षें असे स्व-स्थिती ॥
या दोहींत कसा मनांत रुचला तो म्यां तुतें दीधला ॥
झाला थोर तटस्थ ऐकुनि मुनी दोहींकडे वेधला ॥ ७ ॥

द्रुतवि० मग म्हणे मुनि-राज कृपा-निधी॥घरिं विचारुन येइन आवधि॥
निज-वधूसि कसा सुत मानला॥पुसुन येइन सांब शिवा भला॥८

मालिनी. त्वरित-गति निघाला शीघ्र सद्माशि आला ॥
प्रिय-वधुसि वराला सांगता सांग झाला ॥
मग सति पद माथा वंदुनी प्राण-नाथा ॥
कथि न सुरस गाथा सर्व संसार-वाथा ॥ ९ ॥

शार्दूल वि० मोठे रुक्ष वि-मूढ रूप-रहित प्राणाविणें राहती ॥
ते पाषाण धरेसि जाण जड कीं कल्पांतही पाहती ॥

---

१ पर्वताच्या गुहेंत. २ नमः शिवाय हा मंत्र. ३ मंत्रजप. ४ शेवटीं.
५ वंशस्थितीचें बीज. ६ प्रकार.

लोकीं गकिंति घूक काक बक ते दीर्घायुषी सांग ते ॥
ऐसा पुत्र नको नको प्रियतमा पायांस मी लागतें ॥ १० ॥
मूर्खांचें वय दुःखदायक जगीं माता-पित्यांचीं मुखें ॥
या लोकीं उजळीं कदापि नव्हती, चित्तास कैचीं सुखें ॥
तो भू-भार विकार-कारण[1] कंडा, सांगावया भागतें ॥
ऐसा पुत्र नको नको प्रियतमा पायांस मी लागतें ॥ ११ ॥
सारासार-विचार-पंडित महा-चातुर्य-चिंतामणी ॥
विद्या-वेद-विनोद-वाद-बुधता-वेदांत-बोधा धणी ॥
रूपें सुंदर देह दिव्य धरिला थोड्या वयाचा जरी ॥
वंशोत्तंस अभंग-मंगळ-निधी कल्याणकारी तरी ॥ १२ ॥

वसंतति० धीमंत तो करि सु-कर्म निज-स्वभावें ॥
कर्में स्व-धर्म उजळेल गुण-स्वभावें ॥
धर्मेंच धर्म समजेल, तदा भवारी ॥
तुष्टेल इष्टद सदा-शिव कष्ट वारी ॥ १३ ॥

शार्दूल वि० आकर्णोनि सुपर्णसा पुनरपी पूर्व-स्थळा पातला ॥
साष्टांग-प्रणिपात त्या मुनि-वरें पादांबुजीं घातला ॥
दे देवा मज पुत्र सुंदर मला ज्ञाता सुत्दत्ताप[2]-हा ॥
गौरी-नाथ तथास्तु बोलुनि निज-स्थानासि गेला पहा॥१४॥

स्वागता. आश्रमीं मग मुनी प्रमदेशीं ॥
नांदतां गिरि-गुहांतर-देशीं ॥
गर्भ-चिन्ह धरिलें पति पाहे ॥
तो म्हणे मुनि महेश-कृपा हे ॥ १५ ॥

शार्दूल वि० या रीती नव मास पूर्ण भरतां सत्पुत्र झाला भला॥
तोषावेशविशेषसा[3] मुनि-वरा संसार त्या भासला ॥
पाहे पुत्र-मुखास, अंतर-सुखा लेखा नसे, माय ते ॥
ब्रह्मांडीं न समाय पुत्र-विभवें; सांगों कथा काय ते ॥१६
मार्कंडेय अशी मृकुंडु-मुनिनें नामाभिधा ठेविली ॥
वाढे बाळक बोबडें जंव वदे ते वाक्-सुधा सेविली ॥

---

[1] पतनास कारण. [2] स्वजनांचें दुःख निवारणारा. [3] अतिशय आनंद ज्यामध्यें आहे असा (हें 'संसार' याचें विशेषण).

झाले वत्सर पांच, योग्य म्हणुनी केला द्विजौतो[1] भला ॥
झाला धर्म-निधान तो गुरु-कुळीं विद्या भली लाधला॥१७॥
तर्क-व्याकरणादि-नाटक-कळालंकार-शास्त्रांतरीं ॥
ज्याचा खेळ अशी विशाळ झळके प्रज्ञा-प्रभा[2] अंतरीं ॥
लीलाप्राय समस्त प्राकृत-कथा, वेदांत-सिद्धांत ते ॥
हातीं आमलकासमान डुलती, सांगों किती काय तें ॥१८॥

यूथिका यापरी पुरवितां शिव डोहळे ॥
भोगिती सरस ते सुख-सोहळे ॥
लोटतां पळ घटी दिन काळ जी ॥
लागली उभयतांसहि काळजी ॥ १९ ॥

वसंत वर्षांवरी स्व-सुख वर्षत वर्ष जातां ॥
ति० चिंता तशी तशी उठे बहु हर्ष-जाता ॥
माता पिता उभयतां भय-ताप-संगें ॥
संतप्त गुप्त रुदती बहुता प्रसंगें ॥ २० ॥
हा संकटा कटकटा विकटा[3] कपाळा[3] ॥
कां दीधला सुत मला सुर-लोक-पाळा ॥
होतों सुखी न गणितांचि अशा भयातें ॥
दैवा फुटे त्दृदय आठवितां वयातें ॥ २१ ॥

शालिनी. मार्कंडेयाकारणें माय-बापें॥झालीं दीनें शोषिलीं शोक-तापें॥
वर्षे गेलीं पंधरा आजि याला॥एका वर्षा केविं देखों तयाला॥२२॥

द्रुतवि० धरिल धाक मनीं वदतां तया ॥ बहुत मानिल हा रुदतां भया ॥
म्हणुनि ना रुदती वदती भिती॥उभयतां सहज-स्थिति दाविती॥२३॥

उपजा० परंतु तें दुःख मनीं न झांके ॥ सर्वेंद्रियां शोक-समुद्र फांके ॥
येती बळें लोचनिं बाष्प-धारा॥या इंगितें जाणविलें कुमारा॥२४

सवाई. जोडुनि हात वदे मृदु मात, कशास मनांत विखेद करां ॥
काय उणें पडलें मजपासुनि, पाय नमी विनवी पितरां ॥
कंठ सगद्गद बोलति ते शितिकंठ-वरें दिधलासि बरा ॥
संकट घालुनि शंकर दे वर, शंकतसों सकळंक[4]-वरा ॥ २५ ॥

---

१ मुंज केली. २ बुद्धीचें तेज. ३ दुर्दैवा. ४ सांबानें जो वर दिला तो सकलंक म्ह० संकटाचा आहे म्हणून अशा वराला.

कां उगली न वसोंचि घरीं ? न वसोनि शिवा सुत देइं म्हणों ॥
पुण्य-तपेंचि वरेण्य[1] त्रिभूवर पुण्ये वदे, गति काय[2] जणों ॥
षोडश-वार्षिक पंडित कीं शत-वार्षिक मूर्ख मनास रुचे ॥
तो दिधला, वदतां बुध-भूषण मागितलेंचि असेंचि सुचे ॥ २६ ॥

काम रुदत होतिं त्याप्रति निरोपितां ॥ वदत यापरी माउली-पिता ॥
दावृ० शिव शिवा असा खेद कासया॥करितसां तुम्ही नाहिं नाश या[3]॥२७॥
शिव दयाळु जो दे सु-संतती ॥ भजति त्यांचिया रक्षितो तती ॥
अजि तयां उणी काय संपदा ॥ विनटतां पदा वारि आपदा ॥२८॥
भवनिं काननीं शोक-नाशका ॥ शरण गेलिया लोक-नायका ॥
अभय-दान दे तोचि साधका॥म्हणुनिया तया कायसा धका॥२९॥
निशि दिनीं भजा अंबिका-पती ॥ भजतया[4] कळीकाळ कांपती ॥
उभयतां विचारूनि मूल तो ॥ अभयते भजे आदिमूल[5] तो ॥ ३० ॥

वसंतति० पूजानुरक्त बहु भक्त विरक्त झाला ॥
चित्तीं जपे सतत सांब-पदांबुजाला ॥
मृत्युंजयाविण जगीं भय कोण नाशी ॥
निर्धार ह्या समजुनी नियमो मनाशी ॥ ३१ ॥

मालिनी० जपत तपत ऐसा तो करी तीर्थ-यात्रा ॥
धवल शुभ विभूती लाउनी सर्व गात्रा ॥
स्फटिक-मणि-गणाच्या आणि रौद्राक्ष माळा ॥
करिं शिरिं निज-कंठीं नित्य घाली सुढाळा ॥ ३२ ॥

सवा-पंडित थोर मृकंडु-कुमार अखंड शिवार्चनिं मंडित झाला ॥
ई० हिंडत हिंडत चंड-महेश-कवेर[6]-सुता-तटिनीप्रति आला ॥
त्याच दिनीं यमगंड[7] मनीं समजोनि मुनि प्रभु-पार्थिव[8] पाणी ॥
पूजितसे तिळ-तंदुळ-बेल-फुलें शिव शंकर गर्जत वाणी ॥ ३३ ॥

चूर्णिका. श्री-शंकर-पद-पंकज-भजनांकितांमाजि अग्रेसरें ॥

---

१ श्रेष्ठ. २ चांगलें ( पुत्र दिला म्हणून जें बोलणें तें ) पण पुढें त्याची गति काय होणार कोणास ठाऊक. ३ ह्या मला. ४ भजणाऱ्याला. ५ जगताचें आदि कारण शिव. ६ चंडमहेशाचें देऊळ जिचे काठीं होतें अशी कावेरी नदी. ७ मरणकाळ. ८ पार्थिवलिंग.

मृकंडु-तपोधनाचिया कुमरें ॥
देह-गेह-मोह त्यजुनि एकसरें ॥
सर्व विषय विषासम मानुनि विरागावसरें ॥
भक्तीचेनी प्रसरें ॥ श्रीचंद्र-चूड-चरण-नलिन-
ध्यानाविना नाठवोनि दुसरें ॥
दंड-धर-प्रचंड-भय मानुनी षोडश-वर्षांतिक गंड ॥
समजोनी तांडव-युक्त अखंड॥ आराधना आरंभिली ॥३४॥
मंदाकिनी-जळ-तिळ-तंदुळ-बिल्व-दळीं ॥
मंदार-करवीर-इंदीवर-बकुळीं ॥
श्रीचंदन-केशर-कस्तूरिकादि-परिमळीं ॥
भक्तांमाजी परम-बळी ॥ पूजि शांभव लिंग ॥
मानसीं योजी घोर अभंग ॥ गर्जत नामें नोट निसंग ॥
शंभू देव शंकर मंगळप्रद असो ॥ ३५ ॥
ऐसीये अवसरीं चिन्मय-ध्यानीं तन्मय होउनि ॥
बैसला मुनि-राज-केसरी ॥
तंव जाणुनि आयुष्यावसान-वारी[1] ॥
जैसें गिरीहुनि उतरे महा-प्रवाह-वारी[2] ॥
तैसे हाकित टाकित गर्जत आले दूत अचाट ॥
दुर्धर जैसे घोर पिसाट ॥ पाहति पूजा-पूर्तिचि वाट ॥
तों मुनि झाला शंकर-भाट ॥
वर्णित हा जी मुनि-जन-काजीं[3] मानस द्या जी मी भयवाजी[4]॥
येउनि प्रार्थितों हर हरा ॥ निज-निटिल-निर्गत
ज्वलन-ज्वाला-भस्मीकृत-स्मरा ॥ गौरी-हरा
तांडवावसान[5] तूं जटा-धरा ॥ प्रणता-र्ति-हरा[6]
पाहि मां पाहि मां शंभो ॥ ३६ ॥

स्वागता. आठवोनिं विपदां[7] शिव पूजी॥अर्पूनी शिव-पदांशि वपू जी॥
आदरीच परमा नियमातें॥जो मनांत पर मानि यमातें ॥३७॥

---

१ बेल. २ उदक. ३ मुनिजनाच्या कार्यीं. ४ भयच आहे वाजी ( घोडा ) ज्याला असा म्ह० भयानें सत्वर शरण आलेला असा मी. ५ नृत्यकलेची जो परम सीमाच आहे असा. ६ नम्र झालेल्यांची पीडा दूर करणाऱ्या. ७ विपत्ती.

शार्दूवि० ह्रत्पद्मीं शिव-पाद-पद्म धरुनी पद्मासनीं बैसला ॥
जैसा पद्मज पद्म पाणि-युगलीं प्रार्थी तसा भासला ॥
त्या काळीं विकराळ सेवक यथाकाळीं मुनींद्रावरी ॥
काळें पाठविले बळें क्षिति-तळीं त्यां कोण पां आवरी ॥३८॥
आले गर्जत खड्ग-खेटक-गदा-पाणी दणाणी धरा ॥
हातीं झेलित वागुरा निगदिती ओढा विदारा धरा ॥
धांवा घेत उफाळती, द्विजवरा ते लक्षिती लोचनीं ॥
तों भ्याले शिव-मूर्ति देखुनि दिठी ध्यानीं जगन्मोहिनी ॥३९॥
द्रुतवि० दचकती चकती धृति सांडिती ॥ प्रबळ ते बळ तेथ न मांडिती॥
रय-मदा यम-दास विरामिती॥मग मनीं गमनीं धरिती मती॥४०॥
वसंतति० पूजा-समाप्ति-समयीं दृढ-दीर्घ-पाशीं ॥
बोढूं म्हणोनि यम-हेर उभेच पाशीं ॥
हें धर्म-मर्म जंव जाणवलें द्विजाला ॥
तों तो सदाशिव-पदांबुजि सज्ज झाला ॥ ४१ ॥
भ्याले असें समजुनी शिव-पूजनातें ॥
लेखीच ना मुनि मनांत रिपू-जनातें ॥
वाचेंशि नाम जपतां शिव-शंकराचें ॥
सामर्थ्य लेश न चले यम-किंकरांचें ॥ ४२ ॥
सवाई. देखुनि दंग मुनींद्र अभंगचि, जाति विहंग तसे यम धामा ॥
चॅंार समस्त विचार निवेदिति फार हटेंचि जपे शिव-नामा ॥
पार्थिव चंड करींच अखंड भजे, कळभंड तनू स्थिर दावी ॥
बोलुनि यापरि ते नमिती करिं यावरि चाकरि काय करावी ४३
रथोद्धता. ऐकतांचि यम रुष्ट जाहला ॥ सेवकांप्रति म्हणे सजा, हला ॥

---

१ आसन मांडी घालून. २ ब्रह्मदेव. ३ हातांत कमल घेऊन आणि दोन्ही हात जोडून. ४ प्रार्थना करतो. पूर्वी एकदां शिवाचा अंत लावण्यासाठीं ब्रह्मदेव वरतो आणि विष्णु खालती असे गेले होते. तेव्हां ब्रह्मदेवाला शोध लागला नसतां शोध लागला असें त्यानें खोटें सांगितलें; म्हणून शिवानें "तूं अपूज्य" होशील असा ब्रह्मदेवाला शाप दिला (त्यावरून आतां पृथ्वीवर ब्रह्मदेवाला कोणी पूजीत नाहीं) त्यावेळीं ब्रह्मदेवानें शिवाची हात जोडून प्रार्थना केली अशी कथा आहे. ५ दणाणली. ६ मार्कंडेयाची दृष्टि व ध्यान हीं शिवमूर्तीकडे लागलीं आहेत असें पाहून भ्याले. ७ हेर. ८ गोसाव्यांतील एक भेद आहे. ९ रेड्याला.

आजि सिद्ध करणें द्विजा हॅला[1]॥ हें प्रयोजन विना न जाहल्या॥ ४४

अश्व-धाटीछं०.

झाला स-कोप पर जाला[2] मुठाळुनि[3] भुजालागिच थापटि करें ॥
घालो द्विजावरिच घालावया यम निघाला स-वेग निकरें ॥
पाला[4] समर्पित कृपाला[5] म्हणूनि तंव पालाणुनी[6] निज-हॅला[7] ॥
आला मुनीजवळि आलांपितांचि[8] जाळें आलाबुसा[9] उसळला ४५

शार्दूल-वि०

क्रोधें काळ उफाळला भुज-बळें जाळें झुगारी गळां ॥
तों झांकोनि दिठी शिवाप्रति मिठी मारी मुनी आगळा ॥
लिंगाही समवेत पाश जडतां हांकारिलें ब्राह्मणें ॥
शंभो शंकर धूर्जटे पुरहरा आतां नुपेक्षीं म्हणे ॥ ४६ ॥
भूताधीश्वर भक्त-वत्सल भवाराती भवानी-पती ॥
भोळा शंकर दिव्य तो प्रकटतां दिग्पाळ त्या कांपती ॥
लिंगापासुनि धिंगं[10] पिंगट जटा प्रोत्तुंग बाहू करीं ॥
ढक्का शूल कपाल सायक करी हांसोनि रोषोत्करीं[11] ॥ ४७ ॥

चूर्णिका.

ऐसी ऐकूनि दीनवाणी श्रीमत्पिनाक-पाणी ॥
लिंगापासुनि धिंग भीम-शंकर दुष्कर[12] पिंग-
टाक्ष उठावे कोटि-पतंग-सोज्वळ अंगीं तुंग भुजंग ॥
माथां तरंगति गंगा-तरंग, हस्तकिं नाचति दिव्य कुरंग ॥
तेणें देखुनि यम तृण लेखुनि पदें वक्षःस्थळावरि ताडिला ॥
वसुंधरेवरि पाडिला, आल्हादूनि देवें ॥
नृसिंहें प्रल्हादापरी रक्षिला ॥
तंव तो मार्कंडेय जयजय शब्दें उदेला[13] ॥
त्रिवार चिरंजीव म्हणुनी संबोधिला ॥
आनंद-नंदनें[14] नित्यानंदें भरोनि वारंवार ॥
शिव-पद-पंकजें वंदिलीं ॥ ४८ ॥

---

१ हला ( रेडा ) आजि सिद्ध करणें ( करा ) द्विजा ( वर ) हला ( हल्ला ) जाहल्याविना हें प्रयोजन ( कार्य ) न ( होणार नाहीं ). २ जाळयाला. ३ हातीं धरून. ४ बिल्वपत्रें. ५ शिवाला. ६ सोगीर घालून. ७ आपल्या रेड्याला. ८ बोलतां बोलतां-अतित्वरेनें. ९ भोपळ्याप्रमाणें. १० धिप्पाड ११ अतिक्रोधानें. १२ दुर्धर. १३ उठला. १४ आनंदतनयानें; हें ह्या आख्यानाच्या कवीचें नांव.

मालिनी.

निरखुनिं यम डोळां मारिली लात देवें ॥
क्षण न लगत भूमी पाडिला वामदेवें ॥
सुर-वर सुमनांचे वर्षती भार भारी ॥
मुनि नमुनि उभा तो धीट जैसा इभारी[1] ॥ ४९ ॥

त्वरित-गति पळाले दूत दाही दिशांला ॥
म्हणति मनिं अशाची व्यर्थ सेवा कशाला ॥
मग नग-पति-कन्या-मान्य धन्या प्रभूतें[2] ॥
स्तवुनि निरखितो तैं सूत[3] देव-प्रभूतें ॥ ५० ॥

शिखरिणी.

मृकंडूच्या बाळा धरि त्वदयिं काळांतक करें ॥
म्हणे बारे वत्सा भजन जळ मत्स्या न विसरें ॥
जनामध्यें कांहीं भय लय कदाही तुज नसो ॥
चिरंजीवी होईं त्वदयिं विष-बाधा तुज नसो ॥ ५१ ॥

चिरंजीवी केला स्व-शरण मुनी काळ दमुनी ॥
तदा आले ब्रह्मादिक सुर उभे पाय नमुनी ॥
मुखें नाना रीती स्तवुनि करिती ते विनवणी ॥
महादेवा तूंतें विहित न दिसे सांग करणी[4] ? ॥ ५२ ॥

प्रभो तूझे आज्ञेविरहित नसे दंड धरिला ॥
तसा तो[5] ही ऐसा प्रहरुनि हरा मान हरिला ॥
क्षमा कीजे देवा करि पद-सु-सेवा विधि वदे ॥
तयातें संरक्षीं स-करुण निरीक्षीं अ-भय दे ॥ ५३ ॥

मुला मार्कंडेया तव नियम सोळाचि वरुषें ॥
यथाकाळीं काळें म्हणुनि उभिले पाश सरिसे ॥
म्हणे याचा नाहीं अणु भरिही अन्याय अगती[6] ॥
तुवां ऐसें केलें तरि वदतसे लोक जगतीं ॥ ५४ ॥

मालिनी.

परिसुनि सुर-वाणी तुष्टला शूल-पाणी ॥
वदत मधुर वाणी नित्य आनंद-खाणी ॥
शिव-भजन करीती जे जगीं एकें[7]-रीती ॥
विषयि[8] विषय-भीती त्यां नसे काळ-भीती ॥ ५५ ॥

---

१ सिंह. २ प्रभूत-पुष्कळ. ३ स्तुतिपाठक ( मार्कंडेय ). ४ यमाचें कृत्य. ५ यम. ६ निरुपाय. ७ एकनिष्ठेनें. ८ विषयासक्त असले तरी.

शा० वि० वर्षे षोडश हाचि निश्चय खरा मिथ्या नव्हे मद्गिरा ॥
गेलीं कल्प-शतें तरी मुनि-वरा ऐसीच काया स्थिरा ॥
राहो नित्यपणें म्हणे तंव हरा वंदी सुरांचा फरा[2]॥
तेव्हां तो[3] नग-राज त्र्यंबक बरा वंदोनि गेला घर॥५६

शिखरिणी. मुनीतें बोले हो तदुपरि महादेव समजा ॥
न चाले आम्हांसीं भय यम करी काय गमजा ॥
त्वरें जाई बाळा बहुत रुदती तात-जननी ॥
तुझ्या नामाचा रे निशिदिनिं वसे शब्द[4] अननीं ॥ ५७ ॥

भुजंगप्र० वदोनी असें धाडिलें स्वाश्रमाला॥तया पाहतां नाश झाला श्रमाला
घरीं माय पोटीं तया बाळकासी॥मुखीं वर्णितो त्या जगत्पाळकासी॥५८
कसा वांचलासी मुला तूं अपायीं ॥ वदे तो शिवें वाचवीलें उपायीं
बहू सौख्य झालें मृकंडूसि पाहें॥मितीनें तया बाळकालींगि पाहे५९

शा० वि० ऐसें रक्षियलें तयासि समजा त्या शंकरें एकदा ॥
त्याचें नाम जपा निरंतर तुम्ही नेदी श्रमातें कदा ॥
ज्याची कीर्ति न वर्णवेचि सहसा त्या नारदा तुंबरा ॥
त्या आनंदसुत स्वयें हरि-हरा अर्जोनि[5] गर्जे बरा ॥६०॥

---

## श्लोक-उमा[*]-रमा-संवाद

शालिनी. एके काळीं पार्वती आणि पद्मा[6]॥सारी-पाटा खेळती चित्र-सद्मा[7]॥
डाई येतां बोलती लोक-धर्मा ॥ हांसोनीया काढिती वर्म-कर्मा॥१॥
कोठें भिक्षुक[8] सांग गे, बळि-गृहीं मागे भुमी-दान तो ॥
कोठें तो पशु[9]-पाळ, गोकुळिं असे वत्सें गुरें राखितो ॥
सर्पाधीश[10] कुठें असे वद सखे, निद्रिस्त शेषावरी ॥
कोठें सांग स्मशान[11]-वास करि तो, वृंदे[12] स्मशानीं वरी ॥२॥

---

१ सोळाव्या वर्षी असावयाची तशी. २ सुर-समुदाय. ३ कैलासपति (शंकर) ४ घोष. ५ प्राप्त करून घेऊन. * ह्या आख्यानांत ऱ्हस्वदीर्घ वगैरेच्या बऱ्याच चुका आढळतात. ६ लक्ष्मी. ७ चित्रांनीं सुशोभित केलेल्या गृहांत. ८ भिक्षा मागणारा-शिव. ९ पशुरक्षक-शिव. १० सर्पांचा स्वामी म्ह० पुष्कळ सर्प आंगावर बाळगणारा-शिव. ११ स्मशानवास-स्मशानांत राहणें. १२ वृंदेला:-वृंदा ही जालंधरनामक असुर होता त्याची स्त्री. ही मोठी पतिव्रता होती म्हणून तिचे पुण्यानें सुरासुरयुद्धांत जालंधराचा पराजय होत नसे. ह्यामुळें विष्णूस

इंद्राची अमरावती बळि बळें घे शुक्र-यज्ञादिकें ॥
तेव्हां श्री-हरि साह्य होउनि तया मागे महा कौतुकें ॥
दैत्यांच्या वचना जिणोनि सखये देवेंद्र तो रक्षिला ॥
भिक्षा मागुनि शंकरें नृपतिचा सत्पुत्र तो भक्षिला ॥ ३ ॥
ऐके गे सखये स्व-भक्त अपुला जाणोनिया निश्चयें ॥
त्यातें शोधुनि तुष्टला अतिशयें पुत्रासि देतां स्वयें ॥
स्त्री-पुत्रासमवेत नेउनि पदीं श्री-शंकरें स्थापिलें ॥
देतां मौउसिनें स्तनासि हरिनें जीवें कसें भक्षिलें ॥ ४ ॥
राक्षेसी पुतना स्तनीं विष भरी मारीन हे अंतरीं ॥
आणी ते शबरी कृपा बहु परी केली जई श्री-हरी ॥
नेली मोक्ष-पदा हरी विषमता नेणे कदां तो स्वयें ॥
पोटालागि नसे तरी शिव सखे घे वीष गे निश्चयें ॥ ५ ॥
क्षीराब्धी मथिला सुरासुर इहीं रत्नें तदा काढिलीं ॥
दिल्हीं उत्तम पाहुनी सकळिकां श्री-शंकरें त्या स्थळीं ॥
वांटी त्यासि नुरे उरे विष तया कोण्ही न घेती पहा ॥
अंगीकार करी म्हणोनि सखये कंठीं धरी शीव हा ॥ ६ ॥

---

संकट पडून जालंधर युद्धांत गुंतला असतां विष्णूनें जालंधराच्या रूपानें वृंदेच्या पातिव्रत्याचा भंग केला. ह्या पातकानें जालंधर युद्धांत मरण पावला. पुढें वृंदेला जेव्हां हें विष्णूचें कपट समजलें तेव्हां तिनें 'तुला स्त्रीवियोग होईल' असा त्याला शाप दिला; त्याप्रमाणें त्याला रामावतारीं सीतेचा वियोग झाला. पुढें वृंदा जालंधराबरोबर सती गेली, पण विष्णूला तिचा वियोग सोसवेना, म्हणून तिनें सती जाण्यापूर्वी त्याला सांगितलें कीं, मी सती गेल्यावर माझ्या चितेवर तुळस उत्पन्न होईल, तिजशीं तूं विवाह कर म्हणजे तुझें वियोग-दुःख शांत होईल; त्याप्रमाणें त्यानें केल्याबर त्याची शांति झाली, अशी कथा आहे. ह्या कथेचे धोरणानें उमा रमेस लावून बोलली आहे.

१ शुक्राकडून करविलेल्या यज्ञादि क्रियेनें. २ त्रिपाद भूमि मागे. ३ बलीच्या. ४ श्रियाळराजाचा. ५ चिलया नामक पुत्र. ह्याची कथा श्रीधराच्या शिवलीलामृतांतील ओंव्यांचा उतारा घेतला आहे त्यांत आहे, ती तेथें पहावी. ६ परीक्षा पाहून. ७ पूतनेनें. कृष्णास मारण्याच्या हेतूनें पुतनेनें त्यास स्तन-पान दिलें, तव्हां कृष्णानें तिच्या प्राणांचें आकर्षण केलें, ही गोष्ट प्रसिद्धच आहे. ८ ते (रामावतारांतील प्रसिद्ध) एक भिल्लीण. हिनें रामचंद्र वनवासांत असतां त्यास वन्यफळें भक्षणास देऊन त्याचें आपले घरीं आतिथ्य केलें होतें. ९ म्हणून.

पोटालागि नसे तरी व्रज-पुरीं चोऱ्या करी श्री-हरी ॥
मागे दुग्ध दधीं बरें नवनिता मारी यशोदा बरी ॥
तेव्हां जाउनि भक्षिली यमुनिची माती किती सांगगे ॥
क्रोधें धाउनि मारितां जननिनें वासी कसें तोंड गे ॥ ७ ॥
गौळी गे गिरिजे तयांशि न कळे सद्ब्रह्म हा श्री-हरी ॥
भक्तीनें भुलला म्हणोनि सखये भावार्थ[1] चोऱ्या करी ॥
ऐसें कीं न कळे म्हणोनि वदनीं माती-मिसें दाविलीं ॥
ब्रह्मांडें शत-कोटि तोंड पसरी त्यामाजि तीं देखिलीं ॥ ८ ॥
ऐके गे गिरिजे हरें वर[2] दिल्हा भस्मासुराला जंई ॥
तेव्हां तो सखये फिरोनि पडला श्री-शंकराला तई ॥
तोंडें वासुनिया शिवें स्मरियला श्री-कांत माझा भला ॥
दैत्या भस्म करोनि सोडवि हरी तें सांग तूं गे मला ॥ ९ ॥
लक्ष्मी ऐकसि काल-यौवन[3] जधीं पाठीस तो लागला ॥
तेव्हां श्री-हरिनें शिवास नमितां तत्काळ तो पावला ॥
कृष्णातें मुचकुंद[4] आड करितां दैत्येंद्र तो पावला ॥

---

१ भक्ति पाहाण्याकरितां. २ ज्याच्या मस्तकीं हात ठेवशील त्याचें भस्म होईल हा वर. असा शिवाचा वर मिळतांच भस्मासुर शिवावरच उलटून त्याच्याच मस्तकीं हात ठेवूं लागला. तेव्हां शिवानें विष्णूचा स्तव केला; त्या वेळीं विष्णूनें बटूचा वेष धरून भस्मासुराला भाषणानें संतुष्ट करून वराची परीक्षा पाहण्याकरितां तूं आपले मस्तकावर हात ठेऊन पहा म्हणून सांगितलें. त्याप्रमाणें भस्मासुरानें करतांच त्याचें भस्म झालें अशी कथा आहे. ३ कालयौवन ( कालयवन ) हा एक मोठा दैत्य यवनांचा राजा होता. ह्यानें यादवांवर स्वारी केली, तेव्हां कृष्णाचें आणि त्याचें मोठें युद्ध झालें; पण तो अजिंक्य आहे असें कृष्णास वाटल्यावरून कृष्ण पळाला. तेव्हां कालयौवनही त्याच्या पाठीस लागला. त्या वेळीं कृष्ण पळतां पळतां ज्या गुहेंत मुचकुंद निजला होता त्या गुहेंत शिरला आणि मुचकुंदाच्या आड लपून बसला. मागून कालयौवन आला, त्यास मुचकुंद निजला होता हाच कृष्ण असें वाटून त्यानें त्यास लाथ मारली. तेव्हां मुचकुंदानें जागें होऊन कालयौवनाकडे क्रोधानें पाहिलें. तों लागलाच कालयौवन दग्ध झाला, अशी कथा आहे. ही कृष्णाचे रक्षणाची युक्ति कृष्ण शिवास शरण गेला तेव्हां त्यानें सांगितली. ४ मुचकुंद हा सूर्यवंशी इक्ष्वाकु-कुळांतला राजा होता. ह्यानें देवदैत्यांचे युद्धांत देवांस साहाय्य केल्यावरून त्यांचा जय झाला. तेव्हां देवांनीं संतुष्ट होऊन मोक्षाशिवाय पाहिजे तें माग म्हणून त्यास सांगितलें. तेव्हां तो नुकताच युद्धश्रमानें थकला होता, म्हणून निद्रा करण्यास निवांत स्थल आणि माझे निद्रेचा भंग करील त्यास माझ्या दृष्टिपातानें मृत्यु. हें मागितलें. देवांनीं तें लागलेंच दिलें. अशी कथा आहे.

निद्रा मोडि तयासि भस्म करुनी श्री-कृष्ण तो रक्षिला ॥ १० ॥
बाई ब्रह्म-कपाल पाठिसिं जधीं श्री-शंकरा लागलें ॥
ब्रह्मांडीं फिरला परंतु न सुटे विष्णूसि बोभाइलें ॥
ब्रह्याला उपदेश देउनि सखे रुद्रासि गे रक्षिलें ॥
दोघांच्या स्वरुपासि भेद नसतां श्रीशेश ते राहिले ॥ ११ ॥
विष्णू शंकर दोन भिन्न नसती सद्ब्रह्मच्या चित्कळा ॥
दोघांची न कळे अ-तर्क्य करणी ते कोण वर्णी लिळा ॥
शब्दांची कुसरी विनोद रचिला संवाद झाला भला ॥
लक्ष्मी पार्वति भेटल्या, अनुभवें आनंद झाला मला ॥ १२ ॥

---

# अनंतफंदी

अनंतफंदी हा नगरजिल्ह्यांतील संगमनेर गांवचा रहाणारा. हा यजुर्वेदी कौंडिण्यगोत्री ब्राह्मण. ह्याच्या बापाचें नांव भवानीबावा आणि आईचें नांव राऊबाई. ह्याचें आडनांव घोलप.

ह्याचें फंदी असें नांव पडण्याचें कारण असें सांगतात कीं, पूर्वी संगमनेर येथें मलिकफंदी म्हणून कोणी एक फकीर होता; तो नेहमीं लोकांत चमत्कारिक रीतीनें वागत असे, म्हणून त्यास लोक फंदी असें म्हणत. त्या फकीराचा आणि अनंतफंदीचा फार स्नेह असे, त्यावरून ह्यासही लोक फंदी म्हणूं लागले.

अनंतफंदी हा पूर्वी तमाशा करीत असे. पण पुढें त्यानें तो नाद सोडून दिला. ह्याचें कारण असें झालें कीं, एक वेळ संगमनेर येथें अहल्याबाई होळकरीण आली होती; तिला हा लावण्याकरून तमाशा करतो असें समजल्यावर तिनें त्यास सांगितलें कीं, तुम्ही ब्राह्मण असून तमाशा करितां हें नीट नाहीं. तोंच पश्चात्ताप होऊन त्यानें डफावर थाप मारून डफ फोडून टाकिला; आणि त्या दिवसापासून तो कथा करूं लागला.

अनंतफंदी यानें कटाव, फटके आणि लावण्या फार केल्या आहेत. क्वचित् श्लोक, आर्याही कथेच्या संबंधानें केल्या आहेत. ह्याचा ओंवीबद्ध ग्रंथ एकच आहे. त्याचें नांव "माधवग्रंथ". हा ग्रंथ

करण्याचें कारण असें झालें कीं, ज्या वेळेस सवाईमाधवराव पेशवे माडीवरून उडी टाकून मरण पावले, त्या वेळेस पुण्याच्या कारभारी मंडळींनां बाजीराव रघुनाथ याजकडून पुढें झालेल्या सर्व हकीकतीचें एक पत्र अनंतफंदीस पाठविलें, आणि त्यावर कविता करावयास सांगितलें; त्यावरून त्यानें हा ओंवीबद्ध ग्रंथ केला. या ग्रंथाचे अध्याय पुष्कळ होते, परंतु त्यांतील हल्लीं सहा अध्याय मात्र सांपडतात. ह्याची कांहीं कविता चित्तवेधक आहे.

अनंतफंदीस श्रीपतफंदी म्हणून एक मुलगा होता. त्यास लोक सवाईफंदी म्हणत. तोही कविता चांगली करीत असे. तो शके १७१९ त जन्मून शके १७९४ त कार्तिक शुद्ध ५ स मरण पावला. हल्लीं त्याचे अनंतफंदी आणि गणपतफंदी ह्या नांवाचे दोन मुलगे आहेत. तेही कविता करीत असतात. अनंतफंदीनें राजेरजवाड्यांवर कवनें करून वर्षासनें मिळवून ठेविलीं आहेत. तीं हल्लीं चालू आहेत. ह्यांचा वडिलांपासून चालत आलेला धंदा सराफीचा; तोही हल्लीं चालू आहे. अनंतफंदीच्या मरणकाळीं त्याचें वय ७५ वर्षांचें होतें.

जन्मकाल शके १६६६ इ० स० १७७४
मरणकाल शके १७४१ इ० स० १८१९
कार्तिक शुद्ध ४.

वेंचे–उपदेशपर फटका.

लंडे गुंडे हिरसे तट्टू ह्यांची संगत धरूं नको ॥ नर–देहासी येउन प्राण्या दुष्ट वासना धरूं नको ॥ ध्रु ॥ भंगी चगो बटको सटकी ह्यांच्या मेळ्यांत बसूं नको ॥ बिकटवाट वहिवाट नसावी धोपट मार्गा सोडुं नको ॥ संसारामधिं ऐस आपला उगाच भटकत फिरूं नको ॥ चल सालसपण धरूनि निखालस बोला खोट्या बोलुं नको ॥ पर–धन पर–नार ह्यांस पाहुनि चित्त भ्रमुं हें देउं नको ॥ अंगीं नम्रता सदा असावी राग कुणावर धरूं नको ॥ नास्तिकपणांत शिरुनि जनाचा बोल आपणा घेउं नको ॥ भली भलाई कर कांहीं पण अ–धर्म–मार्गीं शिरूं नको ॥ चाल ॥ मायबापांवर रुसूं नको ॥ दूर एकला बसूं नको ॥ व्यवहारामधें फसूं नको ॥ कधीं रिकामा असूं नको ॥ चा० प० ॥ परी उलाढाली

भलभलत्या पोटासाठीं करूं नको ॥ १ ॥ लंडेगुंडे० ॥ वर्म काढुनी शर-मायाला उणें कुणाला बोलुं नको ॥ बुडवाया दुसऱ्याचा ठेवा करूनी हेवा झटुं नको॥ मी मोठा शाहणा धनाढ्यहि गर्व-भार हा वाहुं नको एकाहुन एक चढी जगामधिं थोरपणाला मिरवुं नको ॥ हिमायतीच्या बळें गुरिबगुरिबांला तूं गुरकावुं नको ॥ दो दिवसांची जाइल सत्ता अपेश माथां घेऊं नको ॥ बहुत कर्जबाजारी होउनि बोज आपला दवडुं नको ॥ स्नेह्यासाठीं पदरमोड कर परंतु जामिन होउं नको ॥ चा० ॥ विडा पैजेचा उचलुं नको ॥ उणी तराजू तोलुं नको ॥ गहाण कुणाचें डुलवुं नको ॥ असल्यावर भीक मागुं नको ॥ झा० प० ॥ नसल्यावर सांगणें कशाला गांव तुझा भिड धरूं नको ॥ २ ॥ लंडे० ॥ उगीच निंदा स्तुती कुणाची स्वहितासाठीं करूं नको ॥ बरी खुशामत शहण्याची ही मूर्खाची ती मैत्रि नको ॥ कष्टाची बरि भाजि भाकरी तुपसाकरेची चोरि नको ॥ आल्या अतिथा मुडभर द्याया मागें पुढती पाहुं नको ॥ दिली स्थिती देवानें तींतच मानीं सुख काधिं विटूं नको ॥ असल्या गाठीं धन-संचय कर सत्कार्यीं व्यय हटूं नको ॥ आतां तुजही गोष्ट सांगतों सत्कर्मा ओसरूं नको ॥ सत्कीर्ती-नौबदिचा डंका गाजे मग शंकाच नको ॥ चाल ॥ सु-विचारा कातरूं नको ॥ सत्संगत अंतरूं नको ॥ द्वैताला अनुसरूं नको ॥ हरि-भजना विस्मरूं नको ॥ गावयास अनंतफंदिचे फटके मागें सरूं नको ॥ ३ ॥ लंडे० ॥

येउं दे वाचे नाम देवाचें अष्टौ प्रहरा शिव हर हर हर ॥ ध्रु०॥ दे टाकुनि हे छंद वावुगे फंद, विषयांची काय मजा ॥ हरि-नामाची लावीं ध्वजा ॥ अ-सार हा संसार त्यजा॥ तमोरजाला देच रजा॥ सत्वगुणाची करो पुजा ॥ क्षमा शांति मनिं धरीत जा ॥ भगवीं वस्त्रें करीं पोट-भर भिक्षा मागें घर घर घर ॥ १ ॥ येउं दे० ॥ परोपकारा शरिर झिजावें जैसा मैलागिरि-चंदन॥ कर सज्जन-चरणीं वंदन ॥सा शत्रूंचें करि कंदन ॥ गृह-वैभव-वाजी-स्यंदन ॥अशाश्वतीं ह्या हो धुंद न॥आठीव मनीं दशरथ-नंदन ॥ अनंतफंदी म्हणे घालीं विठ्ठला गरके गर गर गर ॥ २ ॥ येउं दे० ॥

---

१ मागें सरूं नको. २ भिऊं नको.

## ॥ लावणी. ॥

नर-देहाम्धिं येउन नर हो साधन ऐसें करा ॥ जेणें भव-सागर तरुनि सुखें व्हावें पैलतिरा ॥ ध्रु० ॥ संसारार्णवि भिजा गड्यांनो संसारार्णवि० परंतु परमार्थ-साधनातें साधा यांतच मजा॥पर-नारी-धन त्यजा ॥ गड्यांनो परना० ॥ मद-मत्सर-मीपणासहित द्या तमोगुणाला रजा ॥ भाव न ठेवुनी दुजा ॥ गड्या०॥ अ-कपट होउनि थोर-लहानां सम दृष्टीनें पुजा ॥ अन्याय-पथें न जा ॥ गड्यांनो० ॥ सदसद्विचार करुनी लोकीं सत्कीर्तीनें सजा ॥ कोणा नच द्या इजा ॥ गड्यांनो० ॥ परि आश्रय दुःखितांस द्याया तन-मन-धनें झिजा ॥ संकट-समयीं धजा ॥ ॥ गड्यांनो० ॥ सत्य-वचन राखण्यास न ढळा कथितों ह्या हित गुजा ॥ व्हा सावध नच निजा ॥ गड्यांनो० ॥ पळ घटका प्रहर दिवस, यांहीं अयुष्य होतें ॥ वजा जगदीशाला भजा ॥ गड्यांनो० ॥ अनंतफंदी म्हणे तोचि मग तारिल देउनि करा ॥ १ नरदेहामधिं० ॥

---

# रामजोशी.

रामजोशी हा सोलापूरचा राहाणारा, जातीचा देशस्थ ब्राह्मण होता. तो कथा कीर्तन करून आपलें उपजीवन करीत असे. तो कवि असून चतुर वक्ता होता. ह्याची कविता प्रायः लावण्यांच्या चालीवर असून सरस आहे. तो कथेंत बहुतकरून आपलीच कविता म्हणत असे, कधीं कधीं मोरोपंताच्या आर्याही म्हणत असे. मोरोपंताची कविता ह्यानें फार प्रसिद्ध केली असें सांगतात. हा आपले वयाचे ५० व्या वर्षी वारला.

| | |
|---|---|
| जन्म शके १६८४ | इ०स० १७६२ |
| मरण शके १७३४ | इ०स० १८१२ |

### ह्यानें केलेले ग्रंथ.

छंदोमंजरी (छंदःशास्त्रावर). अनेक विषयांवर लावण्या.

### बोधपर लावणी १

दो दिवसांची तनु हे साची सुरत-रसाची करुनि मजा ॥ गमजा करितां मनिं उमजाना हें सुख न पुढें पडेल वजा ॥ भाई सावध व्हा०॥ ध्रु० ॥

आज उद्यांचा पूर नद्यांची वय-लगद्याचा बहर नवा ॥ उलट्या झाल्या कुलटा रांडा मग कोठिल हो मालपुवा ॥ थाट बसाया पाट रुप्याचें ताट त्यामधें दूध रवा ॥ धेना वयाला बसेल घसरा मग विसरा हो गोड खवा ॥ रांडा पोरें वंचक चोरें जंवर मिळवितां तंवर थवा ॥ शितें तंवरतीं भुतें भोंवतीं कोण कुणाचा सखा जिवा ॥ जोंवरि पैसा तोंवरि बैसा मंचकिं म्हणतिल घ्याल हवा ॥ बेटा बेटी हर्ती नरवटी देतिल हा खूप समज ठिवा ॥ पात यांत कीं घात होतसे हात जोडितों हरिसि भजा ॥ फुका सुखाला मुकाल कथितों न कालचा दिन आज दुजा ॥ दो दिवसांचो तनु हे० भाई सावध व्हा० ॥ १ ॥ कनक-धनाचा मद मदनाचा वोसरल्यावर रंग फिका ॥ रुका न पदरीं विकाल घर मग विलासभरजरी कुठुन दुका ॥ गज रथ घोडा कलगी तोडा पाई जोडा लाल झुका ॥ तोरा जाउन खोडा येइल बसेल येखादा धरमधका ॥ सुगंध शाला नरम दुशाला गरम मसाला पान पका ॥ हार तुरे हे बरे न पुढती बुरे हाल खेळाल बुका ॥ कोकशाला नाटकशाला दासीयांचा घ्याल मुका ॥ कामुक होउनि कां मुकतां परमार्थ सुखाला देह विका ॥ कदम मुलाजा यांत भुला जा तुम्हां न लाजा मनिं समजा ॥ दूत यमाचे मूत आणितिल नेला तुमचा बाप अजा ॥ दो दिवसांची० ॥ भाई सावध व्हा० ॥ २ ॥ पुरे करा या मौजा तेथुनि फौजा झाल्याचि रवाना ॥ यम-दूतांची ढाल बिनीवर बाल सफेदी देखाना ॥ पुढें यमाचे खडे दूत हे बडे हरामो समजाना ॥ मार मारतिल फार कुणी मला मामा काका गौसाना ॥ रांडा आतां मांडा चारिति खांडा म्हणतिल करा चुना ॥ मूल कुणाचें भूल तुम्हांला चूल चालती तंवर म्हणा ॥ तडका येतिल सारे अडका हुडकायाला मरतांना ॥ पीठ गिळेना मीठ मिळेना ऐसें करितिल ऐकाना॥वेडा होइल परि जन वेडा म्हणतिल पेढा आटिव जा ॥ अडाल भूवरि पडाल मग तुम्हि रडाल न म्हणा काळ खुजा ॥ दो दिवसांची०॥भाई सावध व्हा० ॥३॥ सुभा करूनि मनसुभा येखादा उभा करा परिवार भरा॥काय तुम्हांला यांत सांचलें आंत वांचलें अयुधरा ॥दार-जनाला हार नगांचे भार मुलिस मुलग्यास तुरा॥ घ्याल पुन्हा जरि घ्याल न देतिल तुम्हांसि त्यांतिल जरा चुरा ॥ कां मरतां धन-लोभें फिरतां पुरता याचा शोध करा ॥ कोण तुम्हाला वाली तो व-

नमाली लाविल पैलतिरा ॥ लोह-घनाच्या जाड कवाडाआड बसा कीं बाड चिरा ॥ काळ सखत पाताळतळांतुनि काढिल अंबुधिमाजि शिरा ॥ फार कशाला सार सांगतों बार बार जन्मा नवजा ॥ कविरायाचा बोल नव्हे हा फोल डोल ध्यानीं उमजा ॥ दो दिवसांची० ॥ भाई सावध व्हा० ॥ ४ ॥

## लावणी २.

भला जन्म हा तुला लाधला खुलास त्द्दयीं बुधा ॥ धरिसि तरि हरिचा सेवक सुधा ॥ ध्रु० ॥ चराचरीं गुरु तरावयाला नरा शिरावरि हरी ॥ जरा तरी समज धरीं अंतरीं ॥ हटातटानें पटा रंगवुनि जटा धरिशी कां शिरीं ॥ मठाची उठाठेव कां करी ॥ वनांत अथवा जनांत हो कां मनांत भलत्या परी ॥ हरीचें नांव भवांबुधि-तरी ॥ चा० ॥ काय गळ्यांत घालुनि तुळशीचीं लांकडें ॥ हीं काय भवाला दुर करितिल माकडें ॥ बाहेर मिरविशि आंत हरिशीं वांकडें ॥ अशा भक्तिच्या रसा-रहित तूं कसा म्हणविशी बुधा ॥ धरिशि तरि हरिचा सेवक सुधा ॥ १ ॥ जाळ गळ्यामधि माळ कशाला व्याळ-काम कोपला ॥ आंतुनि बाहेर म्हणविशी भला ॥ वित्त पहतां पित्त येतसे चित्त पाहिजे मला ॥ असें हरि म्हणतो नुमजे तुला ॥ दांभिक वर संभावित अभ्यंतरीं नाहिंस बिबला ॥ बहिर्मुख नर नरका लाधला ॥ चा० ॥ तूं पोटासाठीं करि खटपट भलतिशी ॥ परि भक्ति-रसाविण हरि भेटल काय तुसी ॥ कायध्यान धरुनिया गोमुखिला जाळिसी ॥ स्वार्थ-सुखें परमार्थ बुडविला अनर्थ केला बुधा ॥ धरिशि तरि हरिचा सेवक सुधा ॥ २ ॥ टिळा टोपिवर शिळा पडो या बिळांत करिशी जपा ॥ तथापि न होय हरिची कृपा ॥ दर्भ मुष्टिच्या गर्भि धरुनिया निर्भर पशुच्या वपा॥जाळिशी तिळ-तांदुळा तुपा ॥ दंड कमंडलु बंड माजविशी मुंड मुंडशी तपा ॥ न सार्थक लटक्या साऱ्या गपा ॥ चा० ॥ ही बार बार तलवार येईल काय पुन्हा ॥ ह्या दुर्लभ नर-देहांत ठेविशी कुन्हा ॥ भगवंत भुकेला भक्तीचा पाहुणा ॥ वर्म कळेना धर्म घडेना कर्म चित न द्विधा ॥ सदा हरि कविरायावर फिदा ॥ भला जन्म हा तुला लाधला० ॥ ३ ॥

## लावणी ३.

जाऊं नका रे विषयाटविची वाट कठिण मोठी ॥ नागविले किति भले ग

क्यानो असंख्य जन-कोटी ॥ ध्रु० ॥ याच वनामधीं भिल्ल नांदतो काम नाम त्याला॥ पंच-शरानें विश्व मोहिलें ठाउक सकळाला ॥ काम-क्रोधादिक सांगाती जिंकिती काळाला ॥ नितंबिनी वागुरा पसरल्या कामि-कुरंगाला ॥ चा० ॥ भजा तुम्ही निशी-दिनीं देवाला ॥ हेंचि निदानीं येईल कामाला ॥ दया नाहींच निर्दय मदनाला ॥ चा० ॥ सरक सरक तूं पडुं नको गहनीं दुर्ममता खोटी ॥ हरि-मायेचा खेळ कळेना टांगिल उफराटी ॥ जाउं० ॥ १ ॥

## लावणी ४.

नर-जन्मामधिं नरा करुनि घे नर-नारायण-गडी॥तरिच सार्थक मानव-कुडी ॥ ध्रु० ॥ बा चौऱ्यांशी लक्ष वेळ संसार पडला गळां॥ चितेचा पिकला मळा ॥ दार-धनाचा लोभ टाकुनी झडकर हो वेगळा ॥ हा कसा उकलिशी पिळा ॥ धननिमित्तें जनापुढें तूं दाविसि नाना कळा ॥ किति तुला मुलाचा लळा ॥ चा० ॥ तूं पडुं नको याचे भरीं ॥ तुझ्या हें खापर फुटतें शिरीं ॥ तुला मी गोष्ट सांगतों खरी ॥ आतां कर तांतडी ॥ ही पुन्हा नये बा घडी ॥ नर-जन्मामधीं० ॥ १ ॥ निपट बावळा या विषयाच्या मार्गे लागसि कसा ॥ कां होशी बा धडपिसा ॥ वयोधनाची किति चंचळ गति कां धरिशी भरंवसा ॥ हें सकळ मनीला पुसा ॥ उदरासाठीं दुर्धनिकांच्या पुढें पसरिशी पसा ॥ किति उगाळशिल कोळसा ॥ चा० ॥ हें तुला शिकविलें कुणी ॥ दयाळू नर-नारायण धणी ॥ अझुनि तरि करिं ही घोकणी ॥ विष-वल्लीची जडी ॥ तूं म्हणसिल साखर खडी ॥ नर-जन्मामधिं० ॥२ ॥ नवस कामना करुनि मनामधिं म्हणशिल पुरुषोत्तमा ॥ दे सतत विपुला रमा ॥ विषय-वासना तुला तुटेना मानसि या संभ्रमा ॥ काय पुढें बोलशिल अधमा ॥ किती प्रपंचामधें फिरुनिया पावसि विफल श्रमा ॥ कां न करिशी भजनोत्तमा ॥ चा० ॥ हें कसें तुला भावलें ॥ करावी अचळा दारा-मुलें ॥ मिळेना पुढतो हें बाहुलें ॥ कविरायाची घडी॥ दाविल भवार्णवाची थडी ॥ ३ ॥ नर-जन्मामधिं० ॥

# कितीएक कवींचीं पदें वगैरे.

## शिवरामस्वामीचें पद.

संत दयाळ कसे ॥ राजा-रंक जया सरिसे ॥ ध्रु० ॥देउनि भेटी तोडिति माया ॥ नेउनि दाविति निज-पद-ठाया ॥१॥ संत० ॥ श्रवणीं पाजुनि अमृत-वाणी ॥ नेउनि दाविति चिन्मय-खाणी ॥२॥ संत० ॥ शिवरामीचे अभिनव लेणें ॥ लेवविलें मज पूर्ण कृपेनें ॥ ३ ॥ संत० ॥

## केशवस्वामीचीं पदें.

### पद १.

धांव विभो करुणाकर माधव देव दया-निधे देवकी-नंदन ॥ध्रु०॥ हे करुणाकर दीन-जनोद्धर ॥ हा भव दुस्तर यांतुनि उद्धर ॥ धांव० ॥ १ ॥ काम-मदादिक गांजिति हे अति॥धांव रमा-पति सेवक-हितकर॥धांव० ॥ २ ॥ जनन-मरण-भय-हरण करि त्वरें ॥ चरणिं शरण दृढ केशव-किंकर ॥ धांव ॥ ३ ॥

### पद २.

संत-समागम कराचिना ॥ शांति दया मनिं धराचिना ॥ चिन्मय राघव वराचिना ॥ झडकरि कांहो तराचिना ॥ १ ॥ संत-समागम काशी रे ॥ क्षणभर वस्तिशि जाशीरे॥नासति पातक-राशी रे॥पावसि परम-पदासी रे ॥ २ ॥ काम-तरुवर तोडावा॥संशय अवघा मोडावा ॥ सर्व समागम सोडावा ॥ केशवस्वामी जोडावा ॥ ३ ॥

### पद ३.

दीनानाथ दीन-बंधु शरण तुलारे ॥ विषयाचे लोभें मन भ्रमलें से भारी ॥ गृह पुत्र कलत्र हें झालें सुखकारी ॥ आतां याचें दुःख मजला सोसवेना हरी ॥ म्हणोनिया विनवितों करुणाकरा रे ॥ दीनानाथ दीन-बंधु० ॥ १ ॥भवाब्धीचा तरणोपाय न कळेचि कांहीं॥साधु-संग-सेवा-मज घडलीच नाहीं ॥ शिश्नोदर-व्यापाराचे पडलों भवाहीं ॥ यांतुनि काढीं मज कमला-वरा रे ॥दीनानाथ० ॥ २ ॥ चित्त-शुद्धिचिये मज वाट दाखवावी ॥ नवविध भक्ति निरंतर घडवावी॥वेद-शास्त्र-पुराणांची गति सुचवावी ॥ केशवचैतन्य म्हणे भूषण तुलारे ॥ दीनानाथ० ॥ ३ ॥

### पद ४.

इतुकें दे मजला दे मजला ॥ मागतसें हरि तुजला ॥ ध्रु०॥संत-समागम जोंही साझो मीपण वाट मोडी ॥ इतुकें दे० ॥१॥ संत-समागम अर्चा ॥ सारासार-ज्ञान-चर्चा ॥ इतुकें दे मजला० ॥ २ ॥ संत घराप्रति येती ॥ भक्तीभावें पूजीन त्यांसी ॥ इतुकें० ॥ ३ ॥ भगवद्भजनीं जागो ॥ तुझि-ये स्वरुपीं लक्ष लागो ॥ इतुकें० ॥४॥ हेंचि मागणें मागें ॥ भावें केश-व चरणा लागे ॥ इतुकें० ॥ ५ ॥

## पदें अमृतरायाचीं.

### पद १.

अखंड हरिहरि वदा रे ॥ बापांनो अखंड हरिहरि वदा ॥ किति सेवाल धन-दुर्मदा ॥ रे बापांनो अखंड हरिहरि वदा ॥ ध्रु० ॥ काय रानांत आटल्या नद्या ॥ काय तरू म्हणति फळ न द्या ॥ किती कांडोकांडि मिरवाल मुद्या ॥ गेलि आजची घडि न ये उद्यां ॥ रे बापांनो० ॥ १ ॥ काय बिदींत न मिळति चिंध्या ॥ काय न मिळे भोंपळा दुध्या ॥ या तों युक्ति सुखाच्या सुध्या ॥ वाचा एकोबाचा पुस्तकाध्या ॥ रे बापां-नो० ॥ २ ॥ काय पर्वतिं बुजल्या दऱ्या ॥ काय दुकाळ पडला कऱ्या॥ काय महर्गे तृणाच्या बोऱ्या॥या तों वैराग्य-युक्ति खऱ्या॥ रे बापां०॥ ॥ ३ ॥ बाहु असतां आपणापाशीं ॥ मग कशास पाहिजे उशी ॥ काय अडचण महदाकाशीं ॥ ठाय नेदि काय पृथ्वी कुशी ॥ रे बापांनो० ॥ ॥ ४ ॥ काय लोकिं दारवठे रोधिले ॥ काय न मिळति जुने जोंधळे ॥ ऐसें टाकुनि दुर्मद आंधळे ॥ व्यर्थ अमोल आयुष्य उधळे ॥ रे बापांनो० ॥ ५॥ कर जोडुनि अमृत विनवितो ॥ बाहु उभारुनि गर्जतो ॥ जो नि श्चय धरुनि बैसतो ॥ त्या घरीं बसल्या राम देतो ॥ रे बापांनो० ॥ ६ ॥

### पद २

होउनि गोंसावी गोंसावी ॥ हरि-कथाचि परिसावी ॥ध्रु०॥ गमन नसे ज्या गांवीं ॥ तेथिल वाट कशास पुसावी ॥ होउनि० ॥ १ ॥ सुखें मिळो खंबाइत ॥ अथवा भगवींही नेसावीं ॥ होउनि० ॥ २ ॥ भिक्षा मागुन निस्पृहतेनें ॥ सत्संगति पोसावी ॥ होउनि० ॥ ३ ॥ दुर्वाक्यें सोसुनिया ॥ आपण अमृत-वृष्टि वर्षावी ॥ होउनि० ॥४॥

### पद ३

त्याचा हरि विकला, हरि विकला ॥ प्रेमें हरि-गुण शिकला ॥*त्याचा० ॥ ध्रु०० ॥ दो चौं दिवसां सेवी ॥ भाजी चुका चाकवंत सुकला ॥ त्याचा० ॥ १ ॥ कर्ज नसे कोणाचें ॥ देण्याघेण्यापासुनि मुकला ॥ त्याचा० ॥२ ॥ संतुष्ट यदृच्छा-लाभें ॥ आनंद ज्याच्या हृदयीं पिकला ॥ त्याचा० ॥ ३ ॥ आधि वदे अमृतेश्वर ॥ जो नर धन-कामिनीवर थुकला ॥ त्याचा० ॥ ४ ॥

### पद ४

अशाश्वत संग्रह कोण करी ॥ ध्रु० ॥ चिरगुट चिंध्या जोडोनि कंथा ॥ गोदडी हेचि बरी ॥ अशाश्वत० ॥ १ ॥ नित्य नूतन देइल माधव ॥ भिक्षा तेचि बरी ॥ अशाश्वत० ॥ २ ॥ कोण करी घर सोपे माड्या ॥ विवरीं वस्ति बरी ॥ अशाश्वत० ॥ ३ ॥ आत्मस्त्री-सुत परकी होती ॥ ठेविति भूमिवरी ॥ अशाश्वत० ॥ ४ ॥ अमृत म्हणे मज भिक्षा-डोहळे ॥ उठति अशा लहरी ॥ अशाश्वत० ॥ ५ ॥

### पद ५

बा तुझा चालता काळ ॥ खायाला मिळती सकळ ॥ हे कोण बायकोचे साले, तुपावेगळा घांस न गिळे ॥ तांदुळ रांधियेले मोकळे, केलें बेंबीचें ऊखळ ॥ बा तुझा० ॥ १ ॥ हे कोण बायकोचे मामे, घरांत वागती रिकामे ॥ साखर शाल्योदन खाणें, भोजन-भाऊ केवळ ॥ बा तुझा० ॥ २ ॥ बहिणी सासू घरासि येती, फराळाच्या पंक्ती बैसती ॥ नातीं कोरकोरून काढिती, सर्व मायेचा गोंधळ ॥ बा तुझा० ॥ ३ ॥ अमृतराय म्हणे रे मूर्खा, किती भुललासी मायेच्या सुखा ॥ अंतीं जासी एकटा नरका, भज सद्गुरु दयाळ ॥ बा तुझा० ॥ ४ ॥

### पद ६

हें तुज कसें कळतें कसें कळतें ॥ हरि-भजनीं मन चळतें ॥ ध्रु० ॥ षड्रस अन्न करावें यथासांग पोट भरावें ॥ हें तुज कसें क० ॥ १ ॥ सुंदर वनिता व्हावी ॥ वस्त्रें भूषणें बरवीं ल्यावीं ॥ हें तुज कसें क० ॥ २ ॥ कन्या पुत्र व्हावे ॥ बरवें जामातां मिरवावें ॥ हें तुज क० ॥ ३ ॥ घरीं असाव्या म्हैशी ॥ धन धान्य संग्रहा दासी ॥ हें तुज क० ॥ ४ ॥ अमृत द्वारीं लोळे ॥ कीर्तनिं रंगीं जिव्हा खेळे ॥ हें तुज कसें० ॥ ५ ॥

---

* भर्तुं तें चि घरीं असाही पाठ आहे.

## पद ७

माण्या भुलूं नको नटूं नको ॥ स्व-हिता अंतरसी ॥ माण्या भुलूं नको नटूं नको ॥ ध्रु० ॥ हा[1] देह पांचांचा ॥ पांच जण नेतील॥जीव हा अज्ञानी न्यायाला ॥ धर्म दूत येतील ॥ हिशेब पापाचा पुण्याचा ॥ चित्रगुप्त घेतील ॥ केल्या कर्मांचें फळ बाणा ॥ अवश्य ते देतील ॥ माण्या भुलूंनको नटूं० ॥ १ ॥ वेद-शास्त्रांचा उपदेश ॥ निरभिमानी होय ॥ राहें लीनपणें सर्वांशीं ॥ जैसें पातळ तोय ॥ क्षमा आत्मत्वें धरावी ॥ अबोलनी जंव होय ॥ माण्या० ॥ २ ॥ वैभव जायाचें बा जायाचें ॥ पाप-बळें जाईल ॥ सत्ता श्री-हरिची श्री-हरिची ॥ तो हिरोनि नेईल ॥ होई सावधरे बासावधरे ॥ तरिच बरें होईल ॥ क्षेम-कल्याणा बा कल्याणा ॥ अमृतेश्वर देईल ॥ माण्या भुलूं नको नटूं० ॥ ३ ॥

---

## पद श्रीधराचें.

सखया रामा, विश्रांति तुझिये नामीं ॥ म्हणउनि मजला ने त्वरे निज-सुख-धामीं ॥ सखया० ॥ ध्रु० ॥ अवचट सुकृतें नर-देहा झाली भेटी॥पशु-सुत-जाया-धन-धामीं प्रीती मोठी॥माझी माझी म्हणुनि म्यां धरिलीं पोटीं ॥ यांच्या संगें भोगिल्या दुःख-कोटी ॥ सखया० ॥ १ ॥ सोडुनि स्व-हिता धांवलों दिशा दाही ॥ शववत झालों मागुता कौतुक पाहीं ॥ परि खळ जन हे नेदिती कवडी तेही ॥ परि हे आशा पापिणी लाजत नाहीं ॥ सखया० ॥ २ ॥ जंववरि दृढता तंववरि या तनुची प्रीती ॥ जर्जर झाल्या निंदक हे अवघे होती ॥ यांचीं दुःखें तुजला मी सांगू किती ॥ म्हणउनि येतो श्रीधर काकूळती ॥ सखया० ॥ ३ ॥

---

## पदें आनंदतनयाचीं.

### पद १

बरवें समजा रे उमजा रे ॥ कां करतां गमजा रे ॥ ध्रु० ॥ मायामय जग सारें ॥ अवघें दो दिवसांचें वारें ॥ बरवें० ॥ १ ॥ दारा धन सुत पोरें ॥ अवघीं नागवणीसम चोरें ॥ बरवें० ॥ २ ॥ धरुनी पृथ परभारें ॥ तरला आनंदतनय विचारें ॥ बरवें० ॥ ३ ॥

---

१ पंच महाभूतांचा.

## पद २

रत हरि-पद-कमल-कंद सेवि मनो-भ्रमरा॥ध्रु०॥दुष्ट दैत्य दमुनि देत नि-ज-भक्ता थारा ॥ द्रुततर मनिं धरुनि भाव सांडि भव-पसारा ॥ रत०॥ ॥१॥ शुक-सनकादीक मुनी जपति ज्या आधारा ॥सुर-वर मुनि गाति मुखें नित्य निराकारा ॥ रत०॥ २ ॥ पावन पद-रजें करुनि गौतम-मुनि-दारा ॥ निशि-दिनिं आनंदतनय गाय वेद सारा ॥ रत० ॥ ३ ॥

## पद ३

दाखवीं दिव्य पाय दया-निधे रामा ॥ ध्रु०॥ हीन दीन आस तुझी, कास पूर्ण आम्हां ॥ धरावया पाहतसें अगा घन-श्यामा ॥ दाखवीं ॥ १॥ माय बाप बंधु गोत्र, मित्र तूंचि आम्हां ॥ तूजवीण कोण असे सांग सख्या रामा ॥ दाखवीं० ॥२॥ सखया आनंदतनय म्हणे अगा गुण-ग्रामा ॥ शीणभाग हरी त्वरें पुसोनिया घामा ॥ दाखवीं० ॥ ३ ॥

## पद ४

त्यांचा संग नको मजलागीं ॥ त्यांच्या तोंडा लागो आगी ॥ ध्रु०॥ वरि वरि वचनें लागति गोड ॥ अंतरीं दुर्बुद्धीचा मोड ॥ त्यांचा संग नको० ॥ १॥ भजतां श्री-रामाचे पाय ॥ मध्यें करिती अंतराय ॥ त्यांचा संग नको० ॥ २ ॥ घेउन सौजन्याचें सोंग ॥ साधिति जारण-मारण-योग ॥ त्यांचा संग नको० ॥ ३ ॥ भजनीं दावुनिया विश्वास ॥ व्यसनीं घालिति जे विश्वास ॥ त्यांचा संग नको० ॥ ४ ॥ अखंड जन-निंदेतें ध्याय ॥ आनंदतनय वदे कवि-राय ॥ त्यांचा संग नको० ॥ ५ ॥

# पद, विठ्ठल कवीचें.

## पद १

कृपा-घना तुज कां नये करुणा॥ शुक-सनकादिक वंदिति चरणा॥ कृ० ॥ ध्रु० ॥ उत्कंठा मनिं, पाय पहाया ॥ लागली निशि-दिनिं जगदाभरणा ॥ कृ० ॥ १ ॥ अंतरींचा तूं, जाणसि आशय ॥ पूर्ण करिशि कधिं अघ-सं-हरणा ॥ कृपा-घना ॥२॥ ध्यान भजन मी, कांहिच नेणें ॥ दासें म्हणवितों पतितोद्धरणा ॥ कृपा-घना० ॥ ३ ॥

## पदें, जीवनतनयाचीं.

### पद १

माझ्या बाळावरता रोष कैकेयि धरिशीं कां ॥ ध्रु० ॥ चिमणे बाळक कीं रघु-राय ॥ केला नसतां तव अन्याय ॥ वनासि दवडुनि सुख तरि काय ॥ ऐसा अनर्थ करिसी कां ॥ १ ॥ राम केवळ नेणत बाळ ॥ फिरेल विपिनीं कीं अळुमाळ ॥ यास्तव वाटतसे हळहळ ॥ ठेविन भाळ चरणीं कां ॥ २ ॥ अंतरल्यावर श्री-रघु-राज ॥ माझे प्राणचि जातिल आज ॥ त्रिभुवनीं अपकीर्तीची लाज ॥ व्यर्थचि आज वरिसी कां ॥ ॥ ३ ॥ देईं भरताशी संभार ॥ परि मजवरता करिं उपकार ॥ जीवनतनयाचा दातार ॥ चित्तीं दूर धरिसि कां ॥ ४ ॥

### पद २

माझ्या बाळा रघु-वीरा ॥ वनासि जाऊं नको ॥ ध्रु० ॥ कोमळ नाजुक तुझा काय ॥ व्यर्थचि भरीं भरलासी काय ॥ रडतें मोकलोनि मी धाय ॥ पंकीं गाय रोवुं नको ॥ माझ्या० ॥ १ ॥ तुझे पायां येतिल फोड ॥ वन-विचराची इच्छा सोड ॥ देईं मजला येवढी जोड ॥ सुकृत-मोड मोडुं नको ॥ माझ्या० ॥ २ ॥ सूक्ष्म केवळ तूं तर बाळ ॥ कैसा फिरसिल रानोमाळ ॥ होइल अनर्थ कीं तात्काळ ॥ विपरित काळ दावुं नको ॥ माझ्या० ॥ ३ ॥ विनवित रामासी ते माय ॥ स्वस्थचि मजपासीं तूं राय ॥ जीवनतनय वंदितो पाय ॥ कांहीं उदास होउं नको ॥ माझ्या० ॥ ४ ॥

## पदें, शिवदिनकेसरीचीं

### पद १

जैसें ज्यानें केलें ॥ तैसें त्याला फळ झालें ॥ ऐसें अनुभवासि आलें ॥ यांत आमुचें काय गेलें ॥ ध्रु० ॥ जार चोर चाहाडखोर ॥ निंदाद्वेषी रांडा पोर ॥ त्यांसी यम-दुतांनीं बांधुनि अघोर नरकीं नेलें ॥ यांत० ॥ १ ॥ काळ-व्याळ हा विक्राळ ॥ डंखूं पाहे सर्वहि काळ ॥ त्याचें भय सांडुनिया मूर्खे स्व-हित टोलाविलें ॥ यांत० ॥ २ ॥ भक्त विरक्त योगी संत ॥ सिद्ध ज्ञानी जीवन्मुक्त ॥ त्यांची सेवा करितां देवें वैकुंठासी नेलें ॥ यांत० ॥ ३ ॥ अर्थ स्वार्थ साधन अर्थ ॥ केसरि शिवदिन गुरु परमार्थ ॥ गुरु-भक्तांचें गुरु-भक्तिनें जन्म-मरण चुकविलें ॥ यांत० ॥ ४ ॥

पद २

गड्यांनो घ्या हरिच्या नामा ॥ लिहितां कशास ओनामा ॥ ध्रु० ॥ सांगतों ऐका एक बर्म ॥ पहावे भागवती धर्म ॥ दुःखसें माप होय शर्म ॥ यत्न त्या कशास रे परम ॥ न पावे हरिवांचुनि क्षेमा ॥ लिहितां० ॥१॥ शरण सद्गुरुला जावें ॥ हरि-भजनीं नच लाजावें ॥ हरिचें सं-गुण रूप ध्यावें ॥ निर्मळ भावें पूजावें ॥ सांडुनि त्हृदयांतिल कामा॥लिहितां० ॥ २ ॥ गृह धन जन यांची ममता ॥ धरुनी व्यर्थचि कां भ्रमतां ॥ त्हृदयीं वागवुनी समता ॥ हरिचें चरणांबुज नमितां ॥ नेइल हरि तो निज-धामा ॥ लिहितां० ॥ ३ ॥

पद ३

भाव धरारे आपुलासा देव करारे ॥ कोणी काय म्हणे यासाठीं ॥ बळकट प्रेम असावें गांठीं ॥ निंदा-स्तुतीवर लावुनि काठी ॥ मी तूं हरारे ॥ आपुलासा देव० ॥ १ ॥ सकाम साधन सर्वहि सांडा ॥ निष्कामें मुळ-भजनीं भांडा ॥ नाना-कुतर्क-वृत्तिसि दवडा ॥ आली जरारे ॥ आपुलासा० ॥ २ ॥ दुर्लभ नर-देहाची प्राप्ती ॥ पुन्हां न मिळे हा कल्पांतीं ॥ ऐसा विवेक जाणुनि चित्तीं ॥ गुरुसी वरारे ॥ आपुला० ॥ ३ ॥ केशरिनाथ गुरूचे पायीं ॥ सृष्टि आजि बुडाली पाहीं ॥ शिवदिनीं निश्चय दुसरा नाहीं ॥ भक्त-सखारे ॥ आपुलासा देव करारे ॥४॥

पद ४

बाइल पैशाची बा पैशाची ॥ विरळागत पुरुषाची ॥ ध्रु० ॥ धन कनकांतर गांठी ॥ त्याला समान सांगे गोष्टी ॥ बाइल पै० ॥ १ ॥ नेसवि साडी लुगडीं ॥ त्यासीं लावी लाडी गोडी ॥ बाइल पै० ॥ २ ॥ भ्रतार वेडा पीसा ॥ त्यासी नित्य करी कर्कशा ॥ बाइल पै० ॥ ३ ॥ शिवदिन गुरूचे पायीं ॥ पैशावीण कांहींच नाहीं ॥ बाइल पै० ॥ ४ ॥

पद ५

माझी देव-पुजा देव-पुजा ॥ पाय तुझे गुरु-राजा ॥ माझी० ॥ ध्रु ॥ गुरु-चरणाची माती ॥ तेच माझी भागीरथी ॥ १ ॥ माझी० ॥ गुरु-चरणाचा बिंदु ॥ तोची माझा क्षीर-सिंधु ॥ २ ॥ माझी० ॥ गुरु-चरणाचें ध्यान ॥ तेंचि माझें संध्या-स्नान ॥ ३ ॥ माझी० ॥ शिवदिन केशरी पायीं ॥ सद्गुरूवांचुनी दैवत नाहीं ॥ ४ ॥ माझी० ॥ पाय तु० ॥

## पद रामजोशाचें.

भजभज भव-जलधिमाजि मनुजा शिवाला ॥ ध्रु०॥ धरिशिल दृढ चरण-कमल, घडिभरि तरि करुनि विमल ॥ तरिच सकल पाप शमल, त्यज रे भवाला ॥ भजभज०॥ १ ॥ सांडुनिया विषय-वमन, झडकरि कारिं षड-रि-दमन ॥ पूजिं मन हें करुनि सुमन ॥ गिरिजा-धवाला ॥ भजभज० ॥२॥ सावध हो करिशि काय, शंकर गुरु बाप माय ॥ चिंतुनि कवि राम-पाय ॥ त्द्दयीं निवाला ॥ भजभज० ॥ ३ ॥

## पदें, मध्वमुनीचीं.

### पद १

उद्धवा शांतवन कर जा, त्या गोकुलवासि जनांचें ॥ ध्रु० ॥ बा नंद यशोदा माता, मजसाठीं त्यजतिल प्राण ॥ त्यागुनी प्रपंचा फिरती, मनिं उदास रानोरान॥ अन्न-पाणि त्यजिलें रडती, अति दुःखित जाले दीन॥ चाल० ॥ जन्मलों तेंहुनि झटले ॥ मजलागीं तिळ तिळ तुटले ॥ कटि खांदे वाहतां घटले ॥ आटलें रक्त देहाचें ॥ उद्धवा शांतवन० ॥ १ ॥ आइ बाप त्यजुनी बाळें, मजसंगें खेळत होतीं ॥ गोडशा शिदोऱ्या आणुनी, आवडिनें मजला देती ॥ रात्रंदिस फिरले मागें, दधि गोरस चोरू येती ॥ चाल० ॥ मी तोडुनि आलों तटका ॥ तो जिवाला लागला चटका ॥ मजविण त्यां युगसम घटका॥ आठवतें प्रेम जयाचें ॥ उद्धवा शांतवन० ॥ २ ॥ पति-सुतादि गृह धन त्यजिलें, मजवरती धरुनि ममता॥मानिलें तुच्छ अपवर्गा, मजसंगें निश्चळ रमतां॥मद्दत्त-चित्त त्या गोपी, नेत्रांतरि लेवुनी समता ॥ चाल० ॥ तिळतुल्य नाहिं मनिं डगल्या ॥ दृढ निश्चय धरुनी तगल्या ॥ बहुधा त्या नसतिल जगल्या ॥ भंगले मनोरथ ज्यांचे॥उद्धवा शांतवन० ॥ ३ ॥ हरि आहे सुखरुप म्हणुनी, भेटतांचि त्यां सांगावें ॥ सांग कीं समस्तां पुशिलें, प्रत्युत्तर त्यां मागावें ॥ करुनिया ज्ञान तयांतें, सांग कीं शोक त्यजावे ॥ चाल० ॥ हें कार्य नव्हे तुजजोगें ॥ मजसाठीं जावें वेगें ॥ हें मध्वमुनीश्वर सांगे, ॥ त्या नपवे ज्ञान जयाचें ॥ उद्धवा शांतवन० ॥ ४ ॥

### पद २

जाणों हरिचे पाय ॥ आम्ही जाणों हरिचे पाय ॥ ध्रु० ॥ नेम न जाणों यमहि न जाणों ॥ नेणों अन्य उपाय ॥ आम्ही० ॥ १ ॥ परिस देउनी

सोनें घेणें ॥ जळो त्याचा व्यवसाय ॥ आम्ही० ॥ २ ॥ कृष्णाचें पद सोडुनि आम्ही ॥ मुक्ति वरूं हयहाय ॥ आम्ही जाणों हरिचें पाय ॥३॥

पद ३

तूं माझा यजमान ॥ रामा तूं माझा यजमान ॥ ध्रु० ॥ जननी-जठरीं रक्षियलें मज ॥ पोसुनि पंच हि प्राण ॥ रामा तूं०॥ १ ॥ बाहेर निघतां मातेचे स्तनीं ॥ पय केलें निर्माण ॥ रामा तूं० ॥ २ ॥ ऐसें असतां या पोटाची ॥ कां करुं चिंता जाण ॥ रामा तूं० ॥३॥ मध्वमुनीश्वर स्वामि रमा-पति ॥ धरि माझा अभिमान ॥ रामा तूं० ॥ ४ ॥

पद १ ( तुकारामाचे. )

पुरे एकचि पुत्र माय-पोटीं ॥ हरि-स्मरणें उद्धरी कुळें कोटी ॥ध्रु०॥ धन्य वंशीं जन्मला भगीरथ ॥ गंगा आणोनी पूर्वज केले मुक्त ॥ पुरे एक० ॥ १ ॥ गौतमानें आणिली गोदावरी॰॥ आपण तरोनि दुजयासी तारी ॥ पुरे एक०॥२॥ पांचा वर्षांचें ध्रुव बाळ तान्हें ॥ अढळ-पदीं स्थापिलें बहू मानें ॥ पुरे एक० ॥३॥ तेजःपुंज शीतळ सौख्य-दानीं ॥ एक-चंद्र-प्रकाश त्रिभुवनीं ॥ पुरे एक०॥ ४ ॥ पहा कैसा तो पुंडलीक धीट ॥ उभा केला वैकुंठ-नायक ॥ पुरे एकचि० ॥ ५ ॥ रामरूपी जन्मला कीर्तिवंत ॥ अंजनीचे उदरीं हनुमंत ॥ पुरे एक०॥ ६ ॥ तुका म्हणे हरिसी विन्मुख ॥ गांधारीचे उदरीं शत-मूर्ख ॥ पुरे एक० ॥ ७ ॥

पद २

एथें कोणाचें काय बा गेलें ॥ ज्याचें त्यानेंच अनहित केलें॥ ध्रु०॥ संतीं सांगितलें ऐकेना ॥ स्वता बुद्धिही असेना॥ वृत्ति निबरली पिकेना ॥ मूढ कोणाचें ऐकेना ॥ एथें कोणाचें०॥१॥ अन्य यातिचे संगती लागे ॥ साधु-जनामध्यें न वागे॥ केल्यावीण पराक्रम सांगे ॥ जेथें सांगे तेथेंचि भीक मागे ॥ एथें कोणाचें०॥ २ ॥ नीत टाकुनी अनीत चाले ॥ भडभड भलतेंच बोले ॥मंद होउनी उन्मत्त डोले ॥ अखेर फार वाईट झालें ॥ एथें कोणाचें०॥३॥ तुका म्हणे कांहीं नेम ॥ चित्तीं न धरी अधम ॥ सांग पडलासे श्रम ॥ अंतीं कुटील त्यासी यम ॥ एथें को० ॥ ४ ॥

पद ३

पोटापुरतें देई ॥ मागणें लयि नाहीं लयि नाहीं ॥ ध्रु० ॥ पोळी साजुक अथवा शिळी ॥ देवा देई भुकेच्या वेळीं॥१॥मागणें०॥वस्त्र नव अथवा

जुना॥देवा देई अंग भरून॥२॥मागणें० ॥ देवा कळणा अथवा कोंडा ॥ आम्हां देईं भुकेच्या तोंडा ॥ ३ ॥ मागणें० ॥ तुका म्हणे आतां ॥ नका करूं पायापरता ॥ ४ ॥ मागणें लयि नाहीं लयि नाहीं० ॥

## पद ४

ज्याचें सुख त्याला सुख त्याला ॥ काय असे भलत्याला ॥ ज्याचें० ॥ ॥ ध्रु०॥ एक जेवुनि तृप्त झाला॥ एक हाका मारि अन्नाला ॥ १॥ ज्याचें सुख० ॥ एक नदी उतरुनि गेला ॥ एक हाका मारी तारुला ॥ २ ॥ ज्याचें सु० ॥ एक मोक्ष-मार्गी गेला ॥ एक अधोगती चालिला ॥ ३ ॥ ज्याचें सुख०॥ तुका वैकुंठाशीं गेला॥ हाका मारी तो लोकांला ॥ ४ ॥- ज्याचें सुख त्याला सुख त्याला ॥ काय०.

## पद १ ( रामदास. )

धांवरे राम-राया ॥किती अंत पाहासी॥ प्राणांत मांडियेला ॥ नये करुणा कैशी ॥ धांवरे० ॥ ध्रु० ॥ पाहिन क्षणभरी ॥ चरण झाडीन केशीं ॥ नयन शीणले बा॥ आतां केधवां येशी॥ धांवरे०॥१॥मीपण अभिमानी ॥ अंगीं भरियेला ताठा ॥ विषय-कर्दमानें ॥ लाज नाहीं लोळतां ॥ चीळस ऊपजेना ॥ ऐसें झालें बा आतां ॥ धांवरे० ॥२॥ मारुती-स्कंध-भागीं ॥ शीघ्र बैसोनिया यावें ॥ राघवें वैद्य-राजें ॥ कृपा औषध द्यावें ॥ दयेच्या पद्म-हस्तें ॥ माझे शिरीं ठेवावें ॥ धांव०॥३॥ या भवीं रामदास ॥ थोर पावतो व्यथा ॥ कौतुक पाहतोसी ॥काय जानकी-नाथा ॥ दयाळा दीन-बंधो ॥ भक्त-वत्सला आतां ॥ धांवरे राम-राया ॥ ४ ॥

## पद १ ( एकनाथाचे. )

सगुण चरित्रें परम पवित्रें सादर वर्णावीं ॥ सज्जन-वृंदें मनोभावें आधीं वंदावीं ॥ ध्रु०॥ संत-संगें अंतररंगें नाम बोलावें।।कीर्तन-रंगीं देवासन्निध सुखें डोलावें ॥ सगुण चरित्रें० ॥१ ॥ भक्ति-ज्ञानाविरहित गोष्टी इतरा न कराव्या ॥ प्रेम-भरें वैराग्याच्या युक्ति विवराव्या ॥ सगुण च०॥ २ ॥ जेणेंकरुनी मूर्ति ठसावे अंतरिं श्री-हरिची॥ ऐशी कीर्तन मर्यादा हे संताचे घरची ॥ सगुण च०॥३॥अद्वय-भजनें अखंड स्मरणें वाजवि करताळी ॥ एका जनार्दनीं मुक्ती होये तत्काळीं ॥ सगुण चरित्रें० ॥ ४ ॥

# पदें स्फुट.

मर्जी देवाची ॥ मिथ्या धांव मनाची ॥ मर्जी० ॥ ध्रु०॥ मनांत येतें हत्ती घोडे पालखींत बैसावें ॥ देवाजीचे मनांत याला पायीं चालवावें ॥ मर्जी० ॥ १ ॥ लोड तिवाशा नरम बिछाना सुंदर कांता व्हावी ॥ देवाजीच्या मनांत पाठी कर्कशा लावावी ॥ मर्जी० ॥ २ ॥ महाल मुलुखमे पूर्ण खजीना घरांत पैका व्हावा ॥ देवाजीच्या मनांत याला दरिद्री ठेवावा ॥ मर्जी०॥ ३ ॥ बल्लव म्हणे मनांत येतें कांहीं न करावें॥ अहो रात्र सोडुन धंदा देवा आळवावें ॥ मर्जी देवाची ॥ मिथ्या धांव मनाची ॥ मर्जी० ॥ ४ ॥

## पद.

मना कांहिं तुला नाहिं पहा लाज कसी ॥ध्रु॥ पर-कामिनि पर-धनासि ॥ विविध विषय साधनासि ॥ जपसि टपसि मांजरसा ॥ न कळुनिया पडशी फशीरे ॥ मना कांहिं० ॥ १ ॥ निगम-विहित त्यजुन मती ॥ वरिशो स्व-हितार्थ कु-मति॥नेतिल भट यम-सदनीं॥ पडसी मग अभर वसीरे ॥ मना० ॥२ ॥ तिळभरि जरि भूत-दया ॥ बाणेना जरि त्वदया ॥ तरि मग कवण्यादेहीं ॥ श्री-हरिला आवडसीरे ॥ मना कांहि तुला० ॥ ३ ॥ धरुनि सदृढ संत-संग ॥ विठ्ठल-नामींच रंग ॥ आयुर्व्यय व्यर्थ करुनि ॥ पावसि भलत्याच कुशीरे ॥ मना कांहि तुला० ॥ ४ ॥

## पद.

होउनि गोसांवी गोसांवी ॥ हरि-कथाचि परिसावी ॥ ध्रु० ॥ भिक्षा मागुनि निस्पृहतेनें ॥ आपुलीं कुटुंबें पोसावीं ॥ होउनि गोसांवी० ॥१॥ मिळोत कां खंबाळें ॥ अथवा भगवीं ही नेसावीं ॥ होउनि गोसांवी० ॥ २ ॥ स्त्री-पुत्रादिक छळिती ॥ त्यांचीं वचनें सहन करावीं ॥ होउनि गोसांवी०॥३॥ कु-बुद्धि कोणी छळिती ॥ त्यांवरि अमृत-दृष्टी वर्षावी॥ होउनि गोसांवी० ॥ ४ ॥

## पद.

बोलणें फोल झालें ॥ डोलणें वांया गेलें ॥ ध्रु० ॥ चित्तीं विषयांचा अभिलाष ॥ नाहीं विश्रांतीचा लेश ॥ मुखें म्हणे निर्विशेष ॥ पर-ब्रह्म सांचलें ॥ बोलणें० ॥ १॥ श्रवणीं दावी अष्टहि भाव ॥ म्हणे मृगजळवत् हें वाव ॥ कवडी वेंचितांही जीव॥ जाऊं पाहे तळमळुनी॥ बोलणें०-

॥ २ ॥ परोपदेशीं पूर्ण-ज्ञानी ॥ वाहे मत्सर ममता मनीं ॥ नागसुरें तो जैसा फणी ॥ डोले परी विष वदनीं ॥ बोलणें० ॥ ३ ॥ अन्न म्हणतां कोण धाले ॥ शब्दें ब्रह्म कोण झाले ॥ शिकविले बोल बोलें ॥ शुक पक्षी पैं जैसा ॥ बोलणें० ॥ ४ ॥ शिकला नाना-कळा छंद ॥ नाहीं अंतरीं निर्द्वंद्व ॥ सहज पूर्ण निजानंद ॥ सर्व रंगीं न भासे ॥ बोलणें फोल झालें ॥ डो० ॥ ५ ॥

## पद

एक मीच प्रियकर ज्याला ॥ माझें हो आयुष्य त्याला ॥ ध्रु० ॥ कृष्ण म्हणे अर्जुनातें ॥ माझें मद्भक्तांसीं नातें ॥ जैसा मत्स्य जळीं जीवनातें ॥ जीवेंभावें न विसंबे ॥ एक मी० ॥ १ ॥ मज वेगळें दुसरें कांहीं ॥ त्रिभुवनिं जयासि उरलें नाहीं ॥ त्याविण क्षण लव पल मज पाहीं ॥ उदास अनंत ब्रह्मांडें ॥ एक मीच० ॥ २ ॥ इंद्र-पदींचे जे उपभोग ॥ त्याचे दृष्टी ते क्षयरोग ॥ माझे स्वरूपीं अखंड योग ॥ वियोग नाहीं मज त्यासी ॥ एक मीच० ॥ ३ ॥ ऋद्धी सिद्धी मुक्ती चारी ॥ द्वारीं वोळंगति कामारी ॥ देखुनि वांतीचिये परी ॥ अखंड रत हरि-गुरु-भजनीं ॥ एक मीच० ॥ ४ ॥ काया वाचा मना चित्तें ॥ अनन्य भावें भजती मातें ॥ त्यांचा सर्वहि मी अच्युतें ॥ योग-क्षेम वहावा ॥ एक मीच० ॥ ५ ॥ विश्वात्म्याचे आत्मे झाले ॥ पूर्ण निजानंदिं रंगले ॥ त्यांसि म्हणती मेले गेले ॥ ते भ्रांतीचे शिरोमणी ॥ एक मीच प्रियकर ज्याला ॥ माझें हो आयुष्य त्याला ॥ ६ ॥

## पद.

भज रे गोविंदा गोविंदा ॥ सच्चिदानंद-कंदा ॥ सावध होईरे मतिमंदा ॥ न करीं आणिक धंदा ॥ भज रे. ॥ ध्रु० ॥ मोहें भुललासी भुललासी ॥ माझें माझें म्हणसी ॥ क्लेशें मेळविल्या धन-राशी ॥ अंतीं टाकुनि जाशी ॥ १ ॥ भज रे० ॥ गृह-सुत-धन-दारा धन-दारा ॥ मिथ्या मोह पसारा ॥ अंतीं जाशिलरे झरारा ॥ करि कां पूर्ण विचारा ॥ २ ॥ भज रे ० ॥ आयुष्य जातें रे घडिघडि ॥ तुज विषयांची गोडी ॥ काळ पाडिल रे मुरकुंडी ॥ तें तुज कोण सोडी ॥ ३ ॥ भज रे ० ॥ विसरुनि भगवंता भगवंता ॥ करिशिल घरची चिंता ॥ काळ नेइलरे अवचिता ॥ तंव तूं पडशिल भ्रांता ॥ ४ ॥ भज रे० ॥ गुंडाकेशवीं स्थिर राहे ॥ तरीच

तुझी सोय ०॥ पाया लागलिया पैं पाहि ॥ अंतीं मोक्षा जीहि ॥ ५ ॥
भजरे गोविंदा गोविंदा ॥

## पद.

नेदी चित्ता शांति ऐशी विद्या काशाला ॥ नेघे हरिचें नाम ऐशी जिव्हा काशाला ॥ नेदी ० ॥ ध्रु ० ॥ अप्रिय बोलति पतिला ऐशी बाइल काशाला ॥ बाइलिला जो व्यर्थ गांजितो तो पति काशाला ॥ त्हृदयीं कृत्रिम अशांशीं ती मैत्री काशाला ॥ मनचा खोटा फिरोनि शिणला तीर्थें काशाला ॥ १ ॥ नेदी ० ॥ भावाविरहित नर जो त्याला दैवत काशाला ॥ एक धड ना भाराभर त्या चिंध्या काशाला ॥ एक गुणी ना दुर्गुणि बेटे शंभर काशाला ॥ आदर न करी त्याच्या घरचें भोजन काशाला ॥ २ ॥ नेदी ० ॥ गर्वें ताठुनि जाय तयाशीं भाषण काशाला ॥ अभाग्याचें समर्थाशीं वैर काशाला ॥ करणी नसतां ज्ञान व्यर्थ बडबड काशाला ॥ त्हृदयीं षड्रिपु वसती त्याला जप-तप काशाला ॥ ३ ॥ नेदी ० ॥ गुरु-पदिं निष्ठा न धरी ऐसा शिष्या काशाला॥ शिष्याला जो वाइट चिंती तो गुरु काशाला ॥ वाद्या अथवा मैद्या ऐसा सेवक काशाला ॥ भ्र-बोध निर्मळ न करी ऐसा स्वामी काशाला॥४॥ नेदी०॥ प्रीत धरीना सहोदराची ऐसा सोदर काशाला ॥ पोट भरेना जेथें ऐसा देश काशाला॥ हरिकवि बोले सद्गुरु-वचनीं संसृति-पाशाला ॥ छेदीना तो मानव जन्मा आला काशाला ॥ नेदी चित्ता शांति ऐसी० ॥

---

## भूपाळया गणपतीवरच्या.

उठा उठा सकळ जन ॥ वाचे स्मरा गजानन ॥ गौरी-हराचा नंदन ॥ गज-वदन गण-पती ॥ध्रु०॥ ध्यानी आणोनी सु-खमूर्ती॥ स्तवन करीं एकें चित्तीं ॥ तो देईल ज्ञान-मूर्ती॥ मोक्ष-सुख सोज्वळ ॥१॥ जो निज-भक्तांचा दाता॥वंद्य सुर-वरां समस्तां॥त्यासी ध्यातां भव-भय-चिंता॥ विघ्न-वार्ता निवारी॥२॥तो हा सुखाचा सागर॥ श्री-गणराज मोरेश्वर॥ भावें विनवीतो गिरिधर ॥ भक्त त्याचा होऊनी ॥ ३ ॥

## भूपाळी गणपतीवरची.

उठिं उठिं बा मोरेश्वरा ॥ चवदा विद्यांच्या माहेरा॥चतुर्भुजा परशु-करा॥ अंकुशधरा गज-वदना ॥ध्रु०॥ माता बोले शैल-नंदिनी॥योगी उभे अ-

सती अंगणीं ॥ दर्शन द्यावें चिंतामणी ॥ मातःस्मरणीं स्मरती हे ॥ उठीं उठीं बा० ॥ १ ॥ रत्न-जडित सिंहासन ॥ वरी बैसले गजानन ॥ ऋद्धि सिद्धि दासी दोन ॥ करिती चरणसेवेतें ॥ उठिं उठिं बा० ॥ २ ॥ आंगीं सेंदुराची उटी ॥ शोभे चंद्रमा ललाटीं ॥ मुक्ताफळ-हार कंठीं ॥ मुखीं प्रभा फांकतसे ॥ उठिं उठिं बा० ॥ ३ ॥ प्रातःकाळीं ही भूपाळी ॥ योगी ध्याती हृदय-कमळीं ॥ निरंजनी कृपेची सांउली ॥ भक्ताहातीं वदवीली ॥ उठिं उठिं बा मोरेश्वरा० ॥ ४ ॥

## भूपाळी रामावरची.

राम आकाशीं पाताळीं॥ राम नांदे भू-मंडळीं॥ राम योगियांचे मेळीं॥ सर्व काळीं शोभत ॥ ध्रु० ॥ राम नित्य निरंतरी ॥ राम सबाह्य अभ्यंतरीं ॥ राम विवेकाचे घरीं ॥ भक्तीवरी सांपडे ॥ १ ॥ राम भावें ठायीं पडे ॥ राम भक्तीशीं आतुडे ॥ राम ऐक्यरूपीं जोडे ॥ मौन पडे श्रुतीसी ॥ २ ॥ राम योग्यांचें मंडन ॥ राम भक्तांचें भूषण ॥ राम आनंदाचा घन ॥ करी रक्षण दासांचें ॥ ३ ॥

## भूपाळी कृष्णावरची.

उठिं गोपालजी जाइं धेनूंकडे ॥ पाहती सौंगडे वाट तूझी ॥ ध्रु० ॥ लोपली हे निशी मंद झाला शशी ॥ मुनिजन मानसीं तूज ध्याती ॥ १ ॥ भानुउदयाचळीं तेज पुंजाळलें ॥ फुललीं कमळें ऊदकीं हीं ॥ २ ॥ धेनु वत्सें तुला बाहती माधवा ॥ उठिं गा यादवा उशीर झाला ॥ ३ ॥ ऊठ पुरुषोत्तमा वाट पाहे रमा ॥ दावीं मुख-चंद्रमा सकळिकां ॥ ४ ॥ कनक-पात्रांतरीं दीप-रत्नें बरीं ॥ ओंवाळिते सुंदरी तुजलागीं ॥ ५ ॥

## भूपाळी घनश्यामावरची.

घन-श्याम सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला॥ उठिं लौकर वनमाळी उदयाचळीं मित्र आला ॥ ध्रु० ॥ सायंकाळीं एके मेळीं द्विज-गण अवघे वृक्षीं ॥ अरुणोदय होतांच उडाले चरावया पक्षी ॥ अधमर्षणादि करुनि तपासी तपाचरण-दक्षी॥प्रभातकाळीं उठुनि कापडी तीर्थ-पंथ लक्षी ॥ करुनि सडासंमार्जन गोपी कुंभ घेउनि कुक्षीं ॥ यमुना-जळासि जाती मुकुंदा दध्योदन-भक्षी ॥ चाल ॥ मुक्तता होऊं पाहे, कमळिणीपासुनी

भ्रमरा ॥ पूर्वदिशे मुख धुतलें, होतसे नाश तिमिरा ॥ उठिं लौकरि गोविंदा, सांवळ्या नंद-कुमारा ॥ चाल ॥ मुख-प्रक्षाळण करीं अंगिकारीं भाकरकाला ॥ उठिं लौकर वनमाळी० ॥ १ ॥ घरोंघरीं दीप अखंड,त्यांच्या सरसावुनि वाती ॥ गीत गाती सप्रेमें गोपी सदना येति जाती ॥ प्रवर्तोनि गृह-कामीं रंगावळि घालू पाहती॥अमंद-कंदा प्रभात झाली, उठ सरली राती॥ काढि धार क्षिर-पात्र घेउनी धेनु हंबरती ॥द्वारिं उभे गोपाळ हाक मारुनि तुजला बाहती॥ चाल॥हे मुक्ता-हार कंठीं, घालि या रत्न-माळा॥हतीं वेत्रयष्टि बरवी, कांबळा घेइं काळा॥ ममात्मजा मधुसुदना, त्दृषिकेशी जगत्पाळा ॥ चाल॥ लक्षितातिवासुरें हरि धेनु स्तन-पानाला ॥ उठिं लौकर वनमाळी उदयाचळीं० ॥२॥ प्रातःस्तानें करुनि गोपिका अळंकारें नटती॥कुंकुमादि चर्चुनी मंथनालागिं आरंभिती ॥ प्रेम-भरित अंतरांत वदनीं नामावळि गाती॥ अर्घ्य-दान देउनिया द्विज-गण देवार्चन करिती॥नेमनिष्ठ वैष्णव ते विष्णु-पूजा समार्पितीं ॥ स्मार्त शिवार्चन-सक्त शक्तितें शाक्तहि आराधिती ॥ चाल ॥ ऋषि-गण आश्रमवासी, जे निरंजनीं धाले॥अरुणोदयिं आपुलाले, ध्यानीं निमग्न झाले ॥ पंच पंच उषःकालीं, रवि-चक्र निघों आलें ॥ चाल॥ येवढा वेळ निजलासि म्हणुन हरि समजेल नंदाला ॥ उठिं लौकर० ॥ ३ ॥ विद्यार्थी विद्याभ्यासास्तव सादर गुरु-पायीं ॥ अध्यापन गुरु करिती शिष्यहि अध्ययना उदयीं॥ याज्ञिक-जन कुंडामधि आहुति टाकितात पाहीं ॥ रवि-प्रभा पडुनिया उजळल्या शुद्ध दिशा दाही ॥ हे माझे पाडसे सांवळे ऊठ कृष्णाबाई ॥ सिद्ध सर्वे बळिराम घेउनि गोधनें वना जाई ॥ चाल ॥ मुनि-जन-मानस-हंसा, श्री-मनः-कमल-भृंगा ॥ मुरहर पंकज-पाणी, पद्म-नाभ श्री-रंगा ॥ शकटांतक सर्वेशा, हे हरि प्रताप-तुंगा ॥ चाल ॥ कोटि रवींहुनि तेज आगळें तुझिया वदनाला ॥ होनाजी बाळ नित्य ध्यातसे, त्ददयिं नाम-माळा ॥ घन-श्याम सुंदरा श्रीधरा अरुणो० ॥ ४ ॥

## आरती गणपतीवरची.

सुख-कर्ता दुख-हर्ता वार्ता विघ्नाची॥ नुरवी पुरवी प्रेम कृपा जयाची॥ सर्वांगीं सुंदर उटि शेंदुराची ॥ कंठीं झळके माळ मुक्ताफळांची ॥ १ ॥ जय देव जय देव मंगल-मूर्ती ॥ दर्शनमात्रें मनःकामना पुरती ॥ध्रु०॥

रत्न-खचित फरा तुज गौरी-कुमरा॥ चंदनाची उटी कुंकुम-केशरा,॥ हिरें-जडित मुगुट शोभतो बरा ॥ रुणझुणती नूपुरें चरणीं घागरिया ॥ जय देव० ॥ २॥ लंबोदर पीतांबर फणि-वर-बंधना ॥ सरळ सोंड वक्र-तुंड त्रि-नयना ॥ दास रामाचा वाट पाहे सदना ॥ संकटीं पावावें निर्वाणीं रक्षावें सुर-वर-वंदना ॥ ३ ॥ जय देव० ॥

## आरती पांडुरंगावरची.

युगीं अठाविसीं विटेवरी उभा ॥ वामांगीं रखुमाई दिसे दिव्य शोभा ॥ पुंडलिका भेटी पर--ब्रह्म आलें गा॥ चरणीं वाहे भीमा उद्धरी जगा ॥१॥ जय देव जय देव जय पांडुरंगा रखुमाई-वल्लभा पावें जिवलगा ॥ध्रु०॥ तुळशी-माळा गळां कर ठेवूनि कटीं ॥ कांसे पीतांबर कस्तुरि लल्लाटीं ॥ देव सुर--वर नित्य येती भेटी ॥ गरुड हनूमंत पुढें उभे राहती ॥ २ ॥ जय देव० ॥ आषाढी कार्तीकी भक्तजन येती॥ चंद्रभागेमाजी स्नानें जे करिती ॥ दर्शन हेळामात्रें तयां होय मुक्ती ॥ केशवासी नामदेव भावें ओंवाळिती ॥ ३ ॥ जयदेव० ॥

## आरती देवीवरची.

दुर्गे दुर्घट भारी तुजविण संसारीं॥ अनाथ-नाथे अंबे करुणा विस्तारी॥ वारी वारी जन्म-मरणातें वारीं ॥ हारीं पडलों आतां संकट निवारीं॥ ॥१॥ जय देवी जय देवी महिषासुर-मथिनी॥ सुरवर-ईश्वर-वरदे तारक संजिविनी ॥ ध्रु० त्रिभूवन-भवनीं पाहतां तुज ऐशी नाहीं ॥ चारी श्रमले परंतु न बोलवे कांहीं ॥ साही विवादितां पडले प्रवाहीं ॥ ते तूं भक्तालागीं पावसि लवलाहीं ॥ २ ॥ जय० ॥ प्रसन्न वदनें प्रसन्न होसी निज-दासा ॥ क्लेशापासुन सोडीं तोडीं भव-पाशा ॥ अंबे तुजवांचून कोण पुरवील आशा ॥ नरहरि तल्लीन झाला पद-पंकज-कोशा ॥३॥ जय देवी०॥



# त्या ग्रंथांतील कठिण शब्दांचा कोश.



अ.

अंक-मांडी. २ चिन्ह. ३ एक, दोन इ० प्रत्येक.
अकिंचन-निर्धन, भिकारी.
अक्रिय-जें कांहीं करीत नाहीं तें, क्रियाशून्य.
अखिल-सर्व.
अग-पर्वत, डोंगर,
अगद-औषध.
अगम्य-जाणतां येत नाहीं असें.
अंग-खरेपणा, स्वरूप.
अंगद-बाहुभूषण.
अग्रज-वडील भाऊ.
अगाध-खोल, अपार.
अगार-घर.
अंगार-निखारा.
अंगुलिभंग-बोटें मोडणें.
अघ-पाप.
अघवाही-पापी.
अघोर-एक गोसाव्याची जात आहे. हे लोक घाणेरडे आणि भयंकर असून नागवे फिरतात, आणि उजवे हातांत मलमूत्रानें भरलेली मनुष्याची करटी घेतात आणि डावे हातांत निखाऱ्याचें खापर घेतात.
अंघ्रि-पाय.
अचक्षु-अंध. २ धृतराष्ट्र.
अचाट-अद्भुत, मोठें.
अज-ज्याला जन्म नाहीं असा. विष्णु. २ ब्रह्मदेव.
अजंगम-न चालणारें झाडें वगैरे.
अंजन-काजळ, नेत्रौषध.
अजांड-ब्रह्मांड.
अजातरिपु-ज्याला शत्रुनाहींत असा-धर्मराजा.
अजातारि-अजात-शत्रु; धर्मराज
अजितत्व-अजिंकपणा.
अजितनाम-ईश्वराचें नाम.
अंजित-ज्यांत अंजन घातलें आहे तो.
अजिन-चर्म, कातडें.
अजिर-अंगण.
अटन-फिरणें.
अटापिटा-आटापिटा हा शब्द पहा.
अडवी-अटवी, अरण्य, रान.
अढळ-अचल, स्थिर.
अणु-अल्प, थोडें.
अतर्क्य-ज्याविषयीं कल्पना करतां येत नाहीं असें.
अंतरंगीं मनांत.
अंतराय-विघ्न. २ यम.
अंतराल-आकाश.
अंतरीं-मनांत, हृदयांत.
अंतरिक्ष-पोकळी.
अंतरीप-बेट.

अंतरीपयुगीन-द्वीपतुल्य.
अंतर्हित-गुप्त.
अतिकाळ-बहुकाळ.
अतिक्रम-मर्यादा उल्लंघून जाणें,
अतिपात-भंग, नाश-अमर्यादा, उल्लंघन.
अतिमात्र-अत्यंत, बहुत, गाढ.
अतींद्रियद्रष्टा-इंद्रियास समजत नाहीं तें पाहणारा.
अंतुरी-स्त्री, जाया, बायको.
अंत्यज-अतिशूद्र.
अंत्रपाट-अंतःपट.
अत्रि-एक ऋषि.
अदभ्र-बहुत.
अदंभित्व-दांभिकपण नव्हे तें.
अदिति-कश्यपऋषीची स्त्री व देवांची आई.
अंदुक-हत्तीच्या पायांतली बिडी, साखळदंड.
अदृष्ट-दैव.
अद्रि-पर्वत.
अधर-ओंठ.
अधिन-वश.
अधिष्टान-स्थान
अधिष्ठिली-आक्रमिली.
अध्वर-यज्ञ.
अध्वांग-अध्वंग-ज्याचें अंग अधु आहे तो.
अनंत-अंत नाहीं तो.
अनन्य-ज्यास दुसरा नाहीं तो एकटा. २ अगतिक, अनन्य भावानें भजणारा.
अनर्घ्य-अमूल्य.
अनव-जीर्ण, वृद्ध, जुना.
अनवरत-निरंतर.
अनवसर-अप्रसंग.
अनवसरीं-असमयीं.
अनळ-अग्नि.
अनसूयासुत-दत्तात्रेय.
अनाथवाणी-अनाथासारखा. २ दीनवाणी.
अनाद्यंत-ज्याला आदि नाहीं व अंत नाहीं असा, ईश्वर.
अनार्या-हे दुष्टा.
अनिर्देश्य-अमुक म्हणून सांगतां येत नाहीं ते.
अनुकंपा-दया.
अनुकंप्य-दया करण्यास योग्य.
अनुज }
अनुजनि }-धाकटा भाऊ.
अनुबिंब-प्रतिबिंब.
अनुरक्त-प्रेमानें आसक्त.
अनुराग-प्रीति, प्रेम.
अनुरूप-योग्य.
अनुवादावें-सांगावें, बोलावें.
अनुवादे-सांगे, बोले.
अनृत-खोटा, असत्य.
अन्यतम-बहुतांतून कोणताही एक.
अन्वय-संबंध. २ वंश.
अन्वित-युक्त.
अपरूप-अपूर्व, अदृष्टपूर्व.
अपरोक्ष-समक्ष, प्रत्यक्ष.
अपर्णा-पार्वती
अपर्णापति-सदाशिव.
अपसद-दुष्ट.
अपांपति-समुद्र.
अपेक्षा-इच्छा.
अप्सरा-देवांगना.

अप्रमेय-जें जाणण्यास कठिण तें.
अंबक-डोळा.
अंबर-आकाश. २ वस्त्र.
अबळा-स्त्री.
अबाधित-बिनहरकत.
अंबिका-माता. २ पार्वती.
अंबु-पाणी.
अंबुज-कमल.
अब्जज-ब्रह्मदेव.
अब्जिनी-कमलिनी.
अब्द-मेघ. २ वर्ष.
अभद्र-अशुभ.
अभिनय-हावभाव.
अभिनव }
अभिन्नव } -नवीन
अभिराम-सुंदर.
अंभोज-कमल.
अंभोद-मेघ.
अंभोरुह-कमळ.
अभ्र-मेघ.
अभ्रमु-ऐरावताची स्त्री.
अमर-देव.
अमरतरु-कल्पवृक्ष.
अभिज्ञ-जाणता.
अमित }
अमूप } -पुष्कळ.
अमृतकर-चंद्र.
अमोघ-सफल.
अय-लोखंड.
अयन-जाणें, गमन. २ मार्ग.
अरुण-रक्तवर्ण. २ सूर्यसारथि.
अरुवार-मृदु, कोमळ; रवाळ.
अरुष-आर्ष, वेडेवांकडे.
अर्क-सूर्य. २ रुईचें झाड.
अर्की-रुईचें झाड.
अर्जणें-संपादणें.
अर्णव-समुद्र.
अर्थ-पैसा, द्रव्य.
अर्थिला-अर्थी, याचक.
अर्भक-लहान मूल.
अलक्ष-क्ष्य-अतर्क्य, दुर्लक्ष्य.
अलंघ्य-उल्लंघण्यास अयोग्य किंवा कठिण.
अलाबू-भोपळा.
अलि-भ्रमर. २ पंक्ति.
अलिक-कपाळ.
अलिनी-भ्रमरी.
अलिप्त-जो लिप्त नाहीं तो.
अलोट-मोठें, अचाट, अनिवार.
अवकळा-दुश्चिन्ह, नीचकला.
अवगत-ठाउकें.
अवगाहिला-जाणिला, वर्णिलेला.
अवंचक-वंचक नव्हे तो, खरा.
अवचट-अवचित.
अवचितां-अकस्मात.
अवतरण-उतरणें.
अवतीर्ण-ज्यानें अवतार घेतला आहे तो.
अवतंस-भूषण.
अवथिलें-योजिलें.
अवदान-हविर्भाग.
अवधारा-ऐका.
अवन-रक्षण.
अमरावती-इंद्राची नगरी.
अवलोक-दृष्टि.
अवलिळा-सहजांत, लीलेनें.
अवनत-नम्र, आज्ञाधारक.
अवनी-पृथ्वी
अवलंब-स्वीकार, आश्रय.

अवसर-समय, प्रसंग.
अवहार-पसरलेल्या सैन्यादिकां चा आटोप.
अव्हांटें-आडमार्गानें.
अव्हेर-तिटकारा २ हेळसांड.
अवाङ्मुखी-खालीं पहाणारी.
अवारित-निवारल्यावांचून.
अवि } -मेंढा.
अवी }
अविद्या-माया, अज्ञान.
अवो-अरे, अगे.
अंश-विभाग.
अशन-भोजन, खाणें.
अशनि-वज्र.
अशरीरवाणी } -आकाशवाणी.
अशरीरिणी }
अशिव-अकल्याण.
अशुद्ध-रक्त.
अशेष-संपूर्ण.
अश्रु-आसवें, नेत्रोदक,
अष्टभाव-निश्चेष्टता, बेशुद्धि (इंद्रियज्ञानशून्यता) रोमांच उभे राहणें, घाम येणें, मुखाचें वैवर्ण्य, कंप असणें, अश्रु येणें, स्वर बदलणें.
असकृत्-वारंवार.
असकें-सर्व.
असती-जारिणी, व्यभिचारणी. २ अपकीर्ति. ३ खोटी, असत्य.
असंभावनी-संभव नाहीं अशी, किंवा अतर्क्य.
असाधुवाद-दुर्भाषण, निंदा.
असाध्य-न होण्याजोगें.
असाध्वस-निर्भय.
असांवली } -अश्रुयुक्त झाली.
असांरली }
असित-नीलवर्ण, काळा.
असितपथ-अग्नि, कृष्णवर्त्मा.
असिपत्र-तरवारीचें म्यान.
असिवार-खड्गधर, पदाती.
असीपत्र-तरवारीचें पान.
असीपत्रवन-एक नरक आहे, ह्यांत झाडाच्या पानाला तरवारीसारखी धार असते.
असु-प्राण.
असुख-दुःख.
अस्रू-अश्रु, नेत्रोदक.
असूया-हेवा, मत्सर, ईर्षा.
असोशी-हव्यास, अति इच्छा.
अस्तमित-अस्तास गेलेला.
अस्त्र-शस्त्र. मंत्रप्रयोगानें सोडण्याचें शस्त्र.
अस्त्रतति-शस्त्रांचा समूह.
अहंकृति-अहंकार.
अहंमति-अहंकार.
अहर्निशीं-रात्रंदिवस.
अहिवर-सर्पांत श्रेष्ठ, कालिया.
अहेव-सुवासिनी.
अहेवतंतू-सौभाग्यसूत्र.
अहेवपण-सौभाग्य, अवैधव्य.
अळुमाळ-थोडथोडा, थोडासा.
अक्ष-फांसा.
अक्षम-असमर्थ.
अक्षत-तुटलें फुटलें नाहीं तें.
अक्षर-जो नाश पावत नाहीं तो, स्थिर, निश्चळ, न ढळणारा.
आकण-कणसें एकदां तुडवून काढलेलें धान्य, मातेरें, खडामाती.
आकर्णन-ऐकणें, श्रवण.

आकळावा-जाणावा.
आकळे-समजे, जाणे. २स्ववश होई.
आकळेना-समजेना. २वश होईना.
आकांक्षीना-इच्छीना.
आक्रंदती-ओरडती.
आक्रोशावें-बोलावें, वदावें.
आखंडल-इंद्र.
आखु-उंदीर.
आख्या-नाम.
आग-अपराध.
आगम-शास्त्र.
आगमन-येणें.
आंगठसा-आंगवठा हा शब्द पहा.
आंगवठा-शरीराचा बांधा.
आंगवण-शक्ति. २ खोड, छंद.
आगळा / आगळें -अधिक.
आगा-घर, स्थान. २ अरे
आगार-घर, स्थान.
आगीं-अग्रभागीं.
आंगीं-स्वतः
आंगोळी-बोट.
आघवें-सर्व, अवघें.
आचार्य-गुरु.
आजी-युद्ध. २ आज.
आज्य-तूप.
आटणी-मिश्रण.
आटाआटी-प्रयास, श्रम, खटपट.
आटापीटा-तसदी, खटाटोप.
आटी-खटपट.
आटीं-अरण्यांत.
आटोप-डौल.

आठव / आठवण -स्मरण.
आडळ-आडणूक, अडचण.
आड पडे-मागें पडे.
आढ्य-धनिक.
आणिक-दुसरें, निराळें.
आततायी-अविचारानें दुसऱ्याच्या प्राणादिकांचें हरण करणारा.
आत्त-गृहीत, घेतलेला.
आतप-उष्ण.
आतर-नोर, नावेचा उतार.
आतळणें-स्पर्शणें.
आतिथ्य-पाहुणचार.
आतुडलें-समजलें. सांपडलें.
आतुडे-प्राप्त होय. २ सांपडे, मिळे.
आतुर-मरणोन्मुख. २ उत्सुक.
आतुर्बळी-अतिबळी, बळकट.
आत्मचर्चा-आत्म्याविषयीं विचार.
आत्मज-पुत्र.
आत्मजा-मुलगी, कन्या.
आत्मविद्या-आत्मज्ञान, ब्रह्मज्ञान.
आत्महत्या-आपला आपण जीव घेणें. २ आपण आपणास न जाणणें.
आत्मज्ञानी-आत्मा म्हणजे ब्रह्म तें जाणणारा.
आथी-आहे.
आदर-सत्कार.
आदर्श-आरसा.
आदळला-पावला.
आदिठाणें-मूळपीठ.
आदिशक्ति-मूळशक्ति.

आंदुवाचे-वीळयाचे.
आधि-मनाची व्यथा, २ दुःख.
आग-अन्य. २ भिन्न, दुसरें.
आनकदुंदुभि-वसुदेव.
आनन-मुख.
आपगा-नदी.
आपगिता-सांभाळणारा.
आपद-दुःख, विपत्ति.
आपन्ना-दुःखी.
आपपर-स्वकीयपरकीय.
आप्त-संबंधी. २ सत्यवक्ता.
आपैसा-आपांआप.
आफळी-आपटी.
आभास-कांहींसा भास, भ्रांति.
आमय-रोग.
आमलक-आंवळा
आमा-रतन.
आमुष्मिक-परलोकसंबंधी.
आम्नाय-वेद.
आर्त-दुःखसूचक.
आयती-दीर्घ, विस्तीर्ण.
आयस-लोखंड.
आराणुक-वेळ, फुरसत, शांति, सुख.
आरामवाटी-बाग.
आरुष-आर्ष,छांदिष्ट.२असमंजस. ३ असंबद्ध.
आरूढ-वर चढलेला.
आरोह-कमर, नितंब.
आर्जव-सरळपणा.
आर्त-दुःखसूचक.
आर्ती / आर्त } -आवड..
आर्तें-आवडीनें.
आर्या-स्त्री. सभ्य.
आलवाल-आळें.
आलाप-भाषण.२गाण्यांतलाआलाप.
आलापणें-बोलणें. २ गाणें.
आलाबु-भोपळा.
आली-सखी. २ पंक्ति.
आव-धैर्य. २ डौल.
आवरण-कुंपण. आच्छादन-संयमन.
आवृत-वेष्टित.
आवाका-धैर्य.
आवास-राहणें.२ राहण्याचीजागा.
आव्हा-नाम.
आव्हाटें-पसारा. २ आडमार्गानें.
आव्हेरिजे-टाकिजे.
आश-आशा.
आशय-मनोरथ. अभिप्राय.
आशा-दिशा. २ इच्छा.
आशी-आशीर्वाद.
आस्य-तोंड, मुख.
आहव-युद्ध.
आहाळणें-पोळणें. २ खळबळणें.
आहे-ज्वाळा.
आळ-ळी-ळा, हट्ट.
आळविणें-कळवळा उत्पन्नकरणें.

## इ.

इजारा-मक्ता.
इंगित-लक्षण, अभिप्राय.
इठाण-स्थान.
इंदिरा-लक्ष्मी.
इंदिरावेषें-लक्ष्मीवेषानें.
इंदीवर-कमळ.
इंद्रियग्राम-इंद्रियसमुदाय.
इंदु-चंद्र.
इभ-हत्ती.

इभि-हत्तीण.
इषु-बाण.
इसाळ-ब्रह्मराक्षस.
इक्षु-ऊंस.
इंद्रजाल-गारुड.
ईशान-शंकर.

उ.

उक्त-बोललेलें. २ भाषण.
उगला-उगाच,निमूटपणें.
उगवून-उलगडून.
उगाणा-उलगडा झाडा, गणना.
उचंबळणें-भरून सांडणें.
उचित-योग्य.
उच्चैःश्रवा-इंद्राचा घोडा.
उज-सरळ,सरळपणें.२पुनःफिरून.
उजाळे-प्रकाश, शुभ्रता.
उटज-पर्णकुटी.
उठाउठी-सत्वर, लवकर, लागली च.
उठाठेवी-रिकामी चौकशी, खटपट.
उठाणें-उत्थान. २ तरंग.
उडु-नक्षत्र.
उडुप-चंद्र.
उणीव-न्यूनत्व.
उत-अथवा.
उतटली-भरली.
उतटिला-उकलिला.
उतला-माजैला.
उत्कट-अतिशयित. मोठें.
उत्तमर्ण-सावकार.
उत्तमांग-मस्तक, डोकें.
उत्तरापति, उत्तरावर-अभिमन्यु.
उत्तराशेला-उत्तरदशेला.
उत्तरीय-शेला, अंगवस्त्र.
उत्तीर्ण-ऋणमुक्त.
उत्पल-कमल.
उत्सव-आनंद.
उदग्र-उंच. २ ज्याचें अग्र वर आहे तो.
उदंड-पुष्कळ.
उदरंभर-पोटभरणारा.
उदश्रु-रडणारा.
उदेणें-उदय पावणें. २ उद्भवणें
उद्देशें-हेतुनें, कारणानें.
उद्धार-मुक्ति. २ वर काढणें.
उद्यम-उद्योग.
उद्यान-बाग, उपवन.
उद्विग्न-उतावीळ, विव्हल.
उद्वेग-मनाची अस्वस्थता.
उद्भट-मोठा.
उन्मन-विरक्त.
उन्मूलन-उपटणें.
उपकरण-साहित्य.
उपचार-आदर.
उपतिष्ठे-उत्पन्न होई.
उपरति-वैराग्य.
उपरम-शांति.
उपरमे-सुख पावे.
उपराग-ग्रहण.
उपरि-मस्तकावर. २ वर.
उपवन-बाग.
उपाधि-पदार्थाच्या स्वरूपांत भेद करणारा किंवा भासविणारा अन्य पदार्थ किंवा त्याचा संबंध.
उपानह-चर्मी जोडा, पैजार.
उपायन-भेट, नजराणा.
उपायांतर-अन्य उपाय-
उपाव-उपाय.
उपासना-सेवा.

उपास्ति-उपासना.
उपेगा-उपयोगाला.
उपेक्षा-हयगय, औदासिन्य.
उफळतां-उडतां.
उफाळलें-उद्भवलें.
उबगणें-उपेक्षणें. २ त्रासणें, कंटाळणें.
उभय-दोन्ही.
उभविती-उभारिती.
उभरून }
उभारून } -उचलून.
उभारी-उंचली.
उभासे-दिसे.
उभेठाती-उभे राहतो.
उमस-दम, विसांवा.
उमगून-शोधून.
उमा-पार्वती.
उमाणें-मोजणें.
उमाळा-उद्भव. हुंदका, लोट.
उमोप-पुष्कळ.
उरकोन-करून, आटपून,
उरग-सर्प.
उरण-मेंढा.
उरी-अवशिष्ट, बाकी.
उरोज-स्तन.
उर्वी-पृथ्वी.
उलूक-घुबड.
उल्हाटी-उलटी.
उसंत-विश्रांति.
ऊर्ध्वरेता-ब्रह्मचारी.
ऊन-उणे, कमी.
ऊर्वरित-उरलेले, शेष.
ऊर्मिला-लक्ष्मणाची बायको
ऊर्मी-उकळी, गर्व.

ऋ.

ऋतुदान-रति.
ऋतुमती-ऋतु प्राप्त झालेली स्त्री.
ऋत्विक-यज्ञक्रियेस साह्य करणारा.

ए.

एकनिष्ठ-ईश्वरपरायण.
एकसरें-एकदम. २ एकच मोठा लांब इ०
एकाकी-एकटा.
एणांक-चंद्र.
एणी-हरिणी.
एन-पातक
एनस-पातक.
ऐना-आरसा.

ओ.

ओक-घर, स्थान.
ओखटा-वाईट.
ओगरणें-वाढणें.
ओगरू-वाढणारा.
ओतु-बोका.
ओढवणें-पुढें करणें.
ओपणें-देणें. २ विकणें. ३ स्वाधीन-करणें.
ओसंग-मांडी.
ओसंडोन-सांडून.
ओसर-एकीकडे हो.
और्व-वडवानल.
अंचल-पदर.

क.

कई }
कयीं } -कधीं.
कच-केश. २ बृहस्पतीचा मुलग.
कंज-कमल.
कज्जल-काजळ.
कट-हत्तीचें गंडस्थळ

कटक-सैन्य. २ कडें. ३ कडा.
कटकटा-हाय हाय.
कटायी-कढई.
कटाक्ष-दृष्टिपात.
कटाक्षप्रेक्षण-वाकड्या डोळ्यानें सप्रेम पाहणें.
कंठी-घालवी.
कठोर-कठिण.
कडगें-वांकी भूषणें.
कडवा-वि-वे-क्रूर.
कडसणी-विचार.
कडे-एकीकडे.
कढेंत-कढईत.
कण-रज. २ खडा.
कणव-वा-दया.
कणसा-रजासारखा. २ खड्यासारखा.
कणवाळपणें-कृपाळूपणानें.
कणिका-कणी.
कतक-निवळीचें बीं.
कतबा-खत.
कंथा-गोधडी.
कथालाप-वर्णन.
कथिका-कढी.
कदन-युद्ध. २ मारणें.
कदम-पाउल.
कदंब-कळंबाचें झाड. २ समूह.
कदर्थले-अवमानिले.
कदली-केळ-
कंदर्प-मदन.
कदर्यु-कृपण.
कंदुक-चेंडू.
कनकबीज-धोतऱ्याचें बीं.
कनकलतिका-सुवर्णाची वेल.
कनवाळ-कृपाळू.

कपाटीं-गुहेंत.
कपि-पी-वानर, मारुता.
कंपिततनु-ज्याच्या अंगाला कांप सुटला आहे तो.
कपिध्वज-अर्जुन.
कबंध-मस्तकावांचून शरार, धड-
कबरी / कबरीभार } -वेणी.
कंबु-शंख.
कमचा-काठी.
कमनीय-सुंदर.
कमळा-लक्ष्मी.
कमळापति-विष्णु.
कर-हात. २ सोंड. ३ किरण. ४ खंडणी.
करकर-कटकट.
करंटा-कृपण, हतभाग्य.
करटी-गज, हत्ती.
करंडक-करंडा.
करणीचा-खोटा.
करपुष्कर-शुंडाग्र. २ हस्तकमळ.
करबाडे-कडबा.
करवाल-तरवार.
करवीर-कण्हेर.
करा-मडकें.
कराळ-भयंकर.
करिता- गजत्व, गजपणा.
करी-हत्ती.
करुण-करुणरस. २ दयार्द्र.
करुणांबुद-दयेचा मेघ.
कर्णिका-कमलांतील गड्डा.
कलंकी-लांछनयुक्त.
कलगी-मोत्यांचा अ० जडावाचा पागोट्यांत खोंचण्याचा डागिना.

कलत्र-स्त्री, बायको.
कल्पांत-जगत्प्रलय, ब्रह्मदेवाचा एक दिवस आणि रात्र. हा काळ मनुष्याचे ४३२००००००० वर्षांचा होय.
कलभ-हत्तीचा छावा.
कलभंड-भांडखोर.
कलशजनित, कलशसंभव, कलशोद्भव -अगस्ति मुनी.
कलाप-मयूरपिछ, २ समुदाय.
कलि-ळी-कज्जा. २ कलियुग. ३ दुष्ट.
कलिका-कळी.
कलिल, कलुषित -गढूळ.
कलेवर-शरीर.
कल्लोळ-मोठी लाट.
कवइता-कवन कर्ता, कवि.
कवच-चिलखत.
कवडा- एकपक्षी ( अशुभ सूचक )
कवळ-घांस.
कवळिती-आलिंगिती.
कवि--शुक्राचार्य; ज्ञाता.
कविजा-शुक्रकन्या देवयानी.
कविहीर-कविश्रेष्ठ.
कश्यप-सप्तऋषींपैकीं एक.
कशा-चाबुक,
कशो-कांचणी.
कसणें-बांधणें.
कसा-कसोटीस लावा.
कल्हार-कमळ.
कल्होळ-लाटा.
कळानिधि-चंद्र.

काइसेनें-कशानें ही.
काई-काय.
काग-कावळा.
काचा-कच्चा.
काचावला-कचरला.
काज-कार्य.
काजरा-कुचल्याचें झाड.
काजळी-जंग. २ डाग.
कांजो-पेज.
काटला-मळला.
कांड-ब्रह्मांड.
कांडून-नाडून, त्रासदेऊन, जुलूम करून.
कांत-पति. २ सुंदर.
कातर-भितरा.
कांता-बायको, सुंदरी.
कातिया-शस्त्र.
कानकोडें-चोरटें.
कानन-वन, अरण्य.
कापडी-यात्रेकरू.
काम-इच्छा. २ मदन.
कामद-इच्छा पुरविणारा.
कामना-इच्छा, वासना.
कामारि-शंकर. चाकर.
कामित-इच्छिलेलें,
कापासराशि-कापसाचा ढीग.
काय-शरीर.
कार्यवादु-कामापुरतें गोड बोलणारा.
कार्याकारण-कारणपरत्वें. २ जितक्यास तितकें.
कारा-बंदिशाळा, तुरुंग.
कालाही-काळसर्प.
कालिंदी-कलिंद पर्वतांतून निघालेली-यमुना.

काव्य-शुक्राचार्य.
काश्यप-कण्व ऋषि.
कांस-कांसोट्या. २ आश्रय.
कासयाची-कशाची.
कासर-महिष, रेडा.
कासार-सरोवर.
कासाविस-दुःखित.
काळकूट-विष.
काळवखें-काळोख,
काळासर्प-काळियासर्प.
किंकरी-दासी.
किंच-आणखी.
किण-घट्टा.
कितव-दुष्ट,कपटी,ठक,२द्यूतकार.
किरात-कोळी, पारधी.
किरी-डुकर.
किरीट-मुगुट.
किरीटी-अर्जुन.
किशोर-मूल.
किष्किंधा-सुग्रीवाची नगरी.
कीटक-किडा.
कीर-रावा. २ निश्चयें.
कीरवाणी-शुकवाणी.
कीलवाणी-केविलवाणा.
कीर्तिला-वर्णिला.
कीला-अग्निज्वाला.
कीश-वानर.
कुचर-( मूग, हरभरे वगैरेचा ) न भिजणारा, न शिजणारा दाणा.
कुचैला-वाईट वस्त्र नेसलेली.
कुच्या- ढोण शिरा.
कुचुंबेल-दुखवेल.
कुंजर } -गज
कुंजरु }
कुटज-कुड्याचें झाड.
कुटिल-वांकडा. २ कपटी.
कुठार-कुऱ्हाड-वाईट.२ वांकडा. ३ खोटा.
कुडी } -देह.
कुडें }
कुंडल-कर्णभूषण,
कुंत-भाला.
कुंतळ-केश.
कुत्सा-निंदा.
कुऱ्हा-अकस, चुरस.
कुंभिणी } —पृथ्वी.
कुंभिनी }
कुंभिनीपाळ-पृथ्वीपति.
कुंभीपाक-एक नरक आहे.येथें पातक्यास मडक्यांत घालून शिजवतात.
कुमुद-कमळ.
कुमुदिनी-चंद्रविकासी कमलाची वेल.
कुरंग-हरिण.
कुरवंडणें-ओंवाळणें.
कुरवंडी-आरती, ओंवाळणी.
कुरव-केंस.
कुरुकुल-कौरववंश.
कुरुगुरु-कौरवांचा गुरु,द्रोणाचार्य.
कुलगिरि-भारतवर्षांतील मुख्य ७ पर्वत. त्यांचीं नावें-महेंद्र,मलय, सह्य, शक्तिमान, गंधमादन, विंध्य व पारियात्रक.
कुलज-कुलीन.
कुलाल-कुंभार.
कुलिश-वज्र.
कुलिशपाणि-इंद्र.
कुवलय--चंद्रविकासी कमळ. २ भूमंडळ.

कुश-दर्भाची एकजात आहे.
कुशली-खुशाल.
कुशस्थली-द्वारकापुरी.
कुश्मल-कुत्सित.
कुश्मीळ-दुर्गंधी.
कुसरी-चतुराई.
कुसुम-फूल.
कुसुमचाप-मदन.
कुहु-आमावास्या.
कुलपति-कुळपुरुष,कुलांतील-मुख्य
कुक्षि-कूस.
कुच्या-ढुस्से, गुच्चे.
कूजंति-गातात, शब्द करितात
कूट-पश्चात् निंदा.
कूप-आड.
कूर्पर-कोंपर.
कृतांत-यम.
कृतांतभगिनी-यमुना नदी.
कृतार्थ-धन्य.
कृत्तिवासा-कातडें धारण करणारा. शिव.
कृत्या-पिशाची.
कृप-कृपाचार्य-द्रोणाच्या बायकोचा भाऊ.
कृशान-अग्नि.
कृशोदरी-सिंहकटी स्त्री.
कृष्णा-द्रौपदी. २ यमुना.
कें-काय.
केउतीं-कशीं.
केउती-कोणती.
केउतें-कशाचें.
केका-मयूरशब्द.
केकी-मयूर.
केडणें-तुच्छ मानणें.
केणें-व्यापाराचा माल.
केतु-ध्वज.
केली-क्रीडा.
केंवि-कसें.
केंविलवाणें-दीनवाणें.
केंसर-कमळतंतु, केंशर.
केसरी-सिंह.
कैं-केव्हां.
कैटभारी-कैटभासुरहंता-विष्णु.
कैरविणी-चंद्रविकासी कमळाची वेल.
कैवर्तक-ढीवर, कोळी.
कैवल्य-मोक्ष.
कैवल्यदानी-मोक्षदाता.
कोकशाळा-कसबीण.
कोठिगा-कोडगा.
कोड-कौतुक, हौस.
कोडा-कोटी.
कोडें-कौतुकानें.
कोढी-कोटी.
कोंदाटलें-दाटलें, भरलें.
कोपा-झोपडी.
कोंभ } -अंकुर, मोड.
कोंब }
कोमेला-निस्तेज झाला.
कोयाळ-कोकिळ.
कोष्ठ-उदर.
कौपीन-लंगोटी.
कौशिक विश्वामित्र.
कौस्तुभ-विष्णूच्या गळ्यांतील रत्नविशेष.
कौलिक-मांत्रिक.
क्रतु-यज्ञ.
क्रोड-डुकर.
क्रोष्टा-कोल्हा.

क्लीब-नपुंसक.

ख.

ख-आकाश.
खग-पक्षी.
खगगमन-गरुडवाहन-विष्णु.
खंगली-कृश झाली.
खगेंद्र-गरुड.
खचरी-राक्षसी.
खंजन-ताजवा पक्षी.
खडतर-उग्र.
खडतरला-आदळला, खोंचला.
खंडज्ञान-अल्पज्ञान.
खत-पत्र.
खंत / खंती -खेद, काळजीनें झुरणें.
खद्योत-काजवा.
खनि-खाण.
खंबाइत-उंचीवस्त्र.
खल्वाट-टकल्या.
खर-तीक्ष्ण.२गाढव.३एक राक्षस.
खंबाळें-खंबायती वस्त्र.
खवंद-फोड वगैरे होऊन क्षत पडतें तें.
खाणुगें-खाद्य, खाऊ.
खाजें-खाद्य.
खांडा-एके प्रकारची तरवार; हिचें पातें रुंद असून हिला दोहोंकडे धार असत्ये.
खाडाणें-लाथाळ.
खांडावया-तोडावया.
खांडियाची-शस्त्राची.
खाणी-खाण. जारज, अंडज, स्वेदज आणि उद्भिद ह्या चार खाणी आहेत.
खासदार-मोतद्दार.
खुर्द-लहान, अल्प.
खेटक-ढाल.
खेव / खेवो -आलिंगन.

ग.

गगन-आकाश.
गगनग-आकाशसंचारी-देव.
गगनवाणी-आकाशवाणी.
गजगमा-गजगामीनी-स्त्री.
गजपुर-हस्तिनापूर.
गजबज-गडबड.
गजहंता-सिंह.
गणप-गणपति.
गणिका-वेश्या.
गंड-अनिष्ट, संकट. गंडस्थल, गाल.
गत-गेलेले.
गततंद्र-ज्याचा आळस गेला आहे तो.
गतवयस्क-म्हातारा, वृद्ध.
गदारोळी-मोठ्यानें.
गदीश / गदीन गदा युद्धांत निष्णात.
गद्य-वाक्यरूप ग्रंथ.
गभस्ति-सूर्य.
गभीर-गंभीर, खोल.
गमणें-काळ सुखानें जाणें.
गर / गरल -विष.
गरगल-विषकंठ-शिव.
गरिमा-मोठेपणा.
गरी / गुर्वी -श्रेष्ठ.
गरिबनवाज-दीनरक्षक.
गरुद्रथ-गरुडपक्षी.
गल्ल-गाल.

गवसणी-आच्छादन, आवरण.
गव्हर-गुहा, गुह्य, मर्म, तत्त्व.
गव्यादि-धर्मपोवई, अन्नसत्र.
गवाक्ष-धारें, झरोका.
गहन-अरण्य. २ खोल.
गळदंई-हत्तीच्या मानेवरून रिकिबीप्रमाणें चढण्यासाठीं सोडलेली दोरी. किलावा.
गांग-गंगेचें.
गांगेय-गंगेचा पुत्र-भीष्म.
गांजणें-छळणें.
गाजी-शूर.
गांठींचें-पदरचें.
गांडीव-अर्जुनाचें धनुष्य.
गाढ-दृढ.
गांढ-दुर्बल, नपुंसक.
गात्र-शरीर.
गांधर्व-स्त्री पुरुषांचा परस्पर प्रीतीनें विवाह, २ गंधर्वांचें.
गांधार-दुर्योधन.
गाधिज-विश्वामित्र.
गावाळ-निरुपयोगी फुटकळ ग्रंथ.
गाभिणी-सगर्भा, गाभण.
गायन-गाणें. २ गाणारा.
गाली-शिव्या.
गांव-योजन, ४ कोस.
गांवढा-गांवढळ, अडाणी.
गावलगणी-संजयाचें दुसरें नांव.
गाळितिया-गाळण्याचे वस्त्रांत.
गिरा-वाणी, वाक्य.
गिरिधर-गोवर्धनपर्वतधारणकरणारा, कृष्ण.
गिरिश-सदाशिव.
गिवसणें-मिळवणें.
गिवसीत-सांपडत.

गी-वाणी, सरस्वती.
गीत-गाणें.
गीर्वाण-देव. २ संस्कृत भाषा.
गीष्पति-बृहस्पति.
गुज-गुह्य.
गुंजारव-गुंगुं असा ( भुंग्याचा ) शब्द.
गुडाकेश-अर्जुन.
गुंडून-गुंडाळून.
गुण-दोरी.
गुणगुणी-हळूहळू पुटपुटे
गुरु-१ बाप. २ वडील. ३ उपदेष्टा. ४ जड, ५ मोठा.
गुह-कार्तिकस्वामी.
गूज-गुह्य. २ अनिर्वेद्य.
गृध्र-गिधाड.
गृहसंमार्जन-घरांतील सडासारवण
गेह-घर.
गै-हयगय.
गोठण-गोठा.
गोठी-गोष्ट.
गोत्र-पर्वत. २ वंश.
गोधन-गाईचा समुदाय.
गोपायिता-रक्षणकर्ता.
गोपुर-शहरचा दरवाजा. २ शहरच्या किंवा देवळाच्या किंवा राजवाड्याच्या दरवाज्यावर बांधलेली उच इमारत.
गोप्ता-रक्षण करणारा.
गोमटें-सुंदर, चांगलें, प्रिय.
गोरटी-गोमटी.
गोरोचन-गाईच्या डोक्यांतलें पीत द्रव्य.
गोवा } -गुंता.
गोवी }

गोंविला-गुंतविला.
गोहि-साक्ष.
गोहो-नवरा.
गौरविता-शोभविणारा.
ग्रासहरी-कुतरा.
ग्रास-घास.
ग्रीवा-मान,गळा.
ग्लह-पण,डाव.
ग्वाही-साक्षी.

घ.

घटना-घडवून आणण्यांची तजवीज-योजना.
घटा-हत्ती किंवा मेघ यांचा समुदाय.
घडा- १ घट. २ घागर. ३ घटका ४ मोड. ५ जम.
घनघटा-मेघसमुदाय.
घनदाट-गच्च भरलेला.
घनरस- १ कापूर. २ उदक.
घनसार- १ चंदन. २ कापूर.
घरघेणा-घरबुडव्या.
घरटा-स्थान.
घापे-पोंहचें.
घामेजेना-श्रांत होईना.
घांस-गवत.
घूर्णिका-दासी.
घृत-तूप.
घेयिजेना-घेईना.
घोटक-घोडा.
घोटी-गिळी.
घोटूं-गिळायास.
घोर-क्रूर,भयंकर.
घोष-१ शब्द. २ गोठा. ३ गौळवाडा.
घोसलें-घोंस.
घ्राण-नाक.

च.

चकित-भ्यालेला.
चकोर-पक्षिविशेष. हा चंद्रकिरणावर उपजीवन पावतो अशी प्रसिद्धि आहे.
चक्र-चक्रवाक पक्षी.
चक्रवर्ती-सार्वभौमराजा.
चक्रवाल-मंडल,वर्तुल.
चक्रव्यूह-सैन्याची चक्राकार रचना.
चखोट-चांगला.
चंचू-चोंच.
चटक-चिमणी.
चंड-मोठा.
चंडांशु-सूर्य.
चणक-हरबरे.
चतुरानन-ब्रह्मदेव.
चतुर्दश-चवदा.
चतुःशत-चारशें.
चतुष्षष्टि-चौसष्ठ.
चद्रमौळी-महादेव.
चंद्रशाळा-सर्वांहून उंचमाडी.
चपला-वीज.
चपेटा-नाश, फस्त.
चपेटे-वेग.
चमू-सैन्य.
चर्म-१ ढाल. २ कातडें.
चरण-पाय.
चरम-शेवटला.
चराचर-स्थावर जंगम सृष्टि.
चवडा-रुंद.
चवर-चवरी.
चवी-बऱ्या वाइटाची परीक्षा. गोडी.

चषूक-धूनपात्र.
चळश-रास, चवड.
चाकाटला-थक्क जाला, चकित झाला.
चांग-चांगला.
चांगुणा-श्रियाळराजाची स्त्री.
चाचरणें-अडखळणें.
चांचूवरी-चोंचेंत.
चाड-आवड.
चाप-धनुष्य.
चामर-चवरी.
चामीकर-सुवर्ण, सोनें.
चार-चेष्टा.
चारदेह-१स्थूळदेह. २ सूक्ष्मदेह. ३ कारणदेह. ४ महाकारणदेह.
चारु-सुंदर.
चावळे-बडबडे.
चाळूं-हालवूं.
चिकित्सा-रोगाची परीक्षा.२रोगाचें निराकरण.
चित्-ज्ञान.
चित्तचतुष्टय-मन, बुद्धि, चित्त, आणि अहंकार.
चीर-वस्त्र.
चुकूर-चकित.
चुपीत-दाबीत.
चूडामणि-शिरोरत्न.
चेइरें-जागृति.
चेटकें-चेटूक.
चेतना-जीवित्व, चलन वलन.
चेतवे-खवळे.
चेल, चैल-वस्त्र.
चेववी, चेष्टवी-सचेतन करी, जीववी.
चोख-चांगला.
चोखाळपण-चोखपण.
चोखाळिल्या-शुद्ध केल्या.
चोज-कौतुक.
चोहट-चव्हाटा.
चोजवविली-चोळली, माखिली.
चौगुणीनें-चौपटीनें.
चौढाळ-जातिधर्मविरहितआचरण.
चौधरी-पाटलाचा हस्तक एक अधिकारी, सरदेशमुख, चौगुला.
चौसांचा-चार वेद आणि साहा शास्त्रें यांचा.

छ.

छंद-वृत्त. २ नाद, चट.
छद्म-कपट.
छळ-गांजणूक.
छात्र-शिष्य.
छायानायक-सूर्य.
छायापुरुष-सांवली व पुरुष.
छावा-हत्तीचा बालक.

ज.

जई-जेव्हां.
जगढाल-ध्वज, झेंडा.
जंगम-मनुष्य, पशुपक्षी, इ
जघन्य-नीच, कनिष्ठ.
जंघाळ-उंच. २ वेगवान्.
जंघी-जंघावंत. २ त्वरितगति.
जटी-जटायुक्त, तपस्वी.
जठर-पोट.
जडभारी-संकट.
जथिलें-जमविलें, सांचविलें.
जधीं-जेव्हां.
जनक-बाप. २ एक राजा.
जनकतनया-सीता.
जनपद-देश.

जन्मदा-आई.
जनिता-बाप
जनु-जन्म.
जन्हुकन्या-भागीरथी.
जंबीर-ईडनिंबू.
जंबू-जांभूळ.
जयंती-जिंकणारी.
जरठ-म्हातारा.
जरा-म्हातारपण.
जर्जरित-म्हातारपणानें थकलेला. जुना, फाटका.
जलचर-मत्स्य वगैरे पाण्यांतील प्राणी.
जलाशय-सरोवर, तळें, डोह.
जल्पना-बडबड.
जव-वेग.
जवन-वेगवान्.
जलद्जाल / जळद्जाल -मेघमंडळ.
जाइजणें-नाशवंत.
जागीर-जहागीर.
जाच-गांजणूक.
जाची-पीडी.
जाजावती-बोलती, बडबडती.
जाण-जाणणार.
जागवलें-समजलें.
जाणीव-ज्ञान-आत्मज्ञान.
जाति-जाईची वेल.
जान्हवी-भागीरथी.
जानु-गुडघा.
जाया-बायको.
जायीजिणें-नाशवंत.
जाल-समुदाय.
जावळे-आवळे जावळे.
जिणें-वांचणें, जीवन.
जितावें / जिणावें -जिंकावें.
जितेंद्रिय-ज्यांनीं इंद्रियांचें दमण केलें ते.
जिवलग-प्राणप्रिय.
जिव्हार-मर्मस्थान.
जिष्णु-इंद्र. २ विष्णु. ३ अर्जुन. ४ जयशील.
जीन-जीर्ण. २ म्हातारा.
जीमूत-मेघ.
जीव-प्राण. २ बृहस्पति.
जीवखाणी-जीवयोनि.
जीवन-वांचणें २ पाणी.
जीवविलें-वांचविलें.
जुनाट-प्राचीन.
जेंवि-जेवीं-जसें, २ जेव्हां.
जेधवां-जेव्हां.
जैं-जेव्हां.
जोगी-गोसावी.
जोपा-पालन, रक्षण, जतन.
जोहारी-रत्नपारखी.
जौंजार-त्रास, कंटाळा.
ज्या-धनुष्याची दोरी.
ज्येष्ठ-वडील, मोठा.
ज्योतिर्विद्-ज्योतिषी.
ज्योत्स्ना-चांदणें.
ज्वलन-अग्नि.

झ.

झकवितां-फसवितां.
झगडा-युद्ध.
झटिति-लवकर, लागलेंच.
झडपणी-निरसन.
झणी-सत्वर.२एकाएकी.३नजाणा कदाचित्.
झष-मासा.

झळंबला-चिकटला.
झांकोळला-व्यापला.
झाडा-झडती २ निरास.
झुंजार-योद्धा.
झेला-झुपका.
झोंटधरणी-केशधरणी.
झोंटी-डोईचे लांब केश.
झोडा-दांडग्या, निलाजऱ्या.

ट.

टकमक-चकितपणा२चकितपणानें
टकळा-छंद, ध्यास.
टाकाटाकी-त्वरेनें.
टांचराच्या-टांचेच्या.
टाहो-सतत ओरडणें.
टोणपा-लाकडाचा ठोकळा२मूर्ख.
टोप-मुकुट.

ठ.

ठसावे-ठसे.
ठाणमाण-शरीराचा बांधा.
ठाय-ठिकाण, स्थान.
ठायींपाडी-थांग लावी.
ठाव-स्थान-ठिकाण.
ठेला-राहिला २ उभा राहिला.
ठेली-कुंठित झाली२उभी राहिली.
ठोंबरा-बुकुंदा.

ड.

डगमगीना-घाबरा होईना.
डाई-डाव, सरसी, वर्चस्व.
डांगें-झाडी.
डोर-झगा.
डोरला-झांकला.

ढ.

ढका-धक्का.
ढक्का-डमरु.
ढाळ-उतार.
ढाळिते-वारिते, हालविते.
ढाळी-ओती. २ टाकी.

त.

तई-तेव्हां.
तगटे-झटे.
तटाकीं-तळ्यांत.
तडके-पडे, फुटे.
तडाग-तळें.
तडीतापडी-गोसावी, बैरागी.
तति-समुदाय.
तंतू-सूत्र २ वात.
तत्वतां-खरेपणानें, निश्चयें.
तर्धी-तेव्हां.
तप-ग्रीष्मऋतु.
तपन-सूर्य.
तम-अंधकार.
तमोहर-सूर्य
तरंडक-नौका.
तरणि-सूर्य.
तराजे-तागडीनें.
तरी-नौका.
तर्जन-भर्जन-निंदा. जांच, धिक्कारून बोलणें.
तर्णक-वत्स. वासरूं
तवक-क्रोध, उकळी,आवेश.
तहशील-वसूलपट्टी.
तळपणें-चमकणें.
तळपट-सत्यानास-
तळवट-खालचा प्रदेश.
तक्षक-सर्पविशेष.
तात-बाप.
तांडव-नृत्यविशेष.
तांतडी-त्वरेनें.
तादात्म्य-ऐक्य.
तापणें-शेकणें.

तापसी-ऋषिपत्नी. बिचारी.
तामरस-कमळ.
तामरसाक्ष-कमलाक्ष.
तार-उंच. ( स्वर ).
ताराधीश-चंद्र.
तारुवें / तारू -नौका, जहाज.
तावी-संतप्त करी.
ताळोचीताळ-ताडाचावृक्ष.
तितिक्षा-क्षमा, शांति.
तिमाणें-पाखरांनीं शेत खाऊं नये म्हणून केलेलें बुजगावणें.
तिमिर-अंधकार.
तिवाशी-तक्या, २ गिरदी, ३ गादी.
तुकणें-बरोबरी करणें.
तुकविणें-हालविणें.
तुकीं-पारड्यांत, २ कसोटीस
तुंग-उच्च.
तुझेनी-तुझ्यानें.
तुंड-तोंड
तुंबळ-अतिशयित, फार.
तुंबळे-दाटे, भरे.
तुमुल-तुंबळ, निकराचें.
तुरगी-घोडी.
तुरंबणें-हुंगणें.
तुला-साम्य.
तुळय-कापूस.
तुळितां-तोलून पाहतां.
तुळि-हालवा.
तूण / तूणीर -भाता.
तूर्ण-लौकर.
तूर्य-वाद्य.
तूळ-कापूस.
तेजाळ-तेजस्वी.
तेजी-घोडा.
तेजोनिधि-सूर्य.
तेविं / तेवी -तसें, २ तेव्हां.
तैं-तेव्हां.
तोक-बाळक.
तोख-संतोष.
तोडर-तोडरी, पादभूषण.
तोबा-अरेरे, अहाहा.
तोरा-झोंक, डौल. नखरा.
तोय-पाणी.
तोष-संतोष.
त्रपाकंचुक-लज्जाकवच.
त्राणें-रक्षण.
त्राहाटिल्या-सिद्धकेल्या, २ वाजविल्या.
त्रितय-तीन पदार्थांचा समुदाय.
त्रिदश-देव.
त्रिपाद-अग्नि.
त्रिपुटी-कर्ता, क्रिया, कर्म.
त्रिवाचा-सत्य, सत्य; खरेंच.
त्रिशुद्धि-त्रिवारशुद्धि, २ निश्चयें.

थ.

थडी-कड, तीर.
थाटी-समुदाय.
थार-थारा, आश्रय.
थिटें-अभें, लहान.
थिल्लर-पाण्याचें डबकें.
थीत-व्यर्थ.
थोकडें-थोडें.
थोरावे-वाढे.
थोरीव-मोठेपणा.

द.

दचक-धाक.
दंडधर-यम.

झळंबला-चिकटला.
झांकोळला-व्यापला.
झाडा-झडती २ निरास.
झुंजार-योद्धा.
झेला-झुपका.
झोंटधरणी-केशधरणी.
झोंटी-डोईचे लांब केश.
झोडा-दांडग्या, निलाजऱ्या.

ट.

टकमक-चकितपणा२चकितपणानें
टकळा-छंद, ध्यास.
टाकाटाको-त्वरेनें.
टांचराच्या-टांचेच्या.
टाहो-सतत ओरडणें.
टोणपा-लाकडाचा ठोकळा२मूर्ख.
टोप-मुकुट.

ठ.

ठसावे-ठसे.
ठाणमाण-शरीराचा बांधा.
ठाय-ठिकाण, स्थान.
ठायींपाडी-थांग लावी.
ठाव-स्थान-ठिकाण.
ठेला-राहिला २ उभा राहिला.
ठेली-कुंठित झाली२उभी राहिली.
ठोंबरा-बुकुंदा.

ड.

डगमगीना-घाबरा होईना.
डाई-डाव, सरसी, वर्चस्व.
डांगें-झाडी.
डौर-झगा.
डौरला-झांकला.

ढ.

ढका-धक्का.
ढक्का-डमरु.
ढाळ-उतार.
ढाळिते-वारिते, हालविते.
ढाळो-ओती. २ टाकी.

त.

तई-तेव्हां.
तगटे-झटे.
तटाकीं-तळ्यांत.
तडके-पडे, फुटे.
तडाग-तळें.
तडीतापडो-गोसावी, बैरागी.
तति-समुदाय.
तंतू-सूत्र २ वात.
तत्वतां-खरेपणानें, निश्चयें.
तर्धी-तेव्हां.
तप-ग्रीष्मऋतु.
तपन-सूर्य.
तम-अंधकार.
तमोहर-सूर्य
तरंडक-नौका.
तरणि-सूर्य.
तराजे-तागडीनें.
तरी-नौका.
तर्जन-भर्जन-निंदा, जांच, धिक्कारून बोलणें.
तर्णक-वत्स. वासरूं
तवक-क्रोध, उकळी,आवेश.
तहशील-वसूलपट्टी.
तळपणें-चमकणें.
तळपट-सत्यानास-
तळवट-खालचा प्रदेश.
तक्षक-सर्पविशेष.
तात-बाप.
तांडव-नृत्यविशेष.
तांतडी-त्वरेनें.
तादात्म्य-ऐक्य.
तापणें-शेकणें.

तापसी-ऋषिपत्नी. बिचारी.
तामरस-कमळ.
तामरसाक्ष-कमलाक्ष.
तार-उंच. ( स्वर ).
ताराधीश-चंद्र.
तारुवें, तारू -नौका, जहाज.
तावी-संतप्त करी.
ताळीचीताळ-ताडाचावृक्ष.
तितिक्षा-क्षमा, शांति.
तिमाणें-पाखरांनीं शेत खाऊं नये म्हणून केलेलें बुजगावणें.
तिमिर-अंधकार.
तिवाशी-तक्या, २ गिरदी, ३ गादी.
तुकणें-बरोबरी करणें.
तुकविणें-हालविणें.
तुकीं-पारड्यांत, २ कसोटीस
तुंग-उच्च.
तुझेनी-तुझ्यानें.
तुंड-तोंड
तुंबळ-अतिशयित, फार.
तुंबळे-दाटे, भरे.
तुमुल-तुंबळ, भिकराचें.
तुरगी-घोडी.
तुरंबणें-हुंगणें.
तुला-साम्य.
तुळय-कापूस.
तुळितां-तोलून पाहतां.
तुळि-हालवा.
तूण, तूणीर -भाता.
तूर्ण-लौकर.
तूर्य-वाद्य.
तूळ-कापूस.
तेजाळ-तेजस्वी.
तेजी-घोडा.
तेजोनिधि-सूर्य.
तेविं, तेवी -तसें, २ तेव्हां.
तैं-तेव्हां.
तोक-बाळक.
तोख-संतोष.
तोडर-तोडरी, पादभूषण.
तोबा-अरेरे, अहाहा.
तोरा-झोंक, डौल. नखरा.
तोय-पाणी.
तोष-संतोष.
त्रपाकंचुक-लज्जाकवच.
त्राण-रक्षण.
त्राहाटिल्या-सिद्धकेल्या, २ वाजविल्या.
त्रितय-तीन पदार्थांचा समुदाय.
त्रिदश-देव.
त्रिपाद-अग्नि.
त्रिपुटी-कर्ता, क्रिया, कर्म.
त्रिवाचा-सत्य, सत्य; खरेंच.
त्रिशुद्धि-त्रिवारशुद्ध, २ निश्चयें.

थ.

थडी-कड, तीर.
थाटी-समुदाय.
थार-थारा, आश्रय.
थिटें-अभें, लहान.
थिल्लर-पाण्याचें डबकें.
थीत-व्यर्थ.
थोकडें-थोडें.
थोरावे-वाढे.
थोरीव-मोठेपणा.

द.

दचक-धाक.
दंडधर-यम.

दंती-हत्ती.
दंदशूक-सर्प.
दंडिया-योद्धा.
दनुज-दैत्य.
दभ्र-अल्प.
दंपती-मेहुण.नवरा बायको.
दमयंती-गर्वहरण करणारी, २ नळस्त्री.
दमुनी-नाशुनी.
दयाळ-दयाळू.
दयित-प्रिय.
दर-शंख, २ भय, ३ ईषत,थोडें.
दरिद्र-दरिद्री.
दरी-गुहा.
दर्वी-पळी.
दर्वीकर-सर्प.
दर्शनें-षड्दर्शनें,सहा शास्त्रें.
दव-दावानळ, वणवा, २ वन, अरण्य.
दवस्थ-वणव्यांत सांपडलेला.
दशकंधर-दशकंठ,रावण.
दशन-दांत.
दशशतमुखांग-शेषाचा देह.
दशस्यंदन-दशरथ.
दशानन-रावण.
दंष्ट्री-दाढ.
दस्र-अश्विनीकुमार.
दसोडी-दशी.
दळ-ल-सैन्य. २पाकळी.
दळवाडें-जाडपणा, २ समुदाय.
दक्षकरें-दक्षिण हस्तें, उजव्या-हातें.
दक्षिण-उजवा, २ दक्षिण दिशा.
दाटणी-निबिडता, दाटी.
दांतवले-हस्तिदंताचें केलेलें भूषण.
दादुला-नवरा.
दान्त-इंद्रियदमन करणारा.
दापी-दाबी, धमकावी,
दाम-पुष्पमाला, २ दावें.
दामोदर-कृष्ण.
दाय-पितृधन, २ वांटा.
दायाद-भाऊबंद.
दारा-स्त्री, बायको.
दारु-काष्ठ.
दारुक-कृष्णाचा सारथी.
दारुण-क्रूर,कठिण, भयंकर.
दारेचुडा-सुताच्या वांकी, कंगण्या वगैर.
दाव-दावानळ, वणवा, २ वन, अरण्य.
दावार्त-वणव्यानें पीडित
दाक्षिण्य-औदार्य.
दिठा-दृष्टि, दर्शन.
दिठि, दिठिवा -दृष्टि.
दिनमणि-सूर्य.
दिनराज-सूर्य.
दिव्य-स्वर्गातील सुंदर.
दिव्यरस-अमृत.
दीप्ति-प्रकाश, कांति, तेज.
दुखंड-दुभंग.
दुग्धसार-तूप.
दुग्धोदधि-क्षीरसमुद्र.
दुणावे-दुप्पट होई.
दुधिया-पांढरा भोपळा.
दुबळा-दरिद्री, २ अशक्त.
दुभणी-दोहन,दोह.
दुभे-प्रसवे.
दुराप-प्राप्त होण्यास कठिण.
दरित-पातक

दुरुक्ति-दुर्भाषण.
दुर्गत-दरिद्री.
दुर्गा-पार्वती.
दुर्निवार-वारण करण्यास अशक्य.
दुर्द्दद-दुष्ट.
दुर्वह-धारण करण्यास अशक्य.
दुलडी-गळ्यांतील दागिना.
दुष्कर-करायास कठिण.
दुहणें-दूध काढणें.
दुहिता-कन्या. २ सून.
दूती-सुवास, सुगंध.
दून-दु:खित, तप्त.
दूरशी-रजस्वला.
देवगर्भ-देवतुल्य.
देवतटिनी-भागीरथी.
देवदत्त-अर्जुनाच्या शंखाचें नांव.
देवधाडी-अकस्मात् आलेलें महत् संकट.
देवर-दीर.
देवराज-इंद्र.
देवलसी-देवळांत राहणारा, साधु.
देवव्रत-भीष्म.
देवाद्य-महादेव.
देवांगना-देवांच्या स्त्रिया.
देवापगा-गंगा.
देवी-देवांगना, २ राजाची पत्नी, राणी
देवेंद्र-इंद्र.
देशधडी-देशपार.
देशिक-गुरु.
देसवटा-स्थान, प्रदेश.
देहअभिमान-देहच मी अशी बुद्धि.
देहांतर-अन्य देह.
देहुडी-चौकी.

देव्हारें-देवालय.
दैन्यवाणा-बापुडा.
दैवहत } -दुर्दैवी, करंटा.
दैवहतक }
द्युति-कांति.
द्युमणि-सूर्य.
द्रविण-पैसा.
द्रौणि-द्रोणपुत्र, अश्वत्थामा.
द्वंद्वयुद्ध-कुस्ती.
द्वंद्वें-सुखदु:खादि युग्में.
द्वारावती-द्वारका.
द्विज-दंत, २ ब्राह्मण, ३ पक्षी
द्विजाति-ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य हे.
द्विजराज-चंद्र.
द्विप-गज, हत्ती.
द्वैत-भेदबुद्धि,
द्वैपायन-व्यास

## ध.

धडाडीत-जळत.
धणी-लाभ, तृप्ति, वैपुल्य.
धत्तूर-धोतरा.
धन-द्रव्य.
धनद-कुबेर.
धनंजय-अर्जुन, २ अग्नि.
धन्व-धनुष्य.
धन्वी-धनुष्य धारण करणारा.
धमनी-फुकणी, २ शीर.
धर-पर्वत.
धरमधका-कार्य न होतां व्यर्थ जे श्रम पडतात ते.
धर्म-यमधर्म.
धर्षण-दांडगेपणा.
धरणी } -पृथ्वी.
धरा }

